महामुनि आदिकवि श्रीवाल्मीकिप्रणीत

# श्रीरामायण महाकाव्य

[ द्वितीय भाग ]

(२)

## अयोध्या-काण्ड

( पूर्वार्ध )

( मराठी अनुवाद व उपसंहार यांसहित )


संपादक

**श्रीपाद दामोदर सातवळेकर.**

अध्यक्ष, स्वाध्याय-मण्डल, औंध.

**विष्णु दामोदरशास्त्री पण्डित** ( तोपखाने )

वाल्मीकि-वाक्यप्रदीप, आर्मी आर्डिनेन्स-रिटायर्ड, ग्वाल्हेर.



**प्रथम आवृत्ति.**

शके १८६४, सन १९४२

मूल्य ३ रु०

# अयोध्या–काण्ड

## ( पूर्वार्ध )

अयोध्याकाण्डाचा हा पूर्वार्ध, मराठी अनुवाद व निरीक्षण यांसह वाचकांच्या पुढे ठेवीत आहों. या भागामध्ये दशरथाच्या कौटुंबिक स्थितीचें उत्तम चित्र कवीने वर्णिलें आहे. दशरथाच्या ३५० स्त्रिया असून, त्यांत मुख्य राण्या तीन होत्या. यांचे आपसांतील संबंध कसे होते व त्यांच्या आपसांतील वागणुकीमुळे दशरथाची कौटुंबिक स्थिति कशी झालेली होती, यासंबंधाने जें आदि कवीने या महाकाव्यांत वर्णन केलें आहे, तें आजहि चित्ताकर्षक वाटल्यावाचून राहणार नाही.

हें समग्र वर्णन या विभागांत आलेलें आहे. तें हृदयंगम तर आहेच; पण बोधप्रदही आहे. वाचकांनी याचा सूक्ष्म अभ्यास करावा. यासाठी विस्तृत निरीक्षणासह तें वाचकांच्या पुढे ठेवीत आहों. तें पहिल्या भागाप्रमाणेच वाचकांना आकर्षक वाटेल, अशी आम्हांस आशा आहे.

या काण्डांतील चित्रें श्री० बाबुराव संतराम सावंत चित्रकार, पुणें, यांनी काढलेलीं आहेत, याबद्दल त्यांचे फार आभारी आहोंत.

'प्रकाशक'

### श्री वाल्मीकि रामायणाच्या

# अयोध्याकाण्डाच्या पूर्वार्धाची विषयसूची.

**सर्ग १, पृष्ठ १-१०**

भरत शत्रुघ्नासह मातुलगृहीं ( राजा अश्वपतीकडे ) रहावयास जातो (१-५). रामाचें गुणवर्णन ( ६-३५ ). "आपल्या डोळ्यांसमोर रामास राज्याभिषेक व्हावा," अशा इच्छेने दशरथ राजा सर्व मांडलिक, मन्त्री वगैरेंची सभा भरवितो. ( ३६-५१ )

**सर्ग २, पृ. १०-१९**

राजसभेमध्ये दशरथ राजाचें समयोचित भाषण होतें ( १-१५ ). मन्त्री व प्रजाजन रामराज्याभिषेकास संमति देतात ( १६-२५ ), आणि रामराज्याभिषेकाचें योग्य समर्थन करतात ( २६—५४ ).

**सर्ग ३, पृ. १९-२६**

रामाला राज्याभिषेक करण्याचें ठरतें ( १-७ ). वसिष्ठांच्या सांगण्याप्रमाणे सर्व तयारी होते ( ८-२६ ). राम राजसभेंत येतो व दशरथ त्याला उपदेश करतो ( २७-४६ ). सभेचें काम संपतें ( ४७-५० ).

**सर्ग ४, पृ. २७-३४**

दशरथ राजा रामाला पुनः आपल्याजवळ बोलावून आणतो व त्यास उपदेश करितो ( १-२८ ). नंतर राम कौसल्येच्या महालांत जातो व पुष्कळ वेळ मातापुत्रांचें संभाषण होतें ( ३१-३८ ). पुढे राम लक्ष्मणाला म्हणतो कीं, 'आता तूं या राज्याचा भोग घे,' असें म्हणून राम आपल्या मंदिराकडे निघून जातो ( ३९-४५ ).

**सर्ग ५, पृ. ३४-३८**

वसिष्ठ महर्षि रामाकडे येऊन उद्या अभिषेक आहे, त्यासाठी व्रतस्थ रहा असें सांगतात ( ६-१० ). अयोध्यानगरींत सर्व लोकांस आनंद होतो व सर्व जनता रामराज्याभिषेकाचा समारंभ पाहण्यास उत्सुक होते ( ११-२६ ).

**सर्ग ६, पृ० ३९-४३**

अयोध्येंत गुढ्या--तोरणें उभारलीं व नाचगाणें सुरू झालें. राम आपल्या मंदिरांत व्रतस्थ राहतो व प्रातःकालीं उठून स्नानसंध्या करून तयार होतो (१-१६). राम राजा होणार, म्हणून सर्वांनाच आनंद होतो व अभिषेकासाठीं आलेल्या अलोट जनसमुदायामुळे सर्व अयोध्या गजबजून जाते ( १७-२८ ).

**सर्ग ७, पृ० ४३-४९**

कैकेयीची दासी गच्चीवर गेली असतां ती अयोध्यानगर शृंगारलेलें पाहते व त्याचें कारण जवळच असलेल्या रामाच्या दाईला विचारते. तीहि रामाचा राज्याभिषेक आहे, म्हणून सांगते ( १-१० ). तें ऐकतांच मंथरेच्या पायाची तिडिक मस्तकास पोचते व ती लगेच कैकेयीला भेटून, तिचें मन बिघडविण्याचा प्रयत्न करते ( ११-३६ ).

**सर्ग ८, पृ० ४९-५६**

मंथरा कैकेयीला सांगते की, रामाला राज्याभिषेक झाला, तर त्यांत तुझा सत्यानाश होणार आहे. प्रथम हें तिला पटत नाही ( १-१९ ). मंथरेला अधिक राग येतो व ती कैकेयीला " रामाला वनवास व भरताला राज्य " देतां येईल, असें कर, म्हणून परोपरीनें समजाऊन सांगते ( २०-२९ ).

**सर्ग ९, पृ. ५६-६७**

मंथरेचें भाषण ऐकल्यावर कैकेयीची समजूत पटते व ती तिच्या म्हणण्याप्रमाणे करण्यास तयार होते व तिलाच विचारते की, असें घडण्यासाठीं काय करावें तें सांग ( १-४ ). प्रथम तूं रागावून बैस व राजा समजूत घालूं लागला, म्हणजे राजानें देऊं केलेल्या दोन वरांची त्यास आठवण करून, एका वरानें रामाला १४ वर्षे वनवास व दुसऱ्यानें भरताला राज्य मागून घे, असें मंथरा कैकेयीस करावयास सांगते ( ५-३० ). कैकेयी मंथरेच्या म्हणण्याप्रमाणे करण्याच्या तयारीस लागते ( ३१-६६ ).

**सर्ग १०, पृ. ६७-७४**

कैकेयी रुसून बसली. इकडे राजानें अभिषेकाची सर्व तयारी केल्यानंतर तो कैकेयीच्या महालाकडे गेला, तेव्हा ती तेथे नव्हती. दासीच्या सांगण्यावरून तो

क्रोधागारांत गेला ( १-२७ ). तेव्हा ती क्रुद्ध झाली आहे, असें त्यांस समजले व त्याने तिची पुष्कळ समजूत घातली. हवें तें माग, तें मी तुला देतों, असें तिला तो म्हणाला. ( २८-४१ ).

**सर्ग ११, पृ. ७४--७८**

कैकेयी दशरथास ' आपलें वचन पालन करीन, ' अशी प्रतिज्ञा करण्यास सांगते ( १-३ ). राजा त्याला प्रिय अशा रामाची शपथ घेऊन प्रतिज्ञा पालन करतों, असें त्रिवार म्हणतो ( ४-१० ). नंतर ती पूर्वी देऊ केलेल्या वरांची आठवण देते ( ११-२१ ). आणि एका वराने भरतास राज्याभिषेक व दुसऱ्या वराने रामास १४ वर्षे वनवास असे दोन वर मागते ( २२--२९ ).

**सर्ग १२, पृ. ७९-९६**

हें ऐकतांच राजाला मूर्च्छा येते. सावध झाल्यावर तो कैकेयीची बरीच निर्भर्त्सना करतो ( १--३४ ) व पुनः विनवणी करतो की, पृथ्वीवरील कोणतेंहि सुख तूं माग, पण माझा मृत्यु मागूं नको ( ३५--३६ ). पण कैकेयीला तें पटत नाही व ती आपलांच हट्ट धरून बसते ( ३७-३९ ). राजा तिची समजूत घालण्याचा यत्न करतो व पुष्कळ शोक करतो ( ५०--११२ ).

**सर्ग १३, पृ. ९७-१०१**

राजा स्वतः शोक करून मूर्च्छित होतो. येथेच रात्र पडते व तेथेच दुसऱ्या दिवशीं सकाळीं सूर्योदय होतो ( १--२७ ).

**सर्ग १४, पृ. १०१--१११**

राजाचें समजूत करण्यासाठी केलेलें कोणतेंच बोलणें विचारांत न घेतां, कैकेयी राजाला " माझें न ऐकलें, तर मी जीव देईन," म्हणून भीति घालते (१--१०). सकाळीं बाहेर अभिषेकाची तयारी सुरू आहे, अशा वेळीं दशरथाची आज्ञा नसतांच कैकेयीने सुमंत्रास म्हटलें की रामाला येथे महालांत घेऊन ये(११-६०). ' राजाची आज्ञा नसतां मी त्यांस कसें बोलावूं,' असे सुमंत्र म्हणाला. तेव्हा दशरथाने त्यास रामाला आणण्यास सांगितलें ( ६०--६७ ).

**सर्ग १५, पृ. १११--११९**

राजमण्डपांत अभिषेकाकरिता सर्व लोक तयार झाले आहेत. वसिष्ठादिक ऋषि

तेथे जमले आहेत. अशा वेळीं सुमंत्र रामास बोलविण्याकरिता रामाच्या मंदिराकडे गेला ( १--४८ ).

**सर्ग १६, पृ० ११९--१२७**

सुमंत्र दशरथाचा व कैकेयीचा निरोप रामास सांगतो. राम कैकेयीच्या वाड्यांत येण्यासाठीं निघतो, सीता दरवाजापर्यन्त पोचविण्यास येते. राम रथांतून दशरथाच्या वाड्याकडे जातो ( १--४७ ).

**सर्ग १७, पृ० १२७--१३०**

मार्गातून राम येत असतां त्यावर लाह्या फुलें वगैरेंचा वर्षाव पुरवासी लोक करतात, अशा रीतीने थोरांचे आशीर्वाद घेतघेत राम राजवाड्यांत शिरतो व बाकीचे लोक बाहेरच थांबतात ( १--२३ ).

**सर्ग १८, पृ० १३१--१३७**

पितापुत्र--भेट होते ( १--५ ). दशरथाची क्षीण मुद्रा पाहून तसें होण्याचें कारण कैकेयीमातेस राम विचारितो ( ६--१८ ). कैकेयी त्यास सांगते की, राजाने पूर्वी मला दोन वर दिले होते, त्यांतील एकाने तूं वनवासास जावें व दुसऱ्याने तुझ्या राज्याभिषेकाकरिता केलेल्या तयारीने भरताला राज्याभिषेक करावा, अशी राजाची इच्छा आहे. यासाठीं तसें तूं कर व राजाचें रक्षण कर ( १९--४१ ).

**सर्ग १९, पृ० १३७--१४५**

राम तसें करण्यास तयार होतो, पण म्हणतो की, राजा स्वतःच असें मला कां म्हणत नाहीं ? (१--७). त्यावर कैकेयी म्हणते की-- तूं वनांत जाईपर्यंत राजा जेवणारही नाहीं, यासाठीं लवकर आटोप. हें ऐकून राजा रडतो (८--२७). राम, कैकेयी व दशरथ यांस प्रदक्षिणा करून, त्यांचा निरोप घेतो. राज्याभिषेकसामग्रीला प्रदक्षिणा करून तो बाहेर पडतो. छत्रचामरें न घेतां तेथून तो पायींच कौसल्येच्या महालाकडे जातो ( २८--४० ).

**सर्ग २०, पृ. १४५--१५३**

राम वनांत जाणार या कल्पनेने दशरथाच्या अन्तःपुरांत रडारड सुरू होते ( १--५ ). राम कौसल्येच्या दर्शनास निर्विकार मनाने गेला, त्या वेळीं कौसल्या

ध्यान व हवन करीत बसली होती. राम हा घडलेला सर्व वृत्तांत तिला सांगतो ( ६--३१ ). हें एकून कौसल्या मूर्च्छित होते व नंतर शुद्धीवर येऊन, ती फार शोक करते ( ३२--५५ )

**सर्ग २१, पृ. १५४--१६४**

लक्ष्मण दशरथाची रामाला वनांत पाठविण्याबद्दल निंदा करितो ( १--१९ ). त्या बोलण्यास कौसल्या संमति दर्शविते आणि रामाच्या वनांत जाण्याचा निषेध करते. ( २०--२८ ). राम पित्याची आज्ञा पालनाचें महत्त्व सांगतो व वनांत जाण्याचें ठरवितो. शेवटीं कौसल्या त्यास अनुमति देते व स्वस्त्ययन करून आशीर्वादही देते ( २९--६४ ).

**सर्ग २२, पृ० १६४--१६८**

राम लक्ष्मणाला सांगतो की, हा वनवास भरतामुळे किंवा दशरथामुळे घडलेला नसून हा दैवाचा खेळ आहे. कैकेयीचा यांत कांहीच दोष नाही, दैवाशीं भांडून उपयोग काय ? ( १--३० )

**सर्ग २३, पृ० १६९--१७५**

लक्ष्मण रामाला म्हणतो की, पौरुषाशीं टक्कर देणाऱ्याने दैवाची प्रतिष्ठा का बाळगावी ? लक्ष्मणाने आवेशाचें भाषण करून, असें प्रतिपादिलें की मीच प्रतिपक्षीयांचा वध करून रामास राज्य देईन. हें एकून राम म्हणाला, ' मी पित्याचीच आज्ञा पाळणार आहें. मला राज्य नको आहे ' ( १--४२ ).

**सर्ग २४, पृ० १७९--१८१**

कौसल्या शोक करते व मी तुजबरोबर वनांत येतें, असें म्हणते (१-१२). राम तिला पातिव्रत्य-धर्माचा उपदेश करतो व दशरथाची सेवा करण्यासाठी तूं येथेच रहावेंस, हें तिला समजावितो ( १३-३१ ). तें ऐकून कौसल्या रामास वनांत जाण्याची अनुज्ञा देते ( ३२-३९ ).

**सर्ग २५, पृ० १८१--१८८**

कौसल्या रामाला वनवासांत त्रास होऊं नये, म्हणून देवांची पूजा करून, रामाचें सर्व बाजूंनी रक्षण करा, अशी अनेक देवतांची प्रार्थना करते व आनंदाने रामाला जाण्यास अनुमति देते. राम तेथून सीतेकडे येण्यास निघतो (१-४५).

## सर्ग २६, पृ० १८८।१९३

रामाचें खिन्न वदन पाहून सीतेला शंका येते. ती रामास या शुभ प्रसङ्गीं असे खिन्न कां दिसतां, असें विचारते ( १३।१८ ). राम तिला घडलेला सर्व वृत्तांत सांगून मी वनांत जात आहें, तूं येथेच रहा व देवांची, मातेची, पित्याची व भरताची सेवा कर, असा उपदेश करतो (१९।३८ ).

## सर्ग २७, पृ० १९३–१९७

हें भाषण ऐकून साता म्हणाली, प्रत्येक जण स्वतंत्र सुख भोगत असला, तरी स्त्री ही पतीच्या दैवाची भागीदारीण आहे. पतीला जी आज्ञा झाली, तीच स्त्रीला झालेली आहे. असें म्हणून ती आपणांस वनांत न्या, असें रामास विनवूं लागली. रामाने तिला हा हट्ट सोडण्याचा पुष्कळ आग्रह केला (१।२५).

## सर्ग २८, पृ० १९७--२०१

रामाने सीतेला तिने आपला हट्ट सोडावा, म्हणून वनवासांतील अनेक दुःखांचे वर्णन करून सांगितलें. राम वनांत नेण्यास तयार नाही, असें पाहून सीतेस वाईट वाटलें व ती म्हणाली की, तुमची सेवा करून मी वनांत राहीन (१-२६).

## सर्ग २९, पृ० २०२–२०५

सीता आपल्यास बरोबर घेऊन जाण्याविषयी रामाला आग्रह करते; तसें न झाल्यास मी प्राणत्याग करीन, असेहि म्हणते ( १--५ ). आपल्यासारखा शूर पति असतां मला कोणतीच काळजी करण्याचें कारण नाही. माझें व आपलें सुख-दुःख एकच आहे. पूर्वी ज्योतिषांनी मला वनवास घडणार, असें वर्तविलें होतें. तेंच आता प्राप्त झालें आहे, असें सीता म्हणाली ( ६--२० ). इतकें ऐकूनही रामाने तिला वनांत नेण्याचें कबूल केलें नाही ( २१--२४ ).

## सर्ग ३०, पृ० २०६–२१३

सीता रागाने रामाची निंदा करते व म्हणते की– मी वनांत तुमची सेवा करीन, तेथील दुःखामध्येच मला सुख आहे ( १--२० ). राम शेवटीं सीतेला नेण्यास तयार होतो, सीतेला आनंद होतो ( २१--४० ). नंतर ती ब्राह्मणांना दानें देते ( ४१--४६ ).

## सर्ग ३१, पृ० २१३--२१९

लक्ष्मण आपणांस वनांत नेण्याची विनन्ती रामाला करतो. राम त्याला मातापित्यांच्या सेवेसाठी तूं येथेच रहा, असें सांगतो; पण लक्ष्मणाचा फारच आग्रह पाहून शेवटीं वनांत ये म्हणून अनुमति देतो ( १--३७ ).

## सर्ग ३२, पृ० २१९–२२६

राम, लक्ष्मण व सीता यांनी वनांत जाण्याचा बेत ठरवून, त्यांनी सुयज्ञादिक ब्राह्मणांना व मित्रांना रत्नें, हिरे, सोनें, गाई, वस्त्रें इत्यादिकांचें यथेच्छ दान देऊन, ब्राह्मणांचे आशीर्वादही घेतले ( १।४६ ).

## सर्ग ३३, पृ० २२६।२३१

राम, लक्ष्मण व सीता दशरथाला भेटण्यासाठीं पायींच निघतात. तें पाहून गावांतील लोक कैकेयीची निर्भर्त्सना करतात. आम्ही रामाबरोबर वनांत जाऊं, रामाच्या योगानें वन हेंच नगर होईल व कैकेयीचें नगर हें वन बनेल, असें लोक बोलूं लागले. शोकमय वातावरण सर्व अयोध्यानगरींत पसरलें ( १--३१ ).

## सर्ग ३४, पृ० २३१–२४०

राम राजाला भेटण्यासाठी राजवाड्यांत येतो. तेथें सर्व राजस्त्रियाहि येतात ( १–१९ ). नंतर राम दशरथाची अनुज्ञा मागतो. दशरथाला मूर्च्छा येते. तो सावध झाल्यावर पितापुत्रांचें भाषण होतें. राम पित्राज्ञा हेंच आपलें कर्तव्य आहे, असें सांगतो. दशरथ त्याला आशीर्वाद देतो. कैकेयीशिवाय सर्व मंडळी शोकानें व्याकुल होतात ( २०।६१ ).

## सर्ग ३५, पृ० २४१–२४६

सुमंत्र कैकेयीवर रागावतो व तिची निंदा करतो ( १–१५ ). तिची आई अशीच होती, असें सांगून तिच्या आईची माहिती देतो ( १६—२९ ). नंतर तिची पुनः पुष्कळच निंदा करतो; पण कैकेयीवर त्याचा कांहीच परिणाम होत नाहीं ( ३०–३७ ).

## सर्ग ३६, पृ० २४६–२५१

दशरथ रामाबरोबर सैन्य वगैरे पाठविण्यास सुमन्त्रास सांगतो ( १--१० ).

कैकेयी त्याचा निषेध करते. नंतर सिद्धार्थ नामक प्रधान तिची अवहेलना करितो ( ११--३३ ).

**सर्ग ३७, पृ० २५१--२५७**

राम स्वतःच सैन्यवगैरे नको म्हणतो. तो दासीकडे वल्कलें मागतो; पण कैकेयी स्वतःच तीं त्यास आणून देते. सीतेला तीं वल्कलें नेसतां येत नाहींत ( १--१८ ). पुढे वसिष्ठ महर्षींचें भाषण ( १९--३७ ).

**सर्ग ३८, पृ० २५७--२५९**

दशरथ सीतेला वल्कलें दिल्याबद्दल कैकेयीची निर्भर्त्सना करतो व राम दशरथाला माता कौसल्येची काळजी घेण्यास सुचवितो ( १--१५ ).

**सर्ग ३९, पृ० २६०--२६६**

सुमन्त्र रामाला वनांत पोंचविण्यास रथ आणतो ( १--१५ ). दशरथ सीतेला दागिने व वस्त्रें वापरण्यासाठीं देतो. कौसल्या सीतेस उपदेश करते ( १६--३० ). सीतेचें उत्तर व राम सर्वांची क्षमा मागून आज्ञा घेतो ( ३१--४० ).

**सर्ग ४०, पृ० २६६--२७४**

लक्ष्मण व सीता यांचें कौसल्येला, सुमित्रेला वंदन व त्या प्रेमळ सुमित्रेचा लक्ष्मणास उपदेश ( १--१० ). सुमन्त्राने आणलेल्या रथांतून राम, लक्ष्मण व सीता वनांत निघाली. त्यांचा रथ जोराने चालूं लागला, तेव्हा नगरवासी लोक, दशरथ, वगैरे सर्व ' राम राम ' म्हणून आक्रोश करूं लागले ( ११--५१ ).

**सर्ग ४१, पृ० २७४--२७७**

अयोध्या शोकाने व्यापून जाते ( १--२० ).

**सर्ग ४२, पृ० २७७--२८३**

दशरथ राजा परत फिरून आपणांस कौसल्येच्या महालांत न्या, असें म्हणतो. तेथे कौसल्या व दशरथ दोघेंहि शोक करतात. ( १--३५ ).

**सर्ग ४३, पृ० २८३--२८६**

महा भयंकर अशा अरण्यांतील संकटांतून राम पुनः केव्हा परत येईल, असा विलाप कौसल्या करते ( १--२१ ).

**सर्ग ५१, पृ० ३२२-३२६**

रामाचा मुक्काम येथेच होतो. लक्ष्मण व गुह रात्रभर अनेक गोष्टी बोलतात. लक्ष्मणास अयोध्येची आठवण होते. घडलेला प्रकार ऐकून गुहही शोक करतो (१-२७).

**सर्ग ५२, पृ० ३२६-३४१**

राम सुमंत्राला परत जाण्यास सांगतो. राजाचा अपमान होणार नाही, अशा तऱ्हेने वाग म्हणून राम सुमंत्रास उपदेश करतो. सुमंत्राला वाईट वाटते. राम गंगेपलीकडे जातो. गुहाला उपदेश करून परत जाण्यास सुचवितो (१-१०२).

**सर्ग ५३, पृ० ३४१-३४७**

रामाला अयोध्येची आठवण होते. तो कैकेयीची निन्दा करतो व मन मोकळें करून रडतो (१-२९). लक्ष्मण रामाला शोक करणें बरें नाही, तूंच असें केलेंस, तर मी काय करूं ? व या सीतेने तरी काय करावें, असें म्हणतो (३०-३५).

**सर्ग ५४, पृ० ३४७-३५३**

राम, लक्ष्मण, सीता गंगा-यमुनांच्या संगमावर भरद्वाजाच्या आश्रमाजवळ येतात. भरद्वाज त्यांचें आदरातिथ्य करतात व येथेच रहा, असें म्हणतात (१--२३). तेथून अयोध्या जवळ असल्याने येथे लोक येतील, म्हणून येथे राहणें उचित नाही, असें रामाने म्हटलें. तें ऐकून भरद्वाज ऋषि म्हणाले येथून दहा कोसांवर चित्रकूटपर्वत आहे, तेथे जाऊन रहा (२४-४१).

**सर्ग ५५, पृ० ३५४-३५८**

दुसऱ्या दिवशीं राम चित्रकूटास जावयास निघतो. बरेंच दूरवर पोचवून भरद्वाज परत येतात व राम, लक्ष्मण सीता हीं तिघें यमुनानदी तापयाच्या सहाय्याने ओलांडून चित्रकूटाच्या मार्गाला लागतात (१--३४).



( २ )

## अयोध्याकाण्डाच्या पूर्वार्धाच्या

## निरीक्षणाची सूची

*कैकेयी शपथ घेते. (४४३), राम शपथ घेतो. लोक शपथ घेतात. ( ४४४ ), मनुस्मृतींतील शपथ मद्यपान ( ४४५ ), मंत्र व पिशाच ( ४४७ ).*

### दशरथाला भरतासंबंधानें शंका कां वरें यावी ? ४४९

रामाला शत्रु होते काय ? ( ४५३ ), कैकेयीचा दरारा ( ४५४ ), सहज रिपु ( ४५७ ), रामालाहि शंका होतीच. ( ४६१ ), रामाचा पक्ष व भरताचा पक्ष, स्वज्ञाति ( ४६५ ), मंथरेचें भाषण ( ४६६ ), लोकमत ( ४७० ), कौसल्येची आर्थिक स्थिति ( ४७२ ), कौसल्येचें दुःख ( ४७४ ), दशरथाची कबुली ( ४७७ ), राज्यावर सूर्य मावळत नाही. युवराजाचें मत ( ४८० ), लोकमताची छाप ( ४८१ ), लक्ष्मणाचें म्हणणें ( ४८२ ), दशरथ, कौसल्या व सुमित्रा यांचे बांधव ( ४८५ ), कैकेयीचे ज्ञातिबांधव ( ४८६ ), रामाला संशय ( ४८७ ), राज्यसाधारण हें भय ( ४८९ ).

### पातिव्रत्याचा धर्म ४९३

कौसल्येचा उपदेश ( ४९४ ), सीतेचें उत्तर ( ४९५ ), कैकेयीची पतिघातकी आई ( ५०० ), अन्तःपुरांतील दक्षता ( ५०२ ), राजनीति ( ५०३ ).

### दशरथाची विषयी प्रवृत्ति ५०६

लक्ष्मण काय म्हणतो ? ( ५०८ ), धन, ऐश्वर्य व दान, सुयज्ञाला देणगी, तैत्तिरीय शाखेचा आचार्य, कठ व कलाप (५१३), ज्योतिषावर विश्वास (५१५).

### श्रीरामचन्द्राचा वनवास ५१७

त्यागाचें वातावरण ( ५१९ ), स्वयंशासित समाज ( ५२८ ), वनवासांतील सामान ( ५२९ ), वनांतील भोजन ( ५३२ ), वानप्रस्थाचें व्रत ( ५३५ ), श्रीरामाची वनवासांतील दिनचर्या. वनवासाच्या पूर्व दिवशीं ( ५३९ ), राज्यारोहणाचा दिवस ( ५४० ), पहिला दिवस, दुसरा ( ५४१ ), तिसरा, चवथा, पांचवा दिवस. कांही स्थलांचे निर्देश (५४२), चित्रकूटावरील वास्तव्य (५४३).



श्रीहामुनि—वाल्मीकि—प्रणीतं

# श्री रा मा य ण म्।

## अयोध्या-काण्डम्।

॥ॐ॥ गच्छता मातुलकुलं भरतेन तदानघः।
शत्रुघ्नो नित्यशत्रुघ्नो नीतः प्रीतिपुरस्कृतः १
स तत्र न्यवसद्भ्रात्रा सह सत्कारसत्कृतः।
मातुलेनाश्वपतिना पुत्रस्नेहेन लालितः २
तत्रापि निवसन्तौ तौ तर्प्यमाणौ च कामतः।
भ्रातरौ स्मरतां वीरौ वृद्धं दशरथं नृपम् ३
राजापि तौ महातेजाः सस्मार प्रोषितौ सुतौ।
उभौ भरतशत्रुघ्नौ महेन्द्रवरुणोपमौ ४

---

ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं तीर्थास्पदं शिवविरिञ्चिनुतं शरण्यम्।
भृत्यार्तिहं प्रणतपालभवाब्धिपोतं वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम्॥
त्यक्त्वा सुदुस्त्यजसुरेप्सितराज्यलक्ष्मीं धर्मिष्ठ आर्यवचसा यदगादरण्यम्।
मायामृगं दयितयेप्सितमन्वधावद्वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम्॥

भरत मातुलगृहीं जाऊं लागला असतां ( कामक्रोधादि ) नित्य शत्रूंचा नाश करणाऱ्या शत्रुघ्नालाही तो प्रेमपूर्वक आपल्याबरोबर घेऊन गेला व त्या ठिकाणीं तो भ्रात्यासहवर्तमान वास्तव्य करूं लागला असतां, अश्वपति मातुल त्याचा चांगला सत्कार करीत असे व पुत्रप्रेमानें त्याचें लालन करीत असे; परंतु अशा प्रकारच्या मातुलगृहीं ते रहात असतांनाही आणि इष्ट वस्तु प्राप्त होऊन, त्यांचे मनोरथ तेथे सिद्धीस जात असतानाही त्या वीर भ्रात्यांना वृद्ध दशरथराजाचें स्मरण होत असे व महातेजस्वी राजालाही परदेशांत गेलेल्या आपल्या उभयतां

सर्व एव तु तस्येष्टाश्चत्वारः पुरुषर्षभाः ।
स्वशरीराद्विनिर्वृत्ताश्चत्वार इव बाहवः ५
तेषामपि महातेजा रामो रतिकरः पितुः ।
स्वयंभूरिव भूतानां बभूव गुणवत्तरः ६
स हि देवैरुदीर्णस्य रावणस्य वधार्थिभिः ।
अर्थितो मानुषे लोके जज्ञे विष्णुः सनातनः ७
कौसल्या शुशुभे तेन पुत्रेणामिततेजसा ।
यथा वरेण देवानामदितिर्वज्रपाणिना ८
स हि रूपोपपन्नश्च वीर्यवाननसूयकः ।
भूमावनुपमः सूनुर्गुणैर्दशरथोपमः ९
स च नित्यं प्रशान्तात्मा मृदुपूर्वं च भाषते ।
उच्यमानोऽपि परुषं नोत्तरं प्रतिपद्यते १०
कदाचिदुपकारेण कृतेनैकेन तुष्यति ।

---

इंद्रवरुणतुल्य भरतशत्रुघ्नपुत्रांचें स्मरण होत असे; कारण स्वतःच्या शरिरांतून निघालेल्या चार हातांप्रमाणेच कीं काय, त्या दशथराजाला सर्व चारीही पुरुषश्रेष्ठ पुत्र एकसारखेच प्रिय होते. ( १-५ )

त्या चौघांमध्येही महातेजस्वी राम पित्याला विशेष आनंद देणारा असून प्राण्यांमध्ये ब्रह्मदेवाप्रमाणे अधिक गुणवान् होता; कारण मत्त झालेल्या रावणाचा वध व्हावा, हा उद्देश मनांत धरून देवांनी ( अवतार धारण करण्याविषयीं ) सनातन विष्णूची प्रार्थना केली असतां, तो स्वतःच रामरूपाने अवतार धारण करून मनुष्यलोकामध्ये आला होता. यास्तव सुरश्रेष्ठ इंद्रामुळे शोभणाऱ्या अदितीप्रमाणे त्या अपरिमित तेजस्वी पुत्राच्या योगाने कौसल्या शोभत होती. जगतामध्ये अनुपम असलेला तो दशरथपुत्र राम गुणांनी दशरथाप्रमाणे असून रूपवान्, वीर्यवान् व निर्मत्सर होता. त्याचें अंतःकरण नेहमी शांत असे; त्याच्या भाषणांत मार्दव असे व त्याला कोणी टोचून बोलूं लागला असतांही तो त्याला कठोर उत्तर देत नसे. ( ६-१० )

एखाद्याने कधीं काळीं त्याच्यावर एखादा स्वल्प जरी उपकार केलेला

न स्मरत्यपकाराणां शतमप्यात्मवत्तया ११
शीलवृद्धैर्ज्ञानवृद्धैर्वयोवृद्धैश्च सज्जनैः ।
कथयन्नास्त वै नित्यमस्त्रयोग्यान्तरेष्वपि १२
बुद्धिमान् मधुराभाषी पूर्वभाषी प्रियंवदः ।
वीर्यवान्न च वीर्येण महता स्वेन विस्मितः १३
न चानृतकथो विद्वान्वृद्धानां प्रतिपूजकः ।
अनुरक्तः प्रजाभिश्च प्रजाश्चाप्यनुरज्यते १४
सानुक्रोशो जितक्रोधो ब्राह्मणप्रतिपूजकः ।
दीनानुकम्पी धर्मज्ञो नित्यं प्रग्रहवाञ्छुचिः १५
कुलोचितमतिः क्षात्रं स्वधर्मं बहु मन्यते ।
मन्यते परया प्रीत्या महत्स्वर्गफलं ततः १६
नाश्रेयसि रतो यश्च न विरुद्धकथारुचिः ।
उत्तरोत्तरयुक्तीनां वक्ता वाचस्पतिर्यथा १७

---

असला, तरी तेवढ्याने तो त्याच्यावर संतुष्ट असे आणि अंतःकरण स्वाधीन असल्यामुळे शंभर अपराधांचेंही त्याला स्मरण होत नसे. अस्त्राभ्यासाचे समयीं देखील मधल्या अवकाशांत शीलवृद्ध, ज्ञानवृद्ध व वयोवृद्ध सज्जनांशीं ( विविध शास्त्रीय विषयांवर ) तो नित्य संभाषण करीत असे. तो बुद्धिमान् राम कोणी आला असतां त्याच्याशीं प्रथम आपण होऊन प्रिय व मधुर भाषण करीत असे आणि वीर्यवान् असूनही स्वतःच्या प्रचंड वीर्याचा त्याला कधी अचंबा वाटत नसे. अनृत भाषण कधीही न करतां तो ज्ञानी राम वृद्धांचा मान राखीत असे आणि प्रजाजन त्याच्यावर प्रेम करीत असून, तोही प्रजाजनांवर प्रेम करीत असे: सदय, क्रोधसंयमन केलेला आणि दीनांवर कृपा करणारा धर्मवेत्ता राम ब्राह्मणांचा सत्कार करीत असून, नेहमी जितेंद्रिय व शुचिर्भूत असे. (११-१५)

आपल्या कुलाला योग्य अशीच त्याची मति असे; स्वतःचा क्षात्रधर्मच तो श्रेष्ठ समजत असे आणि स्वर्गरूप महाफल क्षात्रधर्माच्या अवलंबनानेच साध्य आहे, असें त्याला अगदी मनापासून वाटत असे. श्रेयस्कर न होणारें कर्म करण्याकडे त्याचा कधीच कल नसे; धर्मविरुद्ध भाषणाची त्याला कधी अभिरुचि नसे व

अरोगस्तरुणो वाग्मी वपुष्मान्देशकालवित्।
लोके पुरुषसारज्ञः साधुरेको विनिर्मितः १८
स तु श्रेष्ठैर्गुणैर्युक्तः प्रजानां पार्थिवात्मजः।
बहिश्चर इव प्राणो बभूव गुणतः प्रियः १९
सर्वविद्याव्रतस्नातो यथावत्साङ्गवेदवित्।
इष्वस्त्रे च पितुः श्रेष्ठो बभूव भरताग्रजः २०
कल्याणाभिजनः साधुरदीनः सत्यवागृजुः।
वृद्धैरभिविनीतश्च द्विजैर्धर्मार्थदर्शिभिः २१
धर्मकामार्थतत्त्वज्ञः स्मृतिमान्प्रतिभानवान्।
लौकिके समयाचारे कृतकल्पो विशारदः २२
निभृतः संवृताकारो गुप्तमन्त्रः सहायवान्।
अमोघक्रोधहर्षश्च त्यागसंयमकालवित् २३

---

स्वपक्षसमर्थन करण्याविषयी उत्तरोत्तर युक्तियुक्त व अप्रतिहत वक्तृत्व करण्यांत जणू काय प्रति बृहस्पतीच असा असे. असो. आरोग्यसंपन्न, तरुण, वक्ता, सुलक्षण-देहधारी, देशकालज्ञ आणि कोणत्या पुरुषाचे अंगीं कोणता गुण आहे, हें जाणणारा तो राम एकच ब्रह्मदेवानें सर्वगुणसंपन्न निर्माण केलेला होता. यास्तव उत्कृष्ट गुणांनी संपन्न असलेला तो राजकुमार राम अंगच्या गुणांमुळे प्रजाजनांना शरीराबाहेर संचार करणारा प्राणच कीं काय, असा प्रिय झाला. ज्या ज्या विद्येला जें जें व्रत अवश्य असेल, तें तें आचरल्यानंतर समावर्तनसंस्कार झालेला आणि म्हणूनच योग्य रीतीनें सांग वेद जाणणारा तो भरताग्रज राम शस्त्रास्त्रांमध्ये तर पित्यापेक्षाही अधिक झाला. ( १६–२० )

असो. तो राम कल्याणांचें उत्पत्तिस्थान, सज्जन, सत्यवचनी व सरळ असून, धर्मार्थवेत्त्या वृद्ध द्विजांपासून त्याला शिक्षण प्राप्त झालें होतें. धर्म, अर्थ आणि काम यांचें तत्त्व जाणणारा तो राम स्मरणशक्ति व समयस्फूर्ति या गुणांनी युक्त असून लोकव्यवहारामध्ये प्रवीण व धर्मशास्त्रामध्येही निष्णात होता. त्या विनयसंपन्न रामाचा अभिप्राय इतरांना समजत नसे; गुप्त मित्रांचें त्याला सहाय्य असे; त्याचा क्रोध आणि हर्ष हे कधीही व्यर्थ जात नसत आणि न्यायमार्गानें द्रव्यार्जन

दृढभक्तिः स्थिरप्रज्ञो नासद्ग्राही न दुर्वचः ।
निस्तन्द्रीरप्रमत्तश्च स्वदोषपरदोषवित् २४
शास्त्रज्ञश्च कृतज्ञश्च पुरुषान्तरकोविदः ।
यः प्रग्रहानुग्रहयोर्यथान्यायं विचक्षणः २५
सत्संग्रहानुग्रहणे स्थानविन्निग्रहस्य च ।
आयकर्मण्युपायज्ञः संदृष्टव्ययकर्मवित् २६
श्रैष्ठ्यं शास्त्रसमूहेषु प्राप्तो व्यामिश्रकेषु च ।
अर्थधर्मौ च संगृह्य सुखतन्त्रो न चालसः २७
वैहारिकाणां शिल्पानां विज्ञातार्थविभागवित् ।
आरोहे विनये चैव युक्तो वारणवाजिनाम् २८
धनुर्वेदविदां श्रेष्ठो लोकेऽतिरथसंमतः ।

केव्हा करावयाचें व त्याचा योग्य मार्गानें व्यय केव्हा करावयाचा, हें तो पूर्णपणें जाणत असे. गुरुजनांचे ठिकाणीं दृढ भक्ति असणारा, स्थिरबुद्धीनें युक्त असलेला व निंद्य गोष्टीचें कधींही ग्रहण न करणारा असा असून, पुनः दुसऱ्याला उद्वेग उत्पन्न होईल, असें भाषण न करणारा; आलस्यरहित आणि दक्ष असा तो राम परक्यांचे तसेच आपलेही दोष जाणत असे. शास्त्रज्ञ, कृतज्ञ व पाहिल्याबरोबर मनुष्याचें अन्तरङ्ग ओळखण्यांत कुशल असून, तो राम निग्रह आणि अनुग्रह यथायोग्य रीतीनें करण्यामध्ये निपुण असे. ( २१-२५ )

सज्जनांचा संग्रह करून त्यांचें पालन करणें व दुर्जनांना योग्य स्थलीं व योग्य कालीं शिक्षा करणें, याचें त्याला सम्यक् ज्ञान होतें आणि राज्याचें उत्पन्न वाढविण्यासंबंधांत योग्य उपाययोजना करणें व योग्य मार्गानें खर्च करणें, हें तो पूर्णपणें जाणत असे. शास्त्रांचा सम्यक् विचार करणाऱ्या विद्वत्समाजामध्ये श्रेष्ठत्व पावलेला, तसाच काव्यनाटक अलंकारादिकांमध्येही अत्यन्त निपुण असूनदेखील धर्म व अर्थ यांना बाध न येईल अशा रीतीनें सुखाचें सेवन करणारा व आपलें कर्तव्य बजावण्याविषयी सदा तत्पर असा तो राम गज व अश्व यांवर स्वारी करण्यांत व त्यांना शिक्षण देण्यांत अत्यन्त निष्णात होता आणि गीत, वाद्य व चित्रकर्मादि कलांचा तो मर्मज्ञ असून द्रव्याची योग्य व्यवस्था लावण्याचे

अभियाता प्रहर्ता च सेनानयविशारदः २९
अप्रधृष्यश्च संग्रामे क्रुद्धैरपि सुरासुरैः ।
अनसूयो जितक्रोधो न दृप्तो न च मत्सरी ३०
नावज्ञेयश्च भूतानां न च कालवशानुगः ।
एवं श्रेष्ठैर्गुणैर्युक्तः प्रजानां पार्थिवात्मजः × ३१
संमतस्त्रिषु लोकेषु वसुधायाः क्षमागुणैः ।
बुद्ध्या बृहस्पतेस्तुल्यो वीर्ये चापि शचीपतेः ३२
तथा सर्वप्रजाकान्तैः प्रीतिसंजननैः पितुः ।
गुणैर्विरुरुचे रामो दीप्तः सूर्य इवांशुभिः ३३
तमेवंवृत्तसंपन्नमप्रधृष्यपराक्रमम् ।

कामांत अत्यन्त चतुर होता. धनुर्वेदवेत्त्यांमध्ये श्रेष्ठ, जगतांतील अतिरथ्यांनाही संमत, शत्रूवर आधी चालून जाणारा आणि आधी प्रहार करणारा तो राम सैन्याच्या हालचाली करविण्यांतही प्रवीण असे. क्रुद्ध झालेल्या देवदैत्यांनाही संग्रामामध्ये त्याच्यासमोर उभें राहण्याचें धैर्य नसे. असूयारहित व क्रोध आवरून धरणारा तो राम स्वसामर्थ्याचा कधीही गर्व वहात नसे आणि कोणाचा मत्सरही करीत नसे. ( २६–३० )

सर्व लोकांना तो अत्यन्त आदरणीय वाटत असे. तो कधीही कालाच्या अनुकूलतेची किंवा प्रतिकूलतेची पर्वा बाळगीत नसे. याप्रमाणे तो राजकुमार राम श्रेष्ठ गुणांनी युक्त होता.× त्रैलोक्यांतील लोकांना तो संमत असे; क्षमाप्रभृति गुणांनी तो पृथ्वीची बरोबरी करणारा असे; बुद्धीने बृहस्पतीसारखा असे आणि वीर्यामध्येही इन्द्रासारखा असे. किरणांच्या योगाने ज्याप्रमाणे देदीप्यमान सूर्य शोभत असतो, त्याचप्रमाणे सर्व प्रजाजनांना इष्ट आणि पित्याला आनंद देणाऱ्या अशा

× टीप– बालकाण्ड सर्ग १८, श्लोक २५ ते ३७ मधील व अयोध्याकाण्ड सर्ग १, श्लोक १२ ते ३३ यांमधील वर्णनावरून पाहतां रामादिक चारही बंधूंचें शिक्षण व पर्यायाने त्या काळीं राजपुत्राचें शिक्षण किती उच्च प्रकारचें होतें व विशेषतः रामाची योग्यता केवढी होती, यांवर चांगलाच प्रकाश पडतो.

लोकपालोपमं नाथमकामयत मेदिनी ३४
एतैस्तु बहुभिर्युक्तं गुणैरनुपमैः सुतम् ।
दृष्ट्वा दशरथो राजा चक्रे चिन्तां परंतपः ३५
अथ राज्ञो बभूवैव वृद्धस्य चिरजीविनः ।
प्रीतिरेषा कथं रामो राजा स्यान्मयि जीवति ३६
एषा ह्यस्य परा प्रीतिर्हृदि संपरिवर्तते ।
कदा नाम सुतं द्रक्ष्याम्यभिषिक्तमहं प्रियम् ३७
वृद्धिकामो हि लोकस्य सर्वभूतानुकम्पकः ।
मत्तः प्रियतरो लोके पर्जन्य इव वृष्टिमान् ३८
यमशक्रसमो वीर्ये बृहस्पतिसमो मतौ ।
महीधरसमो धृत्यां मत्तश्च गुणवत्तरः ३९
महीमहमिमां कृत्स्नामधितिष्ठन्तमात्मजम् ।
अनेन वयसा दृष्ट्वा यथा स्वर्गमवाप्नुयाम् ४०

गुणांच्या योगाने राम शोभूं लागला. तेव्हा अशा प्रकारच्या आचरणाने संपन्न आणि अजिंक्य पराक्रमाने युक्त असा तो लोकपालतुल्य राम प्रभु असावा, म्हणून पृथ्वी वरील प्रजा इच्छा करूं लागली आणि त्या अनेक अनुपम गुणांनी संपन्न असलेल्या पुत्राला अवलोकन करून शत्रुतापन दशरथराजाही त्याला राज्याभिषेक करण्याचा मनामध्ये विचार करूं लागला. ( ३१-३५ )

बहुत कालपर्यन्त प्रजापालन करीत असतां वार्धक्य प्राप्त झालेल्या त्या दशरथराजाला "माझ्या जिवन्तपणींच राम राजा कसा होईल?" यांविषयी उत्कट इच्छा उत्पन्न झाली आणि म्हणूनच "मी आपल्या प्रिय पुत्राला राज्याभिषेक झालेला केव्हा पाहीन ? " हीच उत्कट इच्छा त्याच्या हृदयामध्ये एकसारखी घोळत होती; कारण लोकांच्या अभ्युदयाची इच्छा धरून जलवृष्टियुक्त पर्जन्याप्रमाणे प्राणिमात्रावर दया करणारा हा राम पृथ्वींतील लोकांना माझ्यापेक्षाही प्रिय आहे. वीर्यामध्ये यम व इंद्र यांसमान असलेला, बुद्धीमध्ये बृहस्पतीची बरोबरी करणारा आणि धैर्यासंबंधाने पर्वततुल्य असलेला हा राम माझ्यापेक्षाही गुणी आहे. तस्मात्, या संपूर्ण पृथ्वीचें राज्य चालवितांना मी त्या पुत्राला या

इत्येवं विविधैस्तैस्तैरन्यपार्थिवदुर्लभैः।
शिष्टैरपरिमेयैश्च लोके लोकोत्तमैर्गुणैः ४१
तं समीक्ष्य तदा राजा युक्तं समुदितैर्गुणैः।
निश्चित्य सचिवैः सार्धं यौवराज्यममन्यत ४२
दिव्यन्तरिक्षे भूमौ च घोरमुत्पातजं भयम्।
संचचक्षेऽथ मेधावी शरीरे चात्मनो जराम् ४३
पूर्णचन्द्राननस्याथ शोकापनुदमात्मनः।
लोके रामस्य बुबुधे संप्रियत्वं महात्मनः ४४
आत्मनश्च प्रजानां च श्रेयसे च प्रियेण च।
प्राप्ते काले स धर्मात्मा भक्त्या त्वरितवान्नृपः ४५
नानानगरवास्तव्यान्पृथग्जानपदानपि।

वयामध्ये अवलोकन करून योग्य काळीं स्वर्गप्राप्ति करून घेईन." (३६–४०)

अशा प्रकारचे विचार तो मनामध्ये आणूं लागला. जगतामध्ये इतर राजांचे ठिकाणीं आढळण्यास दुर्लभ अशा या निर्दिष्ट केलेल्या नाना प्रकारच्या गुणांनीं आणि निर्दिष्ट न केलेल्या अशाही लोकोत्तर असंख्य गुणांनीं युक्त असलेल्या म्हणजे उक्त व अनुक्त अशा सर्व गुणांनीं संपन्न असलेल्या त्या पुत्राला अवलोकन करून आणि मंत्र्यांसहवर्तमान निश्चय करून रामाला यौवराज्याचा अभिषेक करण्याचा दशरथाने विचार केला आणि स्वर्ग, अंतरिक्ष व भूमि यांचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस आलेलें उत्पातजन्य घोर भय व स्वतःच्या शरिराचे ठिकाणीं प्राप्त झालेली जरा, हें त्या बुद्धिमान् दशरथ राजाने पुत्राला राज्याभिषेक करण्याचें कारण प्रसिद्ध केलें. नंतर पूर्ण चंद्राप्रमाणे ज्याचें मुख आल्हादकारक आहे, अशा महात्म्या रामाला अभिषेक केला असतां आपली काळजी दूर होऊन, जगतालाही आनंद होईल, असें त्याने मंत्रिमण्डळाचे निदर्शनास आणलें. तेव्हा आपलें कल्याण होऊन प्रजाजनांचा इष्ट हेतु सिद्धीस जावा, एतदर्थ रामाला राज्याभिषेक करण्याचा काल प्राप्त झाला आहे, असें समजून त्याविषयी दशरथाने मंत्र्यांना मनःपूर्वक त्वरा केली. ( ४१–४५ )

नंतर नाना प्रकारच्या नगरांमध्ये वास्तव्य करणाऱ्या आणि भिन्न भिन्न देशां-

**समानिनाय मेदिन्यां प्रधानान्पृथिवीपतिः ४६**
**तान्वेश्मनानाभरणैर्यथार्हं प्रतिपूजितान् ।**
**ददर्शालंकृतो राजा प्रजापतिरिव प्रजाः ४७**
**न तु केकयराजानं जनकं वा नराधिपः ।**
**त्वरया चानयामास पश्चात्तौ श्रोष्यतः प्रियम् × ४८**

मध्ये राहणाऱ्या पृथ्वींतील राजांना भूपति दशरथ राजानें मंत्र्यांकडून बोलावून आणिलें आणि उतरण्याला घरें व नाना प्रकारचीं भूषणें देऊन यथायोग्य रीतीनें त्यांचा आदरसत्कार झाल्यावर, प्रजाजनांची भेट घेणारा ब्रह्मदेव कीं काय, अशा त्या दशरथराजानें अलंकार धारण करून त्यांची भेट घेतली; परंतु, इच्छिलेलें कार्य सिद्धीस नेण्याची त्वरा असल्यामुळें "यांना नंतर प्रिय वार्ता समजेल," असें मनांत आणून त्या दशरथराजानें केकयराजाला अथवा जनकाला× त्या वेळीं आणविलें.

× जनकराजा व केकयराज यांस अवश्य बोलवावयास हवें होतें; कारण दोघेही व्याहीच ! त्यांतही केकयराजाचा मान जनकराजापेक्षा मोठा; पण केकयराज जर या समारंभास आला असता, तर त्यानें व भरताचा मामा युधाजित् यानें भरताचा पक्ष उचलून धरून, रामाच्या राज्याभिषेकाच्या मार्गांत मोठेंच विघ्न उपस्थित केलें असतें आणि तसें झालें असतें, तर जनकराजालाही सहजच रामाचा पक्ष उचलून धरणें प्राप्त झालें असतें आणि त्यामुळें उभय पक्षांत भयंकर रणकंदन होऊन, उभयपक्षींही अत्यन्त वाईट परिणाम झाला असता. एकट्या जनकराजालाच बोलावण्यापासून कांहींदेखील विघ्न उभें राहण्याचा संभव नव्हता; पण दोघां व्याह्यांपैकीं एकाला बोलाविणें व एकाला न बोलाविणें, यांत व्यवहारदृष्ट्याही अयोग्य असून, केकय राजाचा अपमान झाला असता. तसा प्रकार जनकासंबंधांत नव्हता; कारण तो आला असता तर मुलीचा व जावयाचा सोहळा त्यानें प्रत्यक्षच पाहिला असता. न आल्यानें, आपल्या मुलीच्या व जावयाच्या उत्कर्षाची आनंदवार्ता ऐकूनही त्याला तितकाच आनन्द झाला असता. या कारणास्तव, जनकराजा युधाजितापेक्षा जवळ असूनदेखील त्याला ( युधाजिताला ) टाळण्यास्तव यालाही बोलाविलें नाही.

अथोपविष्टे नृपतौ तस्मिन्परपुरार्दने ।
ततः प्रविविशुः शेषा राजानो लोकसंमताः ४९
अथ राजवितीर्णेषु विविधेष्वासनेषु च ।
राजानमेवाभिमुखा निषेदुर्नियता नृपाः ५०
स लब्धमानैर्विनयान्वितैर्नृपैः पुरालयैर्जानपदैश्च मानवैः ।
उपोपविष्टैर्नृपतिर्वृतो बभौ सहस्रचक्षुर्भगवानिवामरैः ५१
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे प्रथमः सर्गः ॥१॥ [५१]

द्वितीयः सर्गः ।

ततः परिषदं सर्वामामन्त्र्य वसुधाधिपः ।
हितमुद्धर्षणं चैवमुवाच प्रथितं वचः १
दुन्दुभिस्वरकल्पेन गम्भीरेणानुनादिना ।
स्वरेण महता राजा जीमूत इव नादयन् २
राजलक्षणयुक्तेन कान्तेनानुपमेन च ।

---

नाही. असो. शत्रूंच्या नगरांना पीडा देणारा तो दशरथराजा सभेमध्ये येऊन बसल्यानंतर केकय आणि जनक यांशिवाय इतर लोकमान्य राजे सभेंत प्रविष्ट झाले. ( ४६-४९ )

नंतर दशरथराजाने नाना प्रकारचीं आसनें दाखवून दिल्यावर आपआपल्या नेमलेल्या आसनांवरच ते राजे दशरथराजाच्या संमुख बसले आणि सत्कार झालेले विनयी राजे व अयोध्यानगरींतील आणि देशांतील दाटीदाटीने बसलेले लोक यांच्या योगाने परिवेष्टित झालेला तो राजा देवांनी परिवेष्टित झालेल्या भगवान् इंद्राप्रमाणे शोभूं लागला. ( ५०-५१ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी पहिला सर्ग समाप्त झाला. ॥ १ ॥

नंतर सर्व सभेला अवधान देण्यास सांगून भूपति दशरथराजा हितकारक, अतिशय हर्षवर्धक व सर्वास स्पष्ट ऐकूं जाईल, असें भाषण करूं लागला. दुंदुभीच्या ध्वनीसारखा गंभीर असल्यामुळे ज्याचा प्रतिध्वनि उठत आहे, अशा मोठ्या स्वराने दशरथराजा मेघाप्रमाणे दशदिशा नादित करूं लागला व

उवाच रसयुक्तेन स्वरेण नृपतिर्नृपान् ३
विदितं भवतामेतद्यथा मे राज्यमुत्तमम् ।
पूर्वकैर्मम राजेन्द्रैः सुतवत्परिपालितम् ४
सोऽहमिक्ष्वाकुभिः सर्वैर्नरेन्द्रैः प्रतिपालितम् ।
श्रेयसा योक्तुमिच्छामि सुखार्हमखिलं जगत् ५
मयाप्याचरितं पूर्वैः पन्थानमनुगच्छता ।
प्रजा नित्यमनिद्रेण यथाशक्त्यभिरक्षिताः ६
इदं शरीरं कृत्स्नस्य लोकस्य चरता हितम् ।
पाण्डुरस्यातपत्रस्य च्छायायां जरितं मया ७
प्राप्य वर्षसहस्राणि बहून्यायूंषि जीवतः ।
जीर्णस्यास्य शरीरस्य विश्रान्तिमभिरोचये ८
राजप्रभावजुष्टां च दुर्वहामाजितेन्द्रियैः ।
परिश्रान्तोऽस्मि लोकस्य गुर्वीं धर्मधुरं वहन् ९
सोऽहं विश्राममिच्छामि पुत्रं कृत्वा प्रजाहिते ।

राजलक्षणाला योग्य, इष्ट आणि अनुपम अशा अद्भुत रसाने संपन्न असलेल्या स्वराने तो दशरथराजा सभेंत बसलेल्या राजांना म्हणाला, " माझ्यापूर्वी होऊन गेलेल्या राजाधिराजांनी या माझ्या उत्कृष्ट राज्याचें पुत्राप्रमाणे परिपालन केलें, हें तुम्हांला विदितच आहे. तेव्हा सर्व इक्ष्वाकुवंशज राजांनी पालन केल्यामुळे सुख भोगण्यासच योग्य झालेल्या या संपूर्ण जगताचें कल्याण करण्याची माझी इच्छा आहे. ( १-५ )

पूर्वजांनी घालून दिलेल्या मार्गालाच अनुसरून मीही हें राज्य चालविलें आहे आणि नित्य दक्ष राहून प्रजाजनांचें यथाशक्ति रक्षण केलेलें आहे. संपूर्ण प्रजाजनांचें हित संपादन करण्यासाठी अविश्रान्त श्रम करण्यांत मी हें शरीर शुभ्रवर्ण छत्राच्या छायेखाली अगदी जीर्ण करून टाकलें आहे. याकरिता हजारो वर्षे म्हणजे पुरुषांचीं अनेक आयुष्यें होईपर्यंत जगून जीर्ण झालेल्या या शरिराला आता विश्रांति द्यावी, अशी माझी इच्छा आहे. ज्याला शौर्यप्रभृति राजप्रभावांची अपेक्षा आहे आणि इंद्रियाधीन पुरुषांना जें रेटणें दुर्घट आहे, असें जगताचें

संनिकृष्टानिमान्सर्वाननुमान्य द्विजर्षभान् १०
अनुजातो हि मां सर्वैर्गुणैः श्रेष्ठो ममात्मजः ।
पुरंदरसमो वीर्ये रामः परपुरंजयः ११
तं चन्द्रमिव पुष्येण युक्तं धर्मभृतां वरम् ।
यौवराज्ये नियोक्तास्मि प्रातः पुरुषपुंगवम् १२
अनुरूपः स वो नाथो लक्ष्मीवाँल्लक्ष्मणाग्रजः ।
त्रैलोक्यमपि नाथेन येन स्यान्नाथवत्तरम् १३
अनेन श्रेयसा सद्यः संयोक्ष्येऽहमिमां महीम् ।
गतक्लेशो भविष्यामि सुते तस्मिन्निवेश्य वै १४
यदिदं मेऽनुरूपार्थं मया साधु सुमन्त्रितम् ।
भवन्तो मेऽनुमन्यन्तां कथं वा करवाण्यहम् १५

धर्मरूप जूं वाहतां वाहतां मी श्रांत झालों आहे. तस्मात् संनिध असलेल्या या सर्व द्विजश्रेष्ठांच्या संमतीने प्रजाहिताविषयीं पुत्राची योजना करून विश्रांति घेण्याचें माझ्या मनांत आहे. ( ६-१० )

" माझा ज्येष्ठ पुत्र राम सर्व गुणांनी माझ्यासारखाच निपजला आहे आणि तो शत्रूंचीं नगरें जिंकणारा व वीर्यामध्ये इंद्राची बरोबरी करणारा आहे. तेव्हा पुष्य नक्षत्राने युक्त असलेल्या चंद्राप्रमाणे कोणतेंही कार्य सिद्धीस नेण्याविषयी दक्ष आणि धर्मनिष्ठांमध्ये उत्कृष्ट अशा पुरुषश्रेष्ठ रामाला मी उदईक प्रातःकालीं यौवराज्याचा अभिषेक करणार; कारण जो राजा मिळाला असतां, त्रैलोक्यालादेखील आपणांला अत्युत्तम राजा लाभला असा अभिमान वाटेल, तो हा लक्ष्मणाग्रज वैभवशाली राम तुम्हांला योग्य असा प्रभु आहे. या कारणास्तव रामाला राज्याभिषेक करण्यांत या पृथ्वीचें ( राष्ट्राचें ) कल्याण आहे, म्हणून आता यत्किंचित्‌ही विलंब न करतां रामाला राज्याभिषेक करीन आणि त्याच्यावर पृथ्वीपालनाचा भार घालून मी या दगदगीपासून मुक्त होईन. या कार्याविषयी हा माझा विचार योग्य आहे, असें होणें जर आपणांला वाटत असेल आणि असें जर आपणाला अनुकूल असेल, तर आपण मला अनुमोदन द्यावें आणि, हें आपणांला संमत नसेल, तर क्लेशांतून मुक्त होण्याविषयी मी काय करावें,

यद्यप्येषा मम प्रीतिर्हितमन्यद्विचिन्त्यताम् ।
अन्या मध्यस्थचिन्ता तु विमर्दाभ्यधिकोदया १६
इति ब्रुवन्तं मुदिताः प्रत्यनन्दन्नृपा नृपम् ।
वृष्टिमन्तं महामेघं नदन्त इव बर्हिणः १७
स्निग्धोऽनुनादः संजज्ञे ततो हर्षसमीरितः ।
जनौघोद्घुष्टसंनादो मेदिनीं कम्पयन्निव १८
तस्य धर्मार्थविदुषो भावमाज्ञाय सर्वशः ।
ब्राह्मणा जनमुख्याश्च पौरजानपदैः सह १९
समेत्य ते मन्त्रयितुं समतागतबुद्धयः ।
ऊचुश्च मनसा ज्ञात्वा वृद्धं दशरथं नृपम् २०
अनेकवर्षसाहस्रो वृद्धस्त्वमसि पार्थिव ।

तें आपण मला कथन करावें. ( ११-१५ )

" रामाला अभिषेक व्हावा अशी जरी माझी उत्कट इच्छा आहे, तरी लोकांचें हित होण्याचा दुसरा कांही उपाय असल्यास त्याचाही आपण विचार करावा; कारण, मध्यस्थांनी निःपक्षपातीपणाने केलेल्या विचाराची गोष्टच निराळी आहे. दोन्ही पक्षांचा खल होऊन जो विचार ठरतो, तो अधिक श्रेयस्कर असतो." याप्रमाणे दशरथराजा भाषण करूं लागला असतां जलवृष्टि करणाऱ्या मोठ्या मेघाचें ज्याप्रमाणे मयूरपक्षी गर्जना करीत करीत अभिनंदन करितात, त्याप्रमाणे त्या सभेंतील सर्व राजे आनंदित होऊन त्याचें अभिनंदन करूं लागले असतां त्यांच्या त्या अभिनन्दनाच्या सहानुभूतिपूर्ण प्रतिध्वनीने सर्व सभामंडप भरून गेला आणि जनसमूहांच्या आनंदघोषाचा ध्वनि तर पृथ्वी कंपित करीत आहे कीं काय, असा होऊं लागला. नंतर त्या धर्मार्थवेत्त्या दशरथराजाचा अभिप्राय पूर्णपणें लक्ष्यांत घेऊन ब्राह्मण आणि जनतेचे पुढारी, नगरांतील व देशांतील लोकांसहवर्तमान एकत्र जुळून एकमताने विचार करूं लागले आणि विचार केल्यानंतर आप-आपल्या मनाशीं पुनः पुनः काय तो निश्चय करून ते वृद्ध दशरथ राजाला म्हणाले. ( १६-२० )

' हे राजा, तूं हजारों वर्षांचा वृद्ध आहेस; तेव्हा तूं आपल्या युवराज

स रामं युवराजानमभिषिञ्चस्व पार्थिवम् २१
इच्छामो हि महाबाहुं रघुवीरं महाबलम् ।
गजेन महता यान्तं रामं छत्रावृताननम् २२
इति तद्वचनं श्रुत्वा राजा तेषां मनःप्रियम् ।
अजानन्निव जिज्ञासुरिदं वचनमब्रवीत् २३
श्रुत्वैतद्वचनं यन्मे राघवं पतिमिच्छथ ।
राजानः संशयोऽयं मे तदिदं ब्रूत तत्त्वतः २४
कथं नु मयि धर्मेण पृथिवीमनुशासति ।
भवन्तो द्रष्टुमिच्छन्ति युवराजं महाबलम् २५
ते तमूचुर्महात्मानः पौरजानपदैः सह ।
बहवो नृप कल्याणगुणाः सन्ति सुतस्य ते २६
गुणान्गुणवतो देव देवकल्पस्य धीमतः ।
प्रियानानन्दनान्कृत्स्नान्प्रवक्ष्यामोऽद्य ताञ्छृणु २७

---

रामाला राज्याभिषेक कर. छत्राने मुख आच्छादून गेलें असतां गजावर आरूढ होऊन महाबलाढ्य व महापराक्रमी रघुवीर रामाला जातांना पाहण्याची आमची इच्छा आहे." हें त्यांचें भाषण श्रवण केल्यावर त्यांच्या मनाला कोणती गोष्ट प्रिय आहे, हें माहीत नसल्यासारखें दाखवून त्यांच्या मनांतील भाव समजून घेण्याच्या उद्देशानेच की काय, दशरथराजा त्यांना म्हणाला, " हे नृप हो ! माझें भाषण श्रवण करून ज्या अर्थी तुम्ही रघुवंशज राम प्रभु होण्याची इच्छा करीत आहां, त्या अर्थी मला हा एक संशय आहे, त्याचें तुम्ही खरें खरें उत्तर द्या. अहो, धर्मानें पृथ्वीचें राज्य मी करीत असतांना महाबलाढ्य राम युवराज होण्याची तुम्ही कां बरें इच्छा करीत आहां ? " (२१–२५)

असें दशरथराजाने विचारल्यानंतर नगरांतील आणि देशांतील लोकांसहवर्तमान ते सर्व महात्मे त्याला म्हणाले, " हे भूपते ! ज्यांचे योगाने प्रजेचें कल्याण होईल, असे पुष्कळच गुण तुझ्या पुत्राच्या ठिकाणीं आहेत. हे राजा ! गुणी, देवतुल्य आणि बुद्धिमान् अशा तुझ्या पुत्राचे इष्ट व आनंदकारक सर्व गुण आम्ही आता सांगतों, ते तूं श्रवण कर. हे प्रजाधिपते दशरथराजा ! अमोघपरा-

दिव्यैर्गुणैः शक्रसमो रामः सत्यपराक्रमः ।
इक्ष्वाकुभ्योऽपि सर्वेभ्यो ह्यतिरिक्तो विशांपते २८
रामः सत्पुरुषो लोके सत्यः सत्यपरायणः ।
साक्षाद्रामाद्विनिर्वृत्तो धर्मश्चापि श्रिया सह २९
प्रजासुखत्वे चन्द्रस्य वसुधायाः क्षमागुणैः ।
बुद्ध्या बृहस्पतेस्तुल्यो वीर्ये साक्षाच्छचीपतेः ३०
धर्मज्ञः सत्यसन्धश्च शीलवाननसूयकः ।
क्षान्तः सान्त्वयिता श्लक्ष्णः कृतज्ञो विजितेन्द्रियः ३१
मृदुश्च स्थिरचित्तश्च सदा भव्योऽनसूयकः ।
प्रियवादी च भूतानां सत्यवादी च राघवः ३२
बहुश्रुतानां वृद्धानां ब्राह्मणानामुपासिता ।
तेनास्येहातुला कीर्तिर्यशस्तेजश्च वर्धते ३३
देवासुरमनुष्याणां सर्वास्त्रेषु विशारदः ।

---

क्रमी राम दिव्य गुणांनी इंद्राची बरोबरी करणारा असल्यामुळे इक्ष्वाकुवंशजांपेक्षा वरचढ आहे. या जगतामध्ये सत्यावलंबी रामच खरा सत्पुरुष असून, अर्थासहवर्तमान धर्महो साक्षात् रामापासूनच निघालेला आहे. सारांश, धर्म व अर्थ हे दोन्हीही रामावरच अवलंबून आहेत. प्रजाजनांना आनंद देण्याविषयी राम चंद्राची बरोबरी करणारा आहे; क्षमाप्रभृति गुणांनी तो पृथ्वीसमान आहे. बुद्धीने तो बृहस्पतिसमान आहे आणि वीर्यामध्ये तर तो प्रत्यक्ष इन्द्रासमान आहे. (२६-३०)

धर्मवेत्ता, सत्यप्रतिज्ञ, सुशील, कोणाचा मत्सर न करणारा, क्षमाशील, इतरांचें दुःख निवारण करणारा, मधुरभाषणी, कृतज्ञ, जितेंद्रिय मृदु, दृढनिश्चयी, सर्व कर्मात कुशल व आश्रितांचें हित करणारा आणि इतरांच्या मत्सरास पात्र नसलेला रघुवंशज राम प्राणिमात्राशीं प्रिय व सत्य भाषण करणारा असून बहुश्रुत वृद्ध ब्राह्मणांचा समागम करणारा आहे आणि त्यामुळे या जगतामध्ये त्याची कीर्ति, ख्याति आणि शौर्य यांची अभिवृद्धि होत आहे. देव, असुर आणि मनुष्य यांच्या सर्व अस्त्रांमध्ये निपुण, ज्या ज्या विद्येला जें जें व्रत आवश्यक,

सम्यग्विद्याव्रतस्नातो यथावत्साङ्गवेदवित् ३४
गान्धर्वे च भुवि श्रेष्ठो बभूव भरताग्रजः ।
कल्याणाभिजनः साधुरदीनात्मा महामतिः ३५
द्विजैरभिविनीतश्च श्रेष्ठैर्धर्मार्थनैपुणैः ।
यदा व्रजति संग्रामं ग्रामार्थे नगरस्य वा ३६
गत्वा सौमित्रिसहितो नाविजित्य निवर्तते ।
संग्रामात्पुनरागत्य कुञ्जरेण रथेन वा ३७
पौरान्स्वजनवन्नित्यं कुशलं परिपृच्छति ।
पुत्रेष्वग्निषु दारेषु प्रेष्यशिष्यगणेषु च ३८
निखिलेनानुपूर्व्या च पिता पुत्रानिवौरसान् ।
शुश्रूषन्ते च वः शिष्याः कच्चिद्वर्मसु दंशिताः ३९
इति वः पुरुषव्याघ्रः सदा रामोऽभिभाषते ।
व्यसनेषु मनुष्याणां भृशं भवति दुःखितः ४०

तें तें उत्तम रीतीने आचरल्यानंतर समावर्तन झालेला आणि यथायोग्य रीतीने सांग वेद जाणणारा तो भरताग्रज राम संगीतशास्त्रांतही या पृथ्वीमध्ये सर्वांत श्रेष्ठ आहे. कल्याणांचें तर तो महाबुद्धिमान् सज्जन राम निवासस्थानच आहेः क्षोभ उत्पन्न होण्यासारिखा प्रसंग असतांनाही त्याचें अंतःकरण कधीही क्षुब्ध होत नाही. ( ३१–३५ )

धर्म व अर्थ यांमध्ये निपुण असलेल्या द्विजांनी शिक्षण दिलेला राम ग्रामाच्या अथवा नगराच्या रक्षणार्थ जेव्हा लक्ष्मणासहवर्तमान संग्रामामध्ये जातो, तेव्हा शत्रूला जिंकल्यावाचून माघारा फिरतच नाही आणि गजावर अथवा रथामध्ये आरूढ होऊन संग्रामांतून परत आल्यानंतर स्वजनांप्रमाणे पौरजनांना– पुत्र अग्नि, स्त्रिया, सेवकजन आणि शिष्यगण यांविषयी पूर्ण रीतीने औरस पुत्रांना विचारणाऱ्या पित्याप्रमाणे— कुशल प्रश्न करीत असतो. " शिष्य आपली शुश्रुषा करीत असतात ना ? " व " सेवक आपल्या रक्षणाविषयी दक्ष असतात ना ? " ( ३६–३९ )

असें तो पुरुषश्रेष्ठ राम अनुक्रमें ब्राह्मणांना व क्षत्रियांना सर्वदा विचारीत

उत्सवेषु च सर्वेषु पितेव परितुष्यति ।
सत्यवादी महेष्वासो वृद्धसेवी जितेन्द्रियः ४१
स्मितपूर्वाभिभाषी च धर्मं सर्वात्मना श्रितः ।
सम्यग्योक्ता श्रेयसां च न विगृह्य कथारुचिः ४२
उत्तरोत्तरयुक्तौ च वक्ता वाचस्पतिर्यथा ।
सुभ्रूरायतताम्राक्षः साक्षाद्विष्णुरिव स्वयम् ४३
रामो लोकाभिरामोऽयं शौर्यवीर्यपराक्रमैः ।
प्रजापालनसंयुक्तो न रागोपहितेन्द्रियः ४४
शक्तस्त्रैलोक्यमप्येष भोक्तुं किं नु महीमिमाम् ।
नास्य क्रोधः प्रसादश्च निरर्थोऽस्ति कदाचन ४५
हन्त्येष नियमाद्वध्यानवध्येषु न कुप्यति ।
युनक्त्यर्थैः प्रहृष्टश्च तमसौ यत्र तुष्यति ४६

असतो. कोणाही मनुष्यावर दुःखाचे प्रसंग आले असतां तो अत्यंत दुःखित होतो आणि प्रजाजनांमध्ये कोणताही उत्सव सुरू झाला असतां, पुत्राच्या सुखाने संतुष्ट होणाऱ्या पित्याप्रमाणे, राम संतुष्ट होत असतो. सत्यवचनी, महाधनुर्धारी, वृद्धांचा समागम करणारा, जितेंद्रिय आणि स्मितपूर्वक भाषण करणारा राम अगदी मनापासून धर्माचे अवलंबन करून राहिलेला आहे. तो प्रजाजनांचें योग्य मार्गाने कल्याण घडवून आणणारा आहे. लोकांमध्ये कलह लावून एकमेकांचीं भांडणें ऐकण्याची त्याला आवड नाही आणि उत्तमोत्तम संभाषणासंबंधाने तर तो बृहस्पती-प्रमाणेच वक्ता आहे. उत्कृष्ट भिवया आणि विशाल व आरक्तवर्ण नेत्र यांनी युक्त असलेला हा त्रैलोक्यसुंदर राम शौर्य, वीर्य आणि पराक्रम यांच्या योगाने प्रत्यक्ष विष्णूची बरोबरी करणारा आहे. प्रजापालनाविषयी हा दक्ष असून याचीं इंद्रियें विषयेच्छेच्या आधीन कधीही होत नाहीत. ( ४०–४४ )

तस्मात्, त्रैलोक्याचाही उपभोग घेण्यास हा समर्थ आहे; मग या पृथ्वीचा उपभोग घेऊं शकेल, याची शंकाच कशाला पाहिजे ? याची अवकृपा अथवा कृपा कधीही व्यर्थ होत नाही. शास्त्राच्या नियमाला अनुसरून हा वध्यांचा वध करीत असतो, अवध्यांचे ठिकाणीं क्रोध करीत नाही आणि ज्याच्यावर संतुष्ट होतो,

दान्तैः सर्वप्रजाकान्तैः प्रीतिसंजननैर्नृणाम् ।
गुणैर्विरोचते रामो दीप्तः सूर्य इवांशुभिः ४७
तमेवंगुणसंपन्नं रामं सत्यपराक्रमम् ।
लोकपालोपमं नाथमकामयत मेदिनी ४८
वत्सः श्रेयसि जातस्ते दिष्ट्यासौ तव राघव ।
दिष्ट्या पुत्रगुणैर्युक्तो मारीच इव कश्यपः ४९
बलमारोग्यमायुश्च रामस्य विदितात्मनः ।
देवासुरमनुष्येषु सगन्धर्वोरगेषु च ५०
आशंसते जनः सर्वो राष्ट्रे पुरवरे तथा ।
आभ्यन्तरश्च बाह्यश्च पौरजानपदो जनः ५१
स्त्रियो वृद्धास्तरुण्यश्च सायंप्रातः समाहिताः ।
सर्वा देवान्नमस्यन्ति रामस्यार्थे मनस्विनः ।
तेषां तद्याचितं देव त्वत्प्रसादात्समृद्ध्यताम् ५२

---

त्याला हा राम हर्षयुक्त होऊन द्रव्यसंपन्न करून सोडितो. सारांश, मनोनिग्रही, सर्व प्रजाजनांना इष्ट आणि मनुष्यांना आनंददायक अशा गुणांनी युक्त असलेला हा राम किरणांच्या योगाने देदीप्यमान असलेल्या सूर्याप्रमाणे प्रकाशत आहे आणि म्हणूनच अशा प्रकारच्या गुणांनी संपन्न असलेला अमोघपराक्रमी व लोकपालतुल्य राम आपला नाथ असावा, अशी पृथ्वीला अर्थात पृथ्वीवरील जनांना इच्छा झाली आहे. ( ४५-४८ )

आमच्या भाग्यामुळे हा तुझा पुत्र रघुवंशज राम प्रजाजनांचें रक्षणरूप कल्याण करण्याविषयी समर्थ झाला आहे आणि आमच्या भाग्यामुळेच हा मरीचिपुत्र कश्यपाप्रमाणे गुणांनी युक्त आहे. देव, असुर, मनुष्य, गंधर्व आणि उरग यांच्यामध्ये, राष्ट्रांमध्ये व या श्रेष्ठ नगरामध्ये असणारा जो तो जन या रामाला बल, आरोग्य आणि आयुष्य चिंतीत असतो. ( ४९-५० )

सेवक, नगरांत व देशांत राहणारे बाहेरील लोक आणि सर्व वृद्ध व तरुण स्त्रिया महात्म्या रामाकरिता ( तो राजा व्हावा, म्हणून ) सकाळसन्ध्याकाळ एकाग्र अन्तःकरणाने देवाची नमस्कारपूर्वक प्रार्थना करीत असतात. यास्तव हे

रामिन्दीवरश्यामं सर्वशत्रुनिबर्हणम् ।
पश्यामो यौवराज्यस्थं तव राजोत्तमात्मजम् ५३
तं देवदेवोपममात्मजं ते सर्वस्य लोकस्य हिते निविष्टम् ।
हिताय नः क्षिप्रमुदारजुष्टं मुदाभिषेक्तुं वरद त्वमर्हसि ५४

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे द्वितीयः सर्गः । २ [१०५]

तृतीयः सर्गः ।

तेषामञ्जलिपद्मानि प्रगृहीतानि सर्वशः ।
प्रतिगृह्याब्रवीद्राजा तेभ्यः प्रियहितं वचः १
अहोऽस्मि परमप्रीतः प्रभावश्चातुलो मम ।
यन्मे ज्येष्ठं प्रियं पुत्रं यौवराज्यस्थमिच्छतः २
इति प्रत्यर्चितान्राजा ब्राह्मणानिदमब्रवीत् ।
वसिष्ठं वामदेवं च तेषामेवोपशृण्वताम् ३
चैत्रः श्रीमानयं मासः पुण्यः पुष्पितकाननः ।
यौवराज्याय रामस्य सर्वमेवोपकल्पताम् ४

---

राजा ! तुझ्या कृपाप्रसादाने त्यांच्या मनांतील उद्देश सिद्धीस जावो. हे नृपश्रेष्ठा ! नील कमलाप्रमाणे श्यामवर्ण असा तुझा पुत्र सर्वशत्रुनाशक राम यौवराज्यावर बसल्याचें आम्ही पाहूं. तस्मात्, हे वरप्रद भूपते ! सर्व लोकांच्या हिताविषयी तत्पर व उदार गुणांनी संपन्न अशा आपल्या देवाधिदेव विष्णुतुल्य रामाला आमच्या हिताकरिता तूं आनंदाने राज्याभिषेक कर. ( ५१–५४ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी दुसरा सर्ग समाप्त झाला. ॥ २ ॥

आपल्या मस्तकाशीं राजांनी जीं अंजलिरूप कमलें लाविलीं होतीं, त्यांचा सर्वप्रकारें योग्य संमानपूर्वक स्वीकार करून दशरथराजा त्यांना प्रिय व हितकारक अशा शब्दांनी म्हणाला, " अहो ! ज्या अर्थी माझा ज्येष्ठ प्रिय पुत्र यौवराज्यावर बसावा, अशी तुझी इच्छा करीत आहां, त्या अर्थी मी आपला प्रभावही अतुल समजत आहें. " याप्रमाणे त्यांना मान दिल्यावर ते ऐकत असतांनाच दशरथराजा वसिष्ठ, वामदेव इत्यादि ब्राह्मणांना म्हणाला, " हा वनें प्रफुल्लित झालेला श्रीमान्

राज्ञस्तूपरते वाक्ये जनघोषो महानभूत् ५
शनैस्तस्मिन्प्रशान्ते च जनघोषे जनाधिपः ।
वसिष्ठं मुनिशार्दूलं राजा वचनमब्रवीत् ६
अभिषेकाय रामस्य यत्कर्म सपरिच्छदम् ।
तदद्य भगवन्सर्वमाज्ञापयितुमर्हसि ७
तच्छ्रुत्वा भूमिपालस्य वसिष्ठो मुनिसत्तमः ।
आदिदेशाग्रतो राज्ञः स्थितान्युक्तान्कृताञ्जलीन् ८
सुवर्णादीनि रत्नानि बलीन्सर्वौषधीरपि ।
शुक्लमाल्यानि लाजांश्च पृथक् च मधुसर्पिषी ९
अहतानि च वासांसि रथं सर्वायुधान्यपि ।
चतुरङ्गबलं चैव गजं च शुभलक्षणम् १०
चामरव्यजने चोभे ध्वजं छत्रं च पाण्डुरम् ।
शतं च शातकुम्भानां कुम्भानामग्निवर्चसाम् ११
हिरण्यशृङ्गमृषभं समग्रं व्याघ्रचर्म च ।
यच्चान्यत्किंचिदेष्टव्यं तत्सर्वमुपकल्प्यताम् १२
उपस्थापयत प्रातरग्न्यागारे महीपतेः ।

चैत्रमास पवित्र आहे. तेव्हा तुम्ही रामाला यौवराज्याचा अभिषेक करण्याविषयीं सर्व तयारी करा." हें राजाचें म्हणणें संपतें, तोंच लोकांनी मोठा आनंदघोष केला व तो आनंदघोष हळूहळू शांत झाल्यावर प्रजाधिपति दशरथराजा मुनिश्रेष्ठ वसिष्ठांना म्हणाला, "हे भगवन्! रामाच्या अभिषेकाकरिता जें कर्म कर्तव्य आहे, त्यासाठी साहित्य काय पाहिजे, हें आपण आम्हांला सर्व सांगा. (१-७)

हें दशरथभूपतीचें भाषण श्रवण केल्यावर मुनिश्रेष्ठ हात जोडून राजाच्या पुढे उभे राहिलेल्या सेवादक्ष मंत्र्यांना म्हणाले, "सुवर्णप्रभृति रत्नें, पूजाद्रव्यें, सर्व प्रकारच्या औषधि, श्वेतपुष्पें, लाह्या, वेगवेगळ्या पात्रांत मध व घृत, कोरीं वस्त्रें, रथ, सर्व प्रकारचीं आयुधें, चतुरंग सेना, सुलक्षणी गज, चौरी व मोर्चेल हीं दोन्ही, ध्वज, श्वेत छत्र, अग्नीप्रमाणे उज्ज्वल असे शंभर सुवर्णकुंभ, सुवर्णशृंगी वृषभ, सबंध व्याघ्रचर्म आणि इतरही हळदकुंकू वगैरे लागणारें सामान हें

अन्तःपुरस्य द्वाराणि सर्वस्य नगरस्य च १३
चन्दनस्रग्भिरर्च्यन्तां धूपैश्च घ्राणहारिभिः ।
प्रशस्तमन्नं गुणवद्दधिक्षीरोपसेचनम् १४
द्विजानां शतसाहस्रं यत्प्रकाममलं भवेत् ।
सत्कृत्य द्विजमुख्यानां श्वः प्रभाते प्रदीयताम् १५
घृतं दधि च लाजाश्च दक्षिणाश्चापि पुष्कलाः ।
सूर्येऽभ्युदितमात्रे श्वो भविता स्वस्तिवाचनम् १६
ब्राह्मणाश्च निमन्त्र्यन्तां कल्प्यन्तामासनानि च ।
आबध्यन्तां पताकाश्च राजमार्गाश्च सिच्यताम् १७
सर्वे च तालापचरा गणिकाश्च स्वलंकृताः ।
कक्ष्यां द्वितीयामासाद्य तिष्ठन्तु नृपवेश्मनः १८
देवायतनचैत्येषु सान्नभक्ष्याः सदक्षिणाः ।
उपस्थापयितव्याः स्युर्माल्ययोग्याः पृथक्पृथक् १९
दीर्घासिबद्धगोधाश्च संनद्धा मृष्टवाससः ।

सर्व जमवा आणि प्रातःकालीं राजाच्या होमशालेमध्ये सिद्ध ठेवा. अंतःपुराचीं आणि साऱ्या नगराचीं द्वारें गंध व पुष्पहारांनी व घाणेंद्रिय तल्लीन करणाऱ्या धूपांनी सुशोभित व सुगंधित करा. दधि व पय यांनी युक्त असलेलें प्रशस्त व गुणवान् अन्न एक लक्ष ब्राह्मणांना अगदी हवें तितकें ( पुरून उरेल इतकें ) तयार करा आणि उदईक प्रभातकालीं तें द्विजश्रेष्ठांना सत्कारपूर्वक द्या व त्याबरोबर घृत, दधि, लाह्या आणि विपुल दक्षिणा द्या. उद्या सूर्योदय होतांक्षणीं स्वस्तिवाचन होणें आहे. ( ८–१६ )

त्याकरिता ब्राह्मणांना निमंत्रणें करून असनांची तजवीज ठेवा आणि जिकडे तिकडे पताका बांधून राजमार्गावर सडे घाला. सर्व गीत, वादित्र व नृत्यनिपुण कलावंत लोक आणि उत्तम अलंकार धारण केलेल्या नायकिणी राजवाड्याच्या दुसऱ्या चौकामध्ये येऊन बसूं द्या. देवालयें आणि मार्गावरील वृक्ष यांचे ठिकाणीं ओदन, भक्ष्य व दक्षिणा यांसहवर्तमान पूजासाहित्य येणाऱ्या ब्राह्मणांकरिता वेगळें वेगळें ठेवून द्या. लांब लांब तलवारी घेऊन अंगुलित्राण धारण केलेले व

महाराजाङ्गनं शूराः प्रविशन्तु महोदयम् २०
एवं व्यादिश्य विप्रौ तु क्रियास्तत्र विनिष्ठितौ।
चक्रतुश्चैव यच्छेषं पार्थिवाय निवेद्य च २१
कृतमित्येव चाब्रूतामभिगम्य जगत्पतिम्।
यथोक्तवचनं प्रीतौ हर्षयुक्तौ द्विजोत्तमौ २२
ततः सुमन्त्रं द्युतिमान्राजा वचनमब्रवीत्।
रामः कृतात्मा भवता शीघ्रमानीयतामिति २३
स तथेति प्रतिज्ञाय सुमन्त्रो राजशासनात्।
रामं तत्रानयांचक्रे रथेन रथिनां वरम् २४
अथ तत्र सहासीनास्तदा दशरथं नृपम्।
प्राच्योदीच्याः प्रतीच्याश्च दाक्षिणात्याश्च भूमिपाः २५
म्लेच्छाश्चार्याश्च ये चान्ये वनशैलान्तवासिनः।
उपासांचक्रिरे सर्वे तं देवा वासवं यथा २६

---

उज्ज्वल वस्त्रें परिधान केलेले वीर सज्ज होऊन महोत्सवसमारंभ ज्यांत चालला आहे, त्या राजवाड्याच्या मोठ्या चौकामध्ये प्रविष्ट होऊं द्या." ( १७–२० )

याप्रमाणे अधिकाऱ्यांना आज्ञा करून, तेथे असलेले विप्र, वसिष्ठ व वामदेव यांनीही आपआपलीं पुरोहितोचित कर्मे उरकलीं आणि राजाच्या सांगण्यांत इतरही जें कांही राहून गेलें होतें; पण अवश्य कर्तव्य होतें, तेंही सर्व राजाला निवेदन करून त्यांनी केलें व नंतर "सांगितल्याप्रमाणे सर्व तयारी झाली," असें त्या सुप्रसन्न व हर्षयुक्त द्विजश्रेष्ठ वसिष्ठ–वामदेवांनी भूपति दशरथापाशीं येऊन सांगितल्यावर तेजस्वी दशरथराजा "धर्माकडे बुद्धि असलेल्या रामाला सत्वर घेऊन ये," म्हणून सुमंत्राला म्हणाला. तेव्हा "ठीक आहे," असें त्या सुमंत्राने त्याला सांगितलें आणि रथ्यांमध्ये श्रेष्ठ असलेल्या रामाला राजाच्या आज्ञेवरून तो रथांतून घेऊन आला. दशरथाने सुमंत्राला आज्ञा केल्यानंतर त्या राजवाड्यामध्ये एकत्र बसलेले पूर्व, उत्तर, पश्चिम व दक्षिण या चारी दिशांकडील म्लेच्छ व आर्य राजे आणि वनामध्ये व पर्वतासमीप वास्तव्य करणारे इतरही भूपति हे सर्व इंद्रासभोवती बसणाऱ्या देवांप्रमाणे त्या दशरथ राजासभोवती बसले. (२१-२६)

तेषां मध्ये स राजर्षिर्मरुतामिव वासवः ।
प्रासादस्थो दशरथो ददर्शायान्तमात्मजम् २७
गन्धर्वराजप्रतिमं लोके विख्यातपौरुषम् ।
दीर्घबाहुं महासत्त्वं मत्तमातङ्गगामिनम् २८
चन्द्रकान्ताननं राममतीव प्रियदर्शनम् ।
रूपौदार्यगुणैः पुंसां दृष्टिचित्तापहारिणम् २९
घर्माभितप्ताः पर्जन्यं ह्लादयन्तमिव प्रजाः ।
न ततर्प समायान्तं पश्यमानो नराधिपः ३०
अवतार्य सुमन्त्रस्तु राघवं स्यन्दनोत्तमात् ।
पितुः समीपं गच्छन्तं प्राञ्जलिः पृष्ठतोऽन्वगात् ३१
स तं कैलासशृङ्गाभं प्रासादं रघुनन्दनः ।
आरुरोह नृपं द्रष्टुं सहसा तेन राघवः ३२
सप्राञ्जलिरभिप्रेत्य प्रणतः पितुरन्तिके ।

देवांमध्ये असलेल्या इंद्राप्रमाणे त्या भूपतींमध्ये बसलेल्या दशरथ राजर्षीनें आपल्या पुत्राला येतांना राजवाड्यांतूनच अवलोकन केलें. त्याची अंगकान्ति गंधर्वराजाप्रमाणे असून, त्याचा पराक्रम जगतामध्ये प्रख्यात होता आणि त्या महाधैर्यवान् व आजानुबाहु रामाची गति मत्त गजाप्रमाणे होती. मुख चंद्रापेक्षाही सुंदर असल्यामुळे त्या रामाचें दर्शन अत्यंत प्रिय होतें; रूप व औदार्य एतद्विषयक गुणांनी तो मनुष्याची दृष्टि व चित्त आपणांकडे आकर्षून घेत होता. आणि सूर्याच्या प्रखर तापाने संतप्त झालेल्या लोकांना आल्हाद देणाऱ्या पर्जन्याप्रमाणे तो आपल्या प्रजाजनांना आपल्या दर्शनाने आल्हाद देत होता. अशा आपणांकडे येत असलेल्या रामाला डोळे भरून पहात असतां भूपति दशरथाची तृप्तीच होईना. ( २७-३० )

रघुवंशज रामाला त्या श्रेष्ठ रथांतून उतरविल्यानंतर तो सुमंत्र सारथि पित्याकडे चाललेल्या रामाच्या मागोमाग हात जोडून जाऊं लागला. रथांतून उतरल्यावर कैलासशिखराप्रमाणे असलेल्या त्या राजवाड्यामध्ये राजाचें दर्शन घेण्याकरिता रघुनंदन राम त्या सारथ्यासह मोठ्या त्वरेने वर चढून गेला व हात

नाम स्वं श्रावयन्रामो ववन्दे चरणौ पितुः ३३
तं दृष्ट्वा प्रणतं पार्श्वे कृताञ्जलिपुटं नृपः ।
गृह्याञ्जलौ समाकृष्य सस्वजे प्रियमात्मजम् ३४
तस्मै चाभ्युदितं सम्यङ्मणिकाञ्चनभूषितम् ।
दिदेश राजा रुचिरं रामाय परमासनम् ३५
तथासनवरं प्राप्य व्यदीपयत राघवः ।
स्वयैव प्रभया मेरुमुदये विमलो रविः ३६
तेन विभ्राजिता तत्र सा सभापि व्यरोचत ।
विमलग्रहनक्षत्रा शारदी द्यौरिवेन्दुना ३७
तं पश्यमानो नृपतिस्तुतोष प्रियमात्मजम् ।
अलंकृतमिवात्मानमादर्शतलसंस्थितम् ३८
स तं सुस्थितमाभाष्य पुत्रं पुत्रवतां वरः ।

जोडून आणि नम्र होऊन पित्याचे समीप गेल्यानंतर " मी राम " असें म्हणून त्याने आपल्या पित्याच्या चरणांना वंदन केलें. तेव्हा अत्यन्त नम्रपणाने बाजूला हात जोडून उभ्या राहिलेल्या आपल्या प्रियपुत्राला अवलोकन करितांच दशरथराजाने त्याला हात धरून जवळ घेतलें व कवटाळून धरिलें आणि तेथे मांडून ठेवलेल्या रत्नें व सुवर्ण यांनी भूषित, अत्यंत रमणीय व श्रेष्ठ अशा आसनावर बसावयास राजाने श्रीरामास आज्ञा केली. ( ३१-३५ )

तेव्हा तें श्रेष्ठ आसन प्राप्त झालें असतां उदयकालीं निर्मल रवि ज्याप्रमाणे स्वतः-च्याच प्रभेने मेरुपर्वताला शोभा आणतो, त्याप्रमाणे रामाने स्वतःच्याच प्रभेने त्या श्रेष्ठ आसनाला शोभा आणिली. आसनाला रामाच्या योगाने शोभा आली, इतकेंच नव्हे; परंतु ज्यांतील ग्रह व नक्षत्रें निर्मल आहेत, असें शरदृतूंतील आकाश ज्याप्रमाणे चंद्राच्या योगाने शोभा पावतें, त्याप्रमाणे रामाने प्रकाशित केलेली ती सभाही शोभूं लागली. आरशामध्ये प्रतिबिंबित झालेलें आपलें स्वतः-चेंच भूषित स्वरूप कीं काय, अशा त्या आपल्या प्रिय पुत्राला अवलोकन करून दशरथराजाला अत्यन्त संतोष झाला व नंतर इंद्राशीं भाषण करणारा कश्यपच कीं काय, असा तो पुत्रवानांमध्ये श्रेष्ठ असलेला दशरथराजा आपल्या समीप

उवाचेदं वचो राजा देवेन्द्रमिव कश्यपः ३९
ज्येष्ठायामसि मे पत्न्यां सदृश्यां सदृशः सुतः ।
उत्पन्नस्त्वं गुणज्येष्ठो मम रामात्मजः प्रियः ४०
त्वया यतः प्रजाश्चेमाः स्वगुणैरनुरञ्जिताः ।
तस्मात्त्वं पुष्ययोगेन यौवराज्यमवाप्नुहि ४१
कामतस्त्वं प्रकृत्यैव विनीतो गुणवानसि ।
गुणवत्यपि तु स्नेहात्पुत्र वक्ष्यामि ते हितम् ।
भूयो विनयमास्थाय भव नित्यं जितेन्द्रियः ४२
कामक्रोधसमुत्थानि त्यजस्व व्यसनानि च ।
परोक्षया वर्तमानो वृत्त्या प्रत्यक्षया तथा ४३
अमात्यप्रभृतीः सर्वाः प्रजाश्चैवानुरञ्जय ।
कोष्ठागारायुधागारैः कृत्वा संनिचयान्बहून् ४४
इष्टानुरक्तप्रकृतिर्यः पालयति मेदिनीम् ।

---

मर्यादेने व सावधानतेने बसलेल्या आपल्या पुत्राला संबोधून म्हणाला, " हे रामा ! माझ्या योग्य व ज्येष्ठ पत्नीचे ठिकाणीं तूं मला अनुरूप असा पुत्र झालेला आहेस. तूं गुणांनीही श्रेष्ठ आहेस आणि म्हणूनच तूं मला अनुरूप असाच पुत्र आहेस. ( ३६-४० )

" तूं या प्रजांचें आपल्या गुणांनी रंजन केलेलें आहेस; तस्मात्, पुष्यनक्षत्रावर तूं यौवराज्य प्राप्त करून घे. हे पुत्रा ! यद्यपि तूं स्वभावतःच अत्यन्त गुणवान् आहेस आणि अत्यन्त विनयशीलही आहेस; तथापि पुत्रप्रेमामुळे मी तुला हिताची गोष्ट सांगतों. तूं विनयशील जरी आहेस तरीदेखील आणखी विनयाचें अवलंबन करून नेहमी जितेंद्रिय असत जा; काम व क्रोध यांपासून उत्पन्न होणारीं जीं व्यसनें त्यांपासून दूर रहा. हेरादिकांच्या द्वारा स्वपरराष्ट्रांतील वृत्तान्त समजून घेऊन, त्याचा सभेमध्ये प्रत्यक्ष स्वतः विचारपूर्वक निर्णय करून प्रजांना न्याय देण्याचा परिपाठ ठेव. धान्याचीं कोठारें व शस्त्रास्त्रांचीं कोठारें आणि स्वर्ण-रत्नादिकांचीं भाण्डारें यांत अधिक भर घालून अमात्य प्रभृति आपल्या प्रजा-जनांना संतुष्ट ठेव. जो प्रजेवर प्रेम करतो व प्रजेचेंही ज्याच्यावर प्रेम असतें,

तस्य नन्दन्ति मित्राणि लब्ध्वामृतमिवामराः ४५
तस्मात्पुत्र त्वमात्मानं नियम्यैवं समाचर ×४६
तच्छ्रुत्वा सुहृदस्तस्य रामस्य प्रियकारिणः ।
त्वरिताः शीघ्रमागत्य कौसल्यायै न्यवेदयन् ४७
सा हिरण्यं च गाश्चैव रत्नानि विविधानि च ।
व्यादिदेश प्रियाख्येभ्यः कौसल्या प्रमदोत्तमा ४८
अथाभवाद्य राजानं रथमारुह्य राघवः ।
ययौ स्वं द्युतिमद्वेश्म जनौघैः प्रतिपूजितः ४९
ते चापि पौरा नृपतेर्वचस्तच्छ्रुत्वा तदा लाभमिवेष्टमाशु ।
नरेन्द्रमामन्त्र्य गृहाणि गत्वा देवान्समानर्चुरभिप्रहृष्टाः ५०

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे तृतीयः सर्गः ॥३॥ [१५५]

अशा राजाचा त्याच्या मित्रांना अमृत प्राप्त झालेल्या देवांप्रमाणे आनन्द होत असतो. तस्मात् हे पुत्र ! तूं आत्मसंयमन करून याप्रमाणे वागत जा." (४१-४६)

हें दशरथराजाचें भाषण श्रवण केल्यावर रामाच्या इच्छेप्रमाणे वागणारे त्याचे सुहृद् सत्वर कौसल्येकडे आले आणि त्यांनी तो वृत्तांत तिला निवेदन केला असतां त्या सर्व राजस्त्रियांत श्रेष्ठ अशा कौसल्येने गायी आणि नाना प्रकारचीं रत्नें त्या प्रिय वार्ता सांगणाऱ्यांना देण्याची आज्ञा केली. दशरथराजाने उपदेश केल्यानंतर इकडे रघुवंशज रामही राजाला अभिवंदन करून आणि रथारूढ होऊन जन-समुदायांचें अभिनन्दन स्वीकारीत आपल्या सुशोभित वाड्यांत गेला; तेथे जमलेले ते नगरवासी जनही प्रिय वस्तूच्या लाभाप्रमाणे असलेलें राजाचें तें भाषण श्रवण केल्यावर त्याचा निरोप घेऊन घरीं गेले आणि (आपला मनोरथ सिद्धीस जाण्याचा समय आला आहे, असें समजून) त्यांनी आनंदाने देवतांचें स्तवन केलें. (४७-५०)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी तिसरा सर्ग समाप्त झाला ॥ ३ ॥

× टीप- या सर्गामधील श्लोक ४२ ते ४६ पर्यंत दशरथराजाने रामास केलेला उपदेश प्रत्येक राजाने, राजपुत्राने व राजपुरुषाने उराशीं बाळगण्यासारखा आहे.

चतुर्थः सर्गः ।

**गतेष्वथ नृपो भूयः पौरेषु सह मन्त्रिभिः ।**
**मन्त्रयित्वा ततश्चक्रे निश्चयज्ञः स निश्चयम्** १
**श्व एव पुष्यो भविता श्वोऽभिषेच्यस्तु मे सुतः ।**
**रामो राजीवपत्राक्षो युवराज इति प्रभुः** २
**अथान्तर्गृहमाविश्य राजा दशरथस्तदा ।**
**सूतमामन्त्रयामास रामं पुनरिहानय** ३
**प्रतिगृह्य तु तद्वाक्यं सूतः पुनरुपाययौ ।**
**रामस्य भवनं शीघ्रं राममानयितुं पुनः** ४
**द्वाःस्थैरावेदितं तस्य रामायागमनं पुनः ।**
**श्रुत्वैव चापि रामस्तं प्राप्तं शङ्कान्वितोऽभवत्** ५
**प्रवेश्य चैनं त्वरितो रामो वचनमब्रवीत् ।**
**यदागमनकृत्यं ते भूयस्तद् ब्रूह्यशेषतः** ६
**तमुवाच ततः सूतो राजा त्वां द्रष्टुमिच्छति ।**
**श्रुत्वा प्रमाणं तत्र त्वं गमनायेतराय वा** ७

नगरवासी जन गेल्यानंतर कालदेशवर्तमान जाणणाऱ्या त्या प्रभु दशरथराजाने पुनरपि मंत्र्यांसहवर्तमान वाटाघाट करून, " उद्याच पुष्यनक्षत्र आहे. तेव्हा उदयीकच माझा कमलनयन पुत्र जो राम त्याला युवराज म्हणून राज्याभिषेक करावयाचा" असा निश्चय केला, नंतर घरांत गेल्यावर "रामाला पुनरपि इकडे घेऊन ये, " म्हणून दशरथराजाने सारथ्याला सांगितलें असतां, त्याची आज्ञा शिरसा मान्य करून सारथि रामाला पुनरपि घेऊन येण्याकरिता सत्वर रामाचे वाड्यांत गेला. तेव्हा द्वारपालांनी तो आल्याचें वर्तमान रामाला निवेदन केलें असतां तो पुनः आला आहे, असे ऐकतांच रामाच्या मनांत शंका आली आणि त्या सारथ्याला सत्वर आंत घेऊन " पुनरपि तुझ्या येण्याचें कारण काय, तें पूर्णपणें सांग, " असें तो त्याला विचारूं लागला. ( १-६ )

तेव्हा " राजाला आपणांला भेटण्याची इच्छा आहे, म्हणून आपणांस नेण्यासाठी परत आलों आहे. चलावयाचें किंवा नाही, या संबंधांत मर्जीनुरूप आज्ञा

इति सूतवचः श्रुत्वा रामोऽपि त्वरयान्वितः ।
प्रययौ राजभवनं पुनर्द्रष्टुं नरेश्वरम् ८
तं श्रुत्वा समनुप्राप्तं रामं दशरथो नृपः ।
प्रवेशयामास गृहं विवक्षुः प्रियमुत्तमम् ९
प्रविशन्नेव च श्रीमान्राघवो भवनं पितुः ।
ददर्श पितरं दूरात्प्रणिपत्य कृताञ्जलिः १०
प्रणमन्तं तमुत्थाप्य संपरिष्वज्य भूमिपः ।
प्रदिश्य चासनं चास्मै रामं च पुनरब्रवीत् ११
राम वृद्धोऽस्मि दीर्घायुर्भुक्ता भोगा यथेप्सिताः ।
अन्नवद्भिः क्रतुशतैर्यथेष्टं भूरिदक्षिणैः १२
जातमिष्टमपत्यं मे त्वमद्यानुपमं भुवि ।
दत्तमिष्टमधीतं च मया पुरुषसत्तम १३

---

व्हावी. " म्हणून त्या सारथ्याने त्याला सांगितलें व हें त्या सारथ्याचें भाषण श्रवण करून रामही पुनरपि दशरथराजाची भेट घेण्याकरिता सत्वर राजवाड्यामध्ये गेला. राम येऊन पोचल्याचें ऐकिल्याबरोबर त्याला प्रिय व अत्यन्त हितकारक अशा कांही गोष्टी सांगण्याचा हेतु मनांत असलेल्या दशरथ राजाने त्याला आंत पाठविणेविषयी आज्ञा केली. वैभवशाली रामानेही पित्याच्या दिवाणखान्यांत प्रविष्ट होतां होतांच हात जोडिले आणि पित्याचें दर्शन होतांक्षणीं दुरूनच त्याला प्रणाम केला. ( ७–१० )

तेव्हा प्रणाम करणाऱ्या त्या रामाला उठवून दशरथ भूपतीने कवटाळून धरिलें आणि हाताने त्याला बसण्याकरिता आसन दाखवून तो पुनरपि त्याला म्हणाला, " हे रामा ! मी आता वृद्ध झालों आहे. मी दीर्घायुषी आहें; यथेष्ट विषयोपभोग मी घेतले आहेत आणि ब्राह्मणभोजन व विपुल दक्षिणा यांसहवर्तमान शेकडो क्रतूंनी मी देवांचें यथाविधि पूजन केलें आहे. हे पुरुषोत्तमा ! पृथ्वीमध्ये अनुपम असें प्रिय अपत्य तूं आज मला प्राप्त झाला आहेस. मी दान, यजन आणि अध्ययन केलें आहे. हे वीरा ! मी पाहिजे त्या

अनुभूतानि चेष्टानि मया वीर सुखान्यपि ।
देवर्षिपितृविप्राणामनृणोऽस्मि तथात्मनः १४
न किंचिन्मम कर्तव्यं तवान्यत्राभिषेचनात् ।
अतो यत्त्वामहं ब्रूयां तन्मे त्वं कर्तुमर्हसि १५
अद्य प्रकृतयः सर्वास्त्वामिच्छन्ति नराधिपम् ।
अतस्त्वां युवराजानमभिषेक्ष्यामि पुत्रक १६
अपि चाद्याशुभान्राम स्वप्नान्पश्यामि राघव ।
सनिर्घाता दिवोल्काश्च पतन्ति हि महास्वनाः १७
अवष्टब्धं च मे राम नक्षत्रं दारुणग्रहैः ।
आवेदयन्ति दैवज्ञाः सूर्याङ्गारकराहुभिः १८
प्रायेण च निमित्तानामीदृशानां समुद्भवे ।
राजा हि मृत्युमाप्नोति घोरां चापदमृच्छति १९
तद्यावदेव मे चेतो न विमुह्यति राघव ।
तावदेवाभिषिञ्चस्व चला हि प्राणिनां मतिः २०

सुखाचा उपभोग घेतला आहे आणि ( याग, अध्ययन, प्रजोत्पादन, दान आणि उपभोग यांच्या योगानें ) मी देव, ऋषि, पितर, विप्र आणि आत्मा यांच्या ऋणांतून मुक्त झालों आहे. तुझ्या अभिषेकावाचून माझें आता कांहीएक कर्तव्य उरलें नाही. यास्तव मी जें तुला सांगतों, तें तूं कर. ( ११–१५ )

" पुत्रा, आज तुला सर्व प्रजा तूं राजा व्हावास अशी इच्छा करीत आहेत. तस्मात्, मी तुला यौवराज्याचा अभिषेक करणार आहें; परंतु, हे रघुवंशजा रामा ! अशुभ स्वप्नें मी आजच अवलोकन केलीं आहेत आणि विद्युत्पातासहवर्तमान आकाशांतून मोठ्या गर्जनेने युक्त असे उल्कापातही होत आहेत. इतकेंच नव्हे परंतु हे रामा ! सूर्य, मंगल आणि राहु हे क्रूर ग्रह आज माझ्या नक्षत्रांला आले आहेत, असें ज्योतिषी सांगत आहेत. अरे, अशा प्रकारचीं निमित्तें झालीं असतां प्रायः राजाला प्रथम घोर विपत्ति प्राप्त होऊन मृत्यु येत असतो. तस्मात्, हे रघुवंशजा रामा ! माझ्या चित्ताला मोह पडला नाही, तोंच तूं आपल्याला अभिषेक करून घे; कारण प्राण्याची बुद्धि अस्थिर आहे. ( १६–२० )

अद्य चन्द्रोऽभ्युपगमत्पुष्यात्पूर्वं पुनर्वसुम्।
श्वः पुष्ययोगं नियतं वक्ष्यन्ते दैवचिन्तकाः २१
तत्र पुष्येऽभिषिञ्चस्व मनस्त्वरयतीव माम्।
श्वस्त्वाहमभिषेक्ष्यामि यौवराज्ये परंतप २२
तस्मात्त्वयाद्यप्रभृति निशेयं नियमात्मना।
सह वध्वोपवस्तव्या दर्भप्रस्तरशायिना २३
सुहृदश्चाप्रमत्तास्त्वां रक्षन्त्वद्य समन्ततः।
भवन्ति बहुविघ्नानि कार्याण्येवंविधानि हि २४
विप्रोषितश्च भरतो यावदेव पुरादितः।
तावदेवाभिषेकस्ते प्राप्तकालो मतो मम २५
कामं खलु सतां वृत्ते भ्राता ते भरतः स्थितः।
ज्येष्ठानुवर्ती धर्मात्मा सानुक्रोशो जितेन्द्रियः २६

आज पुष्याचे पूर्वींच्या नक्षत्रावर म्हणजे पुनर्वसु नक्षत्रावर चंद्र आहे आणि चंद्राचा पुष्यनक्षत्राशीं योग गणिताने निश्चित होत असल्याचें ज्योतिषी सांगत आहेत. तेव्हा त्या पुष्यनक्षत्रावर तुला अभिषेक करावा, म्हणून माझें मन अति त्वरा करीत आहे. तस्मात्, हे शत्रुतापना ! मी उदयींक तुला यौवराज्याचा अभिषेक करणार. याकरिता आतापासून ही आजची रात्र तूं दर्भास्तरणावर शयन करून आणि भार्येसहवर्तमान जितेन्द्रिय राहून व्यतीत कर आणि तुझे सुहृद् सभोवती राहून आज तुझें दक्षतेने रक्षण करोत; कारण अशा प्रकारच्या कार्यांना पुष्कळ विघ्नें येत असतात. भरत या नगरांतून बाहेर गेला आहे, तोच तुझ्या अभिषेकाचा योग्य काल आहे, असें मला वाटतें. जरी तुझा भ्राता भरत सज्जनांच्या वर्तनाचें अनुकरण करणारा आहे व तुज ज्येष्ठ भ्रात्याच्या मर्जीप्रमाणे वागणारा आहे, हें अगदी सत्य आहे आणि तो धर्मात्मा, दयाळु व जितेंद्रिय आहे.× ( २१–२६ )

× ( श्लोक २५, सर्ग ४ अयोध्याकाण्ड )—या श्लोकावरून पाहतां, दशरथाच्या मनांत भरताविषयी थोडा " किंतु " असल्याचें दिसतें. तथापि त्याची त्याला कांही म्हणण्या सारखी भीति वाटत नव्हती. भीति होती, त्याला खरोखरी

किं नु चित्तं मनुष्याणामनित्यमिति मे मतम् ।
सतां च धर्मनित्यानां कृतशोभि च राघव २७
इत्युक्तः सोऽभ्यनुज्ञातः श्वो भाविन्यभिषेचने ।
व्रजेति रामः पितरमभिभाष्याभ्ययाद् गृहम् २८
प्रविश्य चात्मनो वेश्म राज्ञादिष्टेऽभिषेचने ।
तत्क्षणादेव निष्क्रम्य मातुरन्तःपुरं ययौ २९
तत्र तां प्रवणामेव मातरं क्षौमवासिनीम् ।
वाग्यतां देवतागारे ददर्शायाचतीं श्रियम् ३०

तरीदेखील हे राघवा ! ज्या अर्थी धर्माविषयी नित्य तत्पर असलेल्या सज्जनांचें-ही चित्त रागद्वेषादि कारणांमुळे विकारवश होऊन जात असल्याचें दिसतें, त्या अर्थी मनुष्यांचें चित्त स्वभावतः अस्थिरच आहे, असें मला वाटतें. " उदयीक होणाऱ्या अभिषेकासंबंधांत येणेप्रमाणे दशरथाने सांगितल्यावर व घरीं जाण्याची आज्ञा मिळाल्यावर तो राम पित्याचा निरोप घेऊन आपल्या महालांत गेला. राजाने अभिषेकाची आज्ञा दिल्यावर आपल्या घरीं गेल्यानंतर राम तत्क्षणींच तेथून निघून मातेच्या अंतःपुरामध्ये गेला, तों ती माता देवघरामध्ये

---

" मामाची " युधाजिताची !

भरत आला असता तर युधाजितही आलाच असता. तर तो भरताचा हक्क पुढे करून युद्धालादेखील उपस्थित झाला असता. भरताचा हक्क राज्यावर असल्याबद्दल राम स्वतःच कबूल करीत आहेत, हें भरत जेव्हा रामाला परत आणण्यासाठी चित्रकूटावर गेला होता, त्या वेळीं रामाच्या बोलण्यावरूनच स्पष्ट होत आहे. त्या प्रसंगीं राम भरताला म्हणत आहेत की,—

पुरा भ्रातः पिता नः स मातरं ते समुद्वहन् ।
पितामहे समाश्रौषीत् राज्यश्रियमनुत्तमम् ॥

( सर्ग १०७, श्लोक ३ )

यावरून युधाजित् भरताचा हक्क पुढे करून, रामाच्या राज्याभिषेकाला विघ्न उपस्थित करण्याचा संभव होता आणि म्हणून भरतापेक्षा युधाजिताचीच भीति दशरथराजाला अधिक होती.

प्रागेव चागता तत्र सुमित्रा लक्ष्मणस्तथा ।
सीता चानायिता श्रुत्वा प्रियं रामाभिषेचनम् ३१
तस्मिन्कालेऽपि कौसल्या तस्थावामीलितेक्षणा ।
सुमित्रयान्वास्यमाना सीतया लक्ष्मणेन च ३२
श्रुत्वा पुष्ये च पुत्रस्य यौवराज्येऽभिषेचनम् ।
प्राणायामेन पुरुषं ध्यायमाना जनार्दनम् ३३
तथा सनियमामेव सोऽभिगम्याभिवाद्य च ।
उवाच वचनं रामो हर्षयंस्तामिदं वरम् ३४
अम्ब पित्रा नियुक्तोऽस्मि प्रजापालनकर्मणि ।
भविता श्वोऽभिषेको मे यथा मे शासनं पितुः ३५

त्याच्या दृष्टीस पडली. ती × सोवळें नेसून देवपूजनामध्ये गढलेली होती आणि मौन धारण करून रामाला राज्यलक्ष्मी प्राप्त होण्याविषयी देवांची प्रार्थना करीत होती. ( २७–३० )

त्या ठिकाणीं सुमित्रा आणि लक्ष्मण यांचें आगमन त्याच्या पूर्वीच झालेलें असून, आपणांला प्रिय असलेला रामराज्याभिषेक श्रवण केल्याबरोबर कौसल्येने सीतेलाही तेथे आणविलें होतें. त्या वेळींही ( राम येऊन समोर उभा राहिला असतांही ), कौसल्या डोळे मिटून बसलेली होती आणि सुमित्रा, सीता व लक्ष्मण हीं तिच्या शुश्रूषेमध्ये तत्पर होतीं. सारांश, पुष्यनक्षत्रावर आपल्या पुत्राला यौवराज्याचा अभिषेक होणार, असें ऐकून ती कौसल्या भक्तजनांचें दुःख निवारण करणाऱ्या पुराणपुरुषाचें प्राणायामपूर्वक ध्यान करीत होती. असो. त्याप्रमाणे ती ध्यानस्थ असतांनाच तिचे समीप जाऊन अभिवंदनपूर्वक तिला आनंद देणाऱ्या रामाने असें उत्कृष्ट भाषण तिच्याशीं केलें. ( ३१–३४ )

" हे माते ! प्रजापालनरूप कार्याचे ठिकाणीं पित्याने माझी योजना केली आहे आणि पित्याच्या आज्ञेप्रमाणे मला उद्या अभिषेक होणार आहे. माझ्यासारखेंच

× या ठिकाणीं क्षौमवासिनी असें विशेषण कौसल्येला दिलें आहे. यावरून देवपूजावगैरेचे वेळीं सोवळें वस्त्र नेसण्याचा प्रघात अति प्राचीन कालापासून असावा, असें दिसतें.

सीतयाप्युपवस्तव्या रजनीयं मया सह ।
एवमुक्तमुपाध्यायैः स हि मामुक्तवान्पिता ३६
यानि यान्यत्र योग्यानि श्वोभाविन्यभिषेचने ।
तानि मे मङ्गलान्यद्य वैदेह्याश्चैव कारय ३७
एतच्छ्रुत्वा तु कौसल्या चिरकालाभिकाङ्क्षितम् ।
हर्षबाष्पाकुलं वाक्यमिदं राममभाषत ३८
वत्स राम चिरं जीव हतास्ते परिपन्थिनः ।
ज्ञातीन्मे त्वं श्रिया युक्तः सुमित्रायाश्च नन्दय ३९
कल्याणे बत नक्षत्रे मया जातोऽसि पुत्रक ।
येन त्वया दशरथो गुणैराराधितः पिता ४०
अमोघं बत मे क्षान्तं पुरुषे पुष्करेक्षणे ।
येयमिक्ष्वाकुराजश्रीः पुत्र त्वां संश्रयिष्यति ४१
इत्येवमुक्तो मात्रा तु रामो भ्रातरमब्रवीत् ।
प्राञ्जलिं प्रह्वमासीनमभिवीक्ष्य स्मयन्निव ४२

सीतेलाही ही रात्र आत्मसंयमनपूर्वक दर्भास्तरणावर शयन करून व्यतीत केली पाहिजे, असें उपाध्यायांनी सांगितलें असून पित्यानेही मला याप्रमाणेच सांगितलें आहे. यास्तव उद्यां होणाऱ्या अभिषेकाला ज्या ज्या कांही मांगलिक गोष्टी योग्य असतील, त्या माझ्याकरिता व सीतेकरिता तूं आज करीव " ही फार दिवसांपासून जिची उत्सुकतेने वाट पहात होती, अशी गोष्ट श्रवण करून कौसल्येचा कंठ आनंदाश्रूंनी सद्गदित झाला आणि ती रामाला म्हणाली. ( ३५-३८ )

" वत्सा रामा, तूं चिरजीवी हो; तुझ्या शत्रूंचा नाश होवो आणि तूं वैभवसंपन्न होऊन माझ्या व सुमित्रेच्या नातेवाईकांना आनंदित कर. हे पुत्रा, तूं खरोखर शुभ नक्षत्रावर मला झाला आहेस आणि म्हणूनच आपल्या गुणांनी पित्या दशरथाचें तूं आराधन केलें आहेस. हे पुत्रा, ज्या अर्थी ही इक्ष्वाकुकुलाची राज्यलक्ष्मी तुझा आश्रय करणार आहे, त्या अर्थी कमलनयन पुराणपुरुषाचें मी जें कांही व्रत आचरिलें, तें सफल झालें. " याप्रमाणे मातेने रामाला सांगितल्यावर नम्र होऊन व हात जोडून बसलेल्या आपल्या भ्रात्याला अवलोकन करून किंचित् हसत

लक्ष्मणेमां मया सार्धं प्रशाधि त्वं वसुंधराम् ।
द्वितीयं मेऽन्तरात्मानं त्वामियं श्रीरुपस्थिता ४३
सौमित्रे भुङ्क्ष्व भोगांस्त्वमिष्टान्राज्यफलानि च ।
जीवितं चापि राज्यं च त्वदर्थमभिकामये ४४
इत्युक्त्वा लक्ष्मणं रामो मातरावभिवाद्य च ।
अभ्यनुज्ञाप्य सीतां च ययौ स्वं च निवेशनम् ४५

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चतुर्थः सर्गः ॥४॥ [२००]

पंचः सर्गः ।

संदिश्य रामं नृपतिः श्वोभाविन्याभिषेचने ।
पुरोहितं समाहूय वसिष्ठमिदमब्रवीत् १
गच्छोपवासं काकुत्स्थं कारयाद्य तपोधन ।
श्रेयसे राज्यलाभाय वध्वा सह यतव्रत २
तथेति च स राजानमुक्त्वा वेदविदां वरः ।
स्वयं वसिष्ठो भगवान्ययौ रामनिवेशनम् ३

---

हसतच की, काय राम त्याला म्हणाला, " हे लक्ष्मणा, माझ्यासहवर्तमान तूं या पृथ्वीचें राज्य कर; तूं माझा दुसरा अंतरात्मा आहेस आणि तुला हें राज्यवैभव आलेलें आहे. हे लक्ष्मणा, तूं पाहिजे त्या प्रिय गोष्टींचा उपभोग घे व राज्याचीं उत्कृष्ट फलें भोग. या राज्याची आणि जीविताचीही तुझ्याकरिताच मी इच्छा करीत आहें. " याप्रमाणे लक्ष्मणाला सांगून रामानें उभयता मातांना अभिवंदन केलें आणि आपणांला व सीतेला जाण्याविषयींची अनुज्ञा मिळवून, तो आपल्या निवासस्थानामध्ये गेला. ( ३९-४५ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्या-कांडापैकी चवथा सर्ग समाप्त झाला. ॥ ४ ॥

दुसऱ्या दिवशीं होणाऱ्या अभिषेकासंबंधांत रामाला योग्य सूचना करावयाच्या त्या केल्यावर दशरथराजा पुरोहित वसिष्ठांना बोलावून आणून म्हणाला " हे तपोधन, हे व्रतस्थ मुने, राज्यलाभरूप कल्याण होण्याकरिता भार्येसहवर्तमान ककुत्स्थकुलोत्पन्न रामाकडून आपण आज उपवास करवावा." यावर ते वेदवेत्त्यां-

उपवासयितुं वीरं मन्त्रविन्मन्त्रकोविदम् ।
ब्राह्मं रथवरं युक्तमास्थाय सुधृतव्रतः ४
स रामभवनं प्राप्य पाण्डुराभ्रघनप्रभम् ।
तिस्रः कक्ष्या रथेनैव विवेश मुनिसत्तमः ५
तमागतमृषिं रामस्त्वरन्निव ससंभ्रमम् ।
मानयिष्यन्स मानार्हं निश्चक्राम निवेशनात् ६
अभ्येत्य त्वरमाणोऽथ रथाभ्याशं मनीषिणः ।
ततोऽवतारयामास परिगृह्य रथात्स्वयम् ७
स चैनं प्रश्रितं दृष्ट्वा संभाष्याभिप्रसाद्य च ।
प्रियार्हं हर्षयन्राममित्युवाच पुरोहितः ८

मध्ये श्रेष्ठ असलेले भगवान् वसिष्ठ मुनि " ठीक आहे " म्हणून राजाला म्हणाले आणि धारिलेलें व्रत अत्यंत निश्चयपूर्वक चालविणारे ते मंत्रवेत्ते वसिष्ठ मुनि ब्राह्मणाला योग्य अशा अश्व जोडिलेल्या श्रेष्ठ रथावर आरूढ होऊन मंत्रवेत्त्या वीर रामाला उपवास घालण्याकरिता रामाच्या वाड्याकडे गेले व श्वेत मेघाप्रमाणे हुबेहुब दिसत असलेल्या रामाच्या निवासस्थानापाशी जाऊन पोंचल्यावर ते मुनिश्रेष्ठ वसिष्ठ रथांत × बसूनच तीन दरवाजे ओलांडून आंत गेले. ( १-५ )

तेव्हा त्या आलेल्या पूज्य ऋषींचा योग्य सन्मान करण्यास्तव राम मोठ्या आदराने घरांतून सत्वर बाहेर आला आणि त्वरेने त्या विचारी वसिष्ठांच्या रथासमीप आल्यावर त्याने स्वतः हात धरून वसिष्ठांना रथांतून उतरवून घेतलें. नंतर प्रिय भाषणालाच योग्य व नम्रतेने उभ्या असलेल्या त्या रामाला पाहून वसिष्ठांनी " वत्सा रामा " असें म्हणून त्याची प्रशंसा केली आणि त्याला हर्ष उत्पन्न करीत

× **तिस्रः कक्ष्या रथेनैव विवेश मुनिसत्तमः ॥** असें या ठिकाणीं विशेष सांगितलें आहे. यावरून राजवाड्याच्या वगैरे आवारामध्ये गाड्यांत बसून जाण्याची सवलत कांहीं विवक्षित लोकांनाच होती आणि इतरांना नव्हती अशी ही व्यवस्था अति प्राचीन कालापासूनच चालत आली आहे, असें दिसतें.

प्रसन्नस्ते पिता राम यत्त्वं राज्यमवाप्स्यसि ।
उपवासं भवानद्य करोतु सह सीतया ९
प्रातस्त्वामभिषेक्ता हि यौवराज्ये नराधिपः ।
पिता दशरथः प्रीत्या ययातिं नहुषो यथा १०
इत्युक्त्वा स तदा राममुपवासं यतव्रतः ।
मन्त्रवत्कारयामास वैदेह्या सहितं शुचिः ११
ततो यथावद्रामेण स राज्ञो गुरुरर्चितः ।
अभ्यनुज्ञाप्य काकुत्स्थं ययौ रामनिवेशनात् १२
सुहृद्भिस्तत्र रामोऽपि सहासीनः प्रियंवदैः ।
सभाजितो विवेशाथताननुज्ञाप्य सर्वशः १३
हृष्टनारीनरयुतं रामवेश्म तदा बभौ ।
यथा मत्तद्विजगणं प्रफुल्लनलिनं सरः १४
स राजभवनप्रख्यात्तस्माद्रामनिवेशनात् ।
निर्गत्य ददृशे मार्गं वसिष्ठो जनसंवृतम् १५

करीत ते पुरोहित वसिष्ठ म्हणाले, " हे रामा, तुझ्यावर पिता प्रसन्न झाला आहे आणि त्यामुळे तुला राज्य प्राप्त होणार आहे. करिता सीतेसहवर्तमान तूं आज उपवास कर. ययातीला अभिषेक करणाऱ्या नहुषाप्रमाणे तुझा पिता दशरथ राजा उदयीक प्रातःकालीं तुला यौवराज्याचा अभिषेक करणार आहे. " ( ९-१० )

याप्रमाणे सांगून त्या शुचिर्भूत व व्रतस्थ वसिष्ठमुनींनी सीतेसहवर्तमान रामाकडून समंत्रक उपवास करविला आणि नंतर रामाने त्या राजगुरूंचें यथाविधि पूजन केल्यावर ते वसिष्ठमुनि रामाला सांगून तेथून परत गेले. तेव्हा प्रिय भाषण करणाऱ्या मित्रमण्डळींसह बसलेल्या रामाचें त्या मित्रमण्डळींनी अभिनन्दन केल्यावर त्या सर्वांना निरोप देऊन तो गृहामध्ये प्रविष्ट झाला. त्या वेळी रामाचें निवासस्थान जिकडे तिकडे आनंदित स्त्रीपुरुषांनी भरून गेलें आणि ज्याच्यांतील कमलें प्रफुल्लित झालीं आहेत व ज्याच्यावरील पक्षिगण मत्त झाले आहेत, अशा सरोवराप्रमाणे दिसूं लागलें. असो. राजवाड्याप्रमाणे असलेल्या त्या रामाच्या निवासस्थानापासून निघाल्यावर वसिष्ठांनी मार्गावर लोकांची खेचाखेच झालेली

वृन्दवृन्दैरयोध्यायां राजमार्गाः समन्ततः ।
बभूवुरभिसंबाधाः कुतूहलजनैर्वृताः १६
जनवृन्दोर्मिसंघर्षहर्षस्वनवृतस्तदा ।
बभूव राजमार्गस्य सागरस्येव निःस्वनः १७
सिक्तसंमृष्टरथ्या हि तथा च वनमालिनी ।
आसीदयोध्या तदहः समुच्छ्रितगृहध्वजा १८
तदा ह्ययोध्यानिलयः सस्त्रीबालाकुलो जनः ।
रामाभिषेकमाकाङ्क्षन्नाकाङ्क्षन्नुदयं रवेः १९
प्रजालङ्कारभूतं च जनस्यानन्दवर्धनम् ।
उत्सुकोऽभूज्जनो द्रष्टुं तमयोध्यामहोत्सवम् २०
एवं तज्जनसंबाधं राजमार्गं पुरोहितः ।
व्यूहन्निव जनौघं तं शनै राजकुलं ययौ २१

आहे, असें अवलोकन केलें; कारण, अयोध्येंतील राजमार्ग लोकांचे समुदायावर समुदाय लोटल्याकारणाने अगदी गजबजून गेलेले होते आणि जिकडे-तिकडे रामाभिषेकोत्सव पाहण्याकरिता उत्सुक झालेल्या लोकांची गर्दी उसळली होती. ( ११–१६ )

जनसमुदायरूप लाटांच्या संघर्षामुळे आणि त्यांच्या हर्षातिरेकाने उत्पन्न झालेल्या कोलाहलामुळे राजमार्ग भरून गेल्याकारणाने त्याचा सागरासारखा निर्घोष होऊं लागला. त्या दिवशीं अयोध्येंतील मार्गावर झाडून सडे घातलेले होते. ठिकठिकाणीं तोरणें लाविलेलीं होतीं आणि जिकडे-तिकडे घरामध्ये गुढ्या उभारलेल्या होत्या. इतकेंच नव्हे परंतु, बायकामुलांसहवर्तमान आनंदाने प्रफुल्लित झालेले अयोध्येंतील लोक रामाभिषेकसमारंभ पाहण्याची उत्सुकता असल्यामुळे सूर्योदयाची वाट पहात बसले होते. प्रजेला भूषणभूत आणि लोकांचा आनंद वृद्धिंगत करणारा असा तो अयोध्येंतील महोत्सव पाहण्याकरिता प्रजाजन उत्सुक झाले होते. ( १७–२० )

याप्रमाणे लोकांनी गजबजून गेलेल्या राजमार्गाने पुरोहित वसिष्ठमुनि हळूहळू त्या जनसमुदायाला आणखी एकत्र जुळवीत जुळवीतच कीं काय राजवाड्या-

सिताभ्रशिखरप्रख्यं प्रासादमधिरुह्य च।
समीयाय नरेन्द्रेण शक्रेणेव बृहस्पतिः २२
तमागतमभिप्रेक्ष्य हित्वा राजासनं नृपः।
पप्रच्छ स्वमतं तस्मै कृतमित्यभिवेदयत् २३
तेन चैव तदा तुल्यं सहासीनाः सभासदः।
आसनेभ्यः समुत्तस्थुः पूजयन्तः पुरोहितम् २४
गुरुणा त्वभ्यनुज्ञातो मनुजौघं विसृज्य तम्।
विवेशान्तःपुरं राजा सिंहो गिरिगुहामिव २५
तदग्र्यवेषप्रमदाजनाकुलं महेन्द्रवेश्मप्रतिमं निवेशनम्।
व्यदीपयंश्चारु विवेश पार्थिवः शशीव तारागणसंकुलं नभः २६

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चमः सर्गः ॥५॥ [२२६]

मध्ये गेले आणि श्वेतवर्ण मेघाप्रमाणे दिसणाऱ्या हिमालय पर्वताच्या शिखरांसमान असलेल्या त्या राजवाड्यांत वर गेल्यावर इंद्राकडे जाणाऱ्या बृहस्पतीप्रमाणे ते दशरथराजाच्या समीप गेले. तेव्हा ते आलेले पाहून दशरथराजा सिंहासनावरून उठून उभा राहिला आणि "माझ्या मताप्रमाणे झालें का?" म्हणून त्याने विचारिलें असतां त्यांनीही त्याला, 'झालें' म्हणून सांगितलें. राजा सिंहासनावरून उठूं लागला असतां त्याच्याबरोबर बसलेले सभासदही पुरोहित वसिष्ठमुनींची मानमान्यता राखण्याकरिता आपआपल्या आसनांवरून उठून उभे राहिले. असो. गुरूंनी सर्व तयारी झाल्यामुळे विश्रांति घेण्याविषयी अनुज्ञा दिली असतां त्या जनसमुदायाला निरोप देऊन दशरथराजा पर्वताच्या गुहेंत प्रवेश करणाऱ्या सिंहाप्रमाणे अन्तःपुरामध्ये प्रविष्ट झाला. सारांश, उत्कृष्ट वेष धारण केलेल्या स्त्रियांनी गजबजलेल्या आणि इंद्राच्या मंदिराप्रमाणे असलेल्या त्या मनोहर स्थानाला शोभा आणीत आणीत दशरथराजा, तारागणांनी व्याप्त झालेल्या आकाशामध्ये प्रविष्ट होणाऱ्या चंद्राप्रमाणे, त्यांत प्रविष्ट झाला. ( २१-२६ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी पांचवा सर्ग समाप्त झाला ॥ ५ ॥

षष्ठः सर्गः ।

गते पुरोहिते रामः स्नातो नियतमानसः ।
सह पत्न्या विशालाक्ष्या नारायणमुपागमत् १
प्रगृह्य शिरसा पात्रीं हविषो विधिवत्ततः ।
महते दैवतायाज्यं जुहाव ज्वलितानले २
शेषं च हविषस्तस्य प्राश्याशास्यात्मनः प्रियम् ।
ध्यायन्नारायणं देवं स्वास्तीर्णे कुशसंस्तरे ३
वाग्यतः सह वैदेह्या भूत्वा नियतमानसः ।
श्रीमत्यायतने विष्णोः शिश्ये नरवरात्मजः ४
एकयामावशिष्टायां रात्र्यां प्रतिविबुध्य सः ।
अलङ्कारविधिं सम्यक्कारयामास वेश्मनः ५
तत्र शृण्वन्सुखा वाचः सूतमागधबन्दिनाम् ।
पूर्वां सन्ध्यामुपासीनो जजाप सुसमाहितः ६
तुष्टाव प्रणतश्चैव शिरसा मधुसूदनम् ।

---

पुरोहित वसिष्ठमुनि गेल्यानंतर मनःसंयमन केलेला राम आपल्या विशालनयन स्त्रीसहवर्तमान स्नान करून नारायणाचें ध्यान करूं लागला. नंतर प्रणामपूर्वक त्यानें आज्यस्थाली घेतली आणि प्रज्वलित अग्नीमध्ये सर्वोत्कृष्ट नारायण देवतेला उद्देशून आज्याचा होम कला. शेष राहिलेलें आज्य प्राशन करून आपणांला प्रिय असलेली गोष्ट सिद्धीस जाण्याविषयी त्याने ईश्वराची प्रार्थना केली आणि नारायण देवतेचें चिंतन करीत करीत तो पुरुषश्रेष्ठ दशरथराजाचा पुत्र भव्य अशा देवगृहामध्ये व्यवस्थित रीतीने पसरलेल्या दर्भास्तरणावर सीतेसहवर्तमान वाङ्नियम व आत्मसंयमन करून शयन करता झाला. नंतर एक प्रहर रात्र राहिल्यावर जागृत होऊन त्यानें आपल्या निवासस्थानाला सडासंमार्जन वगैरे करवून आणि गुढ्या, तोरणें वगैरेंची व्यवस्था लाववून उत्तम प्रकाराने शोभा आणविली. ( १–५ )

पौराणिक, भाट व स्तुतिपाठक, यांचे मधुर शब्द कानावर येऊं लागले असतां प्रातःसंध्या करूं लागलेल्या त्या रामाने अत्यंत स्वस्थांतःकरणपूर्वक जप केला

विमलक्षौमसंवीतो वाचयामास स द्विजान् ७
तेषां पुण्याहघोषोऽथ गम्भीरमधुरस्तथा।
अयोध्यां पूरयामास तूर्यघोषानुनादितः ८
कृतोपवासं तु तदा वैदेह्या सह राघवम्।
अयोध्यानिलयः श्रुत्वा सर्वः प्रमुदितो जनः ९
ततः पौरजनः सर्वः श्रुत्वा रामाभिषेचनम्।
प्रभातां रजनीं दृष्ट्वा चक्रे शोभयितुं पुरीम् १०
सिताभ्रशिखराभेषु देवतायतनेषु च।
चतुष्पथेषु रथ्यासु चैत्येष्वट्टालकेषु च ११
नानापण्यसमृद्धेषु वणिजामापणेषु च।
कुटुम्बिनां समृद्धेषु श्रीमत्सु भवनेषु च १२
सभासु चैव सर्वासु वृक्षेष्वालक्षितेषु च।
ध्वजाः समुच्छ्रिताः साधु पताकाश्चाभवंस्तथा १३
नटनर्तकसङ्घानां गायकानां च गायताम्।

आणि मस्तकानें प्रणाम करून मधुसूदनाचें स्तवन केल्यावर उज्ज्वल पीतांबर परिधान केलेल्या त्या रामानें ब्राह्मणांकडून पुण्याहवाचन करविलें. तेव्हां वाद्यांच्या घोषाबरोबर गंभीर आणि मधुर अशा त्या ब्राह्मणांच्या पुण्याहघोषानें म्हणजे "पुण्याहं" या शब्दाच्या ध्वनीनें अयोध्या नगरी दुमदुमून गेली. तदनंतर सीतेसहवर्तमान रामानें अभिषेकाकरिता उपवास केल्याचें श्रवण केल्यावर अयोध्येमध्यें राहणारे सर्व लोक आनंदित झाले आणि रामाला अभिषेक होणार, असें ऐकून आनंदित झालेल्या त्या सर्व नगरवासी जनांनी रात्र उजाडली, असें पाहून ते नगरीला सुशोभित करण्याच्या उद्योगास लागले. (९–१०)

श्वेतमेघतुल्य हिमालयपर्वताच्या शिखरांप्रमाणें असलेलीं देवालयें, चौक, मोठमोठे रस्ते, पार, माड्या, अनेक प्रकारचा माल भरलेलीं उदम्यांचीं दुकानें, कुटुंबी लोकांचीं समृद्ध आणि भव्य गृहें, सर्व सभास्थानें आणि चोहोंबाजूंनी दृष्टोत्पत्तीस येणारे उंच उंच वृक्ष यांचे ठिकाणीं निशाणें व पताका चांगल्या

मनःकर्णसुखा वाचः शुश्राव जनता ततः १४
रामाभिषेकयुक्ताश्च कथाश्चक्रुर्मिथो जनाः ।
रामाभिषेके संप्राप्ते चत्वरेषु गृहेषु च १५
बाला अपि क्रीडमाना गृहद्वारेषु सङ्घशः ।
रामाभिषवसंयुक्ताश्चक्रुरेव कथा मिथः १६
कृतपुष्पोपहारश्च धूपगन्धाधिवासितः ।
राजमार्गः कृतः श्रीमान्पौरै रामाभिषेचने १७
प्रकाशीकरणार्थं च निशागमनशङ्कया ।
दीपवृक्षांस्तथा चक्रुरनुरथ्यासु सर्वशः १८
अलङ्कारं पुरस्यैवं कृत्वा तत्पुरवासिनः ।
आकाङ्क्षमाणा रामस्य यौवराज्याभिषेचनम् १९
समेत्य सङ्घशः सर्वे चत्वरेषु सभासु च ।
कथयन्तो मिथस्तत्र प्रशशंसुर्जनाधिपम् २०

---

रीतीने उभारिल्या गेल्या. ठिकठिकाणीं नट व नर्तक ( नृत्य करणारे ) यांचे समुदाय आपआपलीं कामें करूं लागले असतां आणि गवई गाऊं लागले असतां मनाला आणि श्रवणेंद्रियाला सुखावह असे शब्द जनसमुदायाला ऐकूं येऊं लागले. याप्रमाणे रामाला अभिषेक होण्याचा समय प्राप्त झाला असतां चवाठ्यावरून आणि घरांतून लोक रामाभिषेकासंबंधानेच आपआपसांत गोष्टी बोलूं लागले; घरांच्या दारांशीं ठिकठिकाणीं बालकांचे समुदाय एकत्र मिळून खेळत असतांनादेखील रामाच्या अभिषेकासंबंधानेच आपआपसांत वाटाघाटी करूं लागले. (११-१६)

नगरांतील लोकांनी रामाच्या अभिषेकोत्सवाप्रीत्यर्थ फुलांच्या आराशी करून व ठिकठिकाणीं धूप जाळून, राजमार्ग सुगन्धित व सुशोभित केला आणि समारंभ लांबल्यास कदाचित् रात्रही होईल अशी शंका येऊन प्रकाश करण्याकरिता त्यांनी लहान लहान रस्त्यांतूनसुद्धा अगदी चोहोंकडे दीपवृक्ष तयार करून ठेविले. याप्रमाणे नगरी सुशोभित करून, रामाला यौवराज्याचा अभिषेक होण्याची इच्छा करणारे त्या नगरींतील सर्व लोक, चवाठ्यांवर आणि सभांमधून संघशः एकत्र जुळले आणि आपआपसांत गोष्टी बोलतां बोलतां दशरथराजाची

अहो महात्मा राजायमिक्ष्वाकुकुलनन्दनः।
ज्ञात्वा वृद्धं स्वमात्मानं रामं राज्येऽभिषेक्ष्यति २१
सर्वे ह्यनुगृहीताः स्म यन्नो रामो महीपतिः।
चिराय भविता गोप्ता दृष्टलोकपरावरः २२
अनुद्धतमना विद्वान्धर्मात्मा भ्रातृवत्सलः।
यथा च भ्रातृषु स्निग्धस्तथास्मास्वपि राघवः २३
चिरं जीवतु धर्मात्मा राजा दशरथोऽनघः।
यत्प्रसादेनाभिषिक्तं रामं द्रक्ष्यामहे वयम् २४
एवंविधं कथयतां पौराणां शुश्रुवुः परे।
दिग्भ्यो विश्रुतवृत्तान्ताः प्राप्ता जानपदा जनाः २५
ते तु दिग्भ्यः पुरीं प्राप्ता द्रष्टुं रामाभिषेचनम्।
रामस्य पूरयामासुः पुरीं जानपदा जनाः २६
जनौघैस्तैर्विसर्पद्भिः शुश्रुवे तत्र निःस्वनः।

---

प्रशंसा करूं लागले. ( १७–२० )

" काय हो तरी हा महात्मा इक्ष्वाकुवंशज दशरथ राजा ! अहो, आपण वृद्ध झालों, असें समजून हा रामाला राज्याभिषेक करणार आहे. आता जगतांतील सर्व इष्टानिष्ट गोष्टींचें ज्ञान ज्याला आहे, असा रामराजा चिरकालपर्यन्त आपला पालक होणार. हा आपणां सर्वांवर खरोखर ईश्वराचा अनुग्रह झाला आहे. विनयशील, अंतःकरणाने युक्त, ज्ञाता, धर्मनिष्ठ आणि भ्रातृवत्सल असा हा रघुवंशज राम भ्रात्याप्रमाणे आपणांवरही प्रेम करणारा आहे. ज्याच्या कृपेमुळे आज आम्हांला रामाला राज्याभिषेक झालेला पाहण्याचा सुप्रसंग येणार आहे, तो श्रेष्ठ धर्मात्मा दशरथराजा दीर्घायु होवो. " ( २१–२४ )

याप्रमाणे राजधानींतील लोक आपआपसांत बोलूं लागले असतां रामाच्या अभिषेकाचा वृत्तांत श्रवण करून चोहोंकडून आलेल्या देशांतील इतर लोकांनीही तें बोलणें ऐकिलें आणि रामाचा अभिषेक पाहण्याकरितां चोहोंकडून राजधानी-मध्ये आलेल्या त्या देशांतील लोकांनी तर रामाच्या त्या नगरीमध्ये अगदी गर्दीच उसळवून दिली. तेव्हा त्या राजधानीकडे चाललेल्या जनसमुदायांना

पर्वसूदीर्णवेगस्य सागरस्येव निःस्वनः   २७

ततस्तदिन्द्रक्षयसंनिभं पुरं दिदृक्षुभिर्जानपदैरुपाहितैः ।
समन्ततः सस्वनमाकुलं बभौ समुद्रयादोभिरिवार्णवोदकम्   २८

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षष्ठः सर्गः ॥६॥ [२५४]

सप्तमः सर्गः ।

ज्ञातिदासी यतो जाता कैकेय्या तु सहोषिता ।
प्रासादं चन्द्रसंकाशमारुरोह यदृच्छया   १
सिक्तराजपथां कृत्स्नां प्रकीर्णकमलोत्पलाम् ।
अयोध्यां मन्थरा तस्मात्प्रासादादन्ववैक्षत   २
पताकाभिर्वरार्हाभिर्ध्वजैश्च समलंकृताम् ।
सिक्तां चन्दनतोयैश्च शिरःस्नातजनैर्युताम्   ३
माल्यमोदकहस्तैश्च द्विजेन्द्रैरभिनादिताम् ।

---

पर्वदिवशीं ( पूर्णिमेचे दिवशीं ) भरतीचे वेळीं मोठ्या वेगानें युक्त झालेल्या सागराच्या गंभीर ध्वनीसारखी अयोध्या नगरींतील जनसमुदायांचा ध्वनि ऐकूं येऊं लागला आणि समुद्रांतील जलचरांच्या योगानें ज्याप्रमाणें समुद्राचें उदक सशब्द व क्षुब्ध होऊन जातें, त्याप्रमाणें अभिषेक-महोत्सव पाहण्याकरितां आलेल्या देशांतील लोकांच्या योगानें इंद्रभुवनाप्रमाणें असलेलें तें नगर चोहोकडून क्षुब्ध व ध्वनियुक्त झालें. ( २५-२८ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सहावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६ ॥

दूरची नातलग असल्यामुळें अगदीं लहानपणापासून कैकेयीपाशीच राहिलेली तिच्या माहेरची दासी मंथरा चंद्राप्रमाणें शुभ्र असलेल्या वाड्याच्या गच्चीवर सहजगत्या गेली असतां, अयोध्यानगरीकडे पाहूं लागली, तों चोहोंकडे राजमार्गावर सडे घातलेले आहेत, कमलपुष्पें पसरून दिलेलीं आहेत, अत्यन्त मौल्यवान् अशा पताका आणि ध्वज यांच्या योगानें नगरी सुशोभित केलेली आहे; जेथें जागा उंच व सखल आहे, अशा मार्गावरही ती सुशोभित केलेली आहे; तिच्या मार्गावरून सर्वत्र चन्दनाचें पाणी शिंपडलेलें आहे; तिच्यांतील लोकांनीं अभ्यंग

शुक्लदेवगृहद्वारां सर्ववादित्रनादिताम् ४
संप्रहृष्टजनाकीर्णां ब्रह्मघोषनिनादिताम् ।
प्रहृष्टवरहस्त्यश्वां संप्रणर्दितगोवृषाम् ५
हृष्टप्रमुदितैः पौरैरुच्छ्रितध्वजमालिनीम् ।
अयोध्यां मन्थरा दृष्ट्वा परं विस्मयमागता ६
सा हर्षोत्फुल्लनयनां पाण्डुरक्षौमवासिनीम् ।
अविदूरे स्थितां दृष्ट्वा धात्रीं पप्रच्छ मन्थरा ७
उत्तमेनाभिसंयुक्ता हर्षेणार्थपरा सती ।
राममाता धनं किं नु जनेभ्यः संप्रयच्छति ८
अतिमात्रं प्रहर्षः किं जनस्यास्य च शंस मे ।
कारयिष्यति किं वापि संप्रहृष्टो महीपतिः ९
विदीर्यमाणा हर्षेण धात्री तु परया मुदा ।

---

स्नान केलेलें आहे; पुष्पें व मोदक हातांत असलेल्या द्विजश्रेष्ठांच्या घोषांनीं ती दुमदुमून गेलेली आहे; तिच्यांतील देवालयांच्या द्वारांना शुभ्र रंग दिलेला आहे; सर्व प्रकारच्या वाद्यांनीं ती नादित झालेली आहे; जिकडे तिकडे लोकांना हर्ष झाला आहे; वेदघोषाच्या ध्वनीने ती नगरी नादित झालेली आहे; उत्कृष्ट गज आणि अश्व यांनाही हर्ष झालेला आहे; गाई व बैलही आनंदाने डरक्या फोडीत आहेत. ( १—५ )

आणि आनंदित झालेल्या नगरींतील लोकांनी ध्वजपंक्ति उभारिलेल्या आहेत, असें तिच्या दृष्टीस पडलें आणि अशा प्रकारें सुशोभित झालेली अयोध्यानगरी अवलोकन करून, तिला अत्यंत विस्मय झाला. तेव्हा हर्षाने तिचे नेत्र प्रफुल्लित झालेले आहेत आणि जिने शुभ्रवर्ण रेशमी शालू नेसलेला आहे, अशी रामाची दाई जवळच उभी होती, तिला पाहून मंथरा म्हणाली, "पराकाष्ठेचा हर्ष होऊन मनोरथ सिद्धीस गेल्याप्रमाणे दिसत असलेली ही राममाता लोकांना द्रव्य कशाकरिता देत आहे ? या लोकांना अतिशय हर्ष कशाकरिता झालेला आहे आणि दशरथराजा तरी अत्यंत हर्षयुक्त होऊन काय करविण्याच्या बेतात आहे, हें मला सांग." याप्रमाणे विचारलें असतां पोटामध्ये हर्ष मावेनासा झाल्यामुळे जणू तिचें पोटच फुटत आहे कीं

आचचक्षेऽथ कुब्जायै भूयसीं राघवे श्रियम् १०
श्वः पुष्येण जितक्रोधं यौवराज्येन चानघम् ।
राजा दशरथो राममभिषेक्ता हि राघवम् ११
धात्र्यास्तु वचनं श्रुत्वा कुब्जा क्षिप्रममर्षिता ।
कैलासशिखराकारात्प्रासादादवरोहत १२
सा दह्यमाना क्रोधेन मन्थरा पापदर्शिनी ।
शयानामेव कैकेयीमिदं वचनमब्रवीत् १३
उत्तिष्ठ मूढे किं शेषे भयं त्वामभिवर्तते ।
उपप्लुतमघौघेन नात्मानमवबुध्यसे १४
अनिष्टे सुभगाकारे सौभाग्येन विकत्थसे ।
चलं हि तव सौभाग्यं नद्याः स्रोत इवोष्णगे १५
एवमुक्ता तु कैकेयी रुष्टया परुषं वचः
कुब्जया पापदर्शिन्या विषादमगमत्परम् १६

काय, अशी ती दासी अत्यंत आनंदाने त्या कुबडीला रामाच्या राज्यलक्ष्मीविषयी सांगूं लागली. ( ६—१० )

"( हे मंथरे ) उदयीक पुष्यनक्षत्रावर क्रोध जिंकलेल्या निष्पाप रघुवंशज रामाला दशरथराजा अभिषेक करणार आहे." हें दाईचें भाषण श्रवण करितांक्षणीं ती कुबडी क्रुद्ध झाली आणि कैलासपर्वताच्या शिखराप्रमाणे असलेल्या त्या वाड्याच्या गच्चीवरून खाली उतरली आणि उतरतांक्षणीं क्रोधाने जळत असलेली ती पापबुद्धि मंथरा कैकेयी निजली असतांनाच तिला म्हणाली, " हे मूढे, ऊठ; निजलीस काय ? तुला भय प्राप्त झालें आहे आणि स्वतः दुःखसागरांत तूं बुडत असूनदेखील त्याची तुला शुद्धही नाही. राजाला तूं मुळीच आवडत नसून, त्याच्या वरवरच्या प्रेमाच्या देखाव्याला भुलून, " पतीचें माझ्यावरच खरें प्रेम आहे, म्हणून " बढाया मारीत असतेस; परंतु, ग्रीष्मऋतूंतील नदीच्या प्रवाहाप्रमाणे तुझ्यावर असलेलें पतिप्रेम अशाश्वत आहे." ( ११–१५ )

याप्रमाणे त्या पापदृष्टि कुबडीने रुष्ट होऊन, कठोर भाषण केलें असतां कैकेयीला पराकाष्ठेचा खेद झाला आणि ती त्या कुबडीला म्हणाली, " काय मन्थरे माझ्या-

कैकेयी त्वब्रवीत्कुब्जां कच्चित्क्षेमं न मन्थरे ।
विषण्णवदनां हि त्वां लक्षये भृशदुःखिताम् १७
मन्थरा तु वचः श्रुत्वा कैकेय्या मधुराक्षरम् ।
उवाच क्रोधसंयुक्ता वाक्यं वाक्यविशारदा १८
सा विषण्णतरा भूत्वा कुब्जा तस्यां हितैषिणी ।
विषादयन्ती प्रोवाच भेदयन्ती च राघवम् १९
अक्षयं सुमहद्देवि प्रवृत्तं त्वद्विनाशनम् ।
रामं दशरथो राजा यौवराज्येऽभिषेक्ष्यति २०
सास्म्यगाधे भये मग्ना दुःखशोकसमन्विता ।
दह्यमानानलेनेव त्वद्धितार्थमिहागता २१
तव दुःखेन कैकेयि मम दुःखं महद्भवेत् ।
त्वद्वृद्धौ मम वृद्धिश्च भवेदिह न संशयः २२
नराधिपकुले जाता महिषी त्वं महीपतेः ।
उग्रत्वं राजधर्माणां कथं देवि न बुध्यसे २३

संबंधांत कांही अनिष्ट वार्ता आहे कीं काय ? तूं अत्यन्त दुःखित झाली असून, तुझें मुखही अगदी खिन्न झालेलें मला दिसत आहे. " हें कैकेयीचें मधुर शब्दांनें युक्त असलेलें भाषण श्रवण केल्यावर बोलण्यामध्ये पटाईत असलेली ती क्रुद्ध झालेली मंथरा पूर्वी पेक्षाही अधिक खिन्न झाल्यासारखी होऊन कैकेयीचें हित इच्छिणारी ती कुबडी रामाविषयी कैकेयीच्या अंतःकरणांत भेदभाव उत्पन्न करण्याच्या उद्देशानें तिच्या मनांत खेद उत्पन्न करीत करीत म्हणाली. ( १६–१९ )

" हे राजपत्नि, दशरथराजा रामाला यौवराज्याचा अभिषेक करणार, हा एक फार मोठा आणि अक्षय असा तुझा नाशच होण्याचा समय आला आहे. हें ऐकतांक्षणीं अगाध भयामध्ये मी बुडून गेलें आणि दुःख व शोक यांनी व्याप्त होऊन अग्नीनें दग्ध होत असलेलीच कीं काय मी तुझ्या हिताकरिता येथे आलें आहें. हे कैकेयी, तुला दुःख झालें असतां मला फारच दुःख होईल आणि तुझा अभ्युदय झाला असतां माझाही निःसंशय अभ्युदय होईल. तूं राजकुलामध्ये जन्मास आलेली असून राजाची भार्या आहेस; परंतु, हे राजपत्नि,

धर्मवादी शठो भर्ता श्लक्ष्णवादी च दारुणः ।
शुद्धभावेन जानीषे तेनैवमतिसंधिता २४
उपस्थितः प्रयुञ्जानस्त्वयि सान्त्वमनर्थकम् ।
अर्थेनैवाद्य ते भर्ता कौसल्यां योजयिष्यति २५
अपवाह्य तु दुष्टात्मा भरतं तव बन्धुषु ।
काल्ये स्थापयिता रामं राज्ये निहतकण्टके २६
शत्रुः पतिप्रवादेन मात्रेव हितकाम्यया ।
आशीविष इवाङ्केन बाले परिधृतस्त्वया २७
यथा हि कुर्याच्छत्रुर्वा सर्पो वा प्रत्युपेक्षितः ।
राज्ञा दशरथेनाद्य सपुत्रा त्वं तथा कृता २८
पापेनानृतसान्त्वेन बाले नित्यं सुखोचिता ।
रामं स्थापयता राज्ये सानुबन्धा हता ह्यसि २९

इतकें असून राजधर्माचें उग्र स्वरूप तूं कसें जाणीत नाहीस ? धर्माच्या गोष्टी सांगून गोडगोड थापा मारणारा तुझा पति शठ व भयंकर असतांना तूं त्याला शुद्ध मनाचा समजत आहेस आणि म्हणूनच सर्व प्रकारें तुला त्यानें फसविलें आहे. तुझ्याशीं नुसतें पोकळ गोडगोड भाषण करीत असून, कौसल्येचें कल्याण करण्याविषयीं तत्पर असलेला तुझा भर्ता आज कौसल्येचाच मनोरथ सिद्धीस नेणार आहे. ( २०-२५ )

आणि म्हणूनच त्या दुरात्म्या तुझ्या भर्त्यानें भरताला तुझ्या माहेरीं अगोदरच पाठवून दिलें व अशा युक्तीनें निष्कंटक झालेल्या राज्यावर तो उद्यींक प्रभातकालीं रामाची स्थापना करणार आहे. अगे पोरी, माता ज्याप्रमाणें भावी हिताच्या आशेनें सापाचें पिलूं कडेखांद्यावर घेऊन त्याचें पोटच्या मुलासारखें लालनपालन करते, त्याचप्रमाणें तूं ह्या पतीच्या स्वरूपांत, सर्पासारखा शत्रूच पोसला आहेस. उपेक्षा केली असता शत्रु अथवा सर्प ज्याप्रमाणें अवस्था करीत असतो, त्याप्रमाणें दशरथराजानें आज पुत्रासहवर्तमान तुझी अवस्था करून टाकिली आहे. हे पोरी, रामाला राज्यावर बसविणाऱ्या या दशरथराजानें दुष्टपणा व कपट यांनी भरलेल्या गोडगोड भाषणानें सर्व काल सुखा मध्येच

सा प्राप्तकालं कैकेयि क्षिप्रं कुरु हितं तव ।
त्रायस्व पुत्रमात्मानं मां च विस्मयदर्शने ३०
मन्थराया वचः श्रुत्वा शयनात्सा शुभानना ।
उत्तस्थौ हर्षसंपूर्णा चन्द्रलेखेव शारदी ३१
अतीव सा तु संतुष्टा कैकेयी विस्मयान्विता ।
दिव्यमाभरणं तस्यै कुब्जायै प्रददौ शुभम् ३२
दत्त्वा त्वाभरणं तस्यै कुब्जायै प्रमदोत्तमा ।
कैकेयी मन्थरां दृष्ट्वा पुनरेवाब्रवीदिदम् ३३
इदं तु मन्थरे मह्यमाख्यातं परमं प्रियम् ।
एतन्मे प्रियमाख्यातं किं वा भूयः करोमि ते ३४
रामे वा भरते वाहं विशेषं नोपलक्षये ।
तस्मात्तुष्टास्मि यद्राजा रामं राज्येऽभिषेक्ष्यति ३५
न मे परं किंचिदितो वरं पुनः प्रियं प्रियार्हे सुवचं वचोऽमृतम् ।

लोळण्याला योग्य अशा तुझा पुत्रपौत्रादि परंपरेसह घात केला आहे. यास्तव, या समयाला योग्य अशी जी हिताची गोष्ट असेल, ती तूं सत्वर कर आणि चाललेला प्रकार आपल्या हिताचाच चालला आहे, असें समजून विस्मयचकित न होतां, अगे कैकेयि, पुत्राचें, माझें आणि आपल्या स्वतःचें रक्षण कर. " ( २६-३० )

हें मंथरेचें भाषण श्रवण केल्यावर हर्षानें व्याप्त झाल्यामुळे शरदृतूंतील चंद्रकलाच कीं काय अशा रीतीनें प्रसन्न मुद्रेने युक्त झालेली कैकेयी शय्येवर उठून बसली. अतिशय संतुष्ट व विस्मययुक्त होऊन तिने त्या कुबडीला शुभ असें एक दिव्य भूषण दिलें आणि त्या कुबडीला भूषण दिल्यावर हर्षयुक्त झालेली ती सर्वोत्कृष्ट स्त्री कैकेयी मंथरेला पुनरपि म्हणाली, " हे मंथरे, ही पराकाष्ठेची प्रिय वार्ता तूं मला सांगितलीस. खरोखरच ही प्रिय वार्ता तूं मला सांगितली आहेस. आता याबद्दल मी आणखी तुला काय बरें देऊं? राम व भरत यांमध्ये मला कांही भेद दिसत नाही. यास्तव राजा रामाला राज्याभिषेक करणार म्हणून मी संतुष्ट झालें आहें. हे प्रियदानयोग्य मंथरे, या तुझ्या प्रिय

**तथा ह्यवाचस्त्वमतः प्रियोत्तरं वरं परं ते प्रददामि तं वृणु ३६**

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्तमः सर्गः ७ [२९०]

अष्टमः सर्गः ।

**मन्थरा त्वभ्यसूय्यैनामुत्सृज्याभरणं हि तत् ।**
**उवाचेदं ततो वाक्यं कोपदुःखसमन्विता १**
**हर्षं किमर्थमस्थाने कृतवत्यसि बालिशे ।**
**शोकसागरमध्यस्थं नात्मानमवबुध्यसे २**
**मनसा प्रसहामि त्वां देवि दुःखार्दिता सती ।**
**यच्छोचितव्ये हृष्टासि प्राप्य त्वं व्यसनं महत् ३**
**शोचामि दुर्मतित्वं ते का हि प्राज्ञा प्रहर्षयेत् ।**
**अरेः सपत्नीपुत्रस्य वृद्धिं मृत्योरिवागताम् ४**
**भरतादेव रामस्य राज्यसाधारणाद्भयम् ।**

---

वार्तेपेक्षा मला कोणतेंही चांगलें भाषण अधिक प्रिय नाही; कारण तूं अशीच कांही अमृततुल्य वार्ता मला कथन केली आहेस. याकरितां प्रिय वार्ता श्रवण केल्यानंतर मी तुला श्रेष्ठ वर देतें, तो तूं मागून घे." ( ३१-३६ )

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी सातवा सर्ग समाप्त झाला ॥ ७ ॥

मंथरेला कैकेयीचें भाषण सहन न झाल्यामुळे कैकेयीनें दिलेलें तें भूषण तिनें भूमीवर फेकून दिलें आणि कोप व दुःख यांनी व्याप्त झालेली ती मंथरा कैकेयीला म्हणाली, " अगे खुळे, भलत्याच प्रसंगीं तूं हा येवढा हर्ष कशाचा मानीत आहेस? तूं स्वतः शोकसागरामध्ये बुडत आहेस, याची तुला शुद्ध नाही. हे राजपत्नि, भयंकर संकट प्राप्त होऊन शोक करण्याचा समय आला असतांना, तूं आनंदित झाली आहेस, हें पाहून मला अत्यन्त दुःख होत आहे व मी मनापासून तुझा निषेध करीत आहें. तुझ्या मूढपणाबद्दल मला वाईट वाटत आहे. मृत्यूप्रमाणे सवतीच्या पुत्राचा अभ्युदय प्राप्त झाल्याचें पाहून कोण बरें शहाणी स्त्री आनंदित होईल ? राज्य हें सर्वांनाच साधारण असल्यामुळे भरतापासूनच रामाला भय आहे. तेव्हां याचा विचार करून मी खिन्न झालें आहें; कारण जो एक पुरुष

तद्विचिन्त्य विषण्णास्मि भयं भीताद्धि जायते ५
लक्ष्मणो हि महाबाहू रामं सर्वात्मना गतः ।
शत्रुघ्नश्चापि भरतं काकुत्स्थं लक्ष्मणो यथा ६
प्रत्यासन्नक्रमेणापि भरतस्यैव भामिनि ।
राज्यक्रमो विसृष्टस्तु तयोस्तावद्यवीयसोः ७
विदुषः क्षत्रचारित्रे प्राज्ञस्य प्राप्तकारिणः ।
भयात्प्रवेपे रामस्य चिन्तयन्ती तवात्मजम् ८
सुभगा किल कौसल्या यस्याः पुत्रोऽभिषेक्ष्यते ।
यौवराज्येन महता श्वः पुष्येण द्विजोत्तमैः ९
प्राप्तां वसुमतीं प्रीतिं प्रतीतां हतविद्विषम् ।
उपस्थास्यसि कौसल्यां दासीवत्त्वं कृताञ्जलिः १०
एवं च त्वं सहास्माभिस्तस्याः प्रेष्या भविष्यसि ।

---

ज्या दुसऱ्या पुरुषाला भीत असतो, ता अधिकारापन्न झाला असतां त्या दुसऱ्या पुरुषाला त्याच्यापासून भय प्राप्त होतें. ( १–५ )

महापराक्रमी लक्ष्मण सर्वस्वीं रामाच्या तंत्राने वागणारा आहे आणि लक्ष्मण ज्याप्रमाणे ककुत्स्थकुलोत्पन्न रामाच्या तंत्राने वागत आहे, तसा शत्रुघ्नही भरताच्या तंत्राने वागत आहे. जन्माच्या क्रमावरून पाहतांदेखील रामानन्तर भरताचाच हक्क राज्यावर पोहोचतो आणि लक्ष्मण व शत्रुघ्न हे दोघेही वयाने भरतापेक्षाही लहान असल्यामुळे त्यांचा राज्यावरचा हक्क फारच दूर आहे. ( ६–७ )

यास्तव सर्व शास्त्रवेत्ता, राजनीतीं अत्यन्त निपुण व विलंब न करितां समयोचित कर्तव्य गोष्ट करणारा जो राम त्याच्यापासूनच तुझ्या पुत्राला भय प्राप्त होणार असें समजून मी त्याच्या भयाने कापत आहें. उदयीक पुष्यनक्षत्रावर द्विजश्रेष्ठांकडून जिच्या पुत्राला श्रेष्ठ यौवराज्याचा अभिषेक होणार ती कौसल्या खरोखर भाग्यवती आहे. ज्या पृथ्वी प्राप्त होऊन कौसल्या आनंदित झाली असतां आणि तुम्हांस रख्या प्रतिपक्ष्यांना नष्टप्राय करून ती प्रसिद्धीला आली असतां, तुला हात जोडून दासीप्रमाणे तिच्या सेवेमध्ये तत्पर राहणें भाग पडेल. ( ८–१० )

याप्रमाणे तूं आम्हां सद्वर्तमान तिची दासी होशील आणि तुझा पुत्र रामाचा

**पुत्रश्च तव रामस्य प्रेष्यत्वं हि गमिष्यति ११**
**हृष्टाः खलु भविष्यन्ति रामस्य परमाः स्त्रियः । ×**
**अप्रहृष्टा भविष्यन्ति स्नुषास्ते भरतक्षये १२**

दास होईल. सीतेच्या सख्यासुद्धा आनंदित होतील आणि राज्यप्राप्तिक्रमांतून भरताचें नांव नाहीसें झालें असता, तुझ्या स्नुषा दुःखित होऊन राहतील " याप्रमाणे

× या श्लोकांतील "**रामस्य परमाः स्त्रियः** " या शब्दांवरून " रामाला सीतेव्यतिरिक्त आणखीही बहुत स्त्रिया होत्या, " असें अनुमान करून, कांही विद्वान् लोक रामाच्या एकपत्नीत्वास दूषण आणतात; पण तें त्यांचें अनुमान सत्य नाही. " **परमाः** " म्हणजे, श्रेष्ठ, पूज्य, सन्मान्य अशा स्त्रिया. म्हणजे आया, मावश्या, काक्या, माम्या, आते व इतक्याच नत्याच्या बहिणी. त्याच प्रमाणे, सीतेच्याही इतक्याच नात्याच्या स्त्रिया म्हणजे रामाच्या इतक्या प्रकारच्या इतक्याच सास्वा व मेहुण्या आणि सीतेच्या मैत्रिणी, या सर्व " **रामस्य परमाः स्त्रियः** " म्हणजे " मानकरणी " होत. या ठिकाणीं " **रामस्य** " ही संबंध-सामान्ये षष्ठी आहे, या कारणास्तव येथे " स्त्री " शब्दाचा " पाणिगृहीती, पत्नी " असा अर्थ होत नाही. " पाणिग्रहण केलेली स्त्री " या अर्थी भाषेमध्ये सारीं सात नांवें आहेत तीं– " पत्नी, पाणिगृहीती, द्वितीया, सहधर्मिणी, भार्या, जाया व दारा, " हीं सात होत. हीं नांवें – " पाणिगृहण केलेल्या स्त्रीव्यतिरिक्त " अन्यस्त्रियास लागूंच शकत नाहीत. तसें ' स्त्री ' या शब्दाचें नाही. " स्त्री " हा शब्द यद्यपि, " पाणिग्रहण केलेल्या स्त्रीसही " लावला जातो, तथापि, विशेषतः तो सामान्य स्त्रीवाचीही असल्याकारणाने, या " पत्नी " आदि सात शब्दांसारखा " स्त्री " शब्दाचा " पाणिग्रहण केलेलीच, " असा निश्चयात्मक अर्थ होत नाही आणि एकन्दर रामायणावरून पाहतांही " रामाला सीतेव्यतिरिक्त अन्य विवाहित किंवा भोगिनी स्त्री असल्याचा कोठे वासदेखील नाही. " या कारणास्तव परम मर्यादापुरुषोत्तम, धर्ममूर्ति, सत्यप्रतिज्ञ अशा श्रीरामाच्यासंबंधांत अशी अश्लाघ्य अनुमानें काढणें हें अनन्त " **असमंजसपणाचेंच** " केवळ नव्हे, तर त्याच्याही पलिकडचें " पाय म्हणतां येईल, " त्याचें द्योतक आहे.

तां दृष्ट्वा परमप्रीतां ब्रुवन्तीं मन्थरां ततः ।
रामस्यैव गुणान्देवी कैकेयी प्रशशंस ह १३
धर्मज्ञो गुणवान्दान्तः कृतज्ञः सत्यवाञ्छुचिः ।
रामो राजसुतो ज्येष्ठो यौवराज्यमतोऽर्हति १४
भ्रातॄन्भृत्यांश्च दीर्घायुः पितृवत्पालयिष्यति ।
संतप्यसे कथं कुब्जे श्रुत्वा रामाभिषेचनम् १५
भरतश्चापि रामस्य ध्रुवं वर्षशतात्परम् ।

रामाविषयीं अतिशय असंतुष्ट होऊन भाषण करीत असलेल्या त्या मंथरेला अवलोकन करूनही राजपत्नी कैकेयी रामाच्याच गुणांची प्रशंसा करूं लागली. ( ती म्हणाली ) राम हा धर्मवेत्ता, गुणवान्, आत्मसंयमी, कृतज्ञ, सत्यनिष्ठ आणि आचरणाने निर्मल असून राजाचा ज्येष्ठ पुत्र असल्यामुळे त्यालाच यौवराज्य प्राप्त होणें योग्य आहे. तो दीर्घायु राम भ्रात्यांचें आणि दासांचें— पुत्राचें परिपालन करणाऱ्या पित्याप्रमाणे– पालन करील. तेव्हा, हे कुबडये, रामाला अभिषेक होत आहे, हें ऐकून तुझ्या अंगाचा काय कारणास्तव सन्ताप होत आहे ?( ११-१५ )

पुरुषश्रेष्ठ भरतही जर राज्यप्राप्तीची इच्छा धरीत असेल, तर रामाने शंभर

( टिप्पणी मागील पृष्ठावरून चालू )

( २ ) याच श्लोकाच्या पुढल्या अर्धांत " **स्नुषास्ते भरतक्षये** " असे शब्द आहेत. यांतील " **स्नुषा** " म्हणजे सुनेबरोबर तिच्या माहेरून आंदण आलेल्या तिच्या दासी. या सर्व " सुनाच " म्हटल्या जातात.

सांप्रत देखील राजपुतान्यांत राजघराण्यांतून, व मोठ्या खानदानी रजपूत घराण्यांमधून दासी व दास मांचा वर्ग असतो. त्यांना " गोले " असे म्हणतात. त्या गोल्यांच्या ज्या माहेरवासिणी मुली त्यांना " बेटी " असें म्हणतात. त्यांच्या सासुरवासिणी सुना ज्या असतात, त्यांना " बहु " म्हणतात. महाराष्ट्रांत-देखील मराठे क्षत्रिय राजघराण्यांत आणि खानदानी मराठा क्षत्रिय–घराण्यांतूनही हा असाच व्यवहार दृष्टीस पडतो. गोल्याला महाराष्ट्रांत " लेकवळया " म्हणतात व त्या लेकवळयांच्या माहेरवासिणी त्या " लेकी किंवा पोरी " व सासुरवासिणी त्या "सुना" म्हटल्या जातात. "सुनापोरी" हा रूढ शब्द आहे.

पितृपैतामहं राज्यमवाप्स्यति नरर्षभः १६
सा त्वमभ्युदये प्राप्ते दह्यमानेव मन्थरे ।
भविष्यति च कल्याणे किमिदं परितप्यसे १७
यथा वै भरतो मान्यस्तथा भूयोऽपि राघवः ।
कौसल्यातोऽतिरिक्तं च मम शुश्रूषते बहु १८
राज्यं यदि हि रामस्य भरतस्यापि तत्तदा ।
मन्यते हि यथात्मानं तथा भ्रातॄंस्तु राघवः १९
कैकेय्या वचनं श्रुत्वा मन्थरा भृशदुःखिता ।
दीर्घमुष्णं विनिःश्वस्य कैकेयीमिदमब्रवीत् २०
अनर्थदर्शिनी मौर्ख्यान्नात्मानमवबुध्यसे ।
शोकव्यसनविस्तीर्णे मज्जन्ती दुःखसागरे २१
भविता राघवो राजा राघवस्य च यः सुतः ।
राजवंशात्तु भरतः कैकेयि परिहास्यते २२

वर्षे राज्य केल्यानंतर पितृपितामहादि परंपरेने चालत आलेलें राज्य निःसंशय त्यालाही प्राप्त होईल. तस्मात्, रामाभिषेकरूप उत्सव प्राप्त झाला असून, भरताभिषेकरूप श्रेयःप्राप्तीही कांहीं कालाने होण्याचें निश्चित असतांना, हे मंथरे, तूं अगदीं होरपळल्यासारखी कशाकरिता संतप्त होत आहेस ? मला जसा भरत मान्य आहे, तसा राम तर त्याच्याहीपेक्षा अधिक मान्य आहे आणि तोही कौसल्येपेक्षा माझ्याच शुश्रूषेमध्ये फार तत्पर असतो. शिवाय, रामाला जर राज्य प्राप्त होत आहे, तर तें भरतालाही प्राप्त झाल्यासारखेंच आहे; कारण तो स्वताप्रमाणे आपल्या भ्रात्यांना समजत आहे. " ( १६–१९ )

हें कैकेयीचें भाषण श्रवण करून मंथरा अतिशय संतप्त झाली आणि दीर्घ व उष्ण असा सुस्कारा टाकून कैकेयीला म्हणाली "भलतेंच मनांत घेऊन बसलेली तूं शोक आणि संकट यांनीं व्याप्त झालेल्या दुःखसागरामध्ये बुडत असतांनाही मूर्खपणामुळे तुला स्वतःचें भान राहिलेलें नाहीं. रघुवंशज राम उद्या राजा झाला, म्हणजे त्याचाच पुत्र पुढे राजा होणार आणि हे कैकेयी, राजवंशापासून भरत च्युत होणार. हे स्त्रिये, राजाचे सर्वच पुत्र कधी राज्य

नहि राज्ञः सुताः सर्वे राज्ये तिष्ठन्ति भामिनि ।
स्थाप्यमानेषु सर्वेषु सुमहाननयो भवेत् २३
तस्माज्ज्येष्ठे हि कैकेयि राज्यतन्त्राणि पार्थिवाः ।
स्थापयन्त्यनवद्याङ्गि गुणवत्स्वितरेष्वपि २४
असावत्यन्तनिर्भग्नस्तव पुत्रो भविष्यति ।
अनाथवत्सुखेभ्यश्च राजवंशाच्च वत्सले २५
साहं त्वदर्थे संप्राप्ता त्वं तु मां नावबुध्यसे ।
सपत्निवृद्धौ या मे त्वं प्रदेयं दातुमर्हसि २६
ध्रुवं तु भरतं रामः प्राप्य राज्यमकण्टकम् ।
देशान्तरं नाययिता लोकान्तरमथापि वा २७
बाल एव तु मातुल्यं भरतो नायितस्त्वया ।
संनिकर्षाच्च सौहार्दं जायते स्थावरेष्विव २८

करीत नसतात; कारण, सर्वच पुत्र राज्य करूं लागले असतां फारच मोठा अनर्थ होईल. तस्मात्, हे सुंदरी कैकेयी, इतर पुत्र गुणवान् असतांनाही ज्येष्ठ पुत्रालाच राज्याचे अधिकार देत असतात. सारांश, हे दयाशील कैकेयी, हा तुझा पुत्र अनाथाप्रमाणे राजवंशाला आणि सर्व सुखांना अगदी शेवटपर्यंत मुकणार. म्हणून मी तुझ्याकरिता येथे आलें असून, तूं तर माझ्याकडे लक्ष्यच देत नाहींस ! ! इतकेंच नव्हे, तर सवतीचा अभ्युदय होत आहे, म्हणून तूं मला उलट देणगी देण्यास उद्युक्त झाली आहेस. रामाला निष्कंटक राज्य प्राप्त झालें असतां, तो भरताला परदेशीं अथवा परलोकींही निःसंशय पाठवून देणार. ( २०–२७ )

भरताला तर तूं बालपणींच मातुलगृहीं पाठवून दिलें आहेस; परंतु वृक्षलतादिकांचे ठिकाणीं सांनिध्यामुळे जसें परस्परसंयोगरूप प्रेम वाढत असतें तसें मनुष्यांमध्येही सांनिध्यामुळेच प्रेम वाढत असतें. ( सारांश वृक्ष, लता वगैरे जवळजवळ असल्यामुळे जशीं एकमेकांना कवटाळून धरितात, तशीच मनुष्यांची स्थिति असल्यामुळे प्रथमपासून भरत जर पित्याचे संनिध असता, तर त्यालाही आज राज्याचा विभाग प्राप्त झालाच असता. शत्रुघ्न येथे असता, तर कदाचित् भरताचा घात झाला नसता; परंतु

भरतानुवशात्सोऽपि शत्रुघ्नस्तत्समं गतः ।
लक्ष्मणो हि यथा रामं तथायं भरतं गतः २९
श्रूयते हि द्रुमः कश्चिच्छेत्तव्यो वनजीवनैः ।
संनिकर्षादिषीकाभिर्मोचितः परमाद्भयात् ३०
गोप्ता हि रामं सौमित्रिर्लक्ष्मणं चापि राघवः ।
अश्विनोरिव सौभ्रात्रं तयोर्लोकेषु विश्रुतम् ३१
तस्मान्न लक्ष्मणे रामः पापं किंचित्करिष्यति ।
रामस्तु भरते पापं कुर्यादेव न संशयः ३२
तस्माद्राजगृहादेव वनं गच्छतु राघवः ।
एतद्धि रोचते मह्यं भृशं चापि हितं तव ३३
एवं ते ज्ञातिपक्षस्य श्रेयश्चैव भविष्यति ।
यदि चेद्भरतो धर्मात्पित्र्यं राज्यमवाप्स्यति ३४
स ते सुखोचितो बालो रामस्य सहजो रिपुः ।

तोही भरताच्या तंत्राने वागणारा असल्यामुळे त्याच्याबरोबर चालता झाला; कारण लक्ष्मण जसा रामाच्या अनुरोधाने वागणारा आहे, तसा हा भरताच्या अनुरोधाने वागणारा आहे. वनामध्ये उपजीविका करणाऱ्यांना एक वृक्ष तोडावयाचा होता; परंतु त्याच्या भोवताली असलेल्या काटेरी झुडुपांनी त्या पराकाष्ठेच्या भीतीपासून त्या वृक्षाला मुक्त केलें असें ऐकण्यांत आहे. (२८-३०)

सुमित्रापुत्र लक्ष्मण रामाचें रक्षण करणारा असून, राम लक्ष्मणाचें रक्षण करणारा आहे; कारण त्या उभयतांतील भ्रातृप्रेम अश्विनीकुमारांच्या भ्रातृप्रेमाप्रमाणे लोकप्रसिद्ध आहे. यामुळे लक्ष्मणाचें राम यत्किंचितही वाईट करणार नाही, परंतु, भरताचें तो निःसंशय वाईट करणारच. तस्मात् राजवाड्यांतूनच आज रामाने वनांत चालतें व्हावें, हें मला रुचत आहे आणि तुझेंही यामध्ये अतिशय हित आहे. याप्रमाणे भरताला जर धर्मतः पित्याचें राज्य प्राप्त झालें, तर तुझ्या माहेरच्या माणसाचेंही कल्याण होईल. तात्पर्य, रामाला राज्यलक्ष्मी प्राप्त झाली, तर याचा स्वभावतः शत्रु असलेला, नित्य सुखोपभोगाच्याच योग्य असा तुझा

समृद्धार्थस्य नष्टार्थो जीविष्यति कथं वशे ३५
अभिद्रुतमिवारण्ये सिंहेन गजयूथपम् ।
प्रच्छाद्यमानं रामेण भरतं त्रातुमर्हसि ३६
दर्पान्निराकृता पूर्वं त्वया सौभाग्यवत्तया ।
राममाता सपत्नी ते कथं वैरं न यापयेत् ३७
यदा च रामः पृथिवीमवाप्स्यते प्रभूतरत्नाकरशैलसंयुताम् ।
तदा गमिष्यस्यशुभं पराभवं सहैव दीना भरतेन भामिनि ३८
यदा हि रामः पृथिवीमवाप्स्यते ध्रुवं प्रणष्टो भरतो भविष्यति ।
अतो हि संचिन्तय राज्यमात्मजे परस्य चैवास्य विवासकारणं ३९
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डेऽष्टमः सर्गः ॥८॥ [३२९]

नवमः सर्गः ।

एवमुक्ता तु कैकेयी क्रोधेन ज्वलितानना ।
दीर्घमुष्णं विनिःश्वस्य मन्थरामिदमब्रवीत् १

---

बालक राज्यापासून च्युत झाला असतां, त्या रामाच्या आज्ञेंत दासवत् वागून कसा बरें जिवन्त राहील? तस्मात्, अरण्यामध्ये पाठीस लागलेल्या सिंहापासून गजेन्द्राप्रमाणे रामाकडून पादाक्रान्त होणाऱ्या भरताचें तूं रक्षण कर. ( ३१-३६ )

पतिप्रेमाच्या जोरावर पूर्वी तूं गर्वाने रामाच्या मातेला जुमानिलेलें नाहींस. तेव्हा ती तुझी सवत आता त्या वैराचा कां बरें सूड उगवून घेणार नाही? हे स्त्रिये, विशाल समुद्र आणि पर्वत यांसहवर्तमान पृथ्वी जेव्हा रामाला प्राप्त होईल, तेव्हा भरतासहवर्तमान तूं अनाथ होऊन राममातेच्या दास्यत्वाला प्राप्त होशील. तात्पर्य, रामाला पृथ्वी प्राप्त झाली असतां भरताचा निःसंशय घात होईलच होईल. यास्तव, ज्या उपायाने आपल्या पुत्राला राज्यप्राप्ति होईल व रामाला राज्याबाहेर घालवितां येईल, त्याची मनांत नीट योजना कर." ( ३७-३९ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी आठवा सर्ग समाप्त झाला ॥ ८ ॥

याप्रमाणे मंथरा म्हणाली असतां, कैकेयीची मुद्रा क्रोधाने लाल झाली आणि दीर्घ व उष्ण सुस्कारा टाकून ती मंथरेला म्हणाली, "तर मग आजच मी रामाला

अद्य राममितः क्षिप्रं वनं प्रस्थापयाम्यहम् ।
यौवराज्येन भरतं क्षिप्रमद्याभिषेचये    २
इदं त्विदानीं संपश्य केनोपायेन साधये ।
भरतः प्राप्नुयाद्राज्यं न तु रामः कथंचन    ३
एवमुक्ता तु सा देव्या मन्थरा पापदर्शिनी ।
रामार्थमुपहिंसन्ती कैकेयीमिदमब्रवीत्    ४
हन्तेदानीं प्रपश्य त्वं कैकेयि श्रूयतां वचः ।
यथा ते भरतो राज्यं पुत्रः प्राप्स्यति केवलम्    ५
किं न स्मरसि कैकेयि स्मरन्ती वा निगूहसे ।
यदुच्यमानमात्मार्थं मत्तस्त्वं श्रोतुमिच्छसि    ६
मयोच्यमानं यदि ते श्रोतुं छन्दो विलासिनि ।
श्रूयतामभिधास्यामि श्रुत्वा चैतद्विधीयताम्    ७
श्रुत्वैवं वचनं तस्या मन्थरायास्तु कैकयी ।
किंचिदुत्थाय शयनात्स्वास्तीर्णादिदमब्रवीत्    ८

---

सत्वर वनामध्ये पाठवितें आणि भरताला आजच्या आजच सत्वर यौवराज्याचा अभिषेक करवितें; परंतु हे मंथरे, कांही केलें तरी, रामाला राज्य प्राप्त न होतां भरतालाच राज्य प्राप्त व्हावें, ही गोष्ट कोणत्या उपायाने मला साधितां येईल, याचा तूं विचार कर." याप्रमाणे राजपत्नी मंथरेला म्हणाली असतां, वाईट चिंतणारी ती मंथरा रामाचा अभिषेक हाणून पाडण्याच्या उद्देशाने कैकेयीला म्हणाली ( १-४ )

"हे कैकेयी, आता माझें सामर्थ्य पहा आणि फक्त तुझ्या पुत्राला भरतालाच राज्य कसें प्राप्त होईल, यासंबंधाने तूं आता माझें बोलणें ऐकून घे. हे कैकेयी, तो उपाय तुला स्मरतच नाही किंवा स्मरत असूनही तूं लपवून ठेवीत आहेस? कारण ज्या अर्थी आपला मनोरथ सिद्धीस नेणारा तो उपाय तूं अनेक वेळा मला सांगितला असूनही मला "सांग," म्हणून म्हणत आहेस, त्या अर्थी माझ्याच मुखाने वदविण्याचा तुझा उद्देश दिसतो. हे विलासिनी, माझ्या मुखानेच ऐकण्याची जर तुझी इच्छा असेल, तर ऐक आणि ऐकून घेऊन तूं त्याप्रमाणचे वाग." हें त्या मंथरेचें भाषण ऐकून घेतल्यावर उत्कृष्ट रीतीने घातलेल्या शय्येपसून

कथयस्व ममोपायं केनोपायेन मन्थरे ।
भरतः प्राप्नुयाद्राज्यं न तु रामः कथंचन ९
एवमुक्ता तदा देव्या मन्थरा पापदर्शिनी ।
रामार्थमुपहिंसन्ती कैकेयीमिदमब्रवीत् १०
पुरा देवासुरे युद्धे सह राजर्षिभिः पतिः ।
अगच्छत्त्वामुपादाय देवराजस्य साह्यकृत् ११
दिशमास्थाय कैकेयि दक्षिणां दण्डकान्प्रति ।
वैजयन्तमिति ख्यातं पुरं यत्र तिमिध्वजः १२
स शम्बर इति ख्यातः शतमायो महासुरः ।
ददौ शक्रस्य सङ्ग्रामं देवसङ्घैरनिन्दितः १३
तस्मिन्महति सङ्ग्रामे पुरुषान्क्षतविक्षतान् ।
रात्रौ प्रसुप्तान्घ्नन्ति स्म तरसापास्य राक्षसाः १४
तत्राकरोन्महायुद्धं राजा दशरथस्तदा ।

कैकेयी किंचित् उठली आणि म्हणाली. (५-८)

"हे मंथरे, कांही केलें, तरी रामाला राज्य प्राप्त न होतां भरतालाच कोणत्या उपायाने राज्य प्राप्त होईल, तो उपाय तूं मला सांग." याप्रमाणे राजपत्नी कैकेयी बोलली असतां दुसऱ्याचें वाईटच चिंतणारी ती मंथरा रामाचा अभिषेक हाणून पाडण्याचा उद्देश मनांत धरून कैकेयीला म्हणाली, "पूर्वी देवदैत्यांच्या युद्धामध्ये राजर्षींसहवर्तमान तुझा पति देवराज इंद्राला साहाय्य करण्याकरिता तुला बरोबर घेऊन गेला होता. हे कैकेयी, दक्षिण दिशेस असलेल्या दंडकारण्य देशामध्ये वैजयंत म्हणून प्रसिद्ध राजधानीचें शहर असून, त्या ठिकाणीं तिमिध्वज नांवाचा राजा होता. तोच शंबर म्हणून प्रसिद्ध आहे. शेकडो मायांनी युक्त असलेल्या त्या अनिंदित महादैत्याने देवगणांसहवर्तमान इंद्राशीं संग्राम केला. (९-१३)

त्या महासंग्रामामध्ये जे पुरुष जखमा लागून रात्रीं पडलेले असत, त्यांना बलात्काराने आंथरुणावरून ओढून नेऊन राक्षस मारीत असत. त्या संग्राममध्ये दशरथ राजाने मोठें युद्ध केलें. तेव्हा त्या महापराक्रमी राजाच्या अंगाचे दैत्यांनी

असुरैश्च महाबाहुः शस्त्रैश्च शकलीकृतः १५
अपवाह्य त्वया देवि सङ्ग्रामान्नष्टचेतनः ।
तत्रापि विक्षतः शस्त्रैः पतिस्ते रक्षितस्त्वया १६
तुष्टेन तेन दत्तौ ते द्वौ वरौ शुभदर्शने ।
स त्वयोक्तः पतिर्देवि यदिच्छेयं तदा वरम् १७
गृह्णीयां तु तदा भर्तस्तथेत्युक्तं महात्मना ।
अनभिज्ञा ह्यहं देवि त्वयैव कथितं पुरा १८
कथैषा तव तु स्नेहान्मनसा धार्यते मया ।
रामाभिषेकसंभारान्निगृह्य विनिवर्तय १९
तौ च याचस्व भर्तारं भरतस्याभिषेचनम् ।
प्रव्राजनं च रामस्य वर्षाणि च चतुर्दश २०
चतुर्दश हि वर्षाणि रामे प्रव्राजिते वनम् ।
प्रजाभावगतः स्नेहः स्थिरः पुत्रो भविष्यति २१

शस्त्रांच्या योगाने अगदी लचके काढिले. हें पाहून, हे राजपत्नि, मूर्छित झालेल्या त्या आपल्या पतीला तूं रणांतून बाहेर दूर करून नेलेंस; तथापि, तेथेही असुरांनी शस्त्रांच्या योगाने त्याच्या शरिराला क्षतें पाडिलींच; पण त्या प्रसंगींही तूं त्याचें रक्षण केलेंस. हें पाहिल्यावर तुझा भर्ता संतुष्ट होऊन, हे सुंदरी, तुला त्याने दोन वर देऊं केले असतां, "इच्छेस येईल तेव्हा मी हे वर मागून घेईन," म्हणून तूं त्याला सांगितलें आहेस व तो महात्माही त्या वेळीं " ठीक आहे " म्हणून बोलला आहे. हे राजपत्नि, हा प्रकार मला विदित नव्हता; परंतु तूंच पूर्वी सांगितला आहेस. ( १४-१८ )

ही गोष्ट तुझे ठिकाणीं प्रेम असल्यामुळे मी मनांत धरून ठेविलेली आहे. याकरिता वरांच्या जोरावर तूं पतीला अडवून धर आणि रामाला अभिषेक करण्याच्या तयारीपासून त्याला परावृत्त कर. तात्पर्य, भरताला राज्याभिषेक आणि रामाला चवदा वर्षेंपर्यन्त वनवास, याप्रमाणे ते दोन वर तूं आपल्या भर्त्यापासून मागून घे. चवदा वर्षे राम वनामध्ये गेला म्हणजे तुझ्या पुत्राविषयां प्रजेच्या अंतःकरणांत प्रेम उत्पन्न होईल आणि त्या योगाने राज्यावर त्याचे

क्रोधागारं प्रविशाद्य क्रुद्धेवाश्वपतेः सुते ।
शेष्वानन्तर्हितायां त्वं भूमौ मलिनवासिनी २२
मा स्मैनं प्रत्युदीक्षेथा मा चैनमभिभाषथाः ।
रुदन्ती पार्थिवं दृष्ट्वा जगत्यां शोकलालसा २३
दयिता त्वं सदा भर्तुरत्र मे नास्ति संशयः ।
त्वत्कृते च महाराजो विशेदपि हुताशनम् २४
न त्वां क्रोधयितुं शक्तो न क्रुद्धां प्रत्युदीक्षितुम् ।
तव प्रियार्थं राजा तु प्राणानपि परित्यजेत् २५
न ह्यतिक्रमितुं शक्तस्तव वाक्यं महीपतिः ।
मन्दस्वभावे बुध्यस्व सौभाग्यबलमात्मनः २६
मणिमुक्तासुवर्णानि रत्नानि विविधानि च ।
दद्याद्दशरथो राजा मा स्म तेषु मनः कृथाः २७
यौ तौ देवासुरे युद्धे वरौ दशरथो ददौ ।
तौ स्मारय महाभागे सोऽर्थो न त्वाक्रमेदिति २८

---

आसन दृढ व स्थिर होईल. तस्मात्, हे अश्वपतिकन्ये, तूं आज क्रोधगृहामध्ये जा आणि भूमीवर कांहीएक न आंथरतां मलिन वस्त्र परिधान करून पड. ( १९–२२ )

राजा आला असतां त्याच्याकडे तूं पाहूंही नकोस आणि कांही भाषणही करूं नकोस. राजाला पाहिल्याबरोबर तूं शोकाकुल होऊन भूमीवर रुदन करीत पडलेली रहा. तुझ्यावर भर्त्याचें निरन्तर प्रेम आहे, याविषयी मला संशय नाही. इतकेंच नव्हे परंतु, तूं क्रुद्ध असतांना तुझ्याकडे पाहण्याचेंही त्याला धैर्य नाही. तुला प्रिय असलेली गोष्ट करण्याकरिता राजा प्राणांचाही त्याग करील. तुझा शब्द खाली पाडण्यास तो भूपति समर्थ नाही. तेव्हा, हे मूढे, पतिप्रेमाचें केवढें बळ तुला आहे, हें तूं समजून ऐस. ( २३–२६ )

मणि, मोत्यें, सुवर्ण आणि नाना प्रकारचीं रत्नें तुला दशरथ राजा देऊं लागेल; परंतु तूं त्यांचे ठिकाणीं आपलें मन गुंतवूं नको. हे महाभाग्यवती कैकेयी, देव-दैत्यांच्या युद्धाचे वेळीं जे वर तुला दिलेले आहेत, त्यांचें तूं त्याला स्मरण कर,

यदा तु ते वरं दद्यात्स्वयमुत्थाप्य राघवः ।
व्यवस्थाप्य महाराजं त्वमिमं वृणुया वरम् २९
रामप्रव्राजनं दूरं नव वर्षाणि पञ्च च ।
भरतः क्रियतां राजा पृथिव्यां पार्थिवर्षभ ३०
चतुर्दश हि वर्षाणि रामे प्रव्राजिते वनम् ।
रूढश्च कृतमूलश्च शेषं स्थास्यति ते सुतः ३१
रामप्रव्राजनं चैव देवि याचस्व तं वरम् ।
एवं सेत्स्यन्ति पुत्रस्य सर्वार्थास्तव कामिनि ३२
एवं प्रव्राजितश्चैव रामोऽरामो भविष्यति ।
भरतश्च गतामित्रस्तव राजा भविष्यति ३३
येन कालेन रामश्च वनात्प्रत्यागमिष्यति ।

---

म्हणजे तुझा तो उद्देश अगदीच कांहीं निष्फल होणार नाहीं. जेव्हां स्वतः शपथे-वरून राजा तुला वर देईल, तेव्हां त्याला वचन पालन करण्याविषयीं आधीं शपथेनें बांधून घे आणि मग " हे राजाधिराज, चवदा वर्षे रामाला दूर वनामध्यें हाकून देऊन भरताला पृथ्वीचा राजा करावा, " असा वर तूं त्याच्यापाशीं माग. ( २७-३० )

चवदा वर्षें राम वनामध्यें गेला असतां तितक्या कालामध्यें तुझा पुत्र भरत चांगला वाढेल आणि मुळें धरून राहील. सारांश, पुष्कळ वर्षेपर्यंत परिपालन केलेला वृक्ष ज्याप्रमाणे चांगला वाढीस लागतो आणि त्याचीं मुळें पक्कीं बसतात, त्याचप्रमाणें चवदा वर्षेपर्यंत राम वनवासांत गेला असतां तुझ्या पुत्राच्या राज्या-ला बळकटी येऊन, राज्यसंरक्षणाचें एक मुख्य साधन जें सैन्य तेंही तितका काल लोटेपर्यंत त्याला वश होऊन राहील व असें झालें असतां राम जरी वनवासांतून परत आला, तरी तुझा पुत्र राज्यापासून भ्रष्ट होणार नाहीं आणि रामही राज्याची आशा धरणार नाहीं. यास्तव, हे राजपत्नी, रामाला वनांत धाडणें हाच वर तूं त्याच्यापाशीं माग, म्हणजे हे कामिनी, पुत्रासंबंधानें तुझे सर्व मनोरथ परिपूर्ण होतील. याप्रमाणें रामाला हाकून लाविलें असतां तो प्रजाजनांना अप्रिय होईल आणि शत्रु नाहींसा झालेला तुझा भरत राजा होईल. राम वनांतून परत

अन्तर्बहिश्च पुत्रस्ते कृतमूलो भविष्यति ३४
संगृहीतमनुष्यश्च सुहृद्भिः साकमात्मवान्।
प्राप्तकालं नु मन्येऽहं राजानं वीतसाध्वसा ३५
रामाभिषेकसंकल्पान्निगृह्य विनिवर्तय।
अनर्थमर्थरूपेण ग्राहिता सा ततस्तया ३६
हृष्टा प्रतीता कैकेयी मन्थरामिदमब्रवीत्।
सा हि वाक्येन कुब्जायाः किशोरीवोत्पथं गता ३७
कैकेयी विस्मयं प्राप्य परं परमदर्शना।
प्रज्ञां ते नावजानामि श्रेष्ठे श्रेष्ठाभिधायिनि ३८

येईल, तोंपर्यंत तर मध्यन्तरींच्या काळांत सैन्य व प्रजा यांचें अन्तर्बाह्य प्रेम संपादन झाल्याकारणाने, राज्यावर तुझ्या पुत्राचें आसन चांगलें दृढमूल होईल. ( ३१–३४ )

इतकेंच नव्हे परंतु, विश्वासूक माणसांचा संग्रह त्याच्यापाशीं होऊन, त्या जितेंद्रिय भरताच्या मित्राविषयींही प्रजाजनांचे ठिकाणीं अचल प्रेम उत्पन्न होईल. सारांश, रामाला अभिषेक करण्यापासून राजाला परावृत्त करण्याचा हाच समय आहे, असें मला वाटतें. यास्तव, अगदी निर्भयपणाने, वरांच्या जोरावर राजाला कचाट्यांत धरून रामाला अभिषेक करण्याच्या संकल्पापासून तूं त्याला निवृत्त कर." याप्रमाणे त्या मंथरेने अनर्थावह गोष्टच हिताची आहे, असें कैकेयीचे अंतःकरणांत ठसविलें असतां कैकेयीला हर्ष झाला आणि तिने तिचा उपदेश मान्य केला; कारण लहान शिंगरूं बरोबर असलेल्या घोडीप्रमाणे कुबडीच्या भाषणाने ती अत्यंत समंजस कैकेयीही अतिशय विस्मित होऊन आड मार्गाला गेली. ( तात्पर्य, अगदी अल्पवयी शिंगरूं बरोबर येत असलें, म्हणजे घोडी ज्याप्रमाणे चाबुकस्वार वर बसला असतांनाही त्याला न जुमानितां आपल्या शिंगराकरिता आडमार्गाला जाते, त्याप्रमाणे कैकेयी राजाचे अधीन असतांनाही मंथरेच्या उपदेशामुळे भरताकरिता कुमार्गाकडे वळली ) आणि म्हणूनच मंथरेला म्हणाली, "हितोपदेशाविषयीं कुशल व श्रेष्ठ मंथरे, मी तुझ्या बुद्धीची अवज्ञा करीत नाहीं. ( ३५–३८ )

पृथिव्यामासि कुब्जानामुत्तमा बुद्धिनिश्चये ।
त्वमेव तु ममार्थेषु नित्ययुक्ता हितैषिणी ३९
नाहं समवबुद्ध्येयं कुब्जे राज्ञश्चिकीर्षितम् ।
सन्ति दुःसंस्थिताः कुब्जे वक्राः परमपापिकाः ४०
त्वं पद्ममिव वातेन संनता प्रियदर्शना ।
उरस्तेऽभिनिविष्टं वै यावत्स्कन्धात्समुन्नतम् ४१
अधस्ताच्चोदरं शान्तं सुनाभमिव लज्जितम् ।
प्रतिपूर्णं च जघनं सुपीनौ च पयोधरौ ४२
विमलेन्दुसमं वक्त्रमहो राजसि मन्थरे ।
जघनं तव निर्मृष्टं रशनादामभूषितम् ४३
जङ्घे भृशमुपन्यस्ते पादौ च व्यायतावुभौ ।
त्वमायताभ्यां सक्थिभ्यां मन्थरे क्षौमवासिनि ४४

---

कार्य कोणतें आणि अकार्य कोणतें, याचा बुद्धिपूर्वक निश्चय करण्याविषयी तूं पृथ्वीतील सर्व कुबड्या दासींमध्ये श्रेष्ठ आहेस आणि तूंच माझ्या कार्याविषयीं नेहमी तत्पर असून, माझें हित इच्छिणारी आहेस. हे कुबड्ये, तूं जर समजाविलें नसतेंस, तर राजाचें हें कारस्थान माझ्या लक्ष्यांतच आलें नसतें. हे कुब्जे आकृतीनें कुरूप, स्वभावानें कुटिल आणि आचरणानेंही अत्यंत पापी अशाच दासी पुष्कळ असतात. ( ३९-४० )

परंतु, तूं मात्र वायूनें नम्र झालेल्या कमलिनीप्रमाणे वाकलेली असून, तुझी मुद्रा दुसऱ्याला आनंद देणारी आहे. तुझें वक्षःस्थल कुबडानें व्याप्त झाल्यामुळे स्कंधापर्यंत उन्नत आहे आणि वक्षःस्थलाच्या अधोभागीं उत्कृष्ट नाभीनें युक्त असलेलें तुझें उदर कृश असल्यामुळे वक्षःस्थलाची उन्नति पाहून लज्जित झाल्यासारिखें दिसत आहे. तुझा कटिप्रदेश विस्तीर्ण असून स्तन चांगले पुष्ट आहेत आणि तुझें मुख निर्मल चंद्राप्रमाणे दिसत आहे व यामुळे खरोखर, हे मंथरे, तूं कितीतरी चमत्कृत आहेस. तुझा कटिप्रदेश स्वच्छ असून कमरपट्ट्यानें भूषित झालेला आहे आणि तुझ्या पोटऱ्या तर लोकांच्या उपमेस पात्र झाल्या असून, तुझे दोन्ही पाय विस्तीर्ण आहेत. हे सुंदरी मंथरे, तूं पैठणी नेसून माझ्यापुढे चालूं लागलीस

अग्रतो मम गच्छन्ती राजसेऽतीव शोभने ।
आसन्याः शम्बरे मायाः सहस्रमसुराधिपे ४५
हृदये ते निविष्टास्ता भूयश्चान्याः सहस्रशः ।
तदेव स्थगु यद्दीर्घं रथघोणमिवायतम् ४६
मतयः क्षत्रविद्याश्च मायाश्चात्र वसन्ति ते ।
अत्र तेऽहं प्रमोक्ष्यामि मालां कुब्जे हिरण्मयीम् ४७
अभिषिक्ते च भरते राघवे च वनं गते ।
जात्येन च सुवर्णेन सुनिष्टप्तेन सुन्दरि ४८
लब्धार्था च प्रतीता च लेपयिष्यामि ते स्थगु ।
मुखे च तिलकं चित्रं जातरूपमयं शुभम् ४९
कारयिष्यामि ते कुब्जे शुभान्याभरणानि च ।
परिधाय शुभे वस्त्रे देवतेव चरिष्यसि ५०
चन्द्रमाह्वयमानेन मुखेनाप्रतिमानना ।

म्हणजे लांब लांब मांड्यांच्या योगाने तूं अतिशयच मनोहर दिसत असतेस. असुराधिपति शंबरापाशीं ज्या हजारो माया होत्या त्या व इतरही हजारो माया तुझ्या हृदयामध्ये राहिलेल्या आहेत. आणि रथचक्राच्या तुंब्याप्रमाणे विस्तीर्ण असलेलें असें तेंच हें तुझें दीर्घ कुबड आहे, ज्या या तुझ्या कुबडामध्ये मति, राजनीति आणि माया या घर करून आहेत. यास्तव, हे कुब्जे, या तुझ्या कुबडावर ही सोन्याची माळ मी घालत्यें. ( ४१–४७ )

राम वनांत जाऊन भरताला राज्याभिषेक झाला की, माझे मनोरथ परिपूर्ण होऊन मला सन्तोष होईल आणि मग हें तुझें कुबड उत्तम जातवन्त बावनकशी सोन्याने मढवून काढीन व तुझ्या ललाटावर अनेक तऱ्हेतऱ्हेचीं रत्नें ज्यांत बसविलीं आहेत, असा एक अत्यन्त सुन्दर, उत्तम प्रतीच्या सोन्याचा तिलकाकृति अलंकार घडवून घालीन. हे कुबडे, चांगलीं चांगलीं भूषणें मी तुझ्याकरितां करवीन आणि उत्कृष्ट वस्त्रें परिधान करून तूं देवतेप्रमाणें संचार करशील. ( ४८–५० )

अप्रतिम सौन्दर्याच्या योगाने चन्द्राशींही स्पर्धा करणाऱ्या आपल्या मुखामुळे

गमिष्यसि गतिं मुख्यां गर्वयन्ती द्विषज्जने ५१
तवापि कुब्जाः कुब्जायाः सर्वाभरणभूषिताः ।
पादौ परिचरिष्यन्ति यथैव त्वं सदा मम ५२
इति प्रशस्यमाना सा कैकेयीमिदमब्रवीत् ।
शयानां शयने शुभ्रे वेद्यामग्निशिखामिव ५३
गतोदके सेतुबन्धो न कल्याणि विधीयते ।
उत्तिष्ठ कुरु कल्याणं राजानमनुदर्शय ५४
तथा प्रोत्साहिता देवी गत्वा मन्थरया सह ।
क्रोधागारं विशालाक्षी सौभाग्यमदगर्विता ५५
अनेकशतसाहस्रं मुक्ताहारं वराङ्गना ।
अवमुच्य वराहाणि शुभान्याभरणानि च ५६
तदा हेमोपमा तत्र कुब्जावाक्यवशंगता ।
संविश्य भूमौ कैकेयी मन्थरामिदमब्रवीत् ५७
इह वा मां मृतां कुब्जे नृपायावेदयिष्यसि ।

---

शत्रुजनांमध्ये आढ्यतेने मिरविशील व सर्वांत श्रेष्ठता पावशील. तूं जरी कुबडी आहेस, तरी ज्याप्रमाणे तूं सर्वदा माझ्या पायांची सेवा करीत असतेस, त्याचप्रमाणे सर्व प्रकारचे अलंकार धारण केलेल्या कुबड्या तुझ्या पायांची सेवा करूं लागतील." याप्रमाणे कैकेयी मंथरेची प्रशंसा करीत असतांना वेदींतील अग्नीच्या ज्वालेप्रमाणे शुभ्र शय्येवर शयन करणाऱ्या कैकेयीला ती मंथरा म्हणाली, "हे कल्याणि, पाणी निघून गेल्यावर कोणी बांध घालीत नसतात. यास्तव ऊठ; आपलें कल्याण करून घे आणि क्रुद्ध झाली आहेस, असें राजाला दाखीव." याप्रमाणे मंथरेने प्रोत्साहन दिल्यावर पतिप्रेमाच्या मदाने चढून गेलेली ती विशालनयना राजपत्नी कैकेयी मंथरेसहवर्तमान क्रोधगृहामध्ये गेली. (५१-५५)

अनेक लक्षांचा मोत्याचा हार व बहुमोल अशीं इतर उत्कृष्ट भूषणें तिने काढून ठेविलीं; सुवर्णासारिख्या कांतीने युक्त असलेली व कुबडीच्या बोलण्याला वश झालेली ती कैकेयी भूमीवर पडली आणि मंथरेला म्हणाली, "हे कुबडे,

वनं तु राघवे प्राप्ते भरतः प्राप्स्यते क्षितिम् ५८
सुवर्णेन न मे ह्यर्थो न रत्नैर्न च भोजनैः ।
एष मे जीवितस्यान्तो रामो यद्यभिषिच्यते ५९
अथो पुनस्तां महिषीं महीक्षितो वचोभिरत्यर्थमहापराक्रमैः ।
उवाच कुब्जा भरतस्य मातरं हितं वचो राममुपेत्य चाहितम् ६०
प्रपत्स्यते राज्यमिदं हि राघवो यदि ध्रुवं त्वं ससुता च तप्स्यसे ।
ततो हि कल्याणि यतस्व तत्तथा यथा सुतस्ते भरतोऽभिषेक्ष्यते ६१
तथातिविद्धा महिषीति कुब्जया समाहता वागिषुभिर्मुहुर्मुहुः ।
विधाय हस्तौ हृदयेतिविस्मिता शशंस कुब्जां कुपिता पुनः पुनः ६२
यमस्य वा मां विषयं गतामितो निशाम्य कुब्जे प्रतिवेदयिष्यसि ।
वनं गते वा सुचिराय राघवे समृद्धकामो भरतो भविष्यति ६३
अहं हि नैवास्तरणानि न स्रजो न चन्दनं नाञ्जनपानभोजनम् ।

माझ्या मनाप्रमाणे गोष्ट घडून न आल्यास एक तर मी येथे मेल्याचें वर्तमान तूं राजाला सांगशील किंवा राम वनांत जाऊन भरताला तरी पृथ्वी प्राप्त होईल. याशिवाय तिसरी गोष्ट कांही संभवनीय नाही. सुवर्ण, रत्नें व नाना प्रकारचे उपभोग यांच्याशीं मला कांहीएक कर्तव्य नाही. रामाला जर अभिषेक झाला, तर हाच माझ्या जीविताचा अंत होय. यानंतर भरतमाता जी राजभार्या कैकेयी, तिच्या हिताचें आणि रामाच्या अहिताचें भाषण अत्यंत क्रूर शब्दांनी त्या कुबडीने तिच्याशीं केलें की, " हे कल्याणि, रामाला जर हें राज्य प्राप्त झालें, तर पुत्रासहवर्तमान तुला अत्यन्त ताप होईल . यास्तव, तुझा पुत्र भरत यालाच राज्याभिषेक होईल, अशा रीतीने जो यत्न करणें असेल तो कर. " (५६-६०)

याप्रमाणे वाग्बाणांचे वारंवार तडाके देऊन त्या कुबडीने अतिशय घायाळ करून टाकिलेली ती राजभार्या कैकेयी हृदयावर हात ठेवून राजाने माझ्याशीं अशा प्रकारें प्रतारणा केली आहे काय ! म्हणून अत्यंत विस्मित झाली. आणि पुन्हा:पुन्हा क्रुद्ध होऊन ती त्या कुबडीला म्हणाली, " हे कुबडे, रामाला जर राज्याभिषेक झाला तर यमाच्या प्रदेशामध्ये मी येथून गेल्याचें पाहून तूं राजाला तसें सांगशील किंवा पुष्कळ कालपर्यंत राम वनामध्ये चालता झाला, तर

न किंचिदिच्छामि न चेह जीवनम्
न चेदितो गच्छति राघवो वनम् ६४
अथैवमुक्त्वा वचनं सुदारुणम्
निधाय सर्वाभरणानि भामिनी
असंस्कृतामास्तरणेन मेदिनीम् ।
तदाधिशिश्ये पतितेव किंनरी ६५
उदीर्णसंरम्भतमोवृतानना
तदावमुक्तोत्तममाल्यभूषणा ।
नरेन्द्रपत्नी विमना बभूव सा
तमोवृता द्यौरिव मग्नतारका ६६

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे नवमः सर्गः । ९ [३९५]

दशमः सर्गः ।

विदर्शिता यदा देवी कुब्जया पापया भृशम् ।
तदा शेते स्म सा भूमौ दिग्धविद्धेव किंनरी १

भरताचे मनोरथ परिपूर्ण होतील. राम जर येथून वनामध्ये गेला नाही, तर प्रावरणें, माळा, चंदन, अंजन, अन्न, उदक, यांपैकी कशालाही मी स्पर्शदेखील करणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर मी आपला जीवदेखील ठेवणार नाही." (६०–६४)

याप्रमाणे मंथरेशीं अति क्रूर भाषण करून त्या स्त्रीने आपलीं सर्व भूषणें काढून ठेविलीं आणि आस्तरणरहित अशा भूमीवर पुण्यक्षयामुळे स्वर्गातून खाली पडलेल्या किन्नरीप्रमाणे ती पडली. सारांश, अत्यंत कोपरूप तमाने जिचें मुख व्याप्त झालेलें आहे आणि उत्तमोत्तमही पुष्पांचा व भूषणांचा जिने त्याग केलेला आहे, अशी ती खिन्न झालेली राजपत्नी कैकेयी, तमाने व्याप्त आणि म्हणूनच नक्षत्ररहित अशा आकाशाप्रमाणे दिसूं लागली. ( ६५–६६ )

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी नववा सर्ग समाप्त झाला ॥ ९ ॥

दुष्ट कुबडीने राजपत्नी कैकेयीचे मनांत भलतेंच भरवून दिल्यामुळे ती विषलिप्त बाणाने विद्ध झालेल्या किन्नरीप्रमाणे भूमीवर पडली आणि मंथरेने शिकवून

निश्चित्य मनसा कृत्यं सा सम्यगिति भामिनी।
मन्थरायै शनैः सर्वमाचचक्षे विचक्षणा २
सा दीना निश्चयं कृत्वा मन्थरावाक्यमोहिता।
नागकन्येव निःश्वस्य दीर्घमुष्णं च भामिनी ३
मुहूर्तं चिन्तयामास मार्गमात्मसुखावहम्।
सा सुहृच्चार्थकामा च तं निशम्य विनिश्चयम् ४
बभूव परमप्रीता सिद्धिं प्राप्येव मन्थरा।
अथ सा रुषिता देवी सम्यक्कृत्वा विनिश्चयम् ५
संविवेशाबला भूमौ निवेश्य भ्रुकुटिं मुखे।
ततश्चित्राणि माल्यानि दिव्यान्याभरणानि च ६
अपविद्धानि कैकेय्या तानि भूमिं प्रपेदिरे।
तया तान्यपविद्धानि माल्यान्याभरणानि च ७
अशोभयन्त वसुधां नक्षत्राणि यथा नभः।
क्रोधागारे च पतिता सा बभौ मलिनाम्बरा ८

ठेविल्या—अन्वयें, पूर्वी ठरल्याप्रमाणे पुढे काय काय करावयाचें याचा निश्चय मनांत ठरवून, " तुझें म्हणणेंच सर्वथा योग्य आहे," असें ती मंथरेला म्हणाली. तात्पर्य, मंथरेच्या भाषणानें मोहित झालेली ती बिचारी कैकेयी नागकन्येप्रमाणे दीर्घ व उष्ण सुस्कारा टाकूं लागली आणि क्षणभर विचार करून, मंथरेनें सांगितलेला मार्गच आपल्या सुखाचा आहे, असें तिने मनामध्ये ठरविलें. तेव्हा कैकेयीची मैत्रीण आणि तिच्याच वैभवाची इच्छा धरणारी मंथरा कैकेयीचा तो निश्चय पाहून मनोरथ सिद्धीस गेल्याप्रमाणे पराकाष्ठेची आनंदित झाली. तदनंतर क्रुद्ध झालेली ती राजपत्नी अबला कैकेयी मंथरेने सांगितल्याप्रमाणे करण्याचा पक्का निश्चय करून आणि अति क्रोधामुळे भिवया मुखाकडे करून भूमीवर निजली. तेव्हा तिने काढून टाकिलेलीं चित्रविचित्र पुष्पें व दिव्य भूषणें हीं भूमीवर पसरलीं; व नक्षत्रें ज्याप्रमाणे आकाशाला शोभा आणितात, त्याप्रमाणे तिने भिरकावून दिलेल्या पुष्पांनी व भूषणांनी पृथ्वीला शोभा आणिली. क्रोध-गृहामध्ये पडलेल्या त्या कैकेयीने मलिन वस्त्र परिधान केलें होतें. ( १-८ )

एकवेणीं दृढां बद्ध्वा गतसत्त्वेव किंनरी ।
आज्ञाप्य तु महाराजो राघवस्याभिषेचनम् ९
उपस्थानमनुज्ञाप्य प्रविवेश निवेशनम् ।
अद्य रामाभिषेको वै प्रसिद्ध इति जज्ञिवान् १०
प्रियार्हां प्रियमाख्यातुं विवेशान्तःपुरं वशी ।
स कैकेय्या गृहं श्रेष्ठं प्रविवेश महायशाः ११
पाण्डुराभ्रमिवाकाशं राहुयुक्तं निशाकरः ।
शुकबर्हिसमायुक्तं क्रौञ्चहंसरुतायुतम् १२
वादित्रवरसंघुष्टं कुब्जावामनिकायुतम् ।
लतागृहैश्चित्रगृहैश्चम्पकाशोकशोभितैः १३
दान्तराजतसौवर्णवेदिकाभिः समायुतम् ।
नित्यपुष्पफलैर्वृक्षैर्वापीभिरुपशोभितम् १४
दान्तराजतसौवर्णैः संवृतं परमासनैः ।

आणि केसांचा घट्ट अंबाडा बांधून पडलेली ती गतप्राण झालेल्या किन्नर-स्त्रीप्रमाणे दिसत होती. इकडे रामाभिषेकाची आज्ञा केल्यावर महाराज दशरथाने सभासदांना आपआपल्या घरीं जाण्याची अनुज्ञा दिली आणि नंतर तो स्वतः घरामध्ये गेला. तदनंतर आजच रामाला अभिषेक होण्याचें निश्चित झालें आहे, परंतु अद्यापि कैकेयीला हें वर्तमान कळलेलें नाही, असें समजून तो जितेंद्रिय दशरथ राजा प्रिय वार्ता ऐकविण्यास योग्य अशा कैकेयीला तें प्रिय वर्तमान सांगण्याकरिता अंतःपुरामध्ये गेला व अंतःपुरांत गेल्यावर तो महाकीर्तिमान् दशरथ राजा श्वेतवर्ण मेघ व राहु यानी युक्त असलेल्या आकाशांत प्रविष्ट होणाऱ्या चंद्राप्रमाणे कैकेयीच्या मुख्य गृहामध्ये प्रविष्ट झाला. शुक आणि मयूर यांनी युक्त असलेल्या त्या गृहामध्ये क्रौंच व हंस पक्षी शब्द करीत होते. ( ९–१२ )

वाद्यांचा तेथे घोष चाललेला होता; कुबड्या व खुजा स्त्रिया त्यामध्ये होत्या; चंपक व अशोक वृक्ष यांनी सुशोभित असलेलीं सचित्र लतागृहें तेथे असून हस्तिदंत, रजत व सुवर्ण याचे ठिकठिकाणीं ओटे केलेले होते; नेहमी प्रफुल्लित व फलयुक्त असलेल्या वृक्षांनी आणि वापींनी त्याला शोभा आणिली असून, हस्तिदंत रजत व

विविधैरन्नपानैश्च भक्ष्यैश्च विविधैरपि १५
उपपन्नं महार्हैश्च भूषणैस्त्रिदिवोपमम् ।
संप्रविश्य महाराजः स्वमन्तःपुरमृद्धिमत् १५
न ददर्श स्त्रियं राजा कैकेयीं शयनोत्तमे ।
स कामबलसंयुक्तो रत्यर्थी मनुजाधिपः १७
अपश्यद्दयितां भार्यां पप्रच्छ विषसाद च ।
न हि तस्य पुरा देवी तां वेलामत्यवर्तत १८
न च राजा गृहं शून्यं प्रविवेश कदाचन ।
ततो गृहगतो राजा कैकेयीं पर्यपृच्छत १९
यथापुरमविज्ञाय स्वार्थलिप्सुमपण्डिताम् ।
प्रतीहारी त्वथोवाच संत्रस्ता तु कृताञ्जलिः २०
देव देवी भृशं क्रुद्धा क्रोधागारमभिद्रुता ।
प्रतीहार्या वचः श्रुत्वा राजा परमदुर्मनाः २१

---

सुवर्ण यांचीं उत्कृष्ट आसनें तेथे सर्वत्र मांडून ठेविलेलीं होतीं. नाना प्रकारचीं खाद्यपेयें व भक्ष्यपदार्थ तेथे सिद्ध होते आणि मोठमोठ्या मौल्यवान् वस्त्रूंनीं सजवून, त्या गृहाला स्वर्गतुल्य शोभा आणिली होती. अशा त्या आपल्या समृद्ध अन्तःपुरामध्ये महाराज दशरथ प्रविष्ट झाला, तों तेथे शय्येवर प्रिय भार्या कैकेयी त्या राजाच्या दृष्टीस पडली नाही. तेव्हा, उत्कट कामवासना झाल्यामुळे रतिसुखाविषयी उत्सुक झालेल्या त्या भूपतीने तिची चौकशी केली आणि तो खिन्न झाला; कारण, यापूर्वी त्या राजपत्नीने त्याची ती वेळ कधीही चुकविली नव्हती. ( १३–१८ )

आणि म्हणूनच दशरथ राजालाहि कैकेयीरहित अशा त्या गृहामध्ये प्रवेश करण्याचा कधीही प्रसंग आलेला नव्हता. म्हणून गृहांत गेल्याबरोबर, कैकेयी स्वार्थलेलुप व विवेकशून्य बनली आहे हें न जाणून, त्या राजाने नेहमीप्रमाणेच द्वारावर असलेल्या दासीला ती कोठे आहे, म्हणून विचारिलें असतां ती दारावर असणारी दासी भयभीत होऊन हात जोडून म्हणाली. ( १९—२० )

" हे भूपते, राणी अत्यंत क्रुद्ध झाली असून क्रोधगृहामध्ये झपाट्याने निघून

विषसाद पुनर्भूयो लुलितव्याकुलेन्द्रियः ।
तत्र तां पतितां भूमौ शयानामतथोचिताम् २२
प्रतप्त इव दुःखेन सोऽपश्यज्जगतीपतिः ।
स वृद्धस्तरुणीं भार्यां प्राणेभ्योऽपि गरीयसीम् २३
अपापः पापसंकल्पां ददर्श धरणीतले ।
लतामिव विनिष्कृत्तां पतितां देवतामिव २४
किंनरीमिव निर्धूतां च्युतामप्सरसं यथा ।
मायामिव परिभ्रष्टां हरिणीमिव संयताम् २५
करेणुमिव दिग्धेन विद्धां मृगयुना वने ।
महागज इवारण्ये स्नेहात्परमदुःखिताम् २६
परिमृज्य च पाणिभ्यामभिसंत्रस्तचेतनः ।
कामी कमलपत्राक्षीमुवाच वनितामिदम् २७

---

गेली आहे." हें त्या दारावरील दासीचें भाषण श्रवण केल्यावर दशरथ राजाच्या मनाला फारच वाईट वाटलें आणि इंद्रियें अति चंचल व क्षुब्ध होऊन त्याचें चित्त पुनरपि अधिकच व्याकुल झालें व तशा प्रकारें भूमीवर पडून राहण्याला योग्य नसलेली ती कैकेयी भूमीवर पडली आहे, असें पाहून तो भूपति दशरथ राजा दुःखाने अगदी संतप्त झाला. सारांश, त्या वृद्ध व निष्पाप दशरथराजाने प्राणापेक्षाही प्रिय अशी आपली, दुष्ट हेतु मनांत धरून राहिलेली, तरुण भार्या भूतलावर पडलेली जेव्हा पाहिली, तेव्हा ती जणू काय तोडून टाकलेली लता, अथवा स्वर्गापासून च्युत झालेली देवता, किंवा पुण्यक्षयामुळे स्वस्थानापासून पतित झालेली किन्नरी अथवा स्वर्गापासून च्युत झालेली अप्सरा किंवा दुसऱ्यांना मोह पाडण्याकरिता योजिल्यामुळे मध्येच स्थित असलेली माया अथवा जाळ्यामध्ये जखडून गेलेली हरिणी, अथवा व्याधाचा विषलिप्त बाण लागून पडलेली हत्तीणच आहे कीं काय, अशी त्याला दिसली. तेव्हा, अरण्यांत पड-लेल्या हत्तिणीच्या अंगावर सोंड फिरवणाऱ्या महागजाप्रमाणे मनामध्ये अतिशय त्रस्त झालेला तो कामी दशरथ राजा अत्यंत दुःखित अशा आपल्या स्त्रीच्या अंगावर प्रेमाने हात फिरवून त्या कमलनयना स्त्रीला म्हणाला ( २१–२७ )

न तेऽहमभिजानामि क्रोधमात्मनि संश्रितम् ।
देवि केनाभियुक्तासि केन वासि विमानिता २८
यदिदं मम दुःखाय शेषे कल्याणि पांसुषु ।
भूमौ शेषे किमर्थं त्वं मयि कल्याणचेतसि २९
भूतोपहतचित्तेव मम चित्तप्रमाथिनि ।
सन्ति मे कुशला वैद्यास्त्वभितुष्टाश्च सर्वशः ३०
सुखितां त्वां करिष्यन्ति व्याधिमाचक्ष्व भामिनि ।
कस्य वापि प्रियं कार्यं केन वा विप्रियं कृतम् ३१
कः प्रियं लभतामद्य को वा सुमहदप्रियम् ।
मा रौत्सीर्मा च कार्षीस्त्वं देवि संपरिशोषणम् ३२
अवध्यो वध्यतां को वा वध्यः को वा विमुच्यताम् ।
दरिद्रः को भवेदाढ्यो द्रव्यवान्वाप्यकिंचनः ३३

" माझ्या संबंधानें तुला क्रोध येण्याचें कारण काय झालें आहे, हें माझ्या कांहीं लक्ष्यांत येत नाहीं. हे देवि, कल्याणि, ज्या अर्थी केरामध्ये लोळत पडण्याचें हें मला दुःखदायक कृत्य तूं करीत आहेस, त्या अर्थी तुझी कोणी हेटाळणी केली आहे किंवा तुझा कोणी अपमान केला आहे ? तें कळूं दे. तुझ्या हिताचीच इच्छा मनांत बाळगणारा मी जिवंत असतांना तूं कशाकरिता भूमीवर पडली आहेस ? भुतांनी झपाटल्याप्रमाणे तूं भूमीवर पडली असल्यामुळे माझें मन क्षुब्ध करीत आहेस. माझ्यापाशी कुशल वैद्य आहेत आणि सर्वप्रकारें तें माझ्यावर संतुष्ट आहेत. ( २८–३० )

तेव्हा हे प्रिये, तुला काय व्याधि आहे, तें सांग, म्हणजे ते तुला सुखी करतील. कोणाचें प्रिय करण्याचें तुझ्या मनामध्यें आहे किंवा तुला अप्रिय असलेली गोष्ट कोणी केली आहे ? हें कळूं दे. तुला प्रिय अशा कोणाचा मनोरथ आज सिद्धीस गेला पाहिजे किंवा तुला अप्रिय अशा कोणाला अत्यंत दुःख प्राप्त झालें पाहिजे ? तें तरी समजूं दे. हे देवि, तूं रडूं नकोस आणि विनाकारण आपलें शरिरास क्लेश करून घेऊं नकोस. अवध्य असूनही कोणाचा तुझ्या मनामध्यें वध कर्तव्य आहे ? वध्य असूनही कोण मुक्त व्हावा, असें तुला वाटत आहे ? कोण

अहं च हि मदीयाश्च सर्वे तव वशानुगाः ।
न ते कश्चिदभिप्रायं व्याहन्तुमहमुत्सहे  ३४
आत्मनो जीवितेनापि ब्रूहि यन्मनसि स्थितम् ।
बलमात्मनि जानन्ती न मां शङ्कितुमर्हसि  ३५
करिष्यामि तव प्रीतिं सुकृतेनापि ते शपे ।
यावदावर्तते चक्रं तावती मे वसुन्धरा  ३६
द्राविडाः सिन्धुसौवीराः सौराष्ट्रा दक्षिणापथाः ।
वङ्गाङ्गमगधा मत्स्याः समृद्धाः काशिकोसलाः  ३७
तत्र जातं बहु द्रव्यं धनधान्यमजाविकम् ।
ततो वृणीष्व कैकेयि यद्यत्त्वं मनसेच्छसि  ३८
किमायासेन ते भीरु उत्तिष्ठोत्तिष्ठ शोभने ।
तत्त्वं मे ब्रूहि कैकेयि यतस्ते भयमागतम्  ३९
तत्ते व्यपनयिष्यामि नीहारमिव रश्मिवान्  ४०

दरिद्री पुरुष संपन्न व्हावा, असा तुझा उद्देश आहे ? अथवा कोण श्रीमान् पुरुष दरिद्री व्हावा, अशी तुझी मनीषा आहे ? तें तरी एकदा कळूं दे. मी आणि माझे लोक हे सर्व तुझे दास आहेत व माझ्या जिवावर जरी प्रसंग आला, तरी तुझा कोणताही मनोरथ हाणून पाडण्याची माझी छाती नाही. यास्तव जें तुझ्या मनांत असेल, तें सांग. माझें प्रेम तुझ्यावर फार आहे, हें आपलें बल तूं जाणीत असूनही माझ्याविषयी शंका घेणें तुला योग्य नाही. ( ३१–३५ )

मी तुझें प्रिय करीन, हें मी तुला आपल्या पुण्याची शपथ घेऊन सांगत आहें. जेथपर्यंत सूर्यमंडल प्रकाशित होत आहे, तेथपर्यंत ही पृथ्वी माझी आहे. यास्तव, तुझा कोणताही मनोरथ सिद्धिस नेणें मला कठीण नाही. द्राविड, सिंधु, सौवीर, सौराष्ट्र, दाक्षिणापथ, वंग, अंग, मगध, मत्स्य व संपन्न काशिकोसल हे देश माझ्या स्वाधीन आहेत. त्या देशांत जें कांही धन, धान्य, लोकरीचीं वस्त्रें इत्यादि विपुल पदार्थ उत्पन्न होत आहेत, त्यांमधून, हे कैकेयी, जें तुझ्या मनास येईल, तें तूं माग. हे भीरु, तुला इतकें दुःख करून घेण्याचें काय कारण आहे ? हे कल्याणि, ऊठ, ऊठ आणि तुला कोठून भीति प्राप्त झाली आहे तें, हे कैकेयी,

**तथोक्ता सा समाश्वस्ता वक्तुकामा तदाप्रियम् ।**
**परिपीडयितुं भूयो भर्तारमुपचक्रमे ४१**

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे दशमः सर्गः।१०।[४३६]

एकादशः सर्गः ।

**तं मन्मथशरैर्विद्धं कामवेगवशानुगम् ।**
**उवाच पृथिवीपालं कैकेयी दारुणं वचः १**
**नास्मि विप्रकृता देव केनचिन्नावमानिता ।**
**अभिप्रायस्तु मे कश्चित्तमिच्छामि त्वया कृतम् २**
**प्रतिज्ञां प्रतिजानीष्व यदि त्वं कर्तुमिच्छसि ।**
**अथ ते व्याहरिष्यामि यथाभिप्रार्थितं मया ३**
**तामुवाच महाराजः कैकेयीमीषदुत्स्मयः ।**
**कामी हस्तेन संगृह्य मूर्धजेषु भुवि स्थिताम् ४**

---

तूं मला सांग. म्हणजे सूर्य ज्याप्रमाणे धुकें नाहीसें करितो, त्याप्रमाणे मी तुझें भय नाहीसें करीन. " याप्रमाणे भर्त्याशीं अप्रिय भाषण करण्यास उद्युक्त झालेल्या त्या कैकेयीचें राजाने सांत्वन केलें असतां ती भर्त्याला पुनरपि पीडा देण्यास उद्युक्त झाली. ( ३५-४१ )

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी दहावा सर्ग समाप्त झाला ॥ १० ॥

कामबाणांनी विद्ध झाल्यामुळे विषयवासनेच्या तावडींत सापडलेल्या त्या भूपतीला कैकेयी कठोर शब्दांनी म्हणाली, " हे राजा, माझी कोणी हेटाळणी केली नाही व माझा कोणी अवमानही केला नाही. माझा एक उद्देश आहे आणि तो तुझ्याकडून सिद्धीस जावा, अशी माझी इच्छा आहे. तूं जर तो माझा उद्देश सिद्धीस नेण्याचें इच्छित असशील, तर तशी प्रतिज्ञा कर, म्हणजे माझा काय उद्देश आहे, तो मी तुला सांगेन. " ( १-३ )

याप्रमाणे कैकेयीने दशरथाला सांगितलें असतां, त्या विषयलंपट महाराज दशरथ राजाला, मी हिचा शब्द झेलण्यास सारखा तत्पर असतां भलतीच शंका घेऊन ही मला प्रतिज्ञा करण्यास लावीत आहे म्हणून, किंचित् हसूं आलें आणि

अवलिप्ते न जानासि त्वत्तः प्रियतरो मम ।
मनुजो मनुजव्याघ्राद्रामादन्यो न विद्यते ५
तेनाजय्येन मुख्येन राघवेण महात्मना ।
शपे ते जीवनार्हेण ब्रूहि यन्मनसेप्सितम् ६
यं मुहूर्तमपश्यंस्तु न जीवेयमहं ध्रुवम् ।
तेन रामेण कैकेयि शपे ते वचनक्रियाम् ७
आत्मना चात्मजैश्चान्यैर्वृणे यं मनुजर्षभम् ।
तेन रामेण कैकेयि शपे ते वचनक्रियाम् ८
भद्रे हृदयमप्येतदनुमृश्योद्धरस्व मे ।
एतत्समीक्ष्य कैकेयि ब्रूहि यत्साधु मन्यसे ९
बलमात्मनि पश्यन्ती न विशङ्कितुमर्हसि ।
करिष्यामि तव प्रीतिं सुकृतेनापि ते शपे १०
सा तदर्थमना देवी तमभिप्रायमागतम् ।

भूमीवर पडलेल्या त्या कैकेयीचें मस्तक हातांनी उचलून आपल्या मांडीवर ठेवून घेऊन, तिला म्हणाला, " हे गर्विष्ठ कैकेयी, पुरुषश्रेष्ठ रामाशिवाय तुझ्यापेक्षा मला कोणीही अधिक प्रिय नाही, हें तूं जाणीत नाहीस काय ? रघुवंशजांतील मुख्य, शत्रूंनी जिंकण्यास अशक्य आणि माझ्या जीवनाचें साधन अशा महात्म्या रामाशपथ मी तुझा उद्देश सिद्धीस नेईन. करिता, जें तुझ्या मनांत असेल, तें सांग. जो एक क्षणभरही दृष्टिआड झाला असतां मी निःसंशय जगणार नाहीं, त्या रामाशपथ, हे कैकेयी, मी तुझें सांगणें शेवटास नेईन. स्वतःपेक्षा आणि आपल्या इतर पुत्रांपेक्षा मी ज्या पुरुषश्रेष्ठ रामाला प्रिय समजत आहें, त्या रामाशपथ मी तुझें सांगणें शेवटास नेईन. हे कल्याणी, माझें हें अंतःकरण तुझ्याविषयीं कसें आहे, याचा विचार करून तूं या दुःखापासून मला सोडीव आणि राम सर्वांपेक्षा मला प्रिय आहे, हें लक्ष्यांत घेऊन, हे कैकेयी, जें तुला बरें वाटत असेल, तें तूं सांग. पतिप्रेमरूप बल स्वतःचे ठिकाणीं असल्याचें तुला माहीत असतांना माझ्याविषयीं शंका घेणें योग्य नाही. मी तुला प्रिय असलेली गोष्ट सिद्धीस नेईन; जर न नेईन तर माझें सर्व पुण्य निष्फल होईल. " (४–१०)

निर्माध्यस्थ्याच्च हर्षाच्च बभाषे दुर्वचं वचः ११
तेन वाक्येन संहृष्टा तमभिप्रायमात्मनः।
व्याजहार महाघोरमभ्यागतमिवान्तकम् १२
यथाक्रमेण शपसे वरं मम ददासि च।
तच्छृण्वन्तु त्रयस्त्रिंशद्देवाः सेन्द्रपुरोगमाः १३
चन्द्रादित्यौ नभश्चैव ग्रहा रात्र्यहनी दिशः।
जगच्च पृथिवी चेयं सगन्धर्वाः सराक्षसाः १४
निशाचराणि भूतानि गृहेषु गृहदेवताः।
यानि चान्यानि भूतानि जानीयुर्भाषितं तव १५
सत्यसन्धो महातेजा धर्मज्ञः सत्यवाक्शुचिः।
वरं मम ददात्येष सर्वे शृण्वन्तु दैवताः १६
इति देवी महेष्वासं परिगृह्याभिशस्य च।
ततः परमुवाचेदं वरदं काममोहितम् १७

याप्रमाणे दशरथ म्हणाला असतां मंथरेने सांगितलेलीच गोष्ट मनांत धरून बसलेली ती राजपत्नी कैकेयी तो आपला उद्देश शेवटास जाण्याचा हाच समय आहे, असें जाणून समक्ष स्वतःच कठोर शब्दांनी राजाशीं बोलूं लागली. सारांश, राजाच्या त्या प्रतिज्ञेने अतिशय आनंदित झालेली ती कैकेयी साक्षात् मृत्यूप्रमाणे असलेला तो आपला महाभयंकर अभिप्राय राजाला विदित करण्याचा निश्चय करून म्हणाली, " प्रथम प्रिय पुत्राची आणि नंतर पुण्याची क्रमाने शपथ घेऊन तूं मला वर देत आहेस, हें इंद्रप्रभृति तेहेतीस देव ऐकून ठेवोत आणि त्याचप्रमाणे चंद्र, सूर्य, आकाश, ग्रह, रात्री, दिवस, दिशा, जगत्, ही पृथ्वी, गंधर्व आणि राक्षस यांसहवर्तमान स्वर्गातील देवता, निशाचर प्राणी, घरांतील गृहदेवता व इतरही प्राणी हें तुझें प्रतिज्ञेचें भाषण ऐकून ठेवोत. हा सत्यप्रतिज्ञ, महातेजस्वी, धर्मज्ञ, सत्यवक्ता आणि आचाराने शुद्ध असा भूपति मला वर देत आहे, हें सर्व देवांनी ऐकून ठेवावें." ( ११-१६ )

याप्रमाणे राजपत्नी कैकेयीने सत्यप्रतिज्ञत्वादिगुणां विषयीं राजाची प्रशंसा करून त्याला वचनांत पक्कें बांधून घेतलें आणि नंतर काममोहित होऊन वर देण्यास उद्युक्त

स्मर राजन्पुरावृत्तं तस्मिन्देवासुरे रणे ।
तत्र त्वां च्यावयच्छत्रुस्तव जीवितमन्तरा १८
तत्र चापि मया देव यत्त्वं समभिरक्षितः ।
जाग्रत्या यतमानायास्ततो मे प्रददौ वरौ १९
तौ दत्तौ च वरौ देव निक्षेपौ मृगयाम्यहम् ।
तवैव पृथिवीपाल सकाशे रघुनन्दन २०
तत्प्रतिश्रुत्य धर्मेण न चेद्दास्यसि मे वरम् ।
अद्यैव हि प्रहास्यामि जीवितं त्वद्विमानिता २१
वाङ्मात्रेण तदा राजा कैकेय्या स्ववशं कृतः ।
प्रचस्कन्द विनाशाय पाशं मृग इवात्मनः २२
ततः परमुवाचेदं वरदं काममोहितम् ।
वरौ देयौ त्वया देव तदा दत्तौ महीपते २३
तौ तावदहमद्यैव वक्ष्यामि शृणु मे वचः ।

---

झालेल्या त्या राजाला ती म्हणाली, " हे राजा, पूर्वीच्या वृत्तांताचें स्मरण कर. त्या देवदैत्यांच्या संग्राममध्ये रात्रीं युद्धाचे प्रसंगीं शंबरनामक शत्रूने तुला अगदी जर्जर करून टाकिलें होतें; त्याने फक्त जीव मात्र तुझा घेतला नव्हता. हे देवा, त्या वेळीं मी जागीं राहून तुझें संरक्षण केलें आणि तुझ्या जिवाकरिता मी फार खटपट केली; म्हणून तूं मला दोन वर दिलेस. ते दिलेले वर, हे राजा, मी तुझ्याचपाशी आजपर्यंत ठेव म्हणून ठेविले होते आणि हे भूपते रघुनंदना, आज मी ते मागत आहें. तस्मात्, धर्माची शपथ घेऊन तूं वचन दिलें असूनही जर मला वर देणार नाहीस तर तुझ्याकडून माझा अपमान झाला, म्हणून मी आजच्या आजच प्राणत्याग करीन." ( २०-२१ )

याप्रमाणे कैकेयीने केवळ आपल्या भाषणानेच राजाला आपल्या आधीन करून घेतलें असतां, पाशांत सापडणाऱ्या मृगाप्रमाणे तो दशरथराजा आपल्या घाताकरिता प्रतिज्ञारूप पाशामध्ये सापडल्यासारखा झाला. तदनंतर काममोहित होऊन वर देण्यास उद्युक्त झालेल्या दशरथाला कैकेयी म्हणाली " हे भूपते राजा, त्या वेळीं देऊं केलेले वर आपण मला आता द्या. ते मी आजच मागून घेत आहें.

अभिषेकसमारम्भो राघवस्योपकल्पितः २४
अनेन वाभिषेकेण भरतो मेऽभिषिच्यताम् ।
यो द्वितीयो वरो देव दत्तः प्रीतेन मे त्वया २५
तदा देवासुरे युद्धे तस्य कालोऽयमागतः ।
नव पञ्च च वर्षाणि दण्डकारण्यमाश्रितः २६
चीराजिनधरो धीरो रामो भवतु तापसः ।
भरतो भजतामद्य यौवराज्यमकण्टकम् २७
एष मे परमः कामो दत्तमेव वरं वृणे ।
अद्य चैव हि पश्येयं प्रयान्तं राघवं वने २८
स राजराजो भव सत्यसंगरः कुलं च शीलं च हि जन्म रक्ष च ।
परत्र वासे हि वदन्त्यनुत्तमं तपोधनाः सत्यवचो हितं नृणाम् २९

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकादशः सर्गः।११।४६५

यास्तव, माझें भाषण श्रवण करा. रामाच्या अभिषेकाचा जो हा समारंभ केलेला आहे, त्याच समारंभाने माझ्या भरताला अभिषेक व्हावा. हे राजा, त्या देवदैत्यांच्या युद्धामध्ये आपण प्रसन्न होऊन जो दुसरा वर मला देऊं केला होता, तोहि याच वेळेस मला मिळाला पाहिजे. यास्तव वल्कलें आणि अजिनें परिधान करून ज्ञानवान् रामाने तापस बनून चवदा वर्षेपर्यंत दंडकारण्यामध्ये वास्तव्य करावें आणि भरताने आज निष्कंटक यौवराज्याचा स्वीकार करावा. (२२–२७)

हेंचि माझी मुख्य इच्छा आहे व आपण दिलेलाच वर मी मागून घेत आहें याकरिता राम वनामध्ये जात असलेला मी आजच पाहणार. तूं राजाधिराज आहेस. करिता आपली प्रतिज्ञा खरी करून कुलाचा, शीलाचा आणि जन्माचा लौकिक रक्षण कर; कारण परलोकीं वास्तव्य करण्यामध्ये पुरुषांना सत्यवचनच अत्यंत हितकारक होतें, असें तपोधन म्हणत असतात. ( २८–२९ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी अकरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११ ॥

द्वादशः सर्गः

ततः श्रुत्वा महाराजः कैकेय्या दारुणं वचः ।
चिन्तामभिसमापेदे मुहूर्तं प्रतताप च ।　　१
किं नु मे यं दिवास्वप्नश्चित्तमोहोऽपि वा मम ।
अनुभूतोपसर्गो वा मनसो वाप्युपद्रवः　　२
इति संचिन्त्य तद्राजा नाध्यगच्छत्तदा सुखम् ।
प्रतिलभ्य ततः संज्ञां कैकेयीवाक्यतापितः　　३
व्यथितो विक्लवश्चैव व्याघ्रीं दृष्ट्वा यथा मृगः ।
असंवृतायामासीनो जगत्यां दीर्घमुच्छ्वसन्　　४
मण्डले पन्नगो रुद्धो मन्त्रैरिव महाविषः ।
अहो धिगिति सामर्षो वाचमुक्त्वा नराधिपः　　५
मोहमापेदिवान्भूयः शोकोपहतचेतनः ।
चिरेण तु नृपः संज्ञां प्रतिलभ्य सुदुःखितः　　६
कैकेयीमब्रवीत्क्रुद्धो निर्दहन्निव तेजसा ।

---

तदनंतर कैकेयीचें भयंकर भाषण श्रवण केल्यावर महाराज दशरथ चिंताक्रांत होऊन क्षणभर संतप्त झाला आणि "हें काय मी दिवसा पडणारें स्वप्न पाहिलें? कीं हा मला चित्तभ्रम झालेला आहे? किंवा पिशाचानें झपाटल्याचा हा मला अनुभव आलेला आहे? किंवा हा कांहीं मानसिक उपद्रव आहे?" याविषयी तो मनांत विचार करूं लागला; परंतु असा विचार करूनही त्या राजाला बरें वाटेना. नंतर कैकेयीच्या भाषणाचें स्मरण होऊन संतप्त झालेला तो राजा सावध झाला आणि उघड्या भूमीवर बसलेला तो भूपति व्याघ्रीकडे दृष्टि गेलेल्या मृगाप्रमाणे कैकेयीकडे दृष्टि जातांक्षणीं व्यथित व दीन होऊन दीर्घ सुस्कारे टाकूं लागला व यंत्रमंडलामध्ये मंत्रांच्या योगानें जखडून टाकिलेल्या महाविषारी सर्पाप्रमाणे कैकेयीनें जखडून टाकिलेला तो भूपति, "अहो, धिक्कार असो!" असें रागारागानें म्हणून पुनरपि मूर्छित झाला. नंतर शोकानें मूर्छित झालेला तो राजा बऱ्याच वेळानें शुद्धीवर आला आणि अत्यंत दुःखित झाला; व क्रुद्ध होऊन दुःखजन्य संतापानें जळफळत जळफळत कैकेयीला म्हणाला, "हे क्रूरे, हे दुरा-

नृशंसे दुष्टचारित्रे कुलस्यास्य विनाशिनि ७
किं कृतं तव रामेण पापे पापं मयापि वा ।
सदा ते जननीतुल्यां वृत्तिं वहति राघवः ८
तस्यैवं त्वमनर्थाय किंनिमित्तमिहोद्यता ।
त्वं मयात्मविनाशाय भवनं स्वं निवेशिता ९
अविज्ञानान्नृपसुता व्याला तीक्ष्णविषा यथा ।
जीवलोको यदा सर्वो रामस्याह गुणस्तवम् १०
अपराधं कमुद्दिश्य त्यक्ष्यामीष्टमहं सुतम् ।
कौसल्यां च सुमित्रां च त्यजेयमपि वा श्रियम् ११
जीवितं चात्मना रामं न त्वेव पितृवत्सलम् ।
परा भवति मे प्रीतिर्दृष्ट्वा तनयमग्रजम् १२
अपश्यतस्तु मे रामं नष्टं भवति चेतनम् ।
तिष्ठेल्लोको विना सूर्यं सस्यं वा सलिलं विना १३
न तु रामं विना देहे तिष्ठेत्तु मम जीवितम् ।

चारिणी, हे कुलघातिनी, हे पापिणी, रामाने अथवा मी तुझें काय वाईट केलें आहे ? नेहमी आपल्या जननीप्रमाणे राम तुझ्याशीं वर्तन ठेवीत असतो. असें असतांना त्याच्या नाशाकरितां तूं तेथे याप्रमाणे कां उद्युक्त झाली आहेस ? अथवा तुला तरी दोष देण्यांत काय अर्थ आहे ! तीक्ष्ण विषाने युक्त असलेली नागीण जशी एखाद्याने न समजतां घरामध्ये आणून ठेवावी, त्याप्रमाणे राजकन्या म्हणून मीच न समजतां तुला आपल्या नाशाकरितां स्वतःच्या घरामध्ये आणून ठेविली आहे. जगतांतील सर्व लोक जर रामाच्या गुणांची प्रशंसा करीत आहेत, तर कोणत्या अपराधाचें निमित्त करून मी आपल्या प्रिय पुत्राचा त्याग करूं ? कौसल्येचा, सुमित्रेचा अथवा राज्यलक्ष्मीचाही मी त्याग करीन. (७-११)

परंतु, जीविताचें साधन अशा पितृवत्सल रामाचा मी स्वतः होऊन कधींही त्याग करणार नाहीं. ज्येष्ठ पुत्र रामाला अवलोकन केलें, म्हणजे मला पराकाष्ठेचा आनंद होत असतो. तेव्हा राम जर दृष्टिआड झाला, तर माझी शुद्धच नाहींशी होते. सूर्यावाचून कदाचित् जगतही राहील किंवा उदकावाचून पिकेंही कायम

तदलं त्यज्यतामेष निश्चयः पापनिश्चये १४
अपि ते चरणौ मूर्ध्ना स्पृशाम्येष प्रसीद मे ।
किमर्थं चिन्तितं पापे त्वया परमदारुणम् १५
अथ जिज्ञाससे मां त्वं भरतस्य प्रियाप्रिये ।
अस्तु यत्तत्त्वया पूर्वं व्याहृतं राघवं प्रति १६
स मे ज्येष्ठसुतः श्रीमान्धर्मज्येष्ठ इतीव मे ।
तत्त्वया प्रियवादिन्या सेवार्थं कथितं भवेत् १७
तच्छ्रुत्वा शोकसंतप्ता संतापयासि मां भृशम् ।
आविष्टासि गृहे शून्ये सा त्वं परवशं गता १८
इक्ष्वाकूणां कुले देवि संप्राप्तः सुमहानयम् ।
अनयो नयसंपन्ने यत्र ते विकृता मतिः १९

राहतील; परंतु रामावाचून माझ्या देहामध्ये जीव राहणार नाही. तस्मात्, हे दुष्टबुद्धि कैकेयी, तूं हा आग्रह सोडून दे. याकरिता हा मी आपलें मस्तकही तुझ्या पायावर ठेवीत आहें; तूं मजवर कृपा कर. हे पापिणी, अत्यंत भयंकर असें हें आज तूं मनामध्ये कशाकरिता आणिलें आहेस ? ( १२-१५ )

आता भरत मला प्रिय आहे किंवा नाही, याची परीक्षा पाहण्याकरिताच जर तूं असा प्रकार करीत असशील, तर असो. पण " तो माझा ज्येष्ठ वैभवशाली राम धर्मानेही ज्येष्ठ आहे, " असें जें तूं प्रिय भाषण करणारी मला पूर्वी सांगत होतीस, तें केवळ मला गोड लागावें म्हणून व राज्यावर बसल्यावरदेखील रामाने तुझ्याच मर्जीप्रमाणे, तुझ्याच तंत्राने वागावें, या हेतूनेच तूं सांगत होतीस, असें म्हटलें पाहिजे. अथवा महाकुलामध्ये उत्पन्न झालेल्या तुझ्या ठिकाणीं असा दुष्ट विचार येणें असंभवनीय आहे. यास्तव शून्य गृहामध्ये तुला पिशाचादिकांनी झपाटलें आहे आणि म्हणूनच तूं दुसऱ्याच्या तावडींत सापडल्यामुळे रामाच्या अभिषेकाचा वृत्तांत श्रवण करितांक्षणीं शोकाने संतप्त होऊन मलाही अत्यंत ताप देत आहेस. हे विनयसंपन्न देवी, तुझ्या मतीलाही ज्या अर्थी विकार झाला, त्या अर्थी इक्ष्वाकूंच्या कुलामध्ये हा एक अति भयंकर अनर्थच प्राप्त झाला आहे, यांत संशय नाही. हे विशालनयने, त्वा पूर्वी

नहि किंचिदयुक्तं वा विप्रियं वा पुरा मम।
अकरोस्त्वं विशालाक्षि तेन न श्रद्दधामि ते २०
ननु ते राघवस्तुल्यो भरतेन महात्मना।
बहुशो हि स्म बाले त्वं कथाः कथयसे मम २१
तस्य धर्मात्मनो देवि वने वासं यशस्विनः।
कथं रोचयसे भीरु नव वर्षाणि पञ्च च २२
अत्यन्तसुकुमारस्य तस्य धर्मे कृतात्मनः।
कथं रोचयसे वासमरण्ये भृशदारुणे २३
रोचयस्यभिरामस्य रामस्य शुभलोचने।
तव शुश्रूषमाणस्य किमर्थं विप्रवासनम् २४
रामो हि भरताद्भूयस्तव शुश्रूषते सदा।
विशेषं त्वयि तस्मात्तु भरतस्य न लक्षये २५
शुश्रूषां गौरवं चैव प्रमाणं वचनक्रियाम्
कस्तु भूयस्तरं कुर्यादन्यत्र पुरुषर्षभात् २६

---

तूं माझ्याशीं कोणतेंही अयोग्य अथवा अप्रिय भाषण केलेलें नाहींस व म्हणूनच तुझें हें भाषण मला विश्वसनीय वाटत नाहीं. सारांश, तुला कोणीतरी झपाटल्यामुळे तूं असें बोलत आहेस. ( १६–२० )

हे बाले, महात्मा भरत आणि राम हे तुला सारखेच आहेत, म्हणून तूं पुष्कळ वेळा माझ्यापाशीं बोलली आहेस. तस्मात् हे देवी, हे भीरु, भरताप्रमाणेच प्रिय असा जो धर्मात्मा व यशस्वी राम त्यानें चौदा वर्षेपर्यंत वनवास करावा, हें तुला कसें रुचत आहे ? अत्यंत सुकुमार असून धर्माकडेच मन असलेल्या त्या रामाचें अत्यंत भयंकर अशा अरण्यामध्ये वास्तव्य होणें तुला कसें रुचत आहे ? हे शुभनयने, तुझ्या शुश्रूषेमध्ये तत्पर असणाऱ्या मनोहर रामाला अरण्यांत हाकून देणें तुला कसें रुचत आहे ? भरतापेक्षा रामच नेहमी तुझी शुश्रूषा करीत असतो. त्या रामापेक्षा भरताचे ठिकाणीं तुझेविषयीं मुळींदेखील अधिक गौरव दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. ( २१–२५ )

सेवा, बहुमान, विश्वास आणि सांगितलेलें करणें, या गोष्टी पुरुषश्रेष्ठ रामाहून

बहूनां स्त्रीसहस्राणां बहूनां चोपजीविनाम् ।
परिवादोऽपवादो वा राघवे नोपपद्यते २७
सान्त्वयन्सर्वभूतानि रामः शुद्धेन चेतसा ।
गृह्णाति मनुजव्याघ्रः प्रियैर्विषयवासिनः २८
सत्त्वेन लोकाञ्जयति द्विजान्दानेन राघवः ।
गुरूञ्छुश्रूषया वीरो धनुषा युधि शात्रवान् २९
सत्यं दानं तपस्त्यागो मित्रता शौचमार्जवम् ।
विद्या च गुरुशुश्रूषा ध्रुवाण्येतानि राघवे ३०
तस्मिन्नार्जवसंपन्ने देवि देवोपमे कथम् ।
पापमाशंससे रामे महर्षिसमतेजसि ३१
न स्मराम्यप्रियं वाक्यं लोकस्य प्रियवादिनः ।
स कथं त्वत्कृते रामं वक्ष्यामि प्रियमप्रियम् ३२
क्षमा यस्मिंस्तपस्त्यागः सत्यं धर्मः कृतज्ञता ।
अप्यहिंसा च भूतानां तमृते का गतिर्मम ३३

अधिक कोण करणार आहे ? अनेक हजारो स्त्रियांमध्ये रामाची कोणीही निंदा करीत नाही आणि अनेक सेवकांमध्येही रामावर कोणाचा अपवाद नाही; कारण पुरुषश्रेष्ठ राम शुद्ध मनाने सर्व प्राण्यांचें सांत्वन करीत असतो आणि देशांत राहणाऱ्या लोकांना प्रिय असेल तें करून वश करून घेत असतो. सच्छीलपणामुळे लोकांना, दानाच्या योगाने द्विजांना, शुश्रूषेने गुरूंना आणि धनुष्याच्या योगाने युद्धामध्ये शत्रूंना हा वीर राम आपल्या आधीन करून घेत असतो. सत्य वचन, दान, तप, धर्म, मित्रता, शुचिर्भूतपणा, सरलता, विद्या आणि गुरुशुश्रूषा हे गुण रामाचे ठिकाणीं अचल आहेत. ( २६-३० )

तस्मात् सरल आणि देवतुल्य अशा त्या महर्षीसमान तेजस्वी रामाविषयीं, हे देवी, तूं मनामध्ये का बरें पाप आणीत आहेस ? मी प्रिय भाषण करणारा आहें व लोकांना उद्देशून अप्रिय भाषण केल्याचें मला कधीही स्मरत नाही. तेव्हा तुझ्याकरिता प्रिय रामाला मी अप्रिय भाषण कसें करूं ? क्षमा, तप, औदार्य, सत्य, धर्म, कृतज्ञता आणि प्राण्यांची अहिंसा हे गुण ज्याच्या ठिकाणीं आहेत, त्या

मम वृद्धस्य कैकेयि गतान्तस्य तपस्विनः।
दीनं लालप्यमानस्य कारुण्यं कर्तुमर्हसि ३४
पृथिव्यां सागरान्तायां यत्किंचिदधिगम्यते।
तत्सर्वं तव दास्यामि मा च त्वं मृत्युमाविश ३५
अञ्जलिं कुर्मि कैकेयि पादौ चापि स्पृशामि ते।
शरणं भव रामस्य माऽधर्मो मामिह स्पृशेत् ३६
इति दुःखाभिसंतप्तं विलपन्तमचेतनम्।
घूर्णमानं महाराजं शोकेन समभिप्लुतम् ३७
पारं शोकार्णवस्याशु प्रलपन्तं पुनः पुनः।
प्रत्युवाचाथ कैकेयी रौद्रा रौद्रतरं वचः ३८
यदि दत्त्वा वरौ राजन्पुनः प्रत्यनुतप्यसे।
धार्मिकत्वं कथं वीर पृथिव्यां कथयिष्यसि ३९
यदा समेता बहवस्त्वया राजर्षयः सह।

रामावाचून मला काय बरें आधार आहे? यास्तव, हे कैकेयी, तूं मजवर दया कर. मी अगदी वृद्ध होऊन वयाच्या शेवटल्या अवस्थेला पोचलों आहें व दीन होऊन मोठ्या काकुळतीने तुझी प्रार्थना करीत आहें. समुद्रवलयांकित पृथ्वीमध्ये जें कांही मिळण्यासारखें असेल, तें सर्व मी तुला देईन. तूं माझ्या मृत्यूचा हट्ट धरूं नकोस. हे कैकेयी, मी तुला हात जोडतों आणि तुझ्या पायावरही मस्तक ठेवतों; परंतु तूं रामाचें रक्षण करणारी हो आणि या लोकीं मला अधर्माचा स्पर्श होऊं देऊं नको. ( ३५--३६ )

याप्रमाणे दुःखाने संतप्त, शोकाने व्याप्त, बसल्या जागींच खिळल्यासारखा निश्चल होऊन, काय करावें? आणि काय न करावें? याविषयी भ्रान्तींत पडलेल्या व शरिराला कंप सुटून विलाप करीत असलेल्या आणि शोकसागरांतून पार पाडण्याविषयी वारंवार प्रार्थना करीत असलेल्या दशरथ महाराजाला आधींच भयंकर असलेली कैकेयी अधिक भयंकर अशा शब्दांनी म्हणाली, "हे राजा, वर देऊनसवरूनही जर तूं पुन्हा पश्चात्ताप पावत आहेस, तर हे वीरा, पृथ्वीमध्ये लोकांना धार्मिकपणाबद्दल तुझी प्रशंसा कशी करितां येईल? हे धर्मज्ञा,

कथयिष्यन्ति धर्मज्ञ तत्र किं प्रतिवक्ष्यसि ४०
यस्याः प्रसादे जीवामि या च मामभ्यपालयत् ।
तस्याः कृता मया मिथ्या कैकेय्या इति वक्ष्यसि ४१
किल्बिषं त्वं नरेन्द्राणां करिष्यसि नराधिप ।
यो दत्त्वा वरमद्यैव पुनरन्यानि भाषसे ४२
शैब्यः श्येनकपोतीये स्वमांसं पक्षिणे ददौ ।
अलर्कश्चक्षुषी दत्त्वा जगाम गतिमुत्तमाम् ४३
सागरः समयं कृत्वा न वेलामतिवर्तते ।
समयं मानृतं कार्षीः पूर्ववृत्तमनुस्मरन् ४४
स त्वं धर्मं परित्यज्य रामं राज्येऽभिषिच्य च ।
सह कौसल्यया नित्यं रन्तुमिच्छसि दुर्मते ४५

अनेक राजर्षि तुझी भेट घेऊन मला दिलेल्या वरासंबंधाने गोष्टी बोलूं लागले असतां तुला विचारतील, तेव्हा तूं त्यांना काय बरें उत्तर देशील ? (३७-४०)

" जिच्या कृपेने मी जिवंत राहिलों आणि जिनें माझें रक्षण केलें, त्या कैकेयीला दिलेलें वचन मी मिथ्या केलें." असेंच तुला सांगावें लागेल. ज्या अर्थी वर देऊनसवरूनही आज पुन्हा भलतींच भाषणें करीत आहेस, त्याअर्थी, हे राजा, आपल्या कुलांतील राजांच्या नांवाला तूं कलंक लावशील. अरे, शैब्य राजाने कपोताला अभय दिलें होतें व तें आपलें अभय वचन परिपूर्ण करण्याकरिता कपोताबद्दल त्याने आपलें स्वतःचें मांस श्येनपक्ष्याला दिलें; असें श्येनकपोतीय आख्यानामध्ये सांगितलें आहे. अलर्कराजाने अंध ब्राह्मणाला वर देऊं केला; तेव्हा त्याने " तुझे डोळे मला दे !" असा वर मागितला असतांही अलर्क राजा प्रतिज्ञा शेवटास नेण्याकरिता त्याला आपले नेत्र देऊन उत्तम गतीला गेला. मर्यादेचें अतिक्रमण न करण्याविषयी देवांनी प्रार्थना केली असतां " मी अतिक्रमण करणार नाहीं, " असें त्यांना वचन दिल्यापासून समुद्रही मर्यादेचें अतिक्रमण करीत नाही. तस्मात्, या पुरातन वृत्तांताचें स्मरण करून तरी तूं आपली प्रतिज्ञा असत्य करूं नको. हे दुर्मते, धर्माचा त्याग करून आणि रामाला राज्याभिषेक करून कौसल्येसहवर्तमान नित्य रममाण होण्याची तूं इच्छा करीत आहेस. ( ४१-४५ )

भवत्वधर्मो धर्मो वा सत्यं वा यदि वानृतम्
यत्त्वया संश्रुतं मह्यं तस्य नास्ति व्यतिक्रमः ४६
अहं हि विषमद्यैव पीत्वा बहु तवाग्रतः।
पश्यतस्ते मरिष्यामि रामो यद्यभिषिच्यते ४७
एकाहमपि पश्येयं यद्यहं राममातरम्।
अञ्जलिं प्रतिगृह्णन्तीं श्रेयो ननु मृतिर्मम ४८
भरतेनात्मना चाहं शपे ते मनुजाधिप।
यथा नान्येन तुष्येयमृते रामविवासनात् ४९
एतावदुक्त्वा वचनं कैकेयी विरराम ह।
विलपन्तं च राजानं न प्रतिव्याजहार सा ५०
श्रुत्वा तु राजा कैकेय्या वाक्यं परमशोभनम्।
रामस्य च वने वासमैश्वर्यं भरतस्य च ५१
नाभ्यभाषत कैकेयीं मुहूर्तं व्याकुलेन्द्रियः।
प्रैक्षतानिमिषो देवीं प्रियामप्रियवादिनीम् ५२

---

अरे, हा धर्म असो अथवा अधर्म असो किंवा सत्य असो अथवा अनृत असो, तूं जें मला वचन दिलें आहेस, तें फिरणार नाही. रामाला जर राज्याभिषेक होईल, तर मी आजच पुष्कळसें विष भक्षण करून तूं पहात असतां तुझ्यापुढे प्राण देईन. राजमाता या नात्याने सर्व लोकांचे नमस्कार घेतांना रामाच्या मातेला पाहण्याचा एक दिवस जरी मला प्रसंग आला, तर खरोखर मरणच मला श्रेयस्कर होणार आहे. हे राजा, भरताशपथ आणि आपल्या स्वतःशपथ मी तुला सांगतें की, रामाला वनांत पाठविणें यावाचून दुसऱ्या कोणत्याही गोष्टीनें मला संतोष होणार नाही. ( ४६-४९ )

इतकें भाषण करून कैकेयी स्वस्थ राहिली आणि राजा विलाप करूं लागला असतांही ती त्याच्याशीं कांहीएक बोलेनाशी झाली. तेव्हा रामाला वनवास आणि भरताला ऐश्वर्य, हें कैकेयीचें अत्यंत अशुभ भाषण श्रवण केल्यावर दशरथ राजा अत्यन्त व्याकुल झाल्यामुळे कैकेयीशीं क्षणभर कांहीच न बोलतां अप्रिय भाषण करणाऱ्या आपल्या प्रिय भार्येकडे क्रोधाने कांही वेळ टक लावून पाहूं लागला;

तां हि वज्रसमां वाचमाकर्ण्य हृदयाप्रियाम् ।
दुःखशोकमयीं श्रुत्वा राजा न सुखितोऽभवत् ५३
स देव्या व्यवसायं च घोरं च शपथं कृतम् ।
ध्यात्वा रामेऽतिनिःश्वस्य च्छिन्नस्तरुरिवापतत् ५४
नष्टचित्तो यथोन्मत्तो विपरीतो यथातुरः ।
हृततेजा यथा सर्पो बभूव जगतीपतिः ५५
दीनयातुरया वाचा इति होवाच कैकयीम् ।
अनर्थमिममर्थाभं केन त्वमुपदेशिता ५६
भूतोपहतचित्तेव ब्रुवन्ती मां न लज्जसे ।
शीलव्यसनमेतत्ते नाभिजानाम्यहं पुरा ५७
बालायास्तत्त्विदानीं ते लक्षये विपरीतवत् ।
कुतो वा ते भयं जातं या त्वमेवंविधं वरम् ५८
राष्ट्रे भरतमासीनं वृणीषे राघवं वने ।

कारण अंतःकरणाला अप्रिय आणि दुखः व शोक हाच ज्याचा परिणाम, असें ते वज्रप्राय भाषण श्रवण केल्यापासून राजाला सुख झालें नाहीं. इतकेंच नव्हे तर आपल्या भार्येचा तो निश्चय आणि तिला दिलेलें वचन पालन करण्याविषयीं स्वतः आपण घेतलेली घोर शपथ यांचा विचार मनांत आल्याबरोबर अतिशय सुस्कारे टाकून छिन्न वृक्षाप्रमाणे तो एकाएकी भूमीवर पडला आणि भान नाहीसें झालेल्या उन्मत्त पुरुषाप्रमाणे, विपरीतप्रकृति झालेल्या व्याधिग्रस्त पुरुषाप्रमाणे अथवा तेजहरण केलेल्या सर्पाप्रमाणे तो भूपति दिसूं लागला. (५०-५५)

आणि दीन व व्याकुल शब्दांनी तो कैकेयीला म्हणाला, "हितकारक दिसणाऱ्या या अनर्थाचा तुला कोणी उपदेश केला आहे? आणि पिशाचानें अंतःकरण झपाटल्याप्रमाणे माझ्याशीं असें भाषण करितांना तुला लाज कशी वाटत नाहीं? यापूर्वी बालपणींसुद्धा तुझ्या सुशीलपणावर अशी धाड आलेली मला स्मरत नाहीं; परंतु, सांप्रत तुझ्या ठिकाणीं हा सगळाच प्रकार मला विपरीत दिसत आहे. भरताला राज्यावर बसवून रामाला वनवासांत पाठविण्याविषयी तूं वर मागत आहेस; परंतु अशा प्रकारचा वर मागण्यासारखें भय तुला

विरमैतेन भावेन त्वमेतेनानृतेन च ५९
यदि भर्तुः प्रियं कार्यं लोकस्य भरतस्य च।
नृशंसे पापसंकल्पे क्षुद्रे दुष्कृतकारिणि ६०
किं नु दुःखमलीकं वा मयि रामे च पश्यसि।
न कथंचिदृते रामाद्भरतो राज्यमावसेत् ६१
रामादपि हि तं मन्ये धर्मतो बलवत्तरम्।
कथं वक्ष्यसि रामस्य वनं गच्छेति भाषिते ६२
मुखवर्णं विवर्णं तु यथैवेन्दुमुपप्लुतम्।
तां तु मे सुकृतां बुद्धिं सुहृद्भिः सह निश्चिताम् ६३
कथं द्रक्ष्याम्यपावृत्तां परैरिव हतां चमूम्।
किं मां वक्ष्यन्ति राजानो नानादिग्भ्यः समागताः ६४
बालो बतायमैक्ष्वाकश्चिरं राज्यमकारयत्।
यदा हि बहवो वृद्धा गुणवन्तो बहुश्रुताः ६५

कोठून प्राप्त झालें आहे? भर्ता, लोक आणि भरत ह्यांना प्रिय असलेलें जर तुला कर्तव्य असेल तर या विचारापासून आणि या अनृत मार्गापासून तूं परावृत्त हो. (५९-६०)

हे दुष्टे, हे क्षुद्रे, हे दुराचारिणी. हे पापिणी, तुला दुःख होण्यासारखें काय कारण अथवा कोणता अपराध माझे ठिकाणीं व रामाचे ठिकाणीं तुझ्या दृष्टीस पडत आहे? रामावाचून भरत कधींही राज्यावर बसणार नाहीं; कारण रामापेक्षाही मी त्याला अधिक धार्मिक समजत आहें. बरें, "वनांत जा," असें कदाचित् मी जरी रामाला सांगितलें, तरी तुझ्याने त्याला कसें सांगवेल? कारण, राम तुला अतिशयच प्रिय आहे. ग्रहण लागलेल्या चंद्राप्रमाणे राम वनवासांत गेल्यामुळे निस्तेज झालेली आपली मुद्रा मी आरशामध्ये कशी बरें अवलोकन करूं? आणि सुहृदांसहवर्तमान जो उत्कृष्ट विचार मी निश्चित केला तो, शत्रूंनी पराजित केलेल्या सैन्याप्रमाणे, परत फिरलेला मी कसा बरें पाहूं? देशोदेशींहून आलेले राजे मला काय बरें म्हणतील? (६०-६४)

"हा इक्ष्वाकुवंशज दशरथ मूर्ख असतांना याने पुष्कळ दिवस राज्य तरी कसें

परिप्रक्ष्यन्ति काकुत्स्थं वक्ष्यामीह कथं तदा ।
कैकेय्या क्लिश्यमानेन पुत्रः प्रव्राजितो मया ६६
यदि सत्यं ब्रवीम्येतत्तदसत्यं भविष्यति ।
किं मां वक्ष्यति कौसल्या राघवे वनमास्थिते ६७
किं चैनां प्रतिवक्ष्यामि कृत्वा विप्रियमीदृशम् ।
यदा यदा च कौसल्या दासीव च सखीव च ६८
भार्यावद्भगिनीवच्च मातृवच्चोपतिष्ठति ।
सततं प्रियकामा मे प्रियपुत्रा प्रियंवदा ६९
न मया सत्कृता देवी सत्कारार्हा कृते तव ।
इदानीं तत्तपति मां यन्मया सुकृतं त्वयि ७०
अपथ्यव्यञ्जनोपेतं भुक्तमन्नमिवातुरम् ।
विप्रकारं च रामस्य संप्रयाणं वनस्य च ७१
सुमित्रा प्रेक्ष्य वै भीता कथं मे विश्वसिष्यति ।
कृपणं बत वैदेही श्रोष्यति द्वयमप्रियम् ७२

---

केलें ? " असेंच म्हणतील. गुणवान् आणि बहुश्रुत असे अनेक वृद्ध लोक " राम कोठें आहे ? " असें मला विचारूं लागले असतां, मी त्यांना काय बरें सांगूं ? "कैकेयीच्या तावडींत सापडल्यामुळे मी आपला पुत्र वनवासांत घालविला," असें जरी मी खरें सांगूं लागलों, तरी लोकांना तें असत्यच वाटणार. राम वनामध्ये निघाला असतां कौसल्या मला काय बरें म्हणेल ? ( ६५-६७ )

आणि अशा प्रकारची अप्रिय गोष्ट केल्यावर मी तरी तिला काय बरें उत्तर देऊं ? जेव्हा जेव्हा ती पुत्रवत्सल व मधुर भाषण करणारी कौसल्या, माझें प्रिय करण्यासाठीं, माझ्या शुश्रूषेंत नेहमी तत्पर रहात असे, तेव्हा तेव्हा ती सत्कारास पात्र असतांनाही तुझ्याकरिता मी तिचा सत्कार केला नाही. अपथ्य पदार्थांनी युक्त असलेलें अन्न भक्षण केलें असतां त्यापासून जशी रुग्ण मनुष्याला पीडा होते, तशी तुझ्याशीं चांगल्या रीतीने जें मीं वर्तन केलें, त्याची आता मला पीडा होत आहे. ( ६८-७१ )

रामाचा अभिषेक हाणून त्याला वनांत पाठविल्याचें पाहून, भयभीत

मां च पञ्चत्वमापन्नं रामं च वनमाश्रितम्।
वैदेही बत मे प्राणाञ्छोचन्ती क्षपयिष्यति ७३
हीना हिमवतः पार्श्वे किंनरेणेव किंनरी।
न हि राममहं दृष्ट्वा प्रवसन्तं महावने ७४
चिरं जीवितुमाशंसे रुदन्तीं चापि मैथिलीम्।
सा नूनं विधवा राज्यं सपुत्रा कारयिष्यसि ७५
सतीं त्वामहमत्यन्तं व्यवस्याम्यसतीं सतीम्।
रूपिणीं विषसंयुक्तां पीत्वेव मदिरां नरः ७६
अनृतैर्बत मां सान्त्वैः सान्त्वयन्ती स्म भाषसे।
गीतशब्देन संरुध्य लुब्धो मृगमिवावधीः ७७
अनार्य इति मामार्याः पुत्रविक्रायकं ध्रुवम्।

झालेली सुमित्रा माझ्यावर कसा बरें विश्वास ठेवील ? तुझ्या मनाप्रमाणे झालें असतां मी मृत झालों आणि राम वनवासांत गेला, अशा दोन खरोखर दुःखदायक व अप्रिय गोष्टी सीतेला ऐकाव्या लागतील. हिमालयपर्वतावर पतीचा वियोग झालेल्या किंनरस्त्रीप्रमाणे सीता माझ्याकरिता व रामाकरिता शोक करीत करीत आपले प्राण व्याकुळ करील. राम महावनामध्ये निघालेला पाहून आणि मिथिलराजकन्या सीता रुदन करीत आहे, असें अवलोकन करून फार वेळ जगण्याची मला आशा नाही. तुला आपल्या पुत्रासहवर्तमान राज्य चालवावें लागेल; तें खरोखर विधवा होऊनच चालवावें लागेल. ( ७१--७५ )

दृष्टीला मनोहर भासणारी मदिरा प्याल्यावर विकार उत्पन्न झाला असतां ज्याप्रमाणे ती सविष असल्याचें समजून येतें, त्याचप्रमाणे केवळ तुझ्या मनोहर रूपावरून, तूं सती आहेस असें मी फार समजत होतों, पण तुझ्या या वर्तनावरून तूं दिसण्यांत मात्र सती असून, वस्तुतः असती आहेस, असा माझा आता निश्चय झाला. खोट्या अशा मायेच्या शब्दांनी माझें सांत्वन करीत माझ्याशीं तूं आजपर्यंत गोड भाषण करीत आली आहेस. आणि गायनाच्या ध्वनीने मृगाला कचाट्यांत धरून त्याचा वध करणाऱ्या पारध्याप्रमाणे तूं आज माझा वध करण्यास प्रवृत्त झाली आहेस. ( ७६--७७ )

विकरिष्यन्ति रथ्यासु सुरापं ब्राह्मणं यथा ७८
अहो दुःखमहो कृच्छ्रं यत्र वाचः क्षमे तव ।
दुःखमेवंविधं प्राप्तं पुरा कृतमिवाशुभम् ७९
चिरं खलु मया पापे त्वं पापेनाभिरक्षिता ।
अज्ञानादुपसंपन्ना रज्जुरुद्बन्धनी यथा ८०
रममाणस्त्वया सार्धं मृत्युं त्वां नाभिलक्षये ।
बालो रहसि हस्तेन कृष्णसर्पमिवास्पृशम् ८१
तं तु मां जीवलोकोऽयं नूनमाक्रोष्टुमर्हति ।
मया ह्यपितृकः पुत्रः स महात्मा दुरात्मना ८२
बालिशो बत कामात्मा राजा दशरथो भृशम् ।
स्त्रीकृते यः प्रियं पुत्रं वनं प्रस्थापयिष्यति ८३
वेदैश्च ब्रह्मचर्यैश्च गुरुभिश्चोपकर्शितः ।

---

सुरापान करणाऱ्या ब्राह्मणाची ज्याप्रमाणे रस्त्यांतून लोक निंदा करीत असतात, त्याचप्रमाणे "पुत्राचा विक्रय करून स्त्रीसुखाचा उपभोग घेणारा हा दुष्ट आहे," म्हणून सभ्य लोक माझा निःसंशय धिक्कार करूं लागतील ! अरेरे, कायरे हें दुःख !! अरे, केवढा हा दुःखाचा प्रसंग ! ज्या अर्थी तुझे हे शब्द मला ऐकून घेणें भाग पडत आहे, त्या अर्थी पूर्वी कधी तरी केलेल्या पापकर्माचें फल म्हणून अशा प्रकारचें हें अपरिहार्य दुःख मला प्राप्त झालें आहे, असें वाटतें. हे पापिणी, नकळत जशी एखाद्याने आपल्या गळयाभोंवती पडलेली फासाची दोरी तशीच राहूं द्यावी, तशी मी पाप्याने आपल्या नाशाकरिता तुला खरोखर पुष्कळ दिवसपर्यंत जतन करून ठेविली. ( ७८-८० )

हाताने कृष्णसर्पाला स्पर्श करणाऱ्या बालाप्रमाणे तुझ्यासहवर्तमान रममाण होणाऱ्या माझ्या लक्ष्यांत तूं प्रत्यक्ष मृत्यु आहेस हें आलें नाही; यामुळे आता या पृथ्वींतील सर्व प्राण्यांनी माझी निंदा करणेंच योग्य आहे; कारण मी दुरात्म्याने त्या महात्म्या पुत्राला वनांत पाठवून अनाथ करण्याचा प्रसंग आणला. "स्त्रीकरिता पुत्राला वनांत पाठवून देणारा हा विषयासक्त दशरथ राजा खरोखर अतिशय मूर्ख आहे." अशी लोक माझी निंदा करितील. वेदाध्ययन, ब्रह्मचर्य आणि

भोगकाले महत्कृच्छ्रं पुनरेव प्रपत्स्यते ८४
नालं द्वितीयं वचनं पुत्रो मां प्रतिभाषितुम्।
स वनं प्रव्रजेत्युक्तो बाढमित्येव वक्ष्यति ८५
यदि मे राघवः कुर्याद्वनं गच्छेति चोदितः।
प्रतिकूलं प्रियं मे स्यान्न तु वत्सः करिष्यति ८६
राघवे हि वनं प्राप्ते सर्वलोकस्य धिक्कृतम्।
मृत्युरक्षमणीयं मां नयिष्यति यमक्षयम् ८७
मृते मयि गते रामे वनं मनुजपुंगवे।
इष्टे मम जने शेषे किं पापं प्रतिपत्स्यसे ८८
कौसल्या मां च रामं च पुत्रौ च यदि हास्यति।
दुःखान्यसहती देवी मामेवानुगमिष्यति ८९
कौसल्यां च सुमित्रां च मां च पुत्रैस्त्रिभिः सह।
प्रक्षिप्य नरके सा त्वं कैकेयि सुखिता भव ९०
मया रामेण च त्यक्तं शाश्वतं सत्कृतं गुणैः।

गुरुशुश्रूषा यांच्या योगानें आधीच कृश झालेल्या रामाला राज्योपभोगसमयींही पुनरपि मोठें दुःख सोसावें लागणार. माझ्या पुत्राला माझ्याशीं दुसरें भाषण कांहीं करवणारच नाही. "वनांत जा," असें म्हटलें असतां तो "ठीक आहे," एवढेंच म्हणेल. मी "वनांत जा," म्हणून सांगितलें असतां राम जर माझ्या या सांगण्याविरुद्ध वागला, तर मला तें प्रियच होईल; परंतु, तो पुत्र तसें करणारच नाही. राम वनांत गेला असतां क्षमेस अपात्र आणि म्हणूनच सर्व लोकांनीं धिक्कारिलेल्या मला मृत्यु यमसदनीं नेईल. मी मेल्यावर आणि पुरुषश्रेष्ठ राम वनवासांत गेल्यावर अवशिष्ट राहिलेल्या माझ्या प्रिय जनांना तूं कितीतरी दुःख देशील! माझा आणि रामाचा कौसल्येला जर वियोग झाला आणि त्याचप्रमाणे सुमित्रेला जर माझा, रामाचा आणि आपल्या उभयता पुत्रांचा वियोग झाला, तर त्या उभयतांनाही दुःख सहन न होऊन त्या माझेच मागोमाग परलोकीं येतील. सारांश, कौसल्येला, सुमित्रेला आणि तिन्ही पुत्रांसहवर्तमान मला नरकांत लोटून देऊन हे कैकेयी, तूं सुखी हो. ( ८१--९० )

इक्ष्वाकुकुलमक्षोभ्यमाकुलं पालयिष्यसि ९१
प्रियं चेद्भरतस्यैतद्रामप्रव्राजनं भवेत् ।
मा स्म मे भरतः कार्षीत्प्रेतकृत्यं गतायुषः ९२
मृते मयि गते रामे वनं पुरुषपुंगवे ।
सेदानीं विधवा राज्यं सपुत्रा कारयिष्यसि ९३
त्वं राजपुत्रि दैवेन न्यवसो मम वेश्मनि ।
अकीर्तिश्चातुला लोके ध्रुवः परिभवश्च मे ।
सर्वभूतेषु चावज्ञा यथा पापकृतस्तथा ९४
कथं रथैर्विभुर्यात्वा गजाश्वैश्च मुहुर्मुहुः ।
पद्भ्यां रामो महारण्ये वत्सो मे विचरिष्यति ९५
यस्य चाहारसमये सूदाः कुण्डलधारिणः ।
अहंपूर्वाः पचन्ति स्म प्रसन्नाः पानभोजनम् ९६
स कथं नु कषायाणि तिक्तानि कटुकानि च ।
भक्षयन्वन्यमाहारं सुतो मे वर्तयिष्यति ९७
महार्हवस्त्रसंबद्धो भूत्वा चिरसुखोचितः ।

गुणांनी अलंकृत, शाश्वत आणि क्षोभरहित असें इक्ष्वाकुल मी व रामानें सोडलें असतां तूं तें क्षुब्ध झालेलें परिपालन करशील. रामाचें वनवासांत जाणें जर भरताला प्रिय असेल, तर मी मरण पावल्यानंतर भरतानें माझें उत्तरकार्य करूं नये. पुरुषश्रेष्ठ राम वनांत गेल्यामुळे मी मृत झालों असतां हे राजकन्ये, विधवा झालेली तूं पुत्रासहवर्तमान खुशाल राज्य कर. दुर्दैवानें तुझें वास्तव्य माझ्या घरीं झालें आहे, त्या अर्थी जगतामध्ये माझी अत्यंत अपकीर्ति व हेटाळणी निःसंशय होणार आणि पातकी पुरुषाप्रमाणे सर्व प्राण्यांमध्ये माझी अवज्ञ होणार. रथ, गज आणि अश्व यांवर नेहमी आरूढ होऊन जाणारा माझा पुत्र प्रभु राम महारण्यामध्ये पायांनी कसा बरें जाईल ? ( ९१-९५ )

ज्याच्या भोजनाचा समय झाला असतां कुंडलें धारण करणारे आचारी आनंदित होऊन चढाओढीनें खाण्यापिण्याचे पदार्थ तयार करीत असतात, तो माझा पुत्र तुरट, कडू आणि तिखट कंदमुळांवर अर्थात् वन्य आहारावर कशी

काषायपरिधानस्तु कथं रामो भविष्यति ९८
कस्येदं दारुणं वाक्यमेवंविधमपीरितम् ।
रामस्यारण्यगमनं भरतस्याभिषेचनम् ९९
धिगस्तु योषितो नाम शठाः स्वार्थपरायणाः ।
न ब्रवीमि स्त्रियः सर्वा भरतस्यैव मातरम् १००
अनर्थभावेऽर्थपरे नृशंसे ममानुतापाय निवेशितासि ।
किमप्रियं पश्यसि मन्निमित्तं हितानुकारिण्यथवापि रामे १०१
परित्यजेयुः पितरोऽपि पुत्रान्भार्याः पतींश्चापि कृतानुरागाः ।
कृत्स्नं हि सर्वं कुपितं जगत्स्याद्दृष्ट्वैव रामं व्यसने निमग्नम् १०२
अहं पुनर्देवकुमाररूपमलंकृतं तं सुतमाव्रजन्तम् ।
नन्दामि पश्यन्निव दर्शनेन भवामि दृष्ट्वैव पुनर्युवेव १०३

---

बरें उपजीविका करील? मोठमोठीं मौल्यवान् वस्त्रें परिधान करणारा आणि पुष्कळ दिवसांपर्यंत सुखांत राहिलेला राम आज काषायवस्त्रें कशीं बरें परिधान करील ? रामाचें अरण्यामध्ये गमन आणि भरताला अभिषेक अशा प्रकारचें जें भयंकर भाषण आज मला ऐकणें भाग पडलें, तें खरोखर माझ्या एखाद्या अनिर्वचनीय दुष्कर्माचेंच फल होय. धिक्कार असो या स्वार्थसाधु कपटी स्त्रियांना! सर्व स्त्रियांसंबंधाने माझें हें म्हणणें नाहीं. फक्त भरताच्या मातेलाच उद्देशून मी हें म्हणत आहें. ( ९६–१०० )

अनर्थकारक गोष्ट करण्याचा उद्देश धरून स्वार्थ साधूं पाहणारे हे दुष्टे, मला क्लेश व्हावेत, म्हणूनच परमेश्वराने तुला माझ्या घरीं घातलें आहे, असें दिसतें. नाहीतर जगताचें हित करण्याविषयीं तत्पर असलेल्या रामापासून किंवा माझ्यापासून स्वतःला अप्रिय होण्यासारखें तुला काय बरें दिसत आहे ? राम संकटांत सापडल्याचें पाहून पिते पुत्रांचा व अनुरक्त भार्या पतींचाही त्याग करतील. इतकेंच नव्हे; परंतु संपूर्ण जगत् क्रुद्ध होऊन जाईल. देवकुमारांप्रमाणे असलेला माझा पुत्र राम अलंकार धारण करून माझ्याकडे येत असल्याचें ऐकून प्रत्यक्ष पाहिल्याप्रमाणे मला आनंद होतो आणि त्याला पाहिल्यावर तर तरुण पुरुषांप्रमाणे मी उत्साहयुक्त होत असतों. कदाचित् सूर्यावाचूनही लोकांचा व्यव-

विना हि सूर्येण भवेत्प्रवृत्तिरवर्षता वज्रधरेण वापि ।
रामं तु गच्छन्तमितः समीक्ष्य जीवेन्न कश्चित्त्विति चेतना मे १०४
विनाशकामामहितामभित्रामावासयं मृत्युमिवात्मनस्त्वाम् ।
चिरं बताङ्केन धृतासि सर्पी महाविषा तेन हतोऽस्मि मोहात् १०५
मया च रामेण सलक्ष्मणेन प्रशास्तु हीनो भरतस्त्वया सह ।
पुरं च राष्ट्रं च निहत्य बान्धवान्ममाहितानां च भवाभिभाषिणी ६
नृशंसवृत्ते व्यसनप्रहारिणि प्रसह्य वाक्यं यदिहाद्य भाषसे ।
न नाम ते तेन मुखात्पतन्त्यधो विशीर्यमाणा दशनाः सहस्रधा ७
न किंचिदाहाहितमप्रियं वचो न वेत्ति रामः परुषाणि भाषितुम् ।
कथं तु रामे ह्यभिरामवादिनि ब्रवीषि दोषान्गुणनित्यसंमते १०८
प्रताम्य वा प्रज्वल वा प्रणश्य वा सहस्रशो वा स्फुटितां महीं व्रज ।

हार चालेल आणि इंद्र जरी पर्जन्य पाडीत नसला, तरीही कदाचित् लोकांची उपजीविका सुरू राहील; परंतु येथून राम वनांत जात असल्याचें अवलोकन करून कोणीही जिवंत राहणार नाही, असें मला वाटतें. माझ्या विनाशाची व अकल्याणाची इच्छा धरून माझ्याशीं शत्रुभावाने वागणाऱ्या आणि म्हणूनच माझ्या मृत्यूप्रमाणे असलेल्या तुला मी आपणांपाशी राहून घेतली आणि मोहामुळे तुला महाविषारी सर्पिणीला मी पुष्कळ दिवसपर्यंत अङ्कावर धारण केली; त्यामुळे माझा घात झाला आहे. ( १०१–१०५ )

मी आणि लक्ष्मणासहवर्तमान राम यांनी रहित असलेल्या भरताने तुझ्यासहवर्तमान राजधानीवर व राष्ट्रावर अंमल चालवावा आणि बांधवांना मारून तूं माझ्या शत्रूंच्या मनांत अत्यन्त हर्ष उत्पन्न होण्यास कारणीभूत व्हावेंस. संकटांत सापडलेल्यावर प्रहार करणारी हे दुराचारिणी, आज तूं या ठिकाणीं उद्धटपणाने भाषण करीत असूनही तुझ्या दातांचे हजारो तुकडे होऊन ते तुझ्या मुखांतून कसे पडत नाहीत, हें मला समजत नाही. रामाने आजपर्यंत अहितकारक आणि अप्रिय असें भाषण यत्किंचितही केलेलें नाही व कठोर शब्द उच्चारणें तर त्याला ठाऊकच नाही. तेव्हा गुणांच्या योगाने सर्वांना सर्वदा संमत अशा प्रिय भाषण करणाऱ्या रामाला तूं दोष कसे लावीत आहेस ? खुशाल तूं

**न ते करिष्यामि वचः सुदारुणं समाहितं केकयराजपांसने १०९**
**क्षुरोपमां नित्यमसत्प्रियंवदां प्रदुष्टभावां स्वकुलोपघातिनीम् ।**
**न जीवितुं त्वां विषहेऽमनोरमां दिधक्षमाणां हृदयं सबन्धनम् ११०**
**न जीवितं मेऽस्ति कुतः पुनः सुखं विनात्मजेनात्मवतां कुतो रतिः।**
**ममाहितं देवि न कर्तुमर्हसि स्पृशामि पादावपि ते प्रसीद मे १११**
**स भूमिपालो विलपन्ननाथवत्स्त्रिया गृहीतो हृदयेऽतिमात्रया ।**
**पपात देव्याश्चरणौ प्रसारितावुभावसंप्राप्य यथातुरस्तथा ११२**
[ ५७७ ]

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे द्वादशः सर्गः ॥ १२ ॥

---

हवी तितकी सन्ताप, जाळून घे, जीव दे अथवा हजारो तुकडे तुकडे होऊन पृथ्वींत मिळून जा. हे केकयराजकलंकिनि, अत्यंत भयंकर असें हें तूं केलेलें भाषण मी कधींही ऐकणार नाहीं. वस्तऱ्याचीच उपमा तुला योग्य आहे. नेहमी तूं प्रिय परंतु मिथ्या भाषण करणारी आहेस; तुझी बुद्धि फार दुष्ट आहे आणि तूं आपल्या कुलाचा घात करणारी आहेस. यास्तव प्राणांसहवर्तमान हृदय दग्ध करण्याची इच्छा करीत असल्यामुळे मनाला दुःख देणाऱ्या तुला जिवन्त ठेवण्यासदेखील माझें मन घेत नाही. ( १०६–११० )

( राम वनवासांत गेला असतां ) मी जिवंतही रहाणार नाहीं, मग सुखाची गोष्ट कशाला पाहिजे ? कारण, आत्मवेत्त्या पुरुषांना पुत्रांवाचून सुख कोठून असणार ? यास्तव. हे देवी, तूं माझें अकल्याण करूं नकोस. मी तुझे पायही धरितों. तूं मजवर कृपा कर. याप्रमाणे अमर्याद रीतीने वागणाऱ्या स्त्रीच्या कचाट्यांत सापडलेला तो दशरथभूपति अनाथाप्रमाणे विलाप करीत करीत आपल्या भार्येच्या पसरलेल्या पायांना स्पर्श करण्याकरिता गेला असतां व्याधिग्रस्त पुरुषाप्रमाणे तिच्या पायांपर्यंत पोचण्यापूर्वीच मूर्च्छित होऊन भूमीवर पडला. ( १११–११२ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी बारावा सर्ग समाप्त झाला. ॥ १२ ॥

त्रयोदशः सर्गः ।

अतदर्हं महाराजं शयानमतथोचितम् ।
ययातिमिव पुण्यान्ते देवलोकात्परिच्युतम् १
अनर्थरूपासिद्धार्था ह्यभीता भयदर्शिनी ।
पुनराकारयामास तमेव वरमङ्गना २
त्वं कत्थसे महाराज सत्यवादी दृढव्रतः ।
मम चेमं वरं कस्माद्विधारयितुमिच्छसि ३
एवमुक्तस्तु कैकेय्या राजा दशरथस्तदा ।
प्रत्युवाच ततः क्रुद्धो मुहूर्तं विह्वलन्निव ४
मृते मयि गते रामे वनं मनुजपुंगवे ।
हन्तानार्ये ममामित्रे सकामा सुखिनी भव ५
स्वर्गेऽपि खलु रामस्य कुशलं दैवतैरहम् ।
प्रत्यादेशादभिहितं धारयिष्ये कथं बत ६

---

स्त्रीच्या पायावर डोकें ठेवण्याइतक्या केविलवाण्या स्थितीला प्राप्त होईपर्यन्त शोक करण्याला अयोग्य आणि भूमीवर शयन करण्याला अयोग्य असतांनाही तशा रीतीने शयन करणारा आणि म्हणूनच पुण्य सरल्याबरोबर देवलोकापासून च्युत झालेल्या ययातीप्रमाणे दिसणारा जो महाराज दशरथ त्याला, त्याच वराच्या संबंधाने इक्ष्वाकुकुलाला अनर्थरूप, इच्छित हेतु सिद्धीस न गेलेली, लोकापवादाची भीति न बाळगणारी आणि रामापासून भरताला अपाय होईल, असें मनांत भय बाळगणारी स्त्री कैकेयी पुनः म्हणाली, " हे महाराज, सत्यवादी आणि स्वीकारिलेलें व्रत नेटाने चालविणारा म्हणून तुझी मोठी ख्याति आहे. तस्मात् माझें हें वररूपी ऋण बुडविण्याची इच्छा काय म्हणून करीत आहेस ? " याप्रमाणे कैकेयी बोलली असतां, दशरथ राजा क्रोधाने क्षणभर विह्वल होऊन, तिला म्हणाला " हे दुष्टे, हे शत्रुरूपिणी, पुरुषश्रेष्ठ राम वनामध्ये गेला आणि मी मेलों, म्हणजे आपले मनोरथ परिपूर्ण करून घेऊन तूं सुखी हो. ( १-५ )

स्वर्गामध्ये गेल्यावर "राम कुशल आहे ना ?" म्हणून देवांनी विचारलें, तर मी त्यांना काय बरें सांगूं ? " मी त्याला वनांत पाठविलें, " असें जर सांगेन, तर

कैकेय्याः प्रियकामेन रामः प्रव्राजितो वनम् ।
यदि सत्यं ब्रवीम्येतत्तदसत्यं भविष्यति ७
अपुत्रेण मया पुत्रः श्रमेण महता महान् ।
रामो लब्धो महातेजाः स कथं त्यज्यते मया ८
शूरश्च कृतविद्यश्च जितक्रोधः क्षमापरः ।
कथं कमलपत्राक्षो मया रामो विवास्यते ९
कथमिन्दीवरश्यामं दीर्घबाहुं महाबलम् ।
अभिराममहं रामं स्थापयिष्यामि दण्डकान् १०
सुखानामुचितस्यैव दुःखैरनुचितस्य च ।
दुःखं नामानुपश्येयं कथं रामस्य धीमतः ११
यदि दुःखमकृत्वा तु मम संक्रमणं भवेत् ।
अदुःखार्हस्य रामस्य ततः सुखमवाप्नुयाम् १२
नृशंसे पापसंकल्पे रामं सत्यपराक्रमम् ।

"अशा उत्कृष्ट गुणवान् पुत्राला तूं वनांत कसें पाठविलेंस" म्हणून मला लाजविण्याकरिता जर ते विचारूं लागले, तर तें माझ्याने ऐकवणारही नाही. "कैकेयीचें प्रिय करण्याकरिता रामाला मी वनवासांत पाठविलें," असें जर मी त्यांना खरें सांगूं लागलों, तर तें माझें बोलणें ते असत्यच समजतील आणि "विषयवासनेमुळे याने अशी गोष्ट केली," असेंच ते म्हणतील. "मी निपुत्रिक असतांना मोठ्या कष्टाने हा महात्मा, महातेजस्वी पुत्र राम मला प्राप्त झाला आहे. त्याचा मी त्याग कसा बरें करूं? शूर, सर्व विद्यापारंगत, जितक्रोध आणि क्षमाशील असा जो कमलनयन राम त्याला मी कसें बरें हाकून लावावें? नील कमलाप्रमाणे ज्याचा वर्ण आहे, अशा महाबलाढ्य, आजानुबाहु व मनोहर रामाला मी दंडकारण्यामध्ये कसें बरें पाठवावें? (६–१०)

जन्मापासून सुखामध्ये वाढलेल्या आणि दुःखाची कधीच सवय नसलेल्या विचारवान् रामाचें दुःख मी कसें बरें पाहूं? दुःख भोगण्याला अयोग्य अशा रामासाठी दुःख करण्याची पाळी येण्यापूर्वीच जर माझें परलोकीं गमन होईल, तर मला तें अत्यन्त सुखावह होईल. हे दुष्टे, हे पापबुद्धि कैकेयी, माझ्या अमोघ-

किं विप्रियेण कैकेयि प्रियं योजयसे मम १३
अकीर्तिरतुला लोके ध्रुवं परिभविष्यति १४
तथा विलपतस्तस्य परिभ्रमितचेतसः ।
अस्तमभ्यागमत्सूर्यो रजनी चाभ्यवर्तत १५
सा त्रियामा तदार्तस्य चन्द्रमण्डलमण्डिता ।
राज्ञो विलपमानस्य न व्यभासत शर्वरी १६
सदैवोष्णं विनिःश्वस्य वृद्धो दशरथो नृपः ।
विललापार्तवद् दुःखं गगनासक्तलोचनः १७
न प्रभातं त्वयेच्छामि निशे नक्षत्रभूषिते ।
क्रियतां मे दया भद्रे मयायं रचितोऽञ्जलिः १८
अथवा गम्यतां शीघ्रं नाहमिच्छामि निर्घृणाम् ।
नृशंसां कैकयीं द्रष्टुं यत्कृते व्यसनं मम १९
एवमुक्त्वा ततो राजा कैकेयीं संयताञ्जलिः ।
प्रसादयामास पुनः कैकेयीं राजधर्मवित् २०

पराक्रमी प्रिय रामाला वनांत जावयास लाऊन, माझ्यापासून त्याची ताटातूट करण्यास तूं कां प्रवृत्त झाली आहेस ? असें झालें असतां लोकामध्ये माझी कांही पराकाष्ठेची अपकीर्ति होईल व आजपर्यंत मिळविलेल्या कीर्तीवर तुझ्या योगाने पाणी पडेल." ( ११-१४ )

याप्रमाणे अंतःकरणाला मोह पडून तो दशरथ विलाप करीत असतां सूर्य अस्तास जाऊन रात्र पडली आणि ती रात्रही जरी चंद्रमंडलाने भूषित होती, तरी विलाप करीत असलेल्या त्या राजाला ती सुखदायक झाली नाही. तेव्हा एकसारिखे सुस्कारे टाकून तो वृद्ध दशरथ राजा आकाशाकडे दृष्टि देऊन आर्त मनुष्याप्रमाणे दुःखाने विलाप करूं लागला की, " हे नक्षत्रभूषित रात्री, तूं उजाडूं देऊं नकोस. हे कल्याणी, तूं मजवर दया कर. हे मी तुला हात जोडिले आहेत. अथवा तूं जा लवकर. जिच्याकरितां मला हें दुःख झालें आहे, त्या निर्दय व दुष्ट कैकेयीचें फार वेळपर्यंत तोंड पाहण्याची मला इच्छा नाही. " ( १५-१९ )

याप्रमाणे विलाप करून त्या दशरथराजाने कैकेयीपुढे हात जोडिले आणि तो

साधुवृत्तस्य दीनस्य त्वद्गतस्य गतायुषः।
प्रसादः क्रियतां भद्रे देवि राज्ञो विशेषतः २१
शून्येन खलु सुश्रोणि मयेदं समुदाहृतम्।
कुरु साधु प्रसादं मे बाले सहृदया ह्यसि २२
प्रसीद देवि रामो मे त्वद्दत्तं राज्यमव्ययम्।
लभतामसितापाङ्गे यशः परमवाप्स्यसि २३
मम रामस्य लोकस्य गुरूणां भरतस्य च।
प्रियमेतद्गुरुश्रोणि कुरु चारुमुखेक्षणे २४
विशुद्धभावस्य हि दुष्टभावा दीनस्य ताम्राश्रुकलस्य राज्ञः।
श्रुत्वा विचित्रं करुणं विलापं भर्तुर्नृशंसा न चकार वाक्यम् २५
ततः स राजा पुनरेव मूर्छितः प्रियामतुष्टां प्रतिकूलभाषिणीम्।
समीक्ष्य पुत्रस्य विवासनं प्रति क्षितौ विसंज्ञो निपपात दुःखितः२६

राजधर्मज्ञ दशरथ पुनरपि कैकेयीची प्रार्थना करूं लागला की, " हे कल्याणी, मी सद्वर्तनाने वागणारा दशरथ आज दीन होऊन सर्वस्वीं तुझ्या अधीन झालों आहे व आता माझ्या आयुष्याचे दिवसही थोडकेच राहिले आहेत. करिता, हे देवी, मी राजा आहें, या गोष्टीकडे विषेश लक्ष्य देऊन तूं मजवर कृपा कर. हे सुंदरी, सारासार विचार न राहिल्यामुळे मी तुझ्याशीं हें कठोर भाषण केलें; परंतु तूं दयाळु आहेस; करिता, हे बाले, मजवर चांगली कृपा कर. हे देवी, मजवर प्रसन्न हो. तूंच रामाला राज्य दे आणि हे कृष्णनयने, त्याला तूं दिलेलें राज्य अक्षय प्राप्त होऊं दे, म्हणजे तुझीही पराकाष्ठेची कीर्ति होईल. हे सुंदरी, हे मनोहरवदने, हे सुंदरनयने, मला रामाला, लोकांना, वसिष्ठप्रभृति गुरूंना आणि भरतालाही हीच गोष्ट प्रिय आहे." ( २०-२४ )

याप्रमाणे रडून रडून ज्याच्या नेत्रांतील अश्रूही आरक्तवर्ण झाले आहेत व जो मनाने शुद्ध आहे, अशा त्या भर्त्याचा नाना प्रकारचा दीन विलाप श्रवण करूनही पापबुद्धि दुष्ट कैकेयीने त्याच्या म्हणण्याकडे मुळीच लक्ष्य दिलें नाहीं. तेव्हा तो राजा पुनरपि मूर्छित झाला आणि कांहींसा सावध झाल्यावर असंतुष्ट आणि विरुद्ध भाषण करणाऱ्या आपल्या प्रिय पत्नीकडे पाहूं लागला;

**इतीव राज्ञो व्यथितस्य सा निशा जगाम घोरं श्वसतो मनस्विनः ।**
**विबोध्यमानः प्रतिबोधनं तदा निवारयामास स राजसत्तमः २७**

[ ६०४ ]

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे त्रयोदशः सर्गः ॥ १३ ॥

चतुर्दशो सर्गः ।

**पुत्रशोकार्दितं पापा विसंज्ञं पतितं भुवि ।**
**विचेष्टमानमुत्प्रेक्ष्य ऐक्ष्वाकमिदमब्रवीत्    १**
**पापं कृत्वैव किमिदं मम संश्रुत्य संश्रवम् ।**
**शेषे क्षितितले सन्नः स्थित्यां स्थातुं त्वमर्हसि    २**
**आहुः सत्यं हि परमं धर्मं धर्मविदो जनाः ।**
**सत्यमाश्रित्य च मया त्वं धर्मं प्रतिचोदितः    ३**
**संश्रुत्य शैब्यः श्येनाय स्वां तनुं जगतीपतिः ।**
**प्रदाय पक्षिणे राजा जगाम गतिमुत्तमाम्    ४**

परंतु इतकें झालें असतांही पुत्राला वनवासांत पाठविण्याविषयी ती आपला आग्रह सोडीत नाही, असें अवलोकन केल्यावर तो राजा दुःखित व मूर्छित होऊन पृथ्वीवर पडला. याप्रमाणे दुःखाकुल होऊन तो विचारी राजा भयंकर सुस्कारे टाकीत पडला असतांना ती रात्र निघून गेली. तेव्हा मंगल गीतादिकांनी भाट-वगैरे लोक त्याला उठवूं लागले असतां, त्या राजश्रेष्ठाने त्यांचा प्रतिबंध केला. ( २५-२७ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी तेरावा सर्ग समाप्त झाला .॥ १३ ॥

पुत्रशोकाकुल झाल्यामुळे मूर्छित होऊन तडफडत असलेल्या इक्ष्वाकुवंशज दशरथराजाला अवलोकन करून दुष्ट कैकेयी म्हणाली, " अरे, मला वर देण्याची प्रतिज्ञा करून तूं पाप केल्याप्रमाणे व्याकुळ होऊन भूतलावर पडला आहेस, हें काय? सज्जनांच्या सत्यपालनरूप मर्यादेनेच वागणें तुला योग्य आहे. धर्मज्ञ लोक सत्यालाच श्रेष्ठ धर्म म्हणतात आणि मीही सत्यरूप धर्माचेंच अवलंबन करून तुला वरदानाविषयी मागणें केलें आहे. भूपति शैब्य राजा कपोताला अभय

तथा ह्यलर्कस्तेजस्वी ब्राह्मणे वेदपारगे ।
याचमाने स्वके नेत्रे उद्धृत्याविमना ददौ ५
सरितां तु पतिः स्वल्पां मर्यादां सत्यमन्वितः ।
सत्यानुरोधात्समये वेलां स्वां नातिवर्तते ६
सत्यमेकपदं ब्रह्म सत्ये धर्मः प्रतिष्ठितः ।
सत्यमेवाक्षया वेदाः सत्येनावाप्यते परम् ७
सत्यं समनुवर्तस्व यदि धर्मे धृता मतिः ।
स वरः सफलो मेऽस्तु वरदो ह्यसि सत्तम ८
धर्मस्यैवाभिकामार्थं मम चैवाभिचोदनात् ।
प्रव्राजय सुतं रामं त्रिःखलु त्वां ब्रवीम्यहम् ९
समयं च ममार्येमं यदि त्वं न करिष्यसि ।
अग्रतस्ते परित्यक्ता परित्यक्ष्यामि जीवितम् १०
एवं प्रचोदितो राजा कैकेय्या निर्विशङ्कया ।

देण्याची प्रतिज्ञा केल्यावर, आपलें शरीर श्येन पक्ष्याला देऊन उत्कृष्ट गतीला गेला. त्याचप्रमाणे तेजस्वी अलर्क राजानें वेदपारंगत ब्राह्मण याचना करूं लागला असतां आपले नेत्र काढून, खिन्न न होतां, त्याला दिले. ( १–५ )

सत्याचें अवलंबन करून असलेला समुद्र सत्याचा त्याग होईल, या भीतीनें चंद्रोदयकालीं वृद्धिंगत होण्याचा समय असतांही मर्यादेचें उल्लंघन यत्किंचितही करीत नाहीं. सत्यवचन हेंच प्रणवरूप ब्रह्म होय; सत्यावरच धर्म अवलंबून आहे; अक्षय वेदही सत्याच्याच आश्रयानें आहेत आणि सत्य हेंच ब्रह्मस्वरूपाच्या प्राप्तीचें साधन आहे. धर्मावर जर तुझी दृढ निष्ठा असेल, तर सत्याला अनुसरून वाग आणि हे सज्जनश्रेष्ठ, ज्या अर्थी तूं मला वर दिला आहेस, त्या अर्थी तो माझा वर सफल होवो. सारांश, धर्माच्याच प्राप्तीकरितां आणि मी सांगत आहें म्हणून, तूं आपला पुत्र राम याला वनामध्ये पाठीव; हें मी तुला तीन वेळ सांगत आहें. हे आर्य, माझी ही अट जर तूं शेवटास न नेशील, तर तूं माझी उपेक्षा केलीस, म्हणून तुझ्यासमोर मी जीव देईन.” ( ६–१० )

याप्रमाणे निःशंकपणानें कैकेयीनें राजाला सांगितलें असतां इंद्रानें टाकिलेला

नाशकत्पाशमुन्मोक्तु बलिरिन्द्रकृतं यथा　　११
उद्भ्रान्तहृदयश्चापि विवर्णवदनोऽभवत् ।
स धुर्यो वै परिस्पन्दन्युगचक्रान्तरं यथा　　१२
विकलाभ्यां च नेत्राभ्यामपश्यन्निव भूमिपः ।
कृच्छ्राद्धैर्येण संस्तभ्य कैकेयीमिदमब्रवीत्　　१३
यस्ते मन्त्रकृतः पाणिरग्नौ पापे मया धृतः ।
संत्यजामि स्वजं चैव तव पुत्रं सह त्वया　　१४
प्रयाता रजनी देवि सूर्यस्योदनयं प्रति ।
अभिषेकाय हि जनस्त्वरयिष्यति मां ध्रुवम्　　१५
रामाभिषेकसंभारैस्तदर्थमुपकल्पितैः ।
रामः कारयितव्यो मे मृतस्य सलिलक्रियाम्　　१६
सपुत्रया त्वया नैव कर्तव्या सलिलक्रिया ।
व्याहन्तास्यशुभाचारे यदि रामाभिषेचनम्　　१७

पाश ज्याप्रमाणे बलीला सोडवितां आला नाही, त्याप्रमाणे सत्यरूप पाशाच्या बंधनापासून दशरथराजा मुक्त होण्यास समर्थ झाला नाही. इतकेंच नव्हे, परंतु जूं आणि चाक यांमध्ये सापडून तडफड करीत असलेल्या बैलाप्रमाणे तो मनामध्ये गोंधळून जाऊन त्याचें मुख निस्तेज झालें आणि अश्रूंनी नेत्र व्याकुल झाल्यामुळे दृष्टि अंधुक झालेला तो भूपति धैर्यानें दुःख आवरून धरून मोठ्या कष्टानें कैकेयीला म्हणाला, " हे पापिणी, अग्निसंनिध मी जें तुझें समंत्रक पाणिग्रहण केलें आहे, त्याचा मी त्याग करितों आणि माझ्यापासून झालेला तुझा पुत्र भरत त्याचाही तुझ्या सहवर्तमान मी त्याग करितों. ( ११-१४ )

हे देवी, रात्र निघून गेली. आता सूर्योदयाच्या वेळेला अभिषेकाकरिता जुळविलेल्या सामग्रीने रामाला अभिषेक करण्याकरिता लोक मला निःसंशय घाई करितील. यास्तव रामाच्या अभिषेकाकरिता जुळविलेल्या सामुग्रीने मला रामाला अभिषेक करविलाच पाहिजे. आता गुरूचाही अवमान करून जर तुला रामाला अभिषेक हाणून पाडावयाचाच असेल, तर हे दुराचारिणी, त्याच अभिषेकसामग्रीने मज मृताचें उत्तरकार्यच रामाकडून करवावें लागेल. तूं आपल्या

न शक्तोऽद्यास्म्यहं द्रष्टुं दृष्ट्वा पूर्वं तथा मुखम्।
हतहर्षं तथानन्दं पुनर्जनमवाङ्मुखम् १८
तां तथा ब्रुवतस्तस्य भूमिपस्य महात्मनः।
प्रभाता शर्वरी पुण्या चन्द्रनक्षत्रशालिनी १९
ततः पापसमाचारा कैकेयी पार्थिवं पुनः।
उवाच परुषं वाक्यं वाक्यज्ञा रोषमूर्छिता २०
किमिदं भाषसे राजन्वाक्यं गररुजोपमम्।
आनाययितुमक्लिष्टं पुत्रं राममिहार्हसि २१
स्थाप्य राज्ये मम सुतं कृत्वा रामं वने चरम्।
निःसपत्नां च मां कृत्वा कृतकृत्यो भविष्यसि २२
स तुन्न इव तीक्ष्णेन प्रतोदेन हयोत्तमः।
राजा प्रचोदितोऽभीक्ष्णं कैकेय्या वाक्यमब्रवीत् २३
धर्मबन्धेन बद्धोऽस्मि नष्टा च मम चेतना।

---

पुत्रासहवर्तमान माझें उत्तरकार्य करितां उपयोगीच नाहीं; कारण, रामाला अभिषेक होणार, हें समजल्याबरोबर लोकांचीं मुखकमलें प्रफुल्लित झालेलीं मी अवलोकन केलेलीं आहेत. करिता, रामाभिषेक हाणून पाडिला गेला, तर हर्षरहित व आनंदरहित होऊन लोकांनी आपलीं तोंडें खालीं घातलेलीं आता माझ्याने पाहवणार नाहीत." याप्रमाणे तो महात्मा दशरथ भूपति त्या कैकेयीशीं बोलत आहे, तोंच चंद्र व नक्षत्रसमुदाय यांनी युक्त असलेली ती पुण्यकारक रात्र उजाडली. (१५-१९)

तेव्हा पापबुद्धीने वागणारी आणि संभाषण करण्यामध्ये निपुण असलेली ती कैकेयी क्रोधाने अगदी व्याप्त होऊन कठोर शब्दांनी राजाला म्हणाली, "हे राजा, विषजन्य दुःखाप्रमाणे दुःख देणारें हें तूं काय बोलत आहेस? आपल्या पुत्राला रामालाच सरळ येथेंच बोलावून आणीव. माझ्या पुत्राला राज्यावर बसवून आणि रामाला वनवासांत पाठवून मला शत्रुरहित केलेंस, म्हणजे तूं कृतकृत्य होशील." सडकून चाबूक मारिला असतां उत्कृष्ट अश्व ज्याप्रमाणे स्वाराच्या काबूंत येतो, त्याप्रमाणे कैकेयीने वारंवार वाक्प्रहार करून, वश करून घेतलेला

ज्येष्ठं पुत्रं प्रियं रामं द्रष्टुमिच्छामि धार्मिकम् २४
ततः प्रभातां रजनीमुदिते च दिवाकरे।
पुण्ये नक्षत्रयोगे च मुहूर्ते च समागते २५
वसिष्ठो गुणसंपन्नः शिष्यैः परिवृतस्तथा।
उपगृह्याशु संभारान्प्रविवेश पुरोत्तमम् २६
सिक्तसंमार्जितपथां पताकोत्तमभूषिताम्।
संहृष्टमनुजोपेतां समृद्धविपणापणाम् २७
महोत्सवसमायुक्तां राघवार्थे समुत्सुकाम्।
चन्दनागुरुधूपैश्च सर्वतः परिधूपिताम् २८
तां पुरीं समतिक्रम्य पुरन्दरपुरोपमाम्।
ददर्शान्तःपुरं श्रीमान्नानाध्वजगणायुतम् २९
पौरजानपदाकीर्णं ब्राह्मणैरुपशोभितम्।
यष्टिमद्भिः सुसंपूर्णं सदश्वैः परमार्चितैः ३०

राजा म्हणाला, "धर्मबंधनाने मी बद्ध झालों असल्यामुळे मला आता कांही सुचत नाही. प्रिय आणि धार्मिक अशा ज्येष्ठ पुत्र रामाला पाहण्याची माझी इच्छा आहे." ( २०-२८ )

तदनंतर रात्र उजाडलेली पाहून, सूर्योदय झाल्यावर शुभनक्षत्रीं सुमुहूर्त प्राप्त झाला असता, शिष्यांनी परिवेष्टित असे गुणसंपन्न वसिष्ठमुनि अभिषेकाचें साहित्य घेऊन त्या उत्कृष्ट नगरामध्ये सत्वर प्रविष्ट झाले. त्या नगरींतील रस्ते शिंपून व झाडून काढिलेले होते. उत्तम उत्तम पताकांनी त्या नगरीला शोभा आणिलेली होती. आंतील लोक हर्षयुक्त झालेले होते; बाजारांतून विक्रीचे पदार्थ पुष्कळ मांडून ठेविलेले होते; जिकडे तिकडे महोत्सव चाललेला होता. रामाकरिता आंतील लोक उत्सुक झालेले होते आणि चंदन व अगुरु यांचे चोहोंकडे धूप घातलेले होते. अशा त्या इंद्रनगरीसमान असलेल्या नगरींत बराच मार्ग आक्रमण करून गेल्यावर, श्रीमान् वसिष्ठमुनींनी, ज्यामध्ये नाना प्रकारचे ध्वज उभारलेले होते, असें अंतःपुर अवलोकन केलें. नगरींतील आणि बाहेरून आलेल्या लोकांची ज्याच्या पुढे गर्दी उसळलेली होती, ब्राह्मणांच्या योगाने ज्याला शोभा

तदन्तःपुरमासाद्य व्यतिचक्राम तं जनम्।
वसिष्ठः परमप्रीतः परमर्षिभिरावृतः ३१
स त्वपश्यद्विनिष्क्रान्तं सुमन्त्रं नाम सारथिम्।
द्वारे मनुजसिंहस्य सचिवं प्रियदर्शनम् ३२
तमुवाच महातेजाः सूतपुत्रं विशारदम्।
वसिष्ठः क्षिप्रमाचक्ष्व नृपतेर्मामिहागतम् ३३
इमे गङ्गोदकघटाः सागरेभ्यश्च काञ्चनाः।
औदुम्बरं भद्रपीठमभिषेकार्थमाहृतम् ३४
सर्वबीजानि गन्धाश्च रत्नानि विविधानि च।
क्षौद्रं दधि घृतं लाजा दर्भाः सुमनसः पयः ३५
अष्टौ च कन्या रुचिरा मत्तश्च वरवारणः।
चतुरश्वो रथः श्रीमान्निस्त्रिंशो धनुरुत्तमम् ३६
वाहनं नरसंयुक्तं छत्रं च शशिसंनिभम्।
श्वेते च वालव्यजने भृङ्गारं च हिरण्मयम् ३७

आलेली होती आणि उत्तम प्रकारें शृंगारिलेल्या उत्कृष्ट अश्वांनी व भालदार-चोपदारांनी जें गजबजलेलें होतें. ( २६–३० )

अशा प्रकारच्या अंतःपुरासमीप गेल्यावर महर्षींनी परिवेष्टित असलेले वसिष्ठमुनि अत्यंत प्रसन्न होऊन तेथे जमलेल्या लोकांच्या गर्दीतून वाट काढून, जाऊं लागले असतां, ज्याचें दर्शन आल्हादकारक आहे, असा अंतःपुरांतून बाहेर येत असलेला पुरुषश्रेष्ठ दशरथ राजाचा सुमंत्र नामक सारथी व मंत्री त्यांनी अवलोकन केला. ( ३१--३२ )

आणि ते महातेजस्वी वसिष्ठमुनि त्या व्यवहारज्ञ सारथ्याला म्हणाले, " मी येथे आलों आहें, हें तूं राजाला सत्वर निवेदन कर. अभिषेकाकरिता हे गंगाजलाचे घट आणिलेले आहेत, समुद्रांवरूनही सुवर्णघट त्यांच्या उदकाने भरून आणिलेले आहेत आणि अभिषेकाकरिता उंबराचें हें भद्रपीठही आणिलेलें आहे. सर्व प्रकारचीं बीजें, गंध, नाना प्रकारचीं रत्नें, मध, दधि, घृत, लाह्या, दर्भ, पुष्पें, पय, सुंदर अशा आठ कुमारिका, मदमत्त असा उत्कृष्ट गज, चार अश्व जोडिलेला

हेमदामापिनद्धश्च ककुद्मान्पाण्डुरो वृषः ।
केसरी च चतुर्दंष्ट्रो हरिश्रेष्ठो महाबलः ३८
सिंहासनं व्याघ्रतनुः समिधश्च हुताशनः ।
सर्वे वादित्रसंघाश्च वेश्याश्चालंकृताः स्त्रियः ३९
आचार्या ब्राह्मणा गावः पुण्याश्च मृगपक्षिणः ।
पौरजानपदश्रेष्ठा नैगमाश्च गणैः सह ४०
एते चान्ये च बहवः प्रीयमाणाः प्रियंवदाः ।
अभिषेकाय रामस्य सह तिष्ठन्ति पार्थिवैः ४१
त्वरयस्व महाराजं यथा समुदितेऽहनि ।
पुष्ये नक्षत्रयोगे च रामो राज्यमवाप्नुयात् ४२
इति तस्य वचः श्रुत्वा सूतपुत्रो महाबलः ।
स्तुवन्नृपतिशार्दूलं प्रविवेश निवेशनम् ४३
तं तु पूर्वोदितं वृद्धं द्वारस्था राजसंमताः ।

---

वैभवशाली रथ, खड्ग, उत्कृष्ट धनुष्य, भोयांसहवर्तमान पालखी, चंद्रासारिखें निर्मल छत्र, शुभ्रवर्ण चामरें, सुवर्णाची झारी. ( ३३–३७ )

सोन्याच्या साखळदंडाने बांधिलेला आणि वाशिंड असलेला श्वेतवर्ण बैल, विपुल आयाळ आणि चार दाढा यांनी युक्त असलेला महाबलाढ्य व श्रेष्ठ अश्व, सिंहासन, व्याघ्रचर्म, समिधा, अग्नि, सर्व प्रकारचे वाद्यसमुदाय, वेश्या, अलंकार धारण केलेल्या स्त्रिया, आचार्य, ब्राह्मण, गाई, पवित्र पशुपक्षी, नगरांतील व देशांतील श्रेष्ठ श्रेष्ठ लोक आणि आपआपल्या गणांसहवर्तमान उदमी लोक, हे व इतरहि पुष्कळ प्रिय भाषण करणारे व प्रसन्न मुद्रेने युक्त असलेले लोक सामन्त राजांसहवर्तमान रामाच्या अभिषेकाकरिता वाट पहात तिष्ठत उभे आहेत यास्तव, गुणसंपन्न अशा या आजच्या शुभ दिवशीं पुष्यनक्षत्र आहे. तोंपर्यन्त, रामाचा राज्याभिषेक उरकून घेणेस्तव तूं महाराज दशरथाकडून त्वरा करीव." ( ३८–४२ )

हें त्या वसिष्ठमुनींचें भाषण श्रवण केल्यावर तो महाबलाढ्य सारथि नृपश्रेष्ठ दशरथाची स्तुति करीत करीत तो असलेल्या स्थानांमध्ये गेला. तेव्हां " याला

न शेकुरभिसंरोद्धुं राज्ञः प्रियचिकीर्षवः ४४
स समीपस्थितो राज्ञस्तामवस्थामजाज्ञिवान् ।
वाग्भिः परमतुष्टाभिरभिष्टोतुं प्रचक्रमे ४५
ततः सूतो यथापूर्वं पार्थिवस्य निवेशने ।
सुमन्त्रः प्राञ्जलिर्भूत्वा तुष्टाव जगतीपतिम् ४६
यथानन्दति तेजस्वी सागरो भास्करोदये ।
प्रीतः प्रीतेन मनसा तथा नन्दय नस्ततः ४७
इन्द्रमस्यां तु वेलायामभितुष्टाव मातलिः ।
सोऽजयद्दानवान्सर्वांस्तथा त्वां बोधयाम्यहम् ४८
वेदाः सहाङ्गा विद्याश्च यथा ह्यात्मभुवं प्रभुम् ।
ब्रह्माणं बोधयन्त्यद्य तथा त्वां बोधयाम्यहम् ४९
आदित्यः सह चन्द्रेण यथाभूतधरां शुभाम् ।
बोधयत्यद्य पृथिवीं तथा त्वां बोधयाम्यहम् ५०

कधींही कोणी आडकाठी करूं नये," असें राजाने पूर्वींच सांगून ठेविलें असल्यामुळे राजाचें प्रिय करण्याची इच्छा करणारे व राजाला संमत असलेले द्वारपाल त्याला आडकाठी करण्यास समर्थ झाले नाहीत. आंत प्रविष्ट झाल्यावर तो सुमंत्र राजाचे समीप उभा राहिला; परंतु कैकेयीने करून टाकिलेली ती राजाची अवस्था समजण्यांत न आल्यामुळे अत्यंत स्तुतिपरिपूर्ण शब्दांनी तो त्याची प्रशंसा करूं लागला. ( ४३-४५ )

सारांश, राजा जेथे बसला होता, त्या स्थानामध्ये गेलेला तो सारथी सुमंत्र हात जोडून पूर्वींप्रमाणे पृथ्वीपति दशरथाची स्तुति करूं लागला. तो म्हणाला, " सूर्योदय झाला असतां त्याच्या तेजाने युक्त झालेला समुद्र ज्याप्रमाणे स्नानास आलेल्या पुरुषांना आनंदित करितो, त्याप्रमाणे आपण स्वतः संतुष्ट होऊन प्रसन्न अंतःकरणाने आम्हांला आनंदित करा. या सूर्योदयाचे वेळीं मातलीने इंद्राची स्तुति केली असतां, त्या इंद्राने सर्व दानवांचा पराभव केला. तस्मात् ज्याप्रमाणे मातलि इंद्राला उठवितो, त्याप्रमाणे मी तुला उठवीत आहें. सांग वेद व मीमांसा ज्याप्रमाणे स्वयंभु प्रभु ब्रह्मदेवाला सृष्टि करण्याविषयी जागृत करतात त्याप्रमाणे

उत्तिष्ठ सुमहाराज कृतकौतुकमङ्गलः ।
विराजमानो वपुषा मेरोरिव दिवाकरः ५१
उदतिष्ठत रामस्य समग्रमभिषेचनम् ।
पौरजानपदाश्चापि नैगमश्च कृताञ्जलिः ५२
अयं वासिष्ठो भगवान्ब्राह्मणैः सह तिष्ठति ।
क्षिप्रमाज्ञाप्यतां राजन्राघवस्याभिषेचनम् ५३
यथा ह्यपालाः पशवो यथा सेना ह्यनायका ।
यथा चन्द्रं विना रात्रिर्यथा गावो विना वृषम् ५४
एवं हि भविता राष्ट्रं यत्र राजा न दृश्यते ।
एवं तस्य वचः श्रुत्वा सान्त्वपूर्वमिवार्थवत् ५५
अभ्यकीर्यत शोकेन भूय एव महीपतिः ।
ततस्तु राजा तं सूतं सन्नहर्षः सुतं प्रति ५६
शोकरक्तेक्षणः श्रीमानुद्वीक्ष्योवाच धार्मिकः ।

मी तुला जागृत करितों. आदित्य व चंद्र भूतधरा पृथ्वीला अर्थात् पृथ्वीवरच्या सर्व लोकांना जागृत करितात, त्याप्रमाणे मी तुला जागृत करितों. (४६–५०)

हे महाराज, अभिषेकोत्सवसंबंधी मंगल कृत्य करून नाना प्रकारचीं वस्त्रें व अलंकार धारण करा व मेरुपर्वतावर उदय पावलेल्या सूर्याप्रमाणे लोकांना आनंदित करा. रामचंद्राच्या अभिषेकाचें सर्व साहित्य तयार आहे व त्याकरिता पुरांतले व देशांतले लोक आणि शेटसावकारही हात जोडून उभे आहेत. हे भगवान् वसिष्ठमुनि ब्राह्मणांसहवर्तमान येऊन उभे राहिले आहेत. हे राजन्, रामास अभिषेक करण्याविषयी सत्वर अनुज्ञा व्हावी. ज्याप्रमाणे रक्षकावाचून पशु, सेनाधिपतीवाचून सेना, चंद्रावाचून रात्रि व वृषभावाचून गाई शोभत नाहीत, त्याप्रमाणे राजावाचून राज्य शोभत नाही. करिता आपण उठावें" याप्रमाणे सुमंत्राचें सांत्वनपूर्वक आणि आश्चर्ययुक्त असें भाषण ऐकून, राजा पुनरपि शोकाने व्याप्त झाला. ( ५१–५५ )

नंतर पुत्रासंबन्धांत ज्याचा उत्साह नष्ट झाला आहे व शोकाने ज्याचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत, असा तो धार्मिक राजा त्या सुमंत्राला म्हणाला, "हे

वाक्यैस्तु खलु मर्माणि मम भूयो निकृन्तसि ५७
सुमन्त्रः करुणं श्रुत्वा दृष्ट्वा दीनं च पार्थिवम् ।
प्रगृहीताञ्जलिः किञ्चित्तस्माद्देशादपाक्रमत् ५८
यदा वक्तुं स्वयं दैन्यान्न शशाक महीपतिः ।
तदा सुमन्त्रं मन्त्रज्ञा कैकेयी प्रत्युवाच ह ५९
सुमन्त्र राजा रजनीं रामहर्षसमुत्सुकः ।
प्रजागरपरिश्रान्तो निद्रावशमुपागतः ६०
तद्गच्छ त्वरितं सूत राजपुत्रं यशस्विनम् ।
राममानय भद्रं ते नात्र कार्या विचारिणा ६१
अश्रुत्वा राजवचनं कथं गच्छामि भामिनि ।
तच्छ्रुत्वा मन्त्रिणो वाक्यं राजा मन्त्रिणमब्रवीत् ६२
सुमन्त्र रामं द्रक्ष्यामि शीघ्रमानय सुन्दरम् ।
स मन्यमानः कल्याणं हृदयेन ननन्द च ६३

सुमंत्रा, तूं आपल्या भाषणाने पुनरपि माझें मर्मोद्घाटन कां करीत आहेस ? " हें त्या दीन झालेल्या राजाचें, हृदयाला द्रव येण्यासारखें भाषण श्रवण केल्यावर सुमंत्राने हात जोडिले व तो तेथून बाजूला सरला. तेव्हा स्वप्रतिज्ञापालनरूप संकटांत सापडल्याकारणाने दीन झाल्यामुळे राजाच्या मुखांतून कांहीच शब्द निघत नाही, असें पाहून कैकेयी आपण होऊन बोलूं लागली. ती म्हणाली " हे सुमंत्रा, रामाला राज्याभिषेक होणार, याचा हर्ष झल्यामुळे राजाचा रात्रभर डोळा लागला नाही व त्यामुळे हल्ली तो निद्रावश झाला आहे, करिता, हे सूता, तुझें कल्याण असो. तूं यशस्वी राजपुत्र रामचंद्राला कांही विचार न करितां सत्वर घेऊन ये. ( ५६-६१ )

हे ऐकून सुमंत्र म्हणाला, " हे कैकेयी, राजाज्ञा झाल्यावाचून रामचंद्राला आणण्याकरिता मी कसा बरें जाऊं ? " याप्रमाणे सुमंत्राचें वचन श्रवण करतां क्षणीं दशरथराजा मंत्र्याला म्हणाला, " हे सुमंत्रा, मी सुंदर अशा रामाला अवलोकन करण्याची इच्छा करितों. यास्तव त्यास तूं सत्वर घेऊन ये. " असें राजाने सांगितलें असतां, राजा कदाचित् रामदर्शनाने संतुष्ट होऊन रामाला राज्याभिषेक

निर्जगाम च स प्रीत्या त्वरितो राजशासनात् ।
सुमन्त्रश्चिन्तयामास त्वरितं चोदितस्तया　६४
व्यक्तरामाभिषेकार्थं इहायस्यति धर्मराट् ।
इति सूतो मतिं कृत्वा हर्षेण महता पुनः　६५
निर्जगाम महातेजा राघवस्य दिदृक्षया ।
सागरह्रदसंकाशात्सुमन्त्रोऽन्तःपुराच्छुभात्　६६
ततः पुरस्तात्सहसा विनिःसृतो महीपतेर्द्वारगतान्विलोकयन् ।
ददर्श पौरान्विविधान्महाधनानुपस्थितान्द्वारमुपेत्य विष्ठितान् ६७

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चतुर्दशः सर्गः ॥ १४ ॥

[ ६७१ ]

पञ्चदशः सर्गः ।

ते तु तां रजनीमुष्य ब्राह्मणा वेदपारगाः ।
उपतस्थुरुपस्थानं सह राजपुरोहिताः　१

---

करील, असें वाटून सुमंत्र मनामध्ये आनंदित झाला व तो राजाच्या आज्ञेवरून मोठ्या प्रेमानें निघाला असतां कैकेयी त्यास म्हणाली, " हे सुमंत्रा, रामाला लवकर घेऊन ये. " ( ६२-६४ )

याप्रमाणे पुनरपि कैकेयीचें भाषण श्रवण केल्यावर सुमंत्र मनामध्ये विचार करूं लागला की, कैकेयीची ही त्वरा रामाला अभिषेक करण्याकरिताच असावी काय ? हा धर्मरक्षण करणारा दशरथराजा अगदी थकल्यासारखा दिसत आहे. याचें बाहेर येण्याचें मान दिसत नाही. असा विचार करून तो महातेजस्वी सुमंत्र रामचन्द्राची भेट घेण्याकरता समुद्राच्या डोहाप्रमाणे शोभणाऱ्या अंतःपुरांतून बाहेर पडला. तदनंतर पृथ्वीपति दशरथराजाच्या अंतःपुरांतून बाहेर पडतांच देवडीवर प्राप्त झालेले पौर व मोठमोठाले श्रीमान् लोक सुमंत्रानें अवलोकन केले. ( ६५-६७ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी चवदावा सर्ग समाप्त झाला. ॥ १४ ॥

राजाच्या पूर्वीच्या आज्ञेवरून उपाध्यायांसह ते वेदपारंगत ब्राह्मण ती रात्र

अमात्या बलमुख्याश्च मुख्या ये निगमस्य च ।
राघवस्याभिषेकार्थे प्रीयमाणाः सुसंगताः २
उदिते विमले सूर्ये पुष्ये चाभ्यागतेऽहनि ।
लग्ने कर्कटके प्राप्ते जन्म रामस्य च स्थिते ३
अभिषेकाय रामस्य द्विजेन्द्रैरुपकल्पितम् ।
काञ्चना जलकुम्भाश्च भद्रपीठं स्वलंकृतम् ४
रथश्च सम्यगास्तीर्णो भास्वता व्याघ्रचर्मणा ।
गङ्गायमुनयोः पुण्यात्संगमादाहृतं जलम् ५
याश्चान्याः सरितः पुण्या ह्रदाः कूपाः सरांसि च ।
प्राग्वाहाश्चोर्ध्ववाहाश्च तिर्यग्वाहाश्च क्षीरिणः ६
ताभ्यश्चैवाहृतं तोयं समुद्रेभ्यश्च सर्वशः ।
क्षौद्रं दधि घृतं लाजा दर्भाः सुमनसः पयः ७
अष्टौ च कन्या रुचिरा मत्तश्च वरवारणः ।
सजलाः क्षीरिभिश्छन्ना घटाः काञ्चनराजताः ८

---

गेल्यानंतर प्रातःकालीं राजद्वारांत आले. प्रधानमण्डळी, सैन्यांतील अधिकारी आणि व्यापारीवर्गातील मुख्य मुख्य लोक रामाच्या अभिषेकाकरिता प्रेमाने एकत्र झाले. स्पष्ट सूर्याचा उदय झाला असता, त्या वेळेस पुष्यनक्षत्र असतां आणि रामाच्या जन्मकालीं असणारें कर्कलग्न प्राप्त झालें असतां ब्राह्मणांनी रामाच्या अभिषेकाकरिता सर्व तयारी केली, ती अशी- सुवर्णाचे कुंभ जलाने भरून ठेविले; सिंहासन अलंकृत केलें; रथावर सुशोभित व्याघ्रचर्म घातलें. पुण्यकारक अशा गंगायमुनेच्या संगमांतून उदक आणून ठेविलें व पूर्वेकडे वाहणाऱ्या, पर्वत वगैरे आड आल्यामुळे ऊर्ध्व व वाकड्या वाहणाऱ्या, पुष्कळ पाण्याने भरून चाललेल्या अशा ज्या नद्या आहेत, त्या नद्यांपासून आणि सर्व समुद्रांपासून उदक आणून ठेविलें. मध, दही, तूप, लाह्या, दर्भ, फुलें आणि दूध हेही पदार्थ आणून ठेविले. ( १–७ )

आठ रूपवती कन्या आणिल्या व मदोन्मत्त असा हत्ती आणून उभा केला. उदकाने भरलेले व ज्या वृक्षांना चीक येतो, त्या वृक्षांच्या पल्लवाने आच्छादिलेले

पद्मोत्पलयुता भान्ति पूर्णाः परमवारिणा।
चन्द्रांशुविकचप्रख्यं पाण्डुरं रत्नभूषितम् ९
सज्जं तिष्ठति रामस्य वालव्यजनमुत्तमम्।
चन्द्रमण्डलसंकाशमातपत्रं च पाण्डुरम् १०
सज्जं द्युतिकरं श्रीमदभिषेकपुरःसरम्।
पाण्डुरश्च वृषः सज्जः पाण्डुराश्वश्च संस्थितः ११
वादित्राणि च सर्वाणि वंदिनश्च तथा परे।
इक्ष्वाकूणां यथा राज्ये सम्भ्रियेताभिषेचनम् १२
तथा जातीयमादाय राजपुत्राभिषेचनम्।
ते राजवचनात्तत्र समवेता महीपतिम् १३
अपश्यन्तोऽब्रुवन्को नु राज्ञो नः प्रतिवेदयेत्।
न पश्यामश्च राजानमुदितश्च दिवाकरः १४
यौवराज्याभिषेकश्च सज्जो रामस्य धीमतः।
इति तेषु ब्रुवाणेषु सर्वांस्तांश्च महीपतीन् १५

असे सोन्याचे आणि रुप्याचे घट आणि सूर्यविकासी व चंद्रविकासी कमलांनी युक्त, निर्मल उदकाने भरलेले व शोभायमान असे घट ठेविले, चंद्राच्या किरणांप्रमाणे शुभ्र रत्नाने अलंकृत केलेली अशी उत्तम चौंरी रामाला वारा घालण्याकरिता तयार करून ठेविली आणि चंद्रबिंबासारिखें शोभणारें पांढरें असें छत्रही तयार करून ठेविलें. ( ८-१० )

याप्रमाणे रामाला अभिषेक करण्याच्या उपयोगी पडणारें मुख्य मुख्य साहित्य तयार केलें. शिवाय पांढरा बैल आणि पांढरा घोडाही तयार करून ठेविला. सर्व प्रकारचीं वाद्यें तयार ठेविलीं आणि भाट उभे केले. ज्याप्रमाणे इक्ष्वाकुकुलोत्पन्न पुरुषांना राज्याभिषेक करितेवेळीं जसें साहित्य पाहिजे, त्याप्रमाणे तसें रामाला अभिषेक करण्याकरिता सर्व साहित्य तयार केलें. राजाच्या आज्ञेवरून जुळलेले ते सर्व लोक त्या ठिकाणीं राजा न दिसल्यामुळे आपआपसांत बोलूं लागले की, “ येथे आम्ही आलों आहोंत, हें राजाला कोण कळवील? सूर्याचा उदय तर झाला आणि राजा तर येथे दिसत नाही. बुद्धिमान् अशा रामाला यौवराज्याभिषेक

अब्रवीत्तानिदं वाक्यं सुमन्त्रो राजसत्कृतः ।
रामं राज्ञो नियोगेन त्वरया प्रस्थितो ह्यहम् १६
पूज्या राज्ञो भवन्तश्च रामस्य तु विशेषतः ।
अयं पृच्छामि वचनात्सुखमायुष्मतामहम् १७
राज्ञः संप्रतिबुद्धस्य चानागमनकारणम् ।
इत्युक्त्वान्तः पुरद्वारमाजगाम पुराणवित् १८
सदा सक्तं च तद्वेश्म सुमन्त्रः प्रविवेश ह ।
तुष्टावास्य तदा वंशं प्रविश्य स विशाम्पतेः १९
शयनीयं नरेन्द्रस्य तदासाद्य व्यतिष्ठत ।
सोऽत्यासाद्य तु तद्वेश्म तिरस्करणिमन्तरा २०
आशीर्भिर्गुणयुक्ताभिरभितुष्टाव राघवम् ।
सोमसूर्यौ च काकुत्स्थ शिववैश्रवणावपि २१
वरुणश्चाग्निरिन्द्रश्च विजयं प्रदिशन्तु ते ।

---

करण्याची सर्व तयारी सिद्ध आहे." असें ते लोक बोलत असतां, राजानें सत्कार केलेला सुमंत्र, तेथें जुळलेल्या सर्व राजांना असें बोलला की, "राजाच्या आज्ञेवरून हा मी त्वरेने रामाला आणण्याकरिता निघालों आहें. ( ११–१६ )

आपण सर्व दशरथराजाला पूज्य आहांत, त्याहींपेक्षा रामाला अधिक पूज्य आहांत. याकरिता आपल्या आज्ञेवरून राजाला 'आपल्याला सुखानें निद्रा लागली होती ना ? आणि जागें असून बाहेर न येण्याचें कारण काय ? असें द्वारावर वाट पहात उभे असलेले राजे व ब्राह्मण इत्यादि लोक विचारीत आहेत,' अशी राजाला विज्ञापना करितो." असें बोलून सामन्त्र राजेलोकांसंबंधांत राजदरबारांतील जुन्या चालीरीति जाणणारा असा सुमन्त अंतःपुराच्या द्वाराकडे परत गेला. ( १७–१८ )

ज्या अंतःपुरांत जाण्याकरिता त्याला कधींही परवानगी लागत नसे, त्या अंतःपुरांत त्यानें प्रवेश केला. व तेथें गेल्यावर राजाच्या वंशाची स्तुति करण्यास आरंभ केला व तेथें राजाच्या शय्यागारांत पडद्याच्या आड अगदी जवळ उभा राहिला आणि आशीर्वादपूर्वक व गुणवर्णनपर अशी त्याची स्तुति करूं लागला.

गता भगवती रात्रिरहः शिवमुपस्थितम् २२
बुद्ध्यस्व राजशार्दूल कुरु कार्यमनन्तरम् ।
ब्राह्मणा बलमुख्याश्च नैगमाश्चागतास्त्विह २३
दर्शनं तेऽभिकाङ्क्षन्ते प्रतिबुद्ध्यस्व राघव ।
स्तुवन्तं तं तदा सूतं सुमन्त्रं मन्त्रकोविदम् २४
प्रतिबुद्ध्य ततो राजा इदं वचनमब्रवीत् ।
राममानय सूतेति यदस्यभिहितो मया २५
किमिदं कारणं येन ममाज्ञा प्रतिवाह्यते ।
न चैव संप्रसुप्तोऽहमानयेहाशु राघवम् २६
इति राजा दशरथः सूतं तत्रान्वशात्पुनः ।
स राजवचनं श्रुत्वा शिरसा प्रतिपूज्य तम् २७
निर्जगाम नृपावासान्मन्यमानः प्रियं महत् ।

" हे ककुत्स्थकुलोत्पन्न राजा, चंद्र आणि सूर्य, शंकर आणि कुबेर, वरुण, अग्नि आणि इंद्र हे तुला विजय देवोत. ऐश्वर्याने शोभणारी अशी रात्र संपली व शुभकारक दिवसालाही आरंभ झाला. ( १८–२२ )

तरी, हे राजश्रेष्ठा, जागा हो व कर्तव्यकर्म करण्यास आरंभ कर. ब्राह्मण, सेनाधिपति आणि पौरजन हे सर्व येथे आले आहेत व हे राघवा, ते तुला भेटण्याची इच्छा करीत आहेत. तरी तूं जागा हो." हें बोलणें ऐकतांक्षणीं राजा, सुमंत्र जरी पडद्याच्या आड होता, तरी त्याच्या शब्दावरून त्यास ओळखून स्तुति करणाऱ्या आणि मसलतीमध्ये निपुण असलेल्या सुमंत्र सारथ्याला, असें बोलला की, " हे सुमंत्रा, मी तुला रामाला आणण्याविषयीं सांगितलें असतां पुन्हा माघारा येण्याचें कारण काय ? माझी आज्ञा पालन न करण्याचें कारण काय ? मी कांही झोपलेलों नाहीं. असो. आता लवकर रामाला इकडे घेऊन ये." ( २३–२६ )

याप्रमाणे दशरथराजाने रामाला आणण्याविषयी पुन्हा सूताला आज्ञा केली असतां त्या सुमंत्राने राजाचें बोलणें ऐकून राजाला मस्तक लववून नमस्कार केला आणि हें आपणांला अत्यंत प्रिय तेंच काम मिळालें आहे, असें मानून राज-

प्रपन्नो राजमार्गं च पताकाध्वजशोभितम् २८
हृष्टः प्रमुदितः सूतो जगामाशु विलोकयन् ।
स सूतस्तत्र शुश्राव रामाधिकरणाः कथाः २९
अभिषेचनसंयुक्ताः सर्वलोकस्य हृष्टवत् ।
ततो ददर्श रुचिरं कैलाससदृशप्रभम् ३०
रामवेश्म सुमन्त्रस्तु शक्रवेश्मसमप्रभम् ।
महाकपाटपिहितं वितर्दिशतशोभितम् ३१
काञ्चनप्रतिमैकाग्रं मणिविद्रुमतोरणम् ।
शारदाभ्रघनप्रख्यं दीप्तं मेरुगुहासमम् ३२
मणिभिर्वरमाल्यानां सुमहद्भिरलंकृतम् ।
मुक्तामणिभिराकीर्णं चन्दनागुरुभूषितम् ३३
गन्धान्मनोज्ञान्विसृजद्दार्दुरं शिखरं यथा ।
सारसैश्च मयूरैश्च विनदद्भिर्विराजितम् ३४

गृहांतून बाहेर पडला आणि ध्वज व पताका यांनी सुशोभित अशा राजमार्गावर प्राप्त झाला. नंतर सर्वांगावर रोमांच उभारिलेले आहेत, असा आनंदित झालेला सुमंत्र मार्गातील शोभा पहात पहात लवकर चालला असतां, त्या ठिकाणीं सुमंत्राने, हर्षोद्रेकाने फुललेल्या त्या सर्व लोकांचा रामाच्या अभिषेकसंबंधी चाललेल्या कथा ऐकल्या. पुढे सुमंत्र सुंदर कैलास पर्वताप्रमाणे व इंद्रगृहाप्रमाणें शोभणारें, ज्यास मोठमोठालीं कपाटे आहेत, ज्यामध्ये शेकडो ओटे आहेत, ज्याचीं शिखरें सुवर्णाच्या प्रतिमांनी सुशोभित केलीं आहेत, ज्याच्या दरवाज्यावर रत्नांचें व पोवळयांचें काम केलेलें आहे, जें शरद्कालच्या मेघाप्रमाणे दिसणारें, मेरुपर्वताच्या गुहेसारिखें भासणारें, सोन्याच्या फुलांच्या माळांतून मधूनमधून घातलेल्या अत्यंत तेजस्वी अशा रत्नांनी अलंकृत केलेलें, चोहोकडे मोत्यांनी व रत्नांनी सुशोभित केलेलें आणि चंदन व अगरु यांचा सर्वत्र घमघमाट सुटला आहे, असें रामचंद्राचें गृह त्या सुमंत्राच्या दृष्टीस पडलें. ( २७-३० )

ज्यांतून उत्तम प्रकारचे सुगंध निघत आहेत, अशा सुगंधी चंदनवृक्षाला धारण करणारा मलयपर्वतच कीं काय असें शोभणारें, शब्द करणारे सारस

सुकृतेहामृगाकीर्णं सूत्कीर्णं भक्तिभिस्तथा ।
मनश्चक्षुश्च भूतानामाददत्तिग्मतेजसा ३५
चन्द्रभास्करसङ्काशं कुबेरभवनोपमम् ।
महेन्द्रधामप्रतिमं नानापक्षिसमाकुलम् ३६
मेरुशृङ्गसमं सूतो रामवेश्म ददर्श ह ।
उपस्थितैः समाकीर्णं जनैरञ्जलिकारिभिः ३७
उपादाय समाक्रान्तैस्तदा जानपदैर्जनैः ।
रामाभिषेकसुमुखैरुन्मुखैः समलंकृतम् ३८
महामेघसमप्रख्यमुदग्रं सुविराजितम् ।
नानारत्नसमाकीर्णं कुब्जकैरपि चावृतम् ३९
स वाजियुक्तेन रथेन सारथिः समाकुलं राजकुलं विराजयन् ।
वरूथिना राजगृहाभिपातिना पुरस्य सर्वस्य मनांसि हर्षयन् ४०

आणि मोर यांनी सुशोभित, स्थलविशेषीं द्वारें, भिंती व खांब यांवरून सुबक रीतीने बसविलेल्या सोन्याच्या डाळलेल्या लांडग्यांच्या प्रतिमांनी व्याप्त असलेलें व अत्यन्त नाजुक अशा, लाकडावरील खोदीव कामांनी सर्वत्र शोभिवन्त केलेलें आणि प्रतिबिंबित झालेल्या सूर्यकिरणांनी अत्यन्त तेजस्वी दिसूं लागल्याकारणाने सर्व लोकांच्या मनाला व नेत्राला हरण करणारें, चंद्र आणि सूर्य यांच्यासारिखें भासणारें, कुबेराच्या अथवा महाप्रतापी इंद्राच्या मंदिराप्रमाणे दिसणारें, अनेक पक्ष्यांनी व्याप्त अशा मेरूच्या शिखराप्रमाणे भव्य आणि तेथे एकत्र झालेल्या व हात जोडून उभ्या असलेल्या अशा लोकांनी व्याप्त असलेलें, रामाच्या अभिषेकाविषयीं उत्सुक अशा नजराणे घेऊन आलेल्या देशांतल्या लोकांनी भूषित केलेलें असें मोठ्या मेघाशीं तुल्य व प्रशस्त असणारें, अत्यंत सुशोभित असणाऱ्या अनेक रत्नांनी व्याप्त असें व दासवगैरे लोकांनी गजबजून गेलेलें असें रामाचें घर बघता झाला. ( ३१-३९ )

तो सुमंत्र, ज्यास घोडे लाविले आहेत व ज्याचे भोवती रक्षकगण चालत आहेत, अशा रथावर आरूढ होऊन, ज्या ठिकाणीं अति गर्दी आहे, अशा मार्गाला सुशोभित करीत करीत व नगरांतल्या सर्व लोकांना आनंद देत देत, रामाच्या

ततः समासाद्य महाधनं महत्प्रहृष्टरोमा स बभूव सारथिः।
मृगैर्मयूरैश्च समाकुलोल्बणं गृहं वरार्हस्य शचीपतेरिव ४१
स तत्र कैलासनिभाः स्वलंकृताः प्रविश्य कक्ष्यास्त्रिदशालयोपमाः।
प्रियान्वरान्राममते स्थितान्बहून्व्यपोह्य शुद्धान्तमुपस्थितो रथी ४२
स तत्र शुश्राव च हर्षयुक्ता रामाभिषेकार्थकृताञ्जनानाम्।
नरेन्द्रसूनोरभिमङ्गलार्थाः सर्वस्य लोकस्य गिरः प्रहृष्टाः ४३
महेन्द्रसद्मप्रतिमं च वेश्म रामस्य रम्यं मृगपक्षिजुष्टम्।
ददर्श मेरोरिव शृङ्गमुच्चं विभ्राजमानं प्रभया सुमन्त्रः ४४
उपस्थितैरञ्जलिकारिभिश्च सोपायनैर्जानपदैर्जनैश्च।
कोट्या परार्धैश्च विमुक्तयानैः समाकुलं द्वारपदं ददर्श ४५
ततो महामेघमहीधराभं प्रभिन्नमत्यङ्कुशमत्यसह्यम्।

गृहाकडे चालला असतां, तो सारथी ज्यामध्ये मोर व हरिण चोहोकडे संचार करीत आहेत अशा व अनेक मौल्यवान् वस्तूंचा संग्रह असलेल्या अशा इंद्राच्या गृहाप्रमाणे शोभणाऱ्या व सर्व श्रेष्ठ वस्तूंचा उपभोग घेण्याला योग्य अशा रामाच्या समृद्ध गृहाला जाऊन आनंदित झाला व त्यामुळे पोहोचल्याबरोबर त्याच्या रोमांच अंगावर उभे राहिले. नंतर तो सुमंत्र, त्या गृहांतील कैलासपर्वतासारखे शोभणारे आणि अलंकारांनी सुशोभित केलेले असे कांही चौक ओलांडून रामाच्या आज्ञेमध्ये वागणारे, रामाला अत्यंत प्रिय व श्रेष्ठ अशा बहुत द्वारपालांचें उल्लंघन करून, रथासह अन्तःपुरासमीप येऊन उभा राहिला असतां, त्याने त्या ठिकाणीं रामाच्या अभिषेकाकरिता खटपट करणाऱ्या लोकांच्या, ज्यांत रामाच्या कल्याणाचाच अर्थ आहे अशा, गोष्टी आणि इतरही तेथे जुळलेल्या लोकांच्या आनन्दाच्या भरांत चालेल्या गोष्टी ऐकल्या. इन्द्राच्या गृहाप्रमाणे शोभणारें, मृग आणि पक्षी हे ज्या ठिकाणीं संचार करितात असें, मेरुपर्वताच्या शिखरासारखे उंच, तेजाने अत्यंत शुशोभित दिसणारें व रमणीय असें रामाचें गृह त्याने पाहिले आणि नजराणे घेऊन येऊन, आपलीं रथवगैरे वाहनें एका बाजूस ठेऊन. हात जोडून उभे राहिलेल्या कोट्यवधि देशांतल्या लोकांनी भरून गेला आहे, असा दरवाज्यापुढचा चौक त्याच्या दृष्टीस पडला. ( ४०–४५ )

रामोपवाह्यं रुचिरं ददर्श शत्रुंजयं नागमुदग्रकायम् ४६
स्वलङ्कृतान्साश्वरथान्सकुञ्जरानमात्यमुख्यांश्च ददर्श वल्लभान् ।
व्यपोह्य सूतः सहितान्समन्ततः समृद्धमन्तःपुरमाविवेश ह ४७
ततोऽद्रिकूटाचलमेघसन्निभं महाविमानोपमवेश्मसंयुतम् ।
अवार्यमाणः प्रविवेश सारथिः प्रभूतरत्नं मकरो यथाऽर्णवम् ॥४८॥

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चदशः सर्गः ॥१५॥[७१९]

षोडशः सर्गः ।

स तदन्तःपुरद्वारं समतीत्य जनाकुलम् ।
प्रविविक्तां ततः कक्ष्यामाससाद पुराणवित् १
प्रासकार्मुकबिभ्रद्भिर्युवाभिर्मृष्टकुण्डलैः ।
अप्रमादिभिरेकाग्रैः स्वानुरक्तैरधिष्ठिताम् २

नंतर मोठमोठाले मेघ ज्या पर्वतावर उतरले आहेत अशा पर्वताप्रमाणे दिसदिसणारा, उन्मत्त झालेला, महाताला अंकुशानेही आवरण्यास कठिण व स्वतः रामाच्या स्वारीचा आणि ज्याचा देह फार मोठा आहे, असा शत्रुंजय नामक सुंदर हत्ती त्याला दिसला. सुमंत्र सारथि उत्तम उत्तम अलंकारांनी युक्त असे अश्व, गज व रथ यांवर आरूढ झालेले असे मुख्य मुख्य प्रधान व राज्याच्या प्रीतींतले दुसरे लोक यांना मार्गांतून एका बाजूस करून आंत गेल्यावर, तो पर्वताच्या शिखरावर स्थिर असणाऱ्या मेघासारख्या दिसणाऱ्या व मोठमोठाल्या विमानासारिख्या गृहांनी युक्त असलेल्या, अशा रामाच्या खास अंतःपुरांत, ज्याप्रमाणे मकर पुष्कळ रत्नांनी भरलेल्या समुद्रांत प्रवेश करतो, त्याप्रमाणे कोठेही आडकाठी न होतां प्रविष्ट झाला. ( ४६-४८ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी पंधरावा सर्ग समाप्त झाला ॥ १५ ॥

तो जुना माहितगार सारथि लोकांची गर्दी झालेलें अंतःपुराचें द्वार ओलांडून जेथे गर्दी नाही अशा चौकामध्ये गेला. त्या चौकामध्ये भाले व धनुष्यें यांनी सज्ज असलेले, उज्ज्वल कुंडलें धारण केलेले, एकाग्र अंतःकरण करून रक्षणाविषयी दक्ष

अत्र काषायिणो वृद्धान्वेत्रपाणीन्स्वलङ्कृतान् ।
ददर्श विष्ठितान्द्वारि स्त्र्यध्यक्षान्सुसमाहितान् ३
ते समीक्ष्य समायान्तं रामप्रियचिकीर्षवः ।
सहसोत्पतिताः सर्वे ह्यासनेभ्यः ससम्भ्रमाः ४
तानुवाच विनीतात्मा सूतपुत्रः प्रदक्षिणः ।
क्षिप्रमाख्यात रामाय सुमन्त्रो द्वारि तिष्ठति ५
ते राममुपसंगम्य भर्तुः प्रियचिकीर्षवः ।
सहभार्याय रामाय क्षिप्रमेवाचचक्षिरे ६
प्रतिवेदितमाज्ञाय सूतमभ्यन्तरं पितुः ।
तत्रैवानाययामास राघवः प्रियकाम्यया ७
तं वैश्रवणसंकाशमुपविष्टं स्वलङ्कृतम् ।
ददर्श सूतः पर्यंके सौवर्णे सोत्तरच्छदे ८
वराहरुधिराभेण शुचिना च सुगन्धिना ।
अनुलिप्तं परार्ध्येन चन्दनेन परन्तपम् ९

---

असलेले आणि राजाविषयी अन्तःकरणापासून भक्ति असलेले तरुण लोक होते. या ठिकाणीं काषायवस्त्र परिधान करून व उत्तम प्रकारचे अलंकार धारण करून हातांमध्ये राजवेत्र घेतलेले वृद्ध लोक मोठ्या दक्षतेने स्त्रियांवर देखरेख करण्याकरिता ठेवलेले त्या सारथ्याने द्वारामध्ये अवलोकन केले. रामाचें प्रिय करण्याची इच्छा धरणाऱ्या त्या लोकांनी त्या सारथ्याला येतांना पाहिलें आणि पाहिल्याबरोबर ते सर्व लगबगीने आपआपल्या स्थानापासून उठून उभे राहिले. (१–४)

तेव्हा अतिशयच सरळ रीतीने वागणारा तो नम्र सारथी " सुमंत्र दारामध्ये उभा आहे, हें सत्वर रामाला सांगा, " म्हणून त्यांना म्हणाला असतां, स्वामीचें प्रिय करणारे ते वेत्रधर रामाकडे गेले आणि भार्येसहवर्तमान असलेल्या रामाला त्यांनी तें वृत्त सत्वरच निवेदन केलें. तेव्हा पित्याच्या अतरंगांतील सारथी आला आहे, असें समजतांक्षणीं पित्याचें प्रिय करण्याची इच्छा धरून रघुवंशज रामाने त्याला तेथेच आणविलें. तेथे गेल्यावर कुबेराप्रमाणे उत्तम प्रकारचे अलंकार धारण करून मच्छरदाणीने युक्त असलेल्या सुवर्णमंचकावर बसलेल्या रामाला त्या

स्थितया पार्श्वतश्चापि वालव्यजनहस्तया ।
उपेतं सीतया भूयश्चित्रया शशिनं यथा  १०
तं तपन्तमिवादित्यमुपपन्नं स्वतेजसा ।
ववन्दे वरदं बन्दी विनयज्ञो विनीतवत्  ११
प्राञ्जलिः सुमुखं दृष्ट्वा विहारशयनासने ।
राजपुत्रमुवाचेदं सुमन्त्रो राजसत्कृतः  १२
कौसल्या सुप्रजा राम पिता त्वां द्रष्टुमिच्छति ।
महिष्यापि हि कैकेय्या गम्यतां तत्र मा चिरम्  १३
एवमुक्तस्तु संहृष्टो नरसिंहो महाद्युतिः ।
ततः संमानयामास सीतामिदमुवाच ह  १४
देवि देवश्च देवी च समागम्य मदन्तरे ।
मन्त्रयेते ध्रुवं किञ्चिदाभिषेचनसंहितम्  १५

सारथ्याने अवलोकन केलें. वराहाच्या रक्ताप्रमाणे लाल शुचि आणि सुगंधी अशा उत्कृष्ट चंदनाची त्या शत्रुदमन रामाला उटी लाविलेली होती आणि हातामध्ये पंखा घेऊन सीता समीपच उभी असल्यामुळे चित्रासंज्ञक तारेने युक्त असलेल्या चंद्राप्रमाणे तो फारच शोभत होता. ( ५--१० )

स्वतःच्या तेजाने युक्त असल्यामुळे सूर्याप्रमाणे प्रकाशत असलेल्या वरप्रद रामाला, विनयज्ञ व विनयशील सुमंत्राने वंदन केलें आणि विहार, शयन, आसन वगैरे विषयीं राजा ज्याचा मान राखीत आला आहे, असा तो सुमंत्र सारथी हात जोडून व प्रसन्नमुख असलेल्या राजपुत्राला अवलोकन करून म्हणाला, " हे रामा, तुझ्यामुळे कौसल्या सुपुत्रवती झाली आहे. आता राणी कैकेयीसहवर्तमान तुझा पिता तुझी भेट घेण्याची इच्छा करीत आहे. यास्तव, विलंब न करितां तिकडे चलावें. " याप्रमाणे महातेजस्वी पुरुषश्रेष्ठ रामाला सारथ्याने सांगितलें असतां, त्याने आनंदाने सुमंत्राच्या सांगण्याला मान दिला आणि तो सीतेला म्हणाला. ( ११--१४ )

हे देवी, राजा आणि राजपत्नी कैकेयी माझ्याकरिता एक ठिकाणीं जुळून निःसंशय अभिषेकासंबंधानेच कांही विचार करीत आहेत, वर्तनाने अतिशय सरळ

लक्षयित्वा ह्यभिप्रायं प्रियकामा सुदक्षिणा ।
संचोदयति राजानं मदर्थमसितेक्षणा १६
सा प्रहृष्टा महाराजं हितकामानुवर्तिनी ।
जननी चार्थकामा मे केकयाधिपतेः सुता १७
दिष्ट्या खलु महाराजो महिष्या प्रियया सह ।
सुमन्त्रं प्राहिणोद् दूतमर्थकामकरं मम १८
यादृशी परिषत्तत्र तादृशो दूत आगतः ।
ध्रुवमद्यैव मां राजा यौवराज्येऽभिषेक्ष्यति १९
हन्त शीघ्रमितो गत्वा द्रक्ष्यामि च महीपतिम् ।
सह त्वं परिवारेण सुखमास्व रमस्व च २०
पतिसंमानिता सीता भर्तारमसितेक्षणा ।
आ द्वारमनुवव्राज मङ्गलान्यभिदध्युषी २१
राज्यं द्विजातिभिर्जुष्टं राजसूयाभिषेचनम् ।
कर्तुमर्हति ते राजा वासवस्येव लोककृत् २२

आणि राजाचें प्रिय करण्याविषयी तत्पर असलेली ती कृष्णनयना कैकेयी राजाचा अभिप्राय जाणून, माझ्या हितार्थ त्याला कांहीतरी सांगत आहे. ती माझें हित इच्छिणारी व महाराजाच्या इच्छेनुरूप वागणारी अशी माझी माता, केकय राजाची कन्या, आनंदित होऊन माझ्या हिताचें कांहीतरी सांगत आहे. खरोखर आपल्या प्रिय पत्नीसहवर्तमान महाराजाने माझा उद्देश व इच्छा सिद्धीस नेणारा सुमंत्र दूत पाठवून दिला, ही फार चांगली गोष्ट झाली. ज्या प्रकारची त्या ठिकाणीं सभा आहे, त्याच प्रकारचा दूत येथे आला आहे. यावरून राजा मला आजच यौवराज्याचा अभिषेक करणार, हें निश्चित आहे. करिता मी आता येथून जाऊन भूपतीची भेट घेतों. तूं आपल्या सखीजनांसहवर्तमान आनन्दांत कालक्षेप कर ( १५–२० ).

याप्रमाणे भर्त्याने सन्मान केला असतां भर्त्याचें अभीष्ट चिंतन करणारी कृष्णनयना सीता द्वारापर्यंत त्याचे मागोमाग त्यास पोहोचवावयास गेली आणि म्हणाली, "इंद्राला अभिषेक करणाऱ्या ब्रह्मदेवाप्रमाणे राजाने राजसूय यागाविषयी आपणांकडून दीक्षा घेवविणें योग्य होईल; कारण राज्यामध्ये असंख्य

दीक्षितं व्रतसम्पन्नं वराजिनधरं शुचिम् ।
कुरङ्गशृङ्गपाणिं च पश्यन्ती त्वां भजाम्यहम् २३
पूर्वां दिशं वज्रधरो दक्षिणां पातु ते यमः ।
वरुणः पश्चिमामाशां धनेशस्तूत्तरां दिशम् २४
अथ सीतामनुज्ञाप्य कृतकौतुकमङ्गलः ।
निश्चक्राम सुमन्त्रेण सह रामो निवेशनात् २५
पर्वतादिव निष्क्रम्य सिंहो गिरिगुहाशयः ।
लक्ष्मणं द्वारि सोऽपश्यत्प्रह्वाञ्जलिपुटं स्थितम् २६
अथ मध्यमकक्ष्यायां समागच्छत्सुहृज्जनैः ।
स सर्वानर्थिनो दृष्ट्वा समेत्य प्रतिनन्द्य च २७
ततः पावकसंकाशमारुरोह रथोत्तमम् ।
वैयाघ्रं पुरुषव्याघ्रो राजितं राजनन्दनः २८

ब्राह्मण आनन्दांत वास्तव्य करीत आहेत. यास्तव उत्कृष्ट अजिन धारण करून व मृगशृंग हातांत घेऊन व्रतस्थ, शुचिर्भूत व दीक्षा घेतलेल्या आपणांला अवलोकन करीत असतांना मी आपली सेवा करीन. वज्रपाणी इंद्र पूर्व दिशेस आपलें रक्षण करो, दक्षिण दिशेस यम आपलें रक्षण करो, पश्चिम दिशेस वरुण आपलें रक्षण करो आणि उत्तर दिशेस कुबेर आपलें रक्षण करो." ( २१-२४ )

याप्रमाणे सीतेचें बोलणें झाल्यावर अभिषेकोत्सवाकरिता मंगल केलेला राम सीतेला निरोप देऊन सुमंत्रासहवर्तमान घरांतून बाहेर पडला आणि गिरिकंदरामध्ये वास्तव्य करणारा सिंह ज्याप्रमाणे पर्वतांतून बाहेर निघतो, त्याप्रमाणे घरांतून निघाल्यावर त्या रामाने दारामध्ये नम्र होऊन व हात जोडून उभ्या असलेल्या लक्ष्मणाला अवलोकन केलें. तदनंतर त्या मधल्या चौकांत आल्यावर त्यानें आपल्या मित्रमंडळींची भेट घेतली आणि आपणांस राज्याभिषेक व्हावा, असें इच्छिणाऱ्या व दर्शनाच्या इच्छेने तेथे आलेल्या इतरही लोकांवर दृष्टिक्षेप करून, त्यांचाही आश्वासनपूर्वक योग्य आदर करून, अग्नीप्रमाणे तेजस्वी आणि व्याघ्रचर्मानें परिवेष्टित अशा आपल्या सुशोभित व उत्कृष्ट रथावर राजकुमार आरूढ झाला. ( २५-२८ )

मेघनादमसम्बाधं मणिहेमविभूषितम्।
मुष्णन्तमिव चक्षूंषि प्रभया मेरुवर्चसम् २९
करेणुशिशुकल्पैश्च युक्तं परमवाजिभिः।
हरियुक्तं सहस्राक्षो रथमिन्द्र इवाशुगम्॥
प्रययौ तूर्णमास्थाय राघवो ज्वलितः श्रिया ३०
स पर्जन्य इवाकाशे स्वनवानभिनादयन्।
निकेतान्निर्ययौ श्रीमान्महाभ्रादिव चन्द्रमाः ३१
चित्रचामरपाणिस्तु लक्ष्मणो राघवानुजः।
जुगोप भ्रातरं भ्राता रथमास्थाय पृष्ठतः ३२
ततो हलहलाशब्दस्तुमुलः समजायत।
तस्य निष्क्रममाणस्य जनौघस्य समन्ततः ३३
ततो हयवरा मुख्या नागाश्च गिरिसंनिभाः।
अनुजग्मुस्तथा रामं शतशोऽथ सहस्रशः ३४

त्या रथाचा ध्वनि मेघासारखा गंभीर होता. त्यामध्ये जागा विस्तीर्ण होती. रत्नांनी व सुवर्णांनी त्याला शृंगारिलें होतें आणि मेरुपर्वताप्रमाणे तेजस्वी असलेला तो आपल्या प्रभेने लोकांची दृष्टि वेधून टाकीत होता. असो. हरिसंज्ञक अश्व जोडिलेल्या रथावर आरूढ होणाऱ्या इंद्राप्रमाणे लहानसे हत्तीच कीं काय, अशा धिप्पाड असलेल्या उत्कृष्ट अश्वांनी युक्त अशा आपल्या शीघ्रगामी रथावर सत्वर आरूढ होऊन, मेघमण्डळांतून बाहेर पडणाऱ्या कान्तिमान् चन्द्राप्रमाणे राज्य-लक्ष्मीने झळकत असलेला तो रघुवंशज राम आकाशामध्ये गर्जना करणाऱ्या मेघांप्रमाणे गर्जना करणाऱ्या आपल्या रथाने भूप्रदेश नादित करीत चालला. तेव्हा रामाचा कनिष्ठ भ्राता लक्ष्मण हातामध्ये चित्रविचित्र दंडाने युक्त असलेलें चामर घेऊन, पृष्ठभागाकडून रथावर आरूढ होऊन, सूर्याच्या तापापासून भ्रात्याचें रक्षण करूं लागला असतां त्याच्यापुढे निघालेल्या जनसमुदायामध्ये प्रचंड आनंदध्वनि झाला. ( २९–३३ )

तेव्हा उत्कृष्ट अश्व व पर्वतासारिखे धिप्पाड असे मुख्य मुख्य गज शेकडो हजारो रामाच्या मागोमाग चालूं लागले व चंदन आणि अगुरु यांनी भूषित होऊन

अग्रतश्चास्य सन्नद्धाश्चन्दनागुरुभूषिताः ।
खड्गचापधराः शूरा जग्मुराशंसवो जनाः ३५
ततो वादित्रशब्दाश्च स्तुतिशब्दाश्च वन्दिनाम् ।
सिंहनादाश्च शूराणां ततः शुश्रुविरे पथि ३६
हर्म्यवातायनस्थाभिर्भूषिताभिः समन्ततः ।
कीर्यमाणः सुपुष्पौघैर्ययौ स्त्रीभिररिन्दमः ३७
रामं सर्वानवद्याङ्ग्यो रामपिप्रीषया ततः ।
वचोभिरग्र्यैर्हर्म्यस्थाः क्षितिस्थाश्च ववन्दिरे ३८
नूनं नन्दति ते माता कौसल्या मातृनन्दन ।
पश्यन्ती सिद्धयात्रं त्वां पित्र्यं राज्यमुपस्थितम् ३९
सर्वसीमन्तिनीभ्यश्च सीता सीमन्तिनीवरा ।
अमन्यन्त हि ता नार्यो रामस्य हृदयप्रियाम् ४०
तया सुचरितं देव्या पुरा नूनं महत्तपः ।
रोहिणीव शशाङ्केन रामसंयोगमाप या ४१

खड्ग व धनुष्य धारण केलेले रामाचे हितैषी शूर लोक सज्ज होऊन त्याच्यापुढे चालू लागले. तदनंतर वाद्यांचे व भाटांच्या स्तुतीचे ध्वनि आणि शूरांचे सिंहनाद मार्गामध्ये कानीं येऊं लागले आणि असा समारंभ चालला असतांना अलंकार धारण केलेल्या स्त्रिया आपआपल्या घराच्या खिडक्यांमध्ये सभोंवती उभ्या राहून, उत्कृष्ट पुष्पांच्या राशी रामावर उधळीत असतांना तो शत्रुदमन राम चालला होता. तेव्हा ज्यांच्या अवयवांमध्ये कोठेही नांव ठेवण्याला जागा नाही, अशा स्त्रिया आपआपल्या मज्यांवर उभ्या असलेल्या व खालीही उभ्या असलेल्या रामाला प्रसन्न करून घेण्याच्या उद्देशाने वंदनपूर्वक उत्कृष्ट शब्दांनी त्याची स्तुति करूं लागल्या. ( ३४-३८ )

" हे मातृप्रिय, परंपरागत चालत आलेलें राज्य तुला प्राप्त होण्याचा समय आला आहे, हें पाहून खरोखर तुझ्या कौसल्या मातेला आनंद होत असला पाहिजे. सर्व स्त्रियांपेक्षा सीता स्त्री श्रेष्ठ आहे आणि रामाला ती मनापासून प्रिय आहे, असें इतर स्त्रिया आपआपसांत बोलत होत्या. चंद्राचा समागम प्राप्त

इति प्रासादशृङ्गेषु प्रमदाभिर्नरोत्तमः ।
शुश्राव राजमार्गस्थः प्रिया वाच उदाहृताः ४२
स राघवस्तत्र तदा प्रलापाञ्शुश्राव लोकस्य समागतस्य ।
आत्माधिकारा विविधाश्च वाचः प्रहृष्टरूपस्य पुरे जनस्य ४३
एष श्रियं गच्छति राघवोऽद्य राजप्रसादाद्विपुलां गमिष्यन् ।
एते वयं सर्वसमृद्धकामा येषामयं नो भविता प्रशास्ता ४४
लाभो जनस्यास्य यदेष सर्वं प्रपत्स्यते राष्ट्रमिदं चिराय ।
न ह्यप्रियं किंचन जातु कश्चित्पश्येन्न दुःखं मनुजाधिपेऽस्मिन् ४५
सघोषवद्भिश्च हयैः सनागैः पुरःसरैः स्वस्तिकसूतमागधैः ।
महीयमानः प्रवरैश्च वादिकैरभिष्टुतो वैश्रवणो यथा ययौ ४६

होणाऱ्या रोहिणीप्रमाणे जिला रामाचा समागम प्राप्त झाला त्या सीतादेवीने खरोखर पूर्वी मोठीच तपश्चर्या केली असली पाहिजे." ( ३९–४१ )

याप्रमाणे वाड्याच्या मनोऱ्यावर बसलेल्या स्त्रियांनी केलेलीं प्रिय भाषणें राजमार्गामध्ये असलेल्या पुरुषश्रेष्ठ रामाने ऐकिलीं. तात्पर्य, त्या नगरामध्ये आनंदमय होऊन जुळलेल्या लोकांचीं भाषणें व नाना प्रकारचे शब्द त्या रघुवंशज रामाने आपल्या संबंधाने ऐकिले. कांही म्हणाले "राजाच्या कृपेने विपुल संपत्ति प्राप्त होणाच्या उद्देशाने हा रघुवंशज राम आज चालला आहे आणि हा आता आमचा अधिपति होणार असल्यामुळे आमचे सर्व मनोरथ परिपूर्ण झाल्याचसारखे आहेत. आता बहुकालपर्यंत याला हें राष्ट्र प्राप्त होणार आहे, हा या लोकांना एक लाभच आहे. कारण या राजाच्या कारकीर्दीमध्ये कोणत्याही मनुष्याला दुःख पाहण्याची पाळी येणार नाही, इतकेंच नव्हे परंतु कोणालाही कसल्याही प्रकारची अप्रिय गोष्ट अनुभवण्याचा प्रसंग येणार नाही." ( ४२–४५ )

याप्रमाणे लोकांचीं संभाषणें चाललीं असतांना व डंक्याचे घोडे आणि हत्ती यांसहवर्तमान पुढे चाललेले जयजयकार करणारे भाट आणि स्तुतिपाठक वंशपाठक प्रोत्साहन देत असतांना श्रेष्ठ स्तुतिपाठक ज्याची स्तुति करीत आहेत, अशा कुबेराप्रमाणे राम जाऊं लागला असतां, तो राजमार्ग हत्तिणी, हत्ती, रथ

करेणुमातङ्गरथाश्वसंकुलं महाजनौघैः परिपूर्णचत्वरम् ।
प्रभूतरत्नं बहुपण्यसंचयं ददर्श रामो विमलं महापथम् ४७

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षोडषः सर्गः ॥१६॥

[ ७६६ ]

सप्तदशः सर्गः ।

स रामो रथमास्थाय संप्रहृष्टसुहृज्जनः ।
पताकाध्वजसंपन्नं महार्हागुरुधूपितम् १
अपश्यन्नगरं श्रीमान्नानाजनसमान्वितम् ।
सगृहैरभ्रसंकाशैः पाण्डुरैरुपशोभितम् २
राजमार्गं ययौ रामो मध्येनागुरुधूपितम् ३
चन्दनानां च मुख्यानामगुरूणां च संचयैः ।
उत्तमानां च गन्धानां क्षौमकौशाम्बरस्य च ४
आविद्धाभिश्च मुक्ताभिरुत्तमैः स्फाटिकैरपि ।

आणि अश्व यांनीं गजबजून गेलेला, मोठमोठ्या लोकसमुदायांनी ज्यांतील पटांगणें भरून गेलेलीं होतीं असा व नाना प्रकारचीं मौल्यवान् रत्नें आणि अनेक प्रकारचे विक्रीचे पदार्थ ज्या ठिकाणीं नीट व्यवस्थेने मांडून ठेविलेले होते, असा राजमार्ग त्याच्या दृष्टीस पडला. ( ४६-४७ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी सोळावा सर्ग समाप्त झाला ॥ १६ ॥

ज्याच्या मित्रमंडळींना फारच आनंद झाला आहे असा, तो राम रथावर आरूढ होऊन जाऊं लागला असतां, त्या वैभवशाली रामाने मोठमोठ्या मौल्यवान् अगुरूंचे धूप ठिकठिकाणीं जळत आहेत व जिकडे-तिकडे पताका व ध्वज उभारिलेले आहेत, आणि जेथेतेथे अनेकविध लोकांची गर्दी जमलेली आहे, असें नगर अवलोकन केलें आणि अभ्रतुल्य श्वेत गृहांनी ज्याला शोभा आलेली आहे व अगरूच्या धूपाचा ज्यामध्ये सर्वत्र परिमळ सुटला आहे, अशा राजमार्गामधून तो चालला. उत्कृष्ट चंदन व अगुरु, उत्तम सुगंधि द्रव्यें आणि ताग व रेशीम यांचीं वस्त्रें यांच्या ढीगांनी व व्यवस्थितपणें मांडून ठेवलेले मोत्यांचे सर व

शोभमानमसंबाधं तं राजपथमुत्तमम् ५
संवृतं विविधैः पुष्पैर्भक्ष्यैरुच्चावचैरपि ।
ददर्श तं राजपथं दिवि देवपतिर्यथा ६
दध्यक्षतहविर्लाजैर्धूपैरगुरुचन्दनैः ।
नानामाल्योपगन्धैश्च सदाभ्यर्चितचत्वरम् ७
आशीर्वादान्बहूञ्शृण्वन्बहुभिः समुदीरितान् ।
यथार्हं चापि संपूज्य सर्वानेव नरान्ययौ ८
पितामहैराचरितं तथैव प्रपितामहैः ।
अद्योपादाय तं मार्गमभिषिक्तोऽनुपालय ९
यथा स्म पोषिताः पित्रा यथा सर्वैः पितामहैः ।
ततः सुखतरं सर्वे रामे वत्स्याम राजनि १०
अलमद्य हि भुक्तेन परमार्थैरलं च नः ।
यदि पश्याम निर्यान्तं रामं राज्ये प्रतिष्ठितम् ११

उत्कृष्ट स्फटिकाच्या वस्तु यांच्या योगाने शोभिवन्त दिसणारा, उत्कृष्ट बंदोबस्त असलेला आणि नाना प्रकारचीं सुगंधी पुष्पें व विविध प्रकारचे साधारण व उंची खाद्य पदार्थ खच्चून मांडून ठेवल्यामुळे ज्याच्या दोनही बाजू अगदी झाकून गेल्या होत्या, असा तो राजमार्ग स्वर्गाचें अवलोकन करणाऱ्या इंद्राप्रमाणे रामाने अवलोकन केला. ( १–६ )

दही, अक्षता, घृत, लाह्या, अगुरु व चंदन यांचे धूप आणि नाना प्रकारचीं पुष्पें व सुगंधी द्रव्यें यांच्या योगाने त्या राजमार्गातील पटांगणें भूषित केलेलीं होतीं. अशा प्रकारच्या त्या राजमार्गातून अनेक लोकांनी उच्चारिलेले अनेक आशीर्वाद श्रवण करीत करीत आणि सर्व लोकांना योग्यतेप्रमाणे मान देत देत, तो राम चालला. तेव्हा वृद्ध लोक त्याला म्हणाले " आज अभिषेक झाल्यावर तूं अजापणज्यांनी चालविलेल्या मार्गाचें अवलंबन करून परिपालन कर आणि ज्याप्रमाणे तुझ्या पित्याने व तुझ्या सर्व पूर्वजांनी आमचें पोषण केलें, त्याप्रमाणे तूं आमचें पोषण कर, म्हणजे तुज रामराजाच्या कारकीर्दीमध्ये आम्ही पूर्वीपेक्षाही अधिक सुखाने राहूं. आज घरांतून बाहेर निघालेला हा राम राज्यावर बसलेला जर दृष्टी

ततो हि नः प्रियतरं नान्यत्किञ्चिद्भविष्यति ।
यथाभिषेको रामस्य राज्येनामिततेजसः १२
एताश्चान्याश्च सुहृदामुदासीनः शुभाः कथाः ।
आत्मसंपूजनीः शृण्वन्ययौ रामो महापथम् १३
नहि तस्मान्मनः कश्चिच्चक्षुषी वा नरोत्तमात् ।
नरः शक्नोत्यपाक्रष्टुमतिक्रान्तेऽपि राघवे १४
यश्च रामं न पश्येत्तु यं च रामो न पश्यति ।
निन्दितः सर्वलोकेषु स्वात्माप्येनं विगर्हते १५
सर्वेषु स हि धर्मात्मा वर्णानां कुरुते दयाम् ।
चतुर्णां हि वयःस्थानां तेन ते तमनुव्रताः १६
चतुष्पथान्देवपथांश्चैत्यांश्चायतनानि च ।
प्रदक्षिणं परिहरञ्जगाम नृपतेः सुतः १७
स राजकुलमासाद्य मेघसङ्घोपमैः शुभैः ।
प्रासादशृङ्गैर्विविधैः कैलासशिखरोपमैः १८

पडेल, तर आम्ही ऐहिक विषयसुखाची व पारमार्थिक साधनांचीही पर्वा करणार नाही; कारण अत्यंत तेजस्वी रामाच्या राज्याभिषेकापेक्षा दुसरी कोणतीही गोष्ट आम्हांला अधिक प्रिय होणार नाही. " ( ७-१२ )

अशाच प्रकारच्या स्वतःच्या प्रशंसेसंबंधाने मित्रांच्या शुभ कथा श्रवण करीत करीत, उदासीन वृत्तीने असलेला राम राजमार्गाने चालला. राम जरी पुढे लांब निघून गेला, तरी देखील कोणीही पुरुष आपलें मन अथवा दृष्टि त्याच्या वरून काढून घेण्यास समर्थ झाला नाही. ज्याने कोणी त्या वेळीं रामाला अवलोकन केलें नाही आणि ज्याच्याकडे रामाची दृष्टि गेली नाही, त्याची सर्व लोकांमध्ये निंदा होऊन, त्याने स्वतःही आपली निंदा करून घेतली. ( १३-१५ )

चारी वर्णांतील सर्वही लोकांचे ठिकाणीं तो त्यांच्या वयोमानानुरूप दया करीत असे आणि त्यामुळे ते सर्वही त्याच्या मनाप्रमाणे वागत असत. चौक, देवालयांचे मार्ग, प्रसिद्ध वृक्ष आणि देवस्थानें यांना उजवी घालीत घालीत तो राजकुमार गेला आणि राजवाड्यापाशीं आल्यानंतर इंद्राच्या निवासस्थानाप्रमाणे

आवारयद्भिर्गगनं विमानैरिव पाण्डुरैः ।
वर्धमानगृहैश्चापि रत्नजालपरिष्कृतैः १९
तत्पृथिव्यां गृहवरं महेन्द्रसदनोपमम् ।
राजपुत्रः पितुर्वेश्म प्रविवेश श्रिया ज्वलन् २०
स कक्ष्या धन्विभिर्गुप्तास्तिस्रोऽतिक्रम्य वाजिभिः ।
पदातिरपरे कक्ष्ये द्वे जगाम नरोत्तमः २१
स सर्वाः समतिक्रम्य कक्ष्या दशरथात्मजः ।
संनिवर्त्य जनं सर्वं शुद्धान्तःपुरमत्यगात् २२
तस्मिन्प्रविष्टे पितुरन्तिकं तदा जनः स सर्वो मुदितो नृपात्मजे ।
प्रतीक्षते तस्य पुनः स निर्गमं यथोदयं चन्द्रमसः सरित्पतिः २३

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्तदशः सर्गः ॥१७॥[७८९]

पृथ्वीतील श्रेष्ठ गृह जें पित्याचें निवासस्थान, त्यामध्ये तो राज्यलक्ष्मीने झळकत असलेला राजपुत्र प्रविष्ट झाला. त्या राजवाड्याचीं अनेक शुभ्र शिखरें मेघपटलाप्रमाणे मोठीं असून, कैलासपर्वताच्या शिखरासारखीं उंच होतीं आणि आकाशाला वेढून टाकणाऱ्या श्वेतवर्ण विमानाप्रमाणे असलेली व रत्नसमुदायांनी भूषित केलेलीं क्रीडास्थानें राजवाड्यासभोवती होतीं. ( १६–२० )

पित्याच्या निवासस्थानाला गेल्यानंतर धनुर्धारी पुरुषांचा जेथे पहारा आहे, असे तीन चौक अश्वासहवर्तमानच ओलांडून जाऊन तो पुरुषश्रेष्ठ राम दुसरे दोन चौक पायांनी चालून गेला आणि याप्रमाणे सर्व चौक ओलांडल्यावर तो दशरथपुत्र राम सर्व लोकांना परत फिरवून अंतःपुरामध्ये प्रविष्ट झाला. व तो राजकुमार पित्याच्या अंतःपुरांत प्रविष्ट झाल्यानंतर बाहेरील सर्व लोक आनंदित झाले आणि सागर ज्याप्रमाणे चंद्रोदयाची वाट पहात बसतो त्याप्रमाणे तो राम त्या अंतःपुरांतून बाहेर पडण्याची ते वाट पहात बसले. ( २१–२३ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी सतरावा सर्ग समाप्त झाला ॥ १७ ॥

अष्टादशः सर्गः।

स ददर्शासने रामो विषण्णं पितरं शुभे ।
कैकेय्या सहितं दीनं मुखेन परिशुष्यता १
स पितुश्चरणौ पूर्वमभिवाद्य विनीतवत् ।
ततो ववन्दे चरणौ कैकेय्याः सुसमाहितः २
रामेत्युक्त्वा तु वचनं बाष्पपर्याकुलेक्षणः ।
शशाक नृपतिर्दीनो नेक्षितुं नाभिभाषितुम् ३
तदपूर्वं नरपतेर्दृष्ट्वा रूपं भयावहम् ।
रामोऽपि भयमापन्नः पदा स्पृष्ट्वेव पन्नगम् ४
इन्द्रियैरप्रहृष्टैस्तं शोकसंतापकर्शितम् ।
निःश्वसन्तं महाराजं व्यथिताकुलचेतसम् ५
ऊर्मिमालिनमक्षोभ्यं क्षुभ्यन्तमिव सागरम् ।
उपप्लुतमिवादित्यमुक्तानृतमृषिं यथा ६

अंतःपुरांत गेल्यानंतर आपला पिता दुःखित व दीन झाला असून त्याचें मुख निस्तेज झालें आहे आणि कैकेयीसहवर्तमान तो मंचकावर आहे, असें त्या रामानें अवलोकन केलें, तेव्हां प्रथम रामानें पित्याचे चरणाला नम्रपणें अभिवंदन केलें आणि नंतर स्वस्थांतःकरणपूर्वक त्यानें कैकेयीचे चरणीं वंदन केलें. यानंतर दशरथ राजा " राम " येवढींच अक्षरें बोलून स्वस्थ राहिला. कारण अश्रूंनीं डोळे भरून आल्यामुळे व स्वतः दुःखित झाल्यामुळे त्याच्यानें रामाशीं अधिक बोलवेना व वर तोंड करूनही पहावेना. तेव्हां यापूर्वी आजपर्यन्त कधींही न पाहिलेली अशी राजाची ती भयकारक अपूर्व मुद्रा अवलोकन करून, सर्पाला पादस्पर्श केल्याप्रमाणे रामही भयभीत झाला; कारण इंद्रियें खिन्न होऊन त्या महाराजाचें अंतःकरण क्षुब्ध व व्याकुल झालेलें होतें; शोक व संताप यांनीं तो अगदीं जर्जर झालेला होता. ( १--५ )

स्वभावतः क्षोभरहित असूनही लाटा उचंबळूं लागल्यामुळे क्षुब्ध होणाऱ्या सागराप्रमाणे तो क्षुब्ध झालेला होता. ग्रहण लागलेल्या सूर्याप्रमाणे त्याची अवस्था झालेली होती आणि अनृत भाषण केलेल्या ऋषीप्रमाणे त्याचें तेज नाहीसें

अचिन्त्यकल्पं नृपतेस्तं शोकमुपधारयन् ।
बभूव संरब्धतरः समुद्र इव पर्वणि ७
चिन्तयामास चतुरो रामः पितृहिते रतः ।
किंस्विदद्यैव नृपतिर्न मां प्रत्यभिनन्दति ८
अन्यदा मां पिता दृष्ट्वा कुपितोऽपि प्रसीदति ।
तस्य मामद्य संप्रेक्ष्य किमायासः प्रवर्तते ९
स दीन इव शोकार्तो विषण्णवदनद्युतिः ।
कैकेयीमभिवाद्यैव रामो वचनमब्रवीत् १०
कच्चिन्मया नापराद्धमज्ञानाद्येन मे पिता ।
कुपितस्तन्ममाचक्ष्व त्वमेवैनं प्रसादय ११
अप्रसन्नमनाः किं नु सदा मां प्रति वत्सलः ।
विषण्णवदनो दीनो नहि मां प्रति भाषते १२

झालेलें होतें. तेव्हा अत्यंत असंभवनीय अशा प्रकारचा तो राजाला शोक होण्याचें कारण काय, याचा राम विचार करूं लागला असतां, पर्वदिवशीं अधिक क्षुब्ध होणाऱ्या समुद्राप्रमाणे तोही स्वतः पूर्वापेक्षा अधिकच क्षुब्ध झाला आणि नंतर पित्याचें हित करण्याविषयीं तत्पर असलेला तो चतुर राम मनामध्ये विचार करूं लागला की, " आजच हा राजा मला अवलोकन करून माझें अभिनंदन कां करीत नाही ? क्रुद्ध झाला असला, तरी मला अवलोकन करितांक्षणीं तो प्रसन्न होतो, असा नेहमीचा अनुभव आहे. तेव्हा आजच, मला अवलोकन करूनही, प्रसन्न होण्याला त्याच्या अन्तःकरणाला काय बरें क्लेश होत आहेत ? यानंतर शोकाकुल झाल्यामुळे मुख खिन्न व निस्तेज होऊन राम दीनाप्रमाणे कैकेयीला म्हणाला, ( ६-१० )

" ज्याअर्थी माझा पिता क्रुद्ध झाला आहे, त्याअर्थी अज्ञानाने माझ्या हातून कांही अपराध घडला नाही ना, हें तूं मला सांग आणि तूंच याला प्रसन्न कर. माझ्याविषयीं नेहमीं दयाळु असलेल्या पित्याचें मन आजच कां बरें प्रसन्न नाही ? खिन्नवदन होऊन व दीन होऊन ज्याअर्थी तो माझ्याशीं बोलत नाही, त्याअर्थी त्याचें मन प्रसन्न नाही, हें निश्चित आहे. याला कांही शारीरिक तापाची अथवा

शारीरो मानसो वापि कच्चिदेनं न बाधते ।
संतापो वाभितापो वा दुर्लभं हि सदा सुखम् १३
कच्चिन्न किञ्चिद्भरते कुमारे प्रियदर्शने ।
शत्रुघ्ने वा महासत्त्वे मातॄणां वा ममाशुभम् १४
अतोषयन्महाराजमकुर्वन्वा पितुर्वचः ।
मुहूर्तमपि नेच्छेयं जीवितुं कुपिते नृपे १५
यतोमूलं नरः पश्येत्प्रादुर्भावमिहात्मनः ।
कथं तस्मिन्नवर्तेत प्रत्यक्षे सति दैवते १६
कच्चित्ते परुषं किञ्चिदभिमानात्पिता मम ।
उक्तो भवत्या रोषेण येनास्य लुलितं मनः १७
एतदाचक्ष्व मे देवि तत्त्वेन परिपृच्छतः ।
किं निमित्तमपूर्वोऽयं विकारो मनुजाधिपे १८
एवमुक्ता तु कैकेयी राघवेण महात्मना ।

मानसिक व्याधीची पीडा झाली आहे कीं काय ? कारण नेहमी सुख असणें दुर्लभ आहे. ज्याचें दर्शन प्रिय आहे असा राजकुमार भरत, महाधैर्यवान् शत्रुघ्न, माझ्या माता आणि मी, यापैकीं कोणाचे ठिकाणीं त्याला कांहीं अपराध दिसून येत आहे कीं काय ? राजा जर क्रुद्ध झाला असला तर त्या महाराजाला संतुष्ट केल्यावाचून अथवा त्या पित्याच्या आज्ञेप्रमाणे वागल्यावांचून मी एक क्षणभरही जिवंत रहाण्याची इच्छा करीत नाही. ( ११-१५ )

ज्याच्यापासून आपला जन्म झाला हें समजत आहे, तें प्रत्यक्ष दैवत असतांना त्याच्या मनाप्रमाणे कोणता बरें पुरुष वागणार नाहीं ? ज्याअर्थी याचें मन कलुषित झालें आहे त्याअर्थी हा आपल्या मुठींत आहे अशा गर्वाने अथवा रागारागाने तूं माझ्या पित्याला कांहीं कठोर भाषण केलें आहेस कीं काय ? राजाचे ठिकाणीं पूर्वी कधीही दृष्टोत्पत्तीस न आलेला असा हा विकार आताच दृष्टोत्पत्तीस येण्याचें काय कारण असावें बरें ? हें मी तुला विचारीत आहें. तर हे देवि, तूं हें मला खरें खरें सांग. "( १६-१८ )

याप्रमाणे महात्मा रघुवंशज राम बोलला असतां अत्यंत निर्लज्ज बनलेली कैकेयी

उवाचेदं सुनिर्लज्जा धृष्टमात्महितं वचः १९
न राजा कुपितो राम व्यसनं नास्य किंचन ।
किंचिन्मनोगतं त्वस्य त्वद्भयान्नानुभाषते २०
प्रियं त्वामप्रियं वक्तुं वाणी नास्य प्रवर्तते ।
तदवश्यं त्वया कार्यं यदनेन श्रुतं मम २१
एष मह्यं वरं दत्वा पुरा मामभिपूज्य च ।
स पश्चात्तप्यते राजा यथान्यः प्राकृतस्तथा २२
अतिसृज्य ददानीति वरं मम विशाम्पतिः ।
स निरर्थं गतजले सेतुं बन्धितुमिच्छति २३
धर्ममूलमिदं राम विदितं च सतामपि ।
तत्सत्यं न त्यजेद्राजा कुपितस्त्वत्कृते यथा २४
यदि तद्वक्ष्यते राजा शुभं वा यदि वाशुभम् ।
करिष्यासि ततः सर्वमाख्यास्यामि पुनस्त्वहम् २५

रामाला आपल्या स्वार्थाचें व धाडसाचें भाषण करूं लागली की," हे रामा, राजा, क्रुद्ध झालेला नाही व याच्यावर कांही संकटही आलेलें नाही. याच्या मनामध्ये कांही गोष्ट आहे; परंतु तुझ्या भीतीमुळे त्याच्याने ती बोलवत नाही. (१९–२०)

सारांश, तूं याला प्रिय असल्यामुळे तुझ्याशीं अप्रिय भाषण करण्याला याची वाणी प्रवृत्त होत नाही; परंतु, याने जें मला वचन दिलें आहे तें तुला अवश्य शेवटास नेलें पाहिजे. याने आधी मला वर देऊं करून, त्यांच्या योगाने माझा मानही राखिला आणि नंतर हा राजा, आता एखाद्या प्राकृत जनाप्रमाणे, पश्चात्ताप करीत बसला आहे. या प्रजाधिपतीने " वर देईन " म्हणून जर माझ्याशीं प्रतिज्ञा केली आहे, तर आता याचे पश्चात्तापांत पडणें म्हणजे पाणी निघून गेल्यावर बांध घालण्याची याने इच्छा करणें त्याप्रमाणेच निरर्थक आहे. हे रामा, सत्य हेंच धर्माचें मूल आहे, हेंच सज्जनांना विदित व अभिमत आहे. यास्तव, तुझ्याकरिता हा राजा क्रुद्ध होऊन त्या सत्याचा त्याग करणार नाही, अशी तूं व्यवस्था कर. जें सांगण्याचा राजाचा उद्देश आहे तें, शुभ असो अथवा अशुभ असो, तूं जर शेवटास नेणार असशील तर मीही पुनरपि तें तुला सर्व सांगेन. (२१–२५)

यदि त्वभिहितं राज्ञा त्वयि तन्न विपत्स्यते।
ततोऽहमभिधास्यामि न ह्येष त्वयि वक्ष्यति २६
एतत्तु वचनं श्रुत्वा कैकेय्या समुदाहृतम्।
उवाच व्यथितो रामस्तां देवीं नृपसंनिधौ २७
अहो धिङ् नार्हसे देवि वक्तुं मामीदृशं वचः।
अहं हि वचनाद्राज्ञः पतेयमपि पावके २८
भक्षयेयं विषं तीक्ष्णं पतेयमपि चार्णवे।
नियुक्तो गुरुणा पित्रा नृपेण च हितेन च २९
तद् ब्रूहि वचनं देवि राज्ञो यदभिकाङ्क्षितम्।
करिष्ये प्रतिजाने च रामो द्विर्नाभिभाषते ३०
तमार्जवसमायुक्तमनार्या सत्यवादिनम्।
उवाच रामं कैकेयी वचनं भृशदारुणम् ३१
पुरा देवासुरे युद्धे पित्रा ते मम राघव।

सारांश, राजाच्या अनुमतीने मी जें तुला सांगेन, तें जर तुझे ठिकाणीं व्यर्थ होणार नसेल, म्हणजे तूं जर त्याप्रमाणे वागण्यास तयार असशील, तर मी तुला सांगेन. याला तुझ्याशीं बोलवणार नाही." हें कैकेयीनें केलेलें भाषण श्रवण करून दुःखित झालेला राम राजाचे संनिध त्या राजभार्येला म्हणाला "हे देवी, धिःकार असो मला, ज्या अर्थी माझ्याविषयीं तुला अशी शंका येत आहे !! मला उद्देशून अशा प्रकारचें भाषण करणें तुला योग्य नाही. मी राजाच्या सांगण्या-वरून अग्नीमध्येही उडी घालीन. तीक्ष्ण विषही भक्षण करीन अथवा गुरु, पिता राजा आणि माझ्या हिताविषयीं तत्पर असलेल्या याने आज्ञा केली असता मी आपल्याला सागरांतही लोटून घेईन. तस्मात् हे देवी, जें कांहीं राजाच्या मनांत असेल तें सांग; मी तें शेवटास नेण्याची प्रतिज्ञा करीत आहें. राम दोनदा भाषण करीत नसतो." ( २६-३० )

याप्रमाणे राम म्हणाला असतां सरळ रीतीने वागणाऱ्या त्या सत्यवादी रामाला ती दुष्ट कैकेयी अत्यंत कठोर शब्दांनी म्हणाली "हे राघवा, पूर्वी देवदैत्यांच्या युद्धांमध्ये याला शल्य लागलें असतां तें काढून मी याचें रक्षण केलें.

रक्षितेन वरो दत्तो सशल्येन महारणे ३२
तत्र मे याचितो राजा भरतस्याभिषेचनम्।
गमनं दण्डकारण्ये तव चाद्यैव राघव ३३
यदि सत्यप्रतिज्ञं त्वं पितरं कर्तुमिच्छसि।
आत्मानं च नरश्रेष्ठ मम वाक्यमिदं शृणु ३४
संनिदेशे पितुस्तिष्ठ यथानेन प्रतिश्रुतम्।
त्वयारण्यं प्रवेष्टव्यं नव वर्षाणि पञ्च च ३५
भरतश्चाभिषिच्येत यदेतदभिषेचनम्॥
त्वदर्थे विहितं राज्ञा तेन सर्वेण राघव ३६
सप्त सप्त च वर्षाणि दण्डकारण्यमाश्रितः।
अभिषेकमिदं त्यक्त्वा जटाचीरधरो भव ३७
भरतः कोसलपतेः प्रशास्तु वसुधामिमाम्।
नानारत्नसमाकीर्णां सवाजिरथसंकुलाम् ३८
एतेन त्वां नरेन्द्रोऽयं कारुण्येन समाप्लुतः।

तेव्हां त्या महासंग्रामामध्ये या तुझ्या पित्यानें मला दोन वर देऊं केले होते व भरताला राज्याभिषेक आणि तुझें आजच्या आज दंडकारण्यामध्ये गमन, म्हणून ते दोन वर देण्याविषयीं, हे राघवा, मीं राजाची प्रार्थना केली आहे. तस्मात् पित्याची व आपली प्रतिज्ञा खरी करण्याची जर तुला इच्छा असेल तर हें माझें भाषण ऐक. पित्यानें केलेली प्रतिज्ञा शेंवटास नेण्याविषयीं तूं तत्पर हो. (३१--३५)

सारांश, या तुझ्या पित्यानें मला वर देऊं केल्याप्रमाणें तुला चवदा वर्षे अरण्यामध्यें गेलें पाहिजे आणि हे राघवा, तुझ्याकरितां जी ही अभिषेकसामग्री राजानें जुळविली आहे, त्या सर्व सामग्रीच्या योगानें भरताला अभिषेक झाला पाहिजे. तात्पर्य, या राज्याभिषेकाचा त्याग कर आणि जटा व वल्कलें धारण करून तूं चवदा वर्षेपर्यंत दंडकारण्यांत वास कर व नाना प्रकारच्या रत्नांनीं परिपूर्ण आणि अश्व व रथ यांनीं भरलेल्या या कोसल देशाधिपतीच्या पृथ्वीचें भरताला परिपालन करूं दे. अशा प्रकारचे दोन वर यानें मला दिले आहेत आणि

शोकैः संक्लिष्टवदनो न शक्नोति निरीक्षितुम् ३९
एतत्कुरु नरेन्द्रस्य वचनं रघुनन्दन ।
सत्येन महता राम तारयस्व नरेश्वरम् ४०
इतीव तस्यां परुषं वदन्त्यां न चैव रामः प्रविवेश शोकम् ।
प्रविव्यथे चापि महानुभावो राजा च पुत्रव्यसनाभितप्तः ४१ [८३०]

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डेऽष्टादशः सर्गः १८ [८३०]

एकोनविंशः सर्गः ।

तदप्रियममित्रघ्नो वचनं मरणोपमम् ।
श्रुत्वा न विव्यथे रामः कैकेयीं चेदमब्रवीत् १
एवमस्तु गमिष्यामि वनं वस्तुमहं त्वितः ।
जटाचीरधरो राज्ञः प्रतिज्ञामनुपालयन् २
इदं तु ज्ञातुमिच्छामि किमर्थं मां महीपतिः ।
नाभिनन्दति दुर्धर्षो यथापूर्वमरिन्दमः ३
मन्युर्न च त्वया कार्यो देवि ब्रूमि तवाग्रतः ।

---

त्यामुळे दयेने गहिंवरून गेलेला आणि म्हणूनच शोकामुळे खिन्नवदन झालेला हा राजा तुझ्याकडे पाहण्यास समर्थ होत नाही. तस्मात् हे रघुनंदना रामा, हें राजानें दिलेलें वचन तूं शेवटास ने आणि या मोठ्या सत्यानें तूं राजाला तार." याप्रमाणे ती कैकेयी कठोर भाषण करीत असतांनाही रामाला वाईट वाटलें नाहीं; परंतु महाप्रभावी दशरथराजा, येणाऱ्या पुत्रवियोगरूप संकटामुळे संतप्त होऊन, फारच दुःखित झाला. ( ३६—४१ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी अठरावा सर्ग समाप्त झाला ॥ १८ ॥

शत्रूंचा घात करणारा राम तें मरणतुल्य दुःसह भाषण श्रवण करूनही दुःखित न होतां कैकेयीला म्हणाला " बरें आहे. मी जटा व वल्कलें धारण करून येथून, राजाची प्रतिज्ञा शेवटास जावी या उद्देशानें, वनामध्ये वास्तव्य करण्याकरिता जातों; परंतु ज्याच्यासमोर जाण्याची इतरांना भीति वाटते, असा हा शत्रूंचें दमन करणारा भूपति पूर्वीप्रमाणे माझें अभिनंदन कां करीत नाहीं, हें

यास्यामि भव सुप्रीता वनं चीरजटाधरः ४
हितेन गुरुणा पित्रा कृतज्ञेन नृपेण च।
नियुज्यमानो विस्रब्धः किं न कुर्यामहं प्रियम् ५
अलीकं मानसं त्वेकं हृदयं दहते मम।
स्वयं यन्नाह मां राजा भरतस्याभिषेचनम् ६
अहं हि सीतां राज्यं च प्राणानिष्टान्धनानि च।
हृष्टो भ्रात्रे स्वयं दद्यां भरताय प्रचोदितः ७
किं पुनर्मनुजेन्द्रेण स्वयं पित्रा प्रचोदितः।
तव च प्रियकामार्थं प्रतिज्ञामनुपालयन् ८
तथाश्वासय ह्रीमन्तं किं त्विदं यन्महीपतिः।
वसुधासक्तनयनो मन्दमश्रूणि मुञ्चति ९
गच्छन्तु चैवानयितुं दूताः शीघ्रजवैर्हयैः।
भरतं मातुलकुलादद्यैव नृपशासनात् १०

समजण्याची माझी इच्छा आहे. हे देवी, तूं क्रुद्ध होऊं नकोस. तूं प्रसन्न अस. मी तुझ्यासमक्ष वल्कलें व जटा धारण करून वनामध्ये जाईन. ( १–४ )

मित्र, गुरु, पिता आणि कृतज्ञ राजा, असा हा मला आज्ञा करूं लागला असतां मी निःशंक होऊन याला प्रिय असलेली कोणती बरें गोष्ट करणार नाहीं ? परंतु भरताला अभिषेक करण्याविषयीं स्वतः राजा मला कां सांगत नाहीं, हें एक दुःख माझ्या अंतःकरणाला जाळीत आहे. फक्त तूं जरी मला सांगितलेस, तरी सीता, राज्य, प्रियप्राण व संपत्ति मी आनंदानें भ्रात्या भरताला स्वतः देईन. तेव्हां तुझें प्रिय करण्याचा उद्देश धरून पित्या भूपतीनें स्वतः आज्ञा केली असतां, त्याची स्वतःची प्रतिज्ञा शेवटास नेण्याकरितां मी ही गोष्ट करीनच, याविषयीं संशय घेण्याचें कारणच काय ? ( ५—८ )

यास्तव स्वतः ही गोष्ट मला सांगण्याचा संकोच वाटत असल्यामुळे खालीं मान घालून बसलेल्या या राजाला तूं धीर दे. हा भूपति खालीं मान घालून कां बरें हळूहळू रुदन करीत आहे ? महावेगवान् अश्वावर आरूढ होऊन, राजाच्या आज्ञेनें भरताला मातुलगृहाहून आणण्याकरितां आजच दूत जाऊं द्या. पित्यानें

दण्डकारण्यमेषोऽहं गच्छाम्येव हि सत्वरः ।
अविचार्य पितुर्वाक्यं समा वस्तुं चतुर्दश ११
सा हृष्टा तस्य तद्वाक्यं श्रुत्वा रामस्य कैकयी ।
प्रस्थानं श्रद्दधाना सा त्वरयामास राघवम् १२
एवं भवतु यास्यन्ति दूताः शीघ्रजवैर्हयैः ।
भरतं मातुलकुलादिहावर्तयितुं नराः १३
तत्र त्वहं क्षमं मन्ये नोत्सुकस्य विलम्बनम् ।
राम तस्मादितः शीघ्रं वनं त्वं गन्तुमर्हसि १४
व्रीडान्वितः स्वयं यच्च नृपस्त्वां नाभिभाषते ।
नैतत्किंचिन्नरश्रेष्ठ मन्युरेषोऽपनीयताम् १५
यावत्त्वं न वनं यातः पुरादस्मादतित्वरन् ।
पिता तावन्न ते राम स्नास्यते भोक्ष्यतेऽपि वा १६

केलेली आज्ञा युक्त आहे अथवा अयुक्त आहे, याचा विचार न करितां चवदा वर्षपर्यंत वास्तव्य करण्याच्या उद्देशानें हा मी दंडकारण्यामध्यें आताच चालता होतों. " ( ९—११ )

याप्रमाणे रामाचें तें भाषण श्रवण केल्यावर कैकेयीला आनंद झाला आणि राम आता खचित जाणार, असा विश्वास वाटून ती त्याला गमन करण्याविषयीं त्वरा करूं लागली. आणि म्हणाली " असें होऊं दे. महावेगवान् अश्वावर आरूढ होऊन भरताला मातृलगृहाहून येथें आणण्याकरिता दूत लोक जातील; परंतु, हे रामा, वनांत जाण्याविषयीं उत्सुक झालेल्या त्वां आता विलंब लावणें मला योग्य दिसत नाहीं. तस्मात् तूं येथून सत्वर वनामध्यें चालता हो. हे पुरुषश्रेष्ठा रामा, लज्जित झाल्यामुळे राजाला स्वतः ही गोष्ट तुला सांगतां येत नाहीं, यांत कांहीं विशेष नाहीं. तूं आता विलंब न करितां वनामध्यें चालता होऊन याचा कोप नाहीसा कर. हे रामा, जोंपर्यंत या नगरापासून तूं अति त्वरा करून वनामध्यें नेला नाहीस, तोंपर्यंत तुझा पिता स्नान अथवा भोजन कांहीएक करणार नाहीं. " ( १२-१६ )

धिक्कष्टमिति निःश्वस्य राजा शोकपरिप्लुतः।
मूर्छितो न्यपतत्तस्मिन्पर्यङ्के हेमभूषिते १७
रामोऽप्युत्थाप्य राजानं कैकेय्याभिप्रचोदितः।
कशयेव हतो वाजी वनं गन्तुं कृतत्वरः १८
तदप्रियमनार्याया वचनं दारुणोपमम्।
श्रुत्वा गतव्यथो रामः कैकेयीं वाक्यमब्रवीत् १९
नाहमर्थपरो देवि लोकमावस्तुमुत्सहे।
विद्धि मामृषिभिस्तुल्यं विमलं धर्ममास्थितम् २०
यत्तत्रभवतः किञ्चिच्छक्यं कर्तुं प्रियं मया।
प्राणानपि परित्यज्य सर्वथाकृतमेव तत् २१
न ह्यतो धर्मचरणं किञ्चिदस्ति महत्तरम्।
यथा पितरि शुश्रूषा तस्य वा वचनक्रिया २२
अनुक्तोऽप्यत्र भवता भवत्या वचनादहम्।
वने वत्स्यामि विजने वर्षाणीह चतुर्दश २३

हें कैकेयीचें भाषण श्रवण केल्यावर "धिक्कार असो! काय रे दुःखाचा प्रसंग हा!" असें म्हणून शोकाकुल झालेला राजा दुःखाचे सुस्कारे टाकूं लागला आणि त्या सुवर्णभूषित मंचकावर मूर्छित होऊन पडला. नंतर रामाने दशरथ-राजाला सावध केलें आणि कैकेयी पुनरपि म्हणाली असतां, चाबकाने मारिलेल्या घोड्याप्रमाणे वनांत जाण्याविषयीं त्याने त्वरा केली आणि अप्रिय व परिणामी भयंकर असें तें दुष्ट कैकेयीचें भाषण श्रवण करूनही मुळीं देखील दुःख न वाटून घेणारा राम कैकेयीला म्हणाला. (१७--१९)

"हे देवी, मी संपत्तीची आशा धरून या लोकामध्यें वास्तव्य करण्याचें इच्छीत नाहीं. मी ऋषींप्रमाणे निर्मल धर्माचें अवलंबन करून राहिलों आहें, हें तूं समजून ठेव. त्या राजाचें जें कांहीं प्रिय करणें मला शक्य असेल तें प्राणत्याग करूनही सर्व प्रकाराने केलेंच, असें तूं समज; कारण पित्याची शुश्रूषा करणें अथवा त्याच्या आज्ञेप्रमाणे वागणें, यापेक्षा कोणतेंही धर्माचरण श्रेष्ठ नाहीं. जरी पित्याने मला सांगितलें नाहीं, तरीदेखील तुझ्या सांगण्यावरून मी निर्जन वनामध्यें चवदा

न नूनं मयि कैकेयी किञ्चिदाशंससे गुणान् ।
यद्राजानमवोचस्त्वं ममेश्वरतरा सती २४
यावन्मातरमापृच्छे सीतां चानुनयाम्यहम् ।
ततोऽद्यैव गमिष्यामि दण्डकानां महद्वनम् २५
भरतः पालयेद्राज्यं शुश्रूषेच्च पितुर्यथा ।
तथा भवत्या कर्तव्यं स हि धर्मः सनातनः २६
रामस्य तु वचः श्रुत्वा भृशं दुःखगतः पिता ।
शोकादशक्नुवन्वक्तुं प्ररुरोद महास्वनम् २७
वन्दित्वा चरणौ राज्ञो विसंज्ञस्य पितुस्तदा ।
कैकेय्याश्चाप्यनार्याया निष्पपात महाद्युतिः २८
स रामः पितरं कृत्वा कैकेयीं च प्रदक्षिणम् ।
निष्क्रम्यान्तःपुरात्तस्मात्स्वं ददर्श सुहृज्जनम् २९
तं बाष्पपरिपूर्णाक्षः पृष्ठतोऽनुजगाम ह ।

---

वर्षेपर्यंत वास्तव्य करीन. हे कैकेयी, तुझीच माझ्यावर अधिक सत्ता असतांना ज्या अर्थी तूं परस्पर प्रत्यक्ष राजापाशीं ही गोष्ट काढलीस त्या अर्थी, माझे ठिकाणीं कांहीच चांगुलपणा तुला दिसत नाहीं काय ? मातेचा निरोप घेऊन सीतेची समजूत घालीपर्यंत तूं धीर धर. येवढें झालें म्हणजे मी आजच्या आजच भव्य अशा दंडकारण्यामध्ये चालता होईन. ( २०-२५ )

भरत राज्याचें परिपालन करून पित्याच्या शुश्रूषेमध्ये तत्पर राहील अशी तूं व्यवस्था कर: कारण पित्याची शुश्रूषा करणें हा सनातन धर्म आहे. " हे रामाचें भाषण श्रवण केल्यावर अतिशयच दुःखित झालेला पिता दशरथ, शोकामुळे मुखांतून शब्द निघेना म्हणून, मोठ्या स्वरानें रुदन करूं लागला. तेव्हां मूर्छित झालेल्या पित्याच्या चरणांना वंदन करून आणि दुष्ट कैकेयीच्याही चरणांना वंदन करून महातेजस्वी राम तेथून निघाला. पित्याला व कैकेयीला प्रदक्षिणा करून त्या अंतःपुरांतून निघाल्यावर रामानें, बाहेर उत्सुकतेने वाट पाहत उभ्या असलेल्या आपल्या मित्रमंडळीला अवलोकन केलें. राम अंतःपुरांतून बाहेर निघाल्यावर अश्रूंनी नेत्र भरून आलेला व सुमित्रेचा आनंद वृद्धिगत

लक्ष्मण परमक्रुद्धः सुमित्रानन्दवर्धनः ३०
आभिषेचनिकं भाण्डं कृत्वा रामः प्रदक्षिणम् ।
शनैर्जगाम सापेक्षो दृष्टिं तत्राविचालयन् ३१
न चास्य महतीं लक्ष्मीं राज्यनाशोऽपकर्षति ।
लोककान्तस्य कान्तत्वाच्छीतरश्मेरिव क्षयः ३२
न वनं गन्तुकामस्य त्यजतश्च वसुन्धराम् ।
सर्वलोकातिगस्येव लक्ष्यते चित्तविक्रिया ३३
प्रतिषिध्य शुभं छत्रं व्यजने च स्वलंकृते ।
विसर्जयित्वा स्वजनं रथं पौरांस्तथा जनान् ३४
धारयन्मनसा दुःखमिन्द्रियाणि निगृह्य च ।
प्रविवेशात्मवान्वेश्म मातुरप्रियशंसिवान् × ३५

करणारा लक्ष्मण अत्यंत क्रुद्ध होऊन त्याच्या मागोमाग चालला. अभिषेकाकरिता जुळविलेल्या सामग्रीला प्रदक्षिणा करून, तिकडे दृष्टिक्षेपही न करितां वनांत जाण्याची अपेक्षा धरून राम अगदी शान्तपणाने तेथून जाऊं लागला.(२६-३१

अक्षय कांतीने युक्त असलेल्या चंद्राची शोभा ज्याप्रमाणे क्षयाने कमी होत नाही, त्याप्रणाणे एकाएकीं राज्याला मुकण्याने रामाचे मुखावर स्वभावतःच असलेली दिव्य कान्ति मुळीच कमी झाली नाही. जीवन्मुक्ताचे ठिकाणीं ज्याप्रमाणे चित्तविकार दृष्टोत्पत्तीस येत नाहीत, त्याप्रमाणे पृथ्वीचा त्याग करून वनामध्ये जाण्यास उद्युक्त झालेल्या रामाचे ठिकाणीं कांहीएक मनोविकार दृष्टोत्पत्तीस आला नाही. शुभ छत्र व चांगल्या प्रकारें भूषित केलेलीं चामरें व रथ हीं नकों म्हणून परतवून, स्वजन व पौरजन यांचा निरोप घेऊन, मनच्या मनांतच दुःख आवरून धरून आणि इंद्रियांचें संयमन करून, तो विचारी राम ही अप्रिय गोष्ट मातेला विदित करण्याच्या उद्देशाने तिच्या गृहाममध्ये प्रविष्ट झाला. (३२-३५)

× धारयन् मनसा दुःखं इंद्रियाणि निगृह्य च ।
प्रविवेशात्मवान् वेश्म मातुरप्रियशंसिवान् ॥ ३५ ॥

या श्लोकावरून व पुढे कौसल्येची भेट झाल्यावर--

( टिप्पणी पुढे चालू )

**" देवि नूनं न जानीषे महत् भयमुपस्थितम् ।**
**इदं च तव दुःखाय वैदेह्या लक्ष्मणस्य च ॥ "**

( सर्ग २०, श्लोक २७ ).

असें तिला म्हणाला. यावरून व तदनन्तर सीतेच्या महालांत गेल्यावर, सीतेला पाहतांच-

**" तां दृष्ट्वा स हि धर्मात्मा न शशाक मनोगतम् ।**
**तं शोकं राघवः सोढुं ततो विवृततां गतः ॥**

( सर्ग २६, श्लो० ७ )

यावरून, " राज्यभ्रंशाचें " रामाला दुःख झालें, हें तर निर्विवाद आहे. असें असतां—

**न वनं गन्तुकामस्य त्यजतश्च वसुन्धराम् ।**
**सर्वलोकातिगस्येव लक्ष्यते चित्तविक्रिया ॥ "**

( सर्ग १९, श्लो० ३३ )

त्याचप्रमाणे, " **नालक्षयत रामस्य कंचित् आकारमानने** " ॥

( सर्ग । १९-३६ )

म्हणजे, " प्राप्त झालेलें पृथ्वीचें राज्य सोडून, वनांत जावें लागत असल्या-संबन्धांत रामाच्या चेहऱ्यावर कोणत्याही प्रकारें दुःखाची छाया लोकांना दिसून आली नाही, " असें वर्णन आहे. तें रामाच्या मुत्सद्दीपणाचें द्योतक आहे. म्हणजे राजकारणी पुरुष जे असतात, ते आपल्या पोटांत चाललेल्या खळबळीचा यत्-किंचितही विकार आपल्या चेहऱ्यावर केव्हाही दिसूं देत नाहींत, इतके ते गंभीर अन्तःकरणाचे असतात. वनवासाला जाण्याची अत्यन्त अप्रिय आज्ञा ऐकल्याबरोबर अन्तःकरणाला जरी दुःखाचा झटका बसला, तथापि दशर-थाच्या वाड्यांतून कौसल्येच्या ( आईच्या ) महालांत जाईपर्यन्त, इतरेजनांना त्याची जाणीव मुळींच न होऊं देणें, हेंच त्या प्रसंगीं योग्य होतें. आणि म्हणूनच मनांतल्या मनांत दुःख दाबून टेऊन, " जणू काय कांही झालेंच नाही, " अशा प्रकारें चेहऱ्यावर मुळींच विकार दिसूं न देतां, तेथून आईच्या महालांत निघून

**सर्वोऽप्यभिजनः श्रीमाञ्छ्रीमतः सत्यवादिनः ।**
**नालक्षयत रामस्य कंचिदाकारमानने** ३६
**उचितं च महाबाहुर्न जहौ हर्षमात्मवान् ।**
**शारदः समुदीर्णांशुश्चन्द्रस्तेज इवात्मजम्** ३७
**वाचा मधुरया रामः सर्वं संमानयञ्जनम् ।**

तेव्हा अभिषेकोत्सवाकरिता भूषणें धारण करून सभोंवती जमलेल्या लोकांना श्रीमान् व सत्यवादी रामाच्या मुखावर कसलाही विकार दिसला नाही. इतकेंच नव्हे, परंतु उज्ज्वल किरणांनी युक्त झालेला शरदृतूंतील चंद्र ज्याप्रमाणे आपलें तेज सोडीत नाही, त्याप्रमाणे त्या जितेंद्रिय व महापराक्रमी रामाने आपल्या स्वाभाविक धैर्याला उचित असलेला हर्ष सोडिला नाही. असो. मधुर वाणीने सर्व

( टिप्पणी पुढे चालू )

गेला; पण जेव्हा प्रत्यक्ष "जन्मदात्री" आई व पुढे प्रिय पत्नी सीता हीं अत्यन्त जिव्हाळ्याचीं माणसें समोर दृष्टीस पडलीं, त्याबरोबर रामाला दुःख दाबून ठेवणें अशक्य झालें व जोराचा उमाळा आला आणि आईपुढे "**महत् भयमुपस्थितम्**" असे शब्द सहजच निघाले आणि सीता दृष्टीस पडतांक्षणीं तर "बांधच फुटला." आणि इतका वेळपर्यंत महत् प्रयासाने आवरून धरलेला दुःखाचा ओघ दुप्पट वेगाने बाहेर आला. येवढें जरी दुःख झालें, तथापि तें आपलें "वैय्यक्तिक दुःख" म्हणून एकीकडे सारून, "पित्राज्ञा पालनरूप पुत्रधर्मपालनालाच" अधिक महत्त्व रामाने दिलें.

भारतीय युद्धाचे समयीं "अर्जुनापुढे" देखील "स्वजन कीं स्वधर्म" हा प्रश्न उभा राहिला होता. व येथे श्रीरामापुढेही "वैय्यक्तिक सुख कीं स्वधर्म" हा प्रश्न उभा राहिला होता. अर्जुनाचा मोह नष्ट करून, स्वजनांच्या अपेक्षया स्वधर्मपालनाकडेसच त्याची प्रवृत्ति करण्यास त्याला भगवान् गुरु मिळावे लागले. श्रीरामाने आपल्या वैय्यक्तिक "राज्योपभोगरूप सुखाच्या" अपेक्षया, वनवासजन्य दुःखाचादेखील अंगीकार करून, "पित्राज्ञारूप स्वधर्मपालन करणें" हेंच श्रेयस्कर आहे, असा निश्चय स्वयमेव आपल्या आपणच केला, हें विशेष आहे.

मातुः समीपं धर्मात्मा प्रविवेश महायशाः ३८
तं गुणैः समतां प्राप्तो भ्राता विपुलविक्रमः ।
सौमित्रिरनुवव्राज धारयन् दुःखमात्मजम् ३९
प्रविश्य वेश्मातिभृशं मुदा युतं समीक्ष्य तां चार्थविपत्तिमागताम् ।
न चैव रामोऽत्र जगाम विक्रियां सुहृज्जनस्यात्मविपत्तिशङ्कया ४०

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकोनविंशः सर्गः॥१९॥

विंशः सर्गः । [ ८७० ]

तस्मिंस्तु पुरुषव्याघ्रे निष्क्रामति कृताञ्जलौ ।
आर्तशब्दो महाञ्जज्ञे स्त्रीणामन्तःपुरे तदा १
कृत्येष्वचोदितः पित्रा सर्वस्यान्तःपुरस्य च
गतिश्च शरणं चासीत्स रामोऽद्य प्रवत्स्यति २
कौसल्यायां यथा युक्तो जनन्यां वर्तते सदा ।
तथैव वर्ततेऽस्मासु जन्मप्रभृति राघवः ३
न क्रुध्यत्यभिशप्तोऽपि क्रोधनीयानि वर्जयन् ।

---

लोकांचा मान राखीत राखीत तो धर्मात्मा व महायशस्वी राम मातेचे समीप गेला असतां, गुणांनी त्याची साम्यता पावलेला महापराक्रमी भ्राता लक्ष्मणही आपलें दुःख आवरून धरून त्याच्या मागोमाग गेला. लोकांना मान देत देत तो राम मातेच्या गृहामध्ये प्रविष्ट झाल्यावर तें गृह अत्यंत आनंदित झालेलें आहे, असें अवलोकन करून व प्राप्त झालेली ऐश्वर्यहानीही लक्ष्यांत घेऊन, कौसल्या, दशरथ वगैरे सुहृदांना कदाचित् प्राणांतिक दुःख होईल, असा विचार मनांत आल्यामुळे रामाने कोणताही विकार दर्शविला नाही. ( ३६–४० )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी एकोणीसावा सर्ग समाप्त झाला ॥ १९ ॥

तो पुरुषश्रेष्ठ राम हात जोडून बाहेर जाऊं लागला असतां अंतःपुरामध्ये स्त्रियांनी एकच कल्होळ करून सोडिला. " सर्व अंतःकरणाचा आश्रय आणि रक्षणकर्ता जो राम तो पित्याने सांगितलें नसूनही आज वनवासाला जाणार आहे. जननी कौसल्या हिच्या सेवेविषयी जसा राम तत्पर असे, तसाच आमच्या

क्रुद्धान् प्रसादयन् सर्वान् स इतोऽद्य प्रवत्स्यति ४
अबुद्धिर्बत नो राजा जीवलोकं चरत्ययम्।
यो गतिं सर्वभूतानां परित्यजति राघवम् ५
इति सर्वा महिष्यस्ता विवत्सा इव धेनवः।
पतिमाचुक्रुशुश्चापि सस्वनं चापि चुक्रुशुः ६
स हि चान्तःपुरे घोरमार्तशब्दं महीपतिः।
पुत्रशोकाभिसन्तप्तः श्रुत्वा व्यालीयतासने ७
रामस्तु भृशमायस्तो निःश्वसन्निव कुञ्जरः।
जगाम सहितो भ्रात्रा मातुरन्तःपुरं वशी ८
सोऽपश्यत्पुरुषं तत्र वृद्धं परमपूजितम्।
उपविष्टं गृहद्वारि तिष्ठतश्चापरान् बहून् ९
दृष्ट्वैव तु तदा रामं ते सर्वे समुपस्थिताः।
जयेन जयतां श्रेष्ठं वर्धयन्ति स्म राघवम् १०

सेवेंतही तो जन्मापासून तत्पर असे. कोणी निंदा केली असतांही जो रागावत नाही आणि कोणी त्याला क्रोध येण्यासारखे शब्द बोलले, तरी ते तो मनावर न घेतां विसरून जातो आणि जो नेहमी क्रुद्ध झालेल्यांना प्रसन्न करून घेत असतो, तो राम आज प्रवासाला जाणार. प्राणिमात्रांचें आश्रयस्थान असलेल्या रामाचा त्याग करणारा हा आमचा राजा खरोखर अविचारी असून प्रजांचा नाश करण्यास उद्युक्त झाला आहे." ( १-५ )

सारांश, वत्सरहित झालेल्या गाईप्रमाणे ज्यांची स्थिति झाली आहे, अशा त्या सर्व राजस्त्रिया पतीची निंदा करून मोठमोठ्याने आक्रोश करूं लागल्या, तेव्हा अंतःपुरांत झालेला दुःखित जनांचा तो घोर शब्द श्रवण केल्यावर पुत्रशोकाने संतप्त झालेला राजा मंचकांत डोकें खुपसून पडला; परंतु स्वजनांना दुःख झाल्यामुळे अत्यंत खिन्न झालेला मनोनिग्रही राम हत्तीप्रमाणे सुस्कारे टाकीत, भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान मातेच्या अंतःपुरामध्ये गेला. तों अत्यंत वृद्ध असा एक पुरुष त्या अंतःपुराच्या द्वाराशीं बसलेला असून, इतर पुष्कळ लोक उभे आहेत, असें त्याने अवलोकन केलें. ते सर्व लोक राम दृष्टी पडतांक्षणीं उभे राहिले

प्रविश्य प्रथमां कक्ष्यां द्वितीयायां ददर्श सः ।
ब्राह्मणान्वेदसंपन्नान्वृद्धान्राज्ञाभिसत्कृतान् ११
प्रणम्य रामस्तान्वृद्धांस्तृतीयायां ददर्श सः ।
स्त्रियो बालाश्च वृद्धाश्च द्वाररक्षणतत्पराः १२
वर्धयित्वा प्रहृष्टास्ताः प्रविश्य च गृहं स्त्रियः ।
न्यवेदयन्त त्वरितं राममातुः प्रियं तदा १३
कौसल्यापि तदा देवी रात्रिं स्थित्वा समाहिता ।
प्रभाते चाकरोत्पूजां विष्णोः पुत्रहितैषिणी १४
सा क्षौमवसना हृष्टा नित्यं व्रतपरायणा ।
अग्निं जुहोति स्म तदा मन्त्रवत्कृतमङ्गलम् १५
प्रविश्य तु तदा रामो मातुरन्तःपुरं शुभम् ।
ददर्श मातरं तत्र हावयन्तीं हुताशनम् १६
देवकार्यनिमित्तं च तत्रापश्यत्समुद्यतम् ।
दध्यक्षतघृतं चैव मोदकान्हविषस्तथा १७

---

आणि विजयी व श्रेष्ठ अशा रघुवंशज रामाचा जयजयकार करूं लागले. ( ६-१० )

एका चौकांत गेल्यावर दुसऱ्या चौकामध्ये राजाने मानमान्यता राखिलेले असे वैदिक वृद्ध ब्राह्मण त्याने अवलोकन केले आणि त्या वृद्धांना प्रणाम करून निघाल्यावर तिसऱ्या चौकामध्ये लहानथोर स्त्रिया द्वाररक्षणाविषयी तत्पर असलेल्या त्याच्या दृष्टीस पडल्या. रामाला अवलोकन केल्यावर त्या स्त्रियांनी आनंदित होऊन, त्याला आशीर्वाद दिले आणि घरांत जाऊन राममातेला ती प्रिय गोष्ट त्यांनी सत्वर निवेदन केली. राजपत्नी कौसल्येनेहि रात्रभर व्रतस्थ राहून पुत्राचें हित व्हावें या उद्देशाने, प्रभातसमयीं विष्णूची पूजा केली आणि सोळयाचें वस्त्र नेसून समंत्रक स्वस्तिवाचन झालेली व नेहमी आनंदित व व्रतस्थ असणारी कौसल्या त्या वेळीं अग्नीमध्ये हवन करीत बसली होती. ( ११-१५ )

मातेच्या शुभ अंतःपुरामध्ये प्रविष्ट झाल्यावर त्या ठिकाणीं माता अग्नीमध्ये ऋत्विजांकडून होम करवीत आहे, असें रामाच्या दृष्टीस पडलें. देवकार्याकरिता दधि, अक्षता, घृत, मोदक व इतर हविर्द्रव्यें आणि लाह्या, श्वेत पुष्पें, पायस,

लाजान्माल्यानि शुक्लानि पायसं कृसरं तथा ।
समिधः पूर्णकुम्भांश्च ददर्श रघुनन्दनः १८
तां शुक्लक्षौमसंवीतां व्रतयोगेन कर्शिताम् ।
तर्पयन्तीं ददर्शाद्भिर्देवतां वरवर्णिनीम् १९
सा चिरस्यात्मजं दृष्ट्वा मातृनन्दनमागतम् ।
अभिचक्राम संहृष्टा किशोरं वडवा यथा २०
स मातरमुपक्रान्तामुपसंगृह्य राघवः ।
परिष्वक्तश्च बाहुभ्यामवघ्रातश्च मूर्धनि २१
तमुवाच दुराधर्षं राघवं सुतमात्मनः ।
कौसल्या पुत्रवात्सल्यादिदं प्रियहितं वचः २२
वृद्धानां धर्मशीलानां राजर्षीणां महात्मनाम् ।
प्राप्नुह्यायुश्च कीर्तिं च धर्मं चाप्युचितं कुले २३
सत्यप्रतिज्ञं पितरं राजानं पश्य राघव ।
अद्यैव त्वां स धर्मात्मा यौवराज्येऽभिषेक्ष्यति २४
दत्तमासनमालभ्य भोजनेन निमन्त्रितः ।

तिलमिश्रित चरु, समिधा व जलपूर्ण कुंभ हीं तेथे सिद्ध ठेवलेलीं त्या रघुनंदन रामाने अवलोकन केलीं. व्रताचरणाने कृश झालेली आपली माता इष्ट हेतु सिद्धीस नेण्याच्या उद्देशाने पांढरी पैठणी नेसून देवतेचें तर्पण करीत आहे, असें रामाने अवलोकन केलें. मातेला आनंद देणारा असा आपला पुत्र बऱ्याच वेळाने आलेला पाहून, घोडी ज्याप्रमाणे शिंगराकडे धावत जाते, त्याप्रमाणे तीही मोठ्या आनंदाने रामाकडे धावतच गेली. ( १६–२० )

तेव्हा आपल्याकडे आलेल्या मातेला रामाने अभिवंदन केल्यावर तिनेही त्याला हातांनी कवटाळून धरून त्याचें मस्तक हुंगलें आणि ती कौसल्या आपल्या अजिंक्य अशा रघुवंशज पुत्राला प्रिय आणि हितावह शब्दांनी पुत्रप्रेमामुळे म्हणाली, " वृद्ध आणि धर्मनिष्ठ अशा महात्म्या राजर्षींचे आयुष्य, कीर्ति आणि कुलाला उचित असा धर्म हीं तुला प्राप्त होवोत. हे राघवा, पहा तुझा पिता भूपति कसा सत्यवचनी आहे तो !! तो धर्मात्मा आजच तुला यौवराज्याचा अभिषेक कर-

मातरं राघवः किञ्चित्प्रसार्याञ्जलीमब्रवीत् २५
स स्वभावविनीतश्च गौरवाच्च तथानतः ।
प्रस्थितो दण्डकारण्यमाप्रष्टुमुपचक्रमे २६
देवि नूनं न जानीषे महद्भयमुपस्थितम् ।
इदं तव च दुःखाय वैदेह्या लक्ष्मणस्य च २७
गमिष्ये दण्डकारण्यं किमनेनासनेन मे ।
विष्टरासनयोग्यो हि कालोऽयं मामुपस्थितः २८
चतुर्दश हि वर्षाणि वत्स्यामि विजने वने ।
कन्दमूलफलैर्जीवन्हित्वा मुनिवदामिषम् २९
भरताय महाराजो यौवराज्यं प्रयच्छति ।
मां पुनर्दण्डकारण्यं विवासयति तापसम् ३०
स षट् चाष्टौ च वर्षाणि वत्स्यामि विजने वने ।
आसेवमानो वन्यानि फलमूलैश्च वर्तयन् ३१

णार आहे. आता तूं येथेच भोजन करून राजदर्शनाला जा. " असें सांगून कौसल्येने रामाला आसन दिलें; परंतु त्याच्यावर न बसतां त्याला केवळ हस्तस्पर्श करून व जोडिलेले हात थोडेसे पुढे करून मातेशीं राम भाषण करूं लागला. ( २१–२५ )

सारांश, स्वभावतःच विनयी आणि मातेचे ठिकाणीं पूज्य बुद्धि असल्यामुळे अधिकच नम्र झालेला आणि दंडकारण्यामध्ये निघालेला तो राम मातेचा निरोप घेऊं लागला की, " हे देवी, खरोखर तुला कांहीच माहीत नाही ! मोठें भय उत्पन्न झालें आहे ! व हें भय तूं, विदेहराजकन्या आणि लक्ष्मण यांच्या खरोखर दुःखाला कारणीभूत होईल. मी दंडकारण्यामध्ये जाणार. मला या आसनाचा काय उपयोग ? आता हा दर्भासनावर बसण्याचा समय मला प्राप्त झाला आहे. मी आता सर्व राजोपभोग्य पदार्थांचा त्याग करून, मुनीप्रमाणे कंद, मुळें व फळें यांवर उपजीविका करीत चवदा वर्षेपर्यंत निर्जन वनामध्ये वास्तव्य करणार. महाराज भरताला यौवराज्य देत असून, मला तापस–वेष धारण करून दण्डकारण्यांत पाठवीत आहेत. तस्मात्, चवदा वर्षेपर्यंत फलमूलांवर उपजीविका करून

सा निकृत्तेव सालस्य यष्टिः परशुना वने ।
पपात सहसा देवी देवतेव दिवश्च्युता ३२
तामदुःखोचितां दृष्ट्वा पतितां कदलीमिव ।
रामस्तूत्थापयामास मातरं गतचेतसम् ३३
उपावृत्त्योत्थितां दीनां वडवामिव वाहिताम् ।
पांसुगुण्ठितसर्वाङ्गीं विममर्श च पाणिना ३४
सा राघवमुपासीनमसुखार्ता सुखोचिता ।
उवाच पुरुषव्याघ्रमुपशृण्वति लक्ष्मणे ३५
यदि पुत्र न जायेथा मम शोकाय राघव ।
न स्म दुःखमतो भूयः पश्येयमहमप्रजाः ३६
एक एव हि वन्ध्यायाः शोको भवति मानसः ।
अप्रजास्मीति सन्तापो न ह्यन्यः पुत्र विद्यते ३७
न दृष्टपूर्वं कल्याणं सुखं वा पतिपौरुषे ।
अपि पुत्रे विपश्येयमिति रामास्थितं मया ३८

---

आणि वानप्रस्थांना योग्य अशा कर्माचें अवलंबन करून, मी चवदा वर्षे निर्जन वनामध्ये वास्तव्य करणार." ( २६–३१ )

हे पुत्राचे शब्द ऐकून कुऱ्हाडीने तोडिलेली साल वृक्षाची फांदी जशी वनामध्ये पडते, तशी स्वर्गांतून च्युत झालेल्या देवतेप्रमाणे ती राजपत्नी कौसल्या एकाएकी भूमीवर पडली. तेव्हा दुःख भोगण्याला योग्य नसलेली आपली माता मूर्छित होऊन केळाप्रमाणे पडलेली अवलोकन केल्याबरोबर रामाने तिला उठविलें आणि पूर्वी भार वाहून थकवा आल्यावर त्याचा परिहार करण्याकरिता भूमीवर लोळून उठलेल्या घोडीप्रमाणे सर्वांग धुळीने भरलेल्या त्या दीन मातेला त्याने आपल्या हाताने उठून बसाविलें व तिच्या अंगास लागलेली धूळ पुसली. तेव्हा सुख भोगण्यालाच योग्य असून दुःखाकुल झालेली ती कौसल्या समीप बसलेल्या पुरुषश्रेष्ठ रामाला लक्ष्मण ऐकत असतांना म्हणाली. ( ३२–३५ )

" हे राघवा, जर तूं मला शोक करावयास लावण्यासाठीं तूं जन्मालाच आला नसतास, तर मी वंध्या आहें, यापेक्षा अधिक दुःख पाहण्याची मला पाळी

सा बह्वन्यमनोज्ञानि वाक्यानि हृदयच्छिदाम् ।
अहं श्रोष्ये सपत्नीनामवराणां परा सती ३९
अतो दुःखतरं किंनु प्रमदानां भविष्यति ।
मम शोको विलापश्च यादृशोऽयमनन्तकः ४०
त्वयि सन्निहितेऽप्येवमहमासं निराकृता ।
किं पुनः प्रोषिते तात ध्रुवं मरणमेव हि ४१
अत्यन्तं निगृहीतास्मि भर्तुर्नित्यमसंमता ।
परिवारेण कैकेय्याः समा वाप्यथवावरा ४२
यो हि मां सेवते कश्चिदपि वाप्यनुवर्तते ।
कैकेय्या पुत्रमन्वीक्ष्य स जनो नाभिभाषते ४३
नित्यक्रोधतया तस्याः कथं नु खरवादिनम् ।

आली नसती. वंध्या स्त्रीच्या मनाला " मी वंध्या आहें, " येवढेंच काय तें दुःख वाटत असतें. हे पुत्रा, तिला दुसरें कसलेंही दुःख नसतें. हे रामा, पतीच्या प्रेमामुळे होणारें सुख आजपर्यंत मला जरी पहावयाला मिळालें नाही आणि माझी कोणती हौसही जरी मला पुरवून घेतां आली नाही, तरी माझ्या पुत्राच्या राज्यामध्ये या गोष्टी मला पहावयास सापडतील, अशा आशेने हे रामा, मी आजपर्यंत कुडींत प्राण धरून राहिलें आहें. तेव्हा अशा प्रकारें अगदी जर्जर झालेली मी सर्वांत वरिष्ठ असूनही मला आता कनिष्ठ सवतींचीं हृदयाला घरे पाडणारीं बोलणीं ऐकून घेण्याचा आणखीही प्रसंग येणार. अरे, हा जो मला अशा प्रकारचा अक्षय शोक व विलाप करीत बसण्याचा प्रसंग आलेला आहे, यापेक्षा स्त्रियांना अधिक दुःखदायक अशी कोणती बरें गोष्ट आहे ? अरे तूं जवळ असतांही जर माझा अशा प्रकारें नेहमी पाणउतारा केला जात असतो, तर बाबा, तूं वनामध्ये गेल्यावर मग काय विचारावयाचें ? मला खात्रीने मरणदेखील येईल. भर्त्याची मर्जी माझ्यावर कधीच नसल्यामुळे कैकेयीच्या दासीप्रमाणे अथवा दासीपेक्षाही कमी समजून, माझा अतिशय अपमान होत असतो. (३९-४२)

जो माझी सेवा करीत आहे किंवा जो कोणी माझ्या मनाप्रमाणे वागत आहे, तोसुद्धा कैकेयीचा पुत्र आलेला पाहून माझ्याशीं बोलेनासा होईल. तस्मात्, अशी

कैकेय्या वदनं द्रष्टुं पुत्र शक्ष्यामि दुर्गता ४४
सप्त दश च वर्षाणि जातस्य तव राघव।
अतीतानि प्रकाङ्क्षन्त्या मया दुःखपरिक्षयम्। ४५
तदक्षयं महद् दुःखं नोत्सहे सहितुं चिरात्।
विप्रकारं सपत्नीनामेवं जीर्णापि राघव ४६
अपश्यन्ती तव मुखं परिपूर्णशशिप्रभम्।
कृपणा वर्तयिष्यामि कथं कृपणजीविका ४७
उपवासैश्च योगैश्च बहुभिश्च परिश्रमैः।
दुःखसंवर्धितो मोघं त्वं हि दुर्गतया मया ४८
स्थिरं नु हृदयं मन्ये ममेदं यन्न दीर्यते।
प्रावृषीव महानद्या स्पृष्टं कूलं नवाम्भसा ४९
ममैव नूनं मरणं न विद्यते न चावकाशोऽस्ति यमक्षये मम।
यदन्तकोऽद्यैव न मां जिहीर्षति प्रसह्य सिंहो रुदतीं मृगीमिव ५०

विपन्न स्थिति मला प्राप्त झाली असतांना, हे पुत्रा, नेहमीच्या रागीटपणामुळे मर्मभेदक भाषण करणारें कैकेयीचें तोंड माझ्याने कसें रे पहावेल? हे राघवा; आपल्या दुःखाचा परिहार आज होईल, उद्या होईल, अशी वाट पहात पहात तुझ्या जन्मापासून सात, ( दहा आणि ) दहा अशी सत्तावीस वर्षे गेलीं आणि हे राघवा, आधीच मी अशी जर्जर झालेली आहें, आता यापुढे तरी सवतीने केलेला अपमान सहन करण्याचें बळ माझ्या अंगीं राहिलें नाही. पूर्ण चंद्राप्रमाणे असलेलें तुझें मुख दृष्टिआड झालें असतां मी बिचारीने दीनवाणपणाने उपजीविका करून कसे बरें दिवस कंठावेत? अनेक प्रकारें कष्ट सोसून मी जे उपासतापास केले आणि देवांची सेवा केली व अशा रीतीने मी भाग्यहीन बायकोने जें दुःख भोगून तुला वाढविलें, तें व्यर्थच झालें! ( ४३-४८ )

वर्षाकालीं नवीन उदकाचा स्पर्श झालेल्या महानदीचे तीराप्रमाणे ज्या अर्थी हें माझें हृदय विदीर्ण होऊन जात नाही, त्या अर्थी तें मोठें कठिण आहे, असें मला वाटतें. अरे, शोक करीत बसलेल्या हरणीला एकाएकी उचलून नेणाऱ्या सिंहाप्रमाणे मृत्यु मला नेण्याचा विचार मनांत आणीत नाही, यावरून मी अमर आहें व यमाच्या

स्थिरं हि नूनं हृदयं ममायसं न भिद्यते यद्भुवि नो विदीर्यते ।
अनेन दुःखेन च देहमर्पितं ध्रुवं ह्यकाले मरणं न विद्यते ५१
इदं तु दुःखं यदनर्थकानि मे व्रतानि दानानि च संयमाश्च हि ।
तपश्च तप्तं यदपत्यकाम्यया सुनिष्फलं बीजमिवोप्तमूषरे ५२
यदि ह्यकाले मरणं यदृच्छया लभेत कश्चिद्गुरुदुःखकर्शितः ।
गताहमद्यैव परेतसंसदं विना त्वया धेनुरिवात्मजेन वै ५३
अथापि किं जीवितमद्य मे वृथा त्वया विना चन्द्रनिभाननप्रभ ।
अनुव्रजिष्यामि वनं त्वयैव गौः सदुर्बला वत्समिवाभिकाङ्क्षया ५४
भृशमसुखममर्षिता यदा बहु विललाप समीक्ष्य राघवम् ।
व्यसनमुपनिशाम्य सा महत्सुतमिव बद्धमवेक्ष्य किन्नरी ५५

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे विंशः सर्गः ।२०। [९२५]

देखील घरीं मला ठाव नाहीं हेंच खरें. खरोखर माझें हृदय ज्या अर्थी या प्रसंगीं फाटून जात नाही त्या अर्थी तें लोखंडाचें बनविल्याप्रमाणे बळकट आहे आणि अशा प्रकारच्या दुःखाने देह व्याप्त झाला असतांनाही ज्या अर्थी तो विदीर्ण होऊन पृथ्वीवर पडत नाही त्या अर्थी अकालीं मरण कोणाला येत नाही, हेंच निश्चित आहे. पुत्रप्राप्तीच्या आशेने केलेलीं व्रतें, दानें व नेमधर्म हीं सर्व व्यर्थ होऊन, केलेलें तपही उखीर जमिनीमध्ये पेरलेल्या बीजाप्रमाणे अगदीं निष्फल झालें, ही फारच दुःखाची गोष्ट आहे. ( ४९-५२ )

मोठ्या दुःखाने जर्जर झालेल्या एखाद्याला जर स्वेच्छेने अकालीं मरण प्राप्त होत असतें, तर वत्साचा वियोग झालेल्या धेनूप्रमाणे तुझा वियोग झालेली मी आजच्या आजच यमाच्या घरीं चालती झालें असतें. तथापि, हे इंदुवदना, तुझ्यावाचून आज हें माझें निंद्य जीवन व्यर्थ आहे, करिता अतिशय थकलेली गायही वात्सल्यामुळे जशी आपल्या वासराच्या मागोमाग वनामध्ये जाते, त्याप्रमाणे मी अशी थकलेली असतांनाही तुझ्या मागोमाग वनामध्ये येईन.” अतिशय दुःख सहन होईनासें होऊन आणि सवतीमुळे आपणांला आणखीही मोठें दुःख प्राप्त झालें आहे, हें अवलोकन करून व आपला पुत्र राघव सत्यपाशाने बद्ध झाला आहे, हें मनांत आणून दुःखित झालेल्या किन्नरीप्रमाणे ती

एकविंशः सर्गः ।

तथा तु विलपन्तीं तां कौसल्यां राममातरम् ।
उवाच लक्ष्मणो दीनस्तत्कालसदृशं वचः १
न रोचते ममाप्येतदार्ये यद्राघवो वनम् ।
त्यक्त्वा राज्यश्रियं गच्छेत्स्त्रिया वाक्यवशंगतः २
विपरीतश्च वृद्धश्च विषयैश्च प्रधर्षितः ।
नृपः किमिव न ब्रूयाच्चोद्यमानः समन्मथः ३
नास्यापराधं पश्यामि नापि दोषं तथाविधम् ।
येन निर्वास्यते राष्ट्राद्वनवासाय राघवः ४
न तं पश्याम्यहं लोके परोक्षमपि यो नरः ।
स्वामित्रोऽपि निरस्तोऽपि योऽस्य दोषमुदाहरेत् ५
देवकल्पमृजुं दान्तं रिपूणामपि वत्सलम् ।
अवेक्षमाणः को धर्मं त्यजेत्पुत्रमकारणात् ६

कौसल्या अशा प्रकारें फारच विलाप करूं लागली. ( ५३–५५ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी विसावा सर्ग समाप्त झाला ॥ २० ॥

याप्रमाणे विलाप करीत असलेल्या त्या राममाता कौसल्येला अवलोकन करून लक्ष्मण दीन झाला आणि त्या समयालाच शोभणाऱ्या अशा शब्दांनी तिला म्हणाला, " हे माते, राज्यलक्ष्मीचा त्याग करून राघव वनामध्ये जाणार आहे, हें मलाही नीट दिसत नाही. स्त्रीच्या भाषणाला वश झालेला, विषयांच्या तावडींत सापडलेला आणि म्हातारपणामुळे बुद्धीला चळ लागलेला हा विषयी व वृद्ध राजा कैकेयी प्रेरणा करूं लागली असतां कोणती बरें बडबड करणार नाही ? दशरथाने रामाला राष्ट्रांतून हाकून देऊन वनवासांत पाठवावें, अशा प्रकारचा राजद्रोहासारखा अपराध किंवा महापातक रामाने केल्याचें माझ्या तर कांहीं दृष्टोत्पत्तीस येत नाही. रामाने अपमान करून सोडिलेला हाडवैरी जरी असला तरी त्याच्या ( रामाच्या ) मागेसुद्धा त्याचा दोष काढणारा पुरुष या जगतामध्ये कोणी असेलसा मला दिसत नाही. ( १–५ )

तदिदं वचनं राज्ञः पुनर्बाल्यमुपेयुषः ।
पुत्रः को हृदये कुर्याद्राजवृत्तमनुस्मरन् ७
यावदेव न जानाति कश्चिदर्थमिमं नरः ।
तावदेव मया सार्धमात्मस्थं कुरु शासनम् ८
मया पार्श्वे सधनुषा तव गुप्तस्य राघव ।
कः समर्थोऽधिकं कर्तुं कृतान्तस्येव तिष्ठतः ९
निर्मनुष्यामिमां सर्वामयोध्यां मनुजर्षभ ।
करिष्यामि शरैस्तीक्ष्णैर्यदि स्थास्यति विप्रिये १०
भरतस्याथ पक्ष्यो वा यो वास्य हितमिच्छति ।
सर्वांस्तांश्च वधिष्यामि मृदुर्हि परिभूयते ११
प्रोत्साहितोऽयं कैकेय्या सन्तुष्टो यदि नः पिता ।
अमित्रभूतो निःसङ्गं बध्यतां वध्यतामपि १२
गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः ।

---

सारांश, देवासारखा निष्पाप, कायावाचामनेंकरून अत्यन्त सरळ, सुशिक्षित व जितेन्द्रिय आणि शत्रुवरही दया करणारा अशा पुत्राचा निष्कारण त्याग करण्यास कोण बरें धर्माची चाड बाळगणारा पुरुष उद्युक्त होईल आणि राजनीतीला अनुसरून वागणारा कोणता बरें पुत्र पोरकटपणा करणाऱ्या या राजाच्या वचनाला मान देईल ? तस्मात्, ही गोष्ट बाहेर कोणाला समजली नाही, तोंच माझ्या सहाय्याने तूं राज्यकारभार आपल्याकडे घे. हे राघवा, काळासारखा मी तुझ्या पाठीमागे धनुष्य घेऊन रक्षण करीत असतांना कोण बरें तुझ्याशीं अतिप्रसंग करण्यास समर्थ आहे ? ही अयोध्या जरी विरुद्ध झाली, तरी हे पुरुषश्रेष्ठा, तीक्ष्ण बाणांनी मी ती सर्व निर्मनुष्य करून टाकीन आणि भरताच्या बाजूचा अथवा त्याचें हित इच्छिणारा जो कोणी असेल, त्या सर्वांचाही मी वध करीन; कारण मऊ सापडलें म्हणजे लोक कोपराने खणूं लागतात. ( ६-११ )

कैकेयीने प्रोत्साहन दिल्यामुळे तिच्यावर संतुष्ट होऊन पिता जर आमचा शत्रु झाला असेल तर, त्याची मुळीच भीड न धरतां, त्याला बांधून टाकण्याला अथवा त्याचा वध करण्यालाही कांही हरकत नाही; कारण विवेकभ्रष्ट झाल्या-

उत्पथं प्रतिपन्नस्य कार्यं भवति शासनम् १३
बलमेष किमाश्रित्य हेतुं वा पुरुषोत्तम ।
दातुमिच्छति कैकेय्यै उपस्थितमिदं तव १४
त्वया चैव मया चैव कृत्वा वैरमनुत्तमम् ।
कास्य शक्तिः श्रियं दातुं भरतायारिशासन १५
अनुरक्तोऽस्मि भावेन भ्रातरं देवि तत्त्वतः ।
सत्येन धनुषा चैव दत्तेनेष्टेन ते शपे १६
दीप्तमग्निमरण्यं वा यदि रामः प्रवेक्ष्यति ।
प्रविष्टं तत्र मां देवि त्वं पूर्वमवधारय १७
हरामि वीर्याद् दुःखं ते तमः सूर्य इवोदितः ।
देवी पश्यतु मे वीर्यं राघवश्चैव पश्यतु १८
हनिष्ये पितरं वृद्धं कैकेय्यासक्तमानसम् ।
कृपणं च स्थितं बाल्ये वृद्धभावेन गर्हितम् १९

कारणाने कार्याकार्यविवेक न राहिल्यामुळे उन्मार्गाला प्रवृत्त झालेल्या गुरूलाही शासन करणें अवश्य आहे. हे पुरुषोत्तमा, न्यायाने तुला प्राप्त झालेलें हें राज्य हा राजा आज कोणाच्या जोरावर अथवा कोणता हेतु मनांत धरून कैकेयीच्या स्वाधीन करण्याची इच्छा करीत आहे ? हे शत्रुदमना, तुझ्याशीं व माझ्याशीं मोठें वैर बांधून भरताला राज्यलक्ष्मी देण्याला याचें काय सामर्थ्य लागून गेलें आहे ? ( १२-१५ )

हे देवी, मी मनापासून आपल्या भ्रात्यावर प्रेम करीत आहें, हें मी तुला सत्य, धनुष्य, दान आणि यज्ञयाग यांची शपथ घेऊन सांगत आहें. हे देवी, प्रदीप्त अग्नीमध्ये अथवा अरण्यामध्ये जर राम प्रवेश करणार असला, तर त्या ठिकाणीं मी त्याच्या आधीं प्रवेश करीन, हें तूं समजून ऐस. उदय पावलेला सूर्य ज्याप्रमाणे अंधकाराचा नाश करितो, त्याप्रमाणे मी आपल्या सामर्थ्याने तुझ्या दुःखाचा नाश करून टाकितों. राघवाला आणि देवीला एकदा माझें सामर्थ्य दृष्टीं पडूं देच. वृद्धपणामुळे विचारशून्य होऊन कैकेयीचे ठिकाणींच मन गुंतल्यामुळे पोरकटपणा धरून शोचनीय झालेल्या या वृद्ध पित्याला मी आज वाटेला लावतों. (१६-१९)

एतत्तु वचनं श्रुत्वा लक्ष्मणस्य महात्मनः ।
उवाच रामं कौसल्या रुदती शोकलालसा २०
भ्रातुस्ते वदतः पुत्र लक्ष्मणस्य श्रुतं त्वया ।
यदत्रानन्तरं तत्त्वं कुरुष्व यदि रोचते २१
न चाधर्म्यं वचः श्रुत्वा सपत्न्या मम भाषितम् ।
विहाय शोकसन्तप्तां गन्तुमर्हसि मामितः २२
धर्मज्ञ इति धर्मिष्ठ धर्मं चरितुमिच्छसि ।
शुश्रूष्व मामिहस्थस्त्वं चर धर्ममनुत्तमम् २३
शुश्रूषुर्जननीं पुत्र स्वगृहे नियतो वसन् ।
परेण तपसा युक्तः काश्यपस्त्रिदिवं गतः २४
यथैव राजा पूज्यस्ते गौरवेण तथा ह्यहम् ।
त्वां साहं नानुजानामि न गन्तव्यमितो वनम् २५
त्वद्वियोगान्न मे कार्यं जीवितेन सुखेन च ।
त्वया सह मम श्रेयस्तृणानामपि भक्षणम् २६

हे महात्म्या लक्ष्मणाचें भाषण श्रवण करून रडत असलेली, शोकाकुल झालेली ती कौसल्या रामाला म्हणाली, "हे पुत्रा, तुझा भ्राता लक्ष्मण बोलत आहे तें तूं ऐकिलेंच आहेस. याकरिता आता यानंतर जर तुला त्याचें बोलणें उचित दिसत असेल, तर तूं त्याप्रमाणे कर. माझ्या सवतीनें उच्चारिलेलें धर्मविरुद्ध भाषण श्रवण केल्यावर शोकसंतप्त झालेल्या माझा त्याग करून येथून जाणें तुला योग्य नाहीं. हे धर्मनिष्ठा, तूं धर्मवेत्ता आहेस; म्हणून आज्ञा परिपालनरूप धर्मच आचारण करण्याची जर तुझी इच्छा असेल, तर राज्याचा त्याग करून तूं येथेच रहा आणि माझी शुश्रूषा कर आणि मातृशुश्रूषारूप उत्कृष्ट धर्माचें तूं आचरण कर. हे पुत्रा, मातेची शुश्रूषा करण्याच्या उद्देशानें स्वगृहींच शुद्ध राहून वास्तव्य करणारा काश्यप मोठ्या तपश्चर्येनें युक्त होऊन म्हणजे मोठ्या तपश्चर्येप्रमाणे मातृसेवेचें फल प्राप्त होऊन स्वर्गाला गेला. ज्याप्रमाणे राजा तुला पूज्य आहे, त्याप्रमाणे श्रेष्ठपणामुळे मीही तुला पूज्य आहें. तस्मात्, मी तुला अनुज्ञा देत नाहीं; व तूं येथून वनामध्ये जाऊं नकोस. तुझा वियोग झाल्यावर सुखाशीं आणि जीविताशीं

यदि त्वं यास्यसि वनं त्यक्त्वा मां शोकलालसाम् ।
अहं प्रायमिहासिष्ये न च शक्ष्यामि जीवितुम् २७
ततस्त्वं प्राप्स्यसे पुत्र निरयं लोकविश्रुतम् ।
ब्रह्महत्यामिवाधर्मात्समुद्रः सरितां पतिः २८
विलपन्तीं तथा दीनां कौसल्यां जननीं ततः ।
उवाच रामो धर्मात्मा वचनं धर्मसंहितम् २९
नास्ति शक्तिः पितुर्वाक्यं समतिक्रमितुं मम ।
प्रसादये त्वां शिरसा गन्तुमिच्छाम्यहं वनम् ३०
ऋषिणा च पितुर्वाक्यं कुर्वता वनचारिणा ।
गौर्हता जानता धर्मं कण्डुना च विपश्चिता ३१
अस्माकं तु कुले पूर्वं सगरस्याज्ञया पितुः ।
खनद्भिः सागरैर्भूमिमवाप्तः सुमहान्वधः ३२
जामदग्न्येन रामेण रेणुका जननी स्वयम् ।
कृत्ता परशुनारण्ये पितुर्वचनकारणात् ३३

तरी मला काय करावयाचें आहे ? तृण भक्षण करूनही तुझ्यासहवर्तमान राहण्यांत माझें कल्माण आहे. याहीवर शोकाकुल झालेल्या माझा त्याग करून जर तूं वनांत जाशील, तर मी अन्नपाणी सोडून मरणाच्या द्वारीं बसेन; तुझा वियोग झाला असतां मी जिवन्त राहूं शकणार नाहीं. असें झालें असतां सिंधुपति समुद्राला मातेला दुःख देणें या अधर्मामुळे जसें ब्रह्महत्त्येचें पातक प्राप्त झालें, तसा हे पुत्रा, लोकविख्यात नरक तुला प्राप्त होईल." ( २०–२८ )

याप्रमाणे दीन होऊन विलाप करीत असलेल्या कौसल्या मातेला धर्मात्मा राम धर्माला अनुसरून असलेल्या शब्दांनी म्हणाला, "पित्याने जें सांगितलें, त्याचें उल्लंघन करण्याचें मला सामर्थ्य नाही. मी चरणीं मस्तक ठेऊन तुझी प्रार्थना करितों; माझी वनांत जाण्याची इच्छा आहे. वनामध्ये संचार करणाऱ्या धर्मज्ञ व विचारी कंडु ऋषींनी पित्याची आज्ञा परिपालन करण्याकरिता गोवध केला आणि आमच्या कुलामध्येही पित्या सगराच्या आज्ञेने भूमि खणूं लागलेल्या सगरपुत्रांना अत्यंत घोर वध प्राप्त झाला व पित्याच्या सांगण्यामुळे जमदग्निपुत्र परशुरामाने तर

एतैरन्यैश्च बहुभिर्दिवि देवसमैः कृतम् ।
पितुर्वचनमक्लीबं करिष्यामि पितुर्हितम् ३४
न खल्वेतन्मयैकेन क्रियते पितृशासनम् ।
एतैरपि कृतं देवि ये मया परिकीर्तिताः ३५
नाहं धर्ममपूर्वं ते प्रतिकूलं प्रवर्तये ।
पूर्वैरयमभिप्रेतो गतो मार्गोऽनुगम्यते ३६
तदेतत्तु मया कार्यं क्रियते भुवि नान्यथा ।
पितुर्हि वचनं कुर्वन्न कश्चिन्नाम हीयते ३७
तामेवमुक्त्वा जननीं लक्ष्मणं पुनरब्रवीत् ।
वाक्यं वाक्यविदां श्रेष्ठः श्रेष्ठः सर्वधनुष्मताम् ३८
तव लक्ष्मण जानामि मयि स्नेहमनुत्तमम् ।
विक्रमं चैव सत्त्वं च तेजश्च सुदुरासदम् ३९
मम मातुर्महद् दुःखमतुलं शुभलक्षण ।
अभिप्रायं न विज्ञाय सत्यस्य च शमस्य च ४०

---

अरण्यामध्ये कुऱ्हाडीने स्वतः आपली जननी रेणुका तोडून टाकिली. (२९-३३)

यांनी व स्वर्गातील देवांप्रमाणे असलेल्या इतरही पुष्कळांनी ज्याप्रमाणे धैर्याने पित्याचें वचन सफल केलें. त्याप्रमाणे मी न भिता पित्याचें सांगणें शेवटास नेऊन त्याचें हित करीन. हे देवी, मी एकटाच आज पित्याची आज्ञा परिपालन करीत आहें, अशांतली गोष्ट नाही; ज्यांचीं नांवें मी आताच तुला सांगितलीं त्यांनीही असेंच केलें आहे. तुला प्रतिकूल असा कांही नवीन धर्म मी आज प्रवृत्त करीत नाहीं. पूर्वीच्या लोकांनाही अभिमत असून त्यांनी आचरिलेल्या या मार्गानेच मी जात आहें. तस्मात्, भूलोकामध्ये करण्याला उचित असेंच पित्याचें वचन मी करीत आहें, भलतेंच कांही कृत्य मी करीत नाहीं. पित्याच्या सांगण्याप्रमाणे वागण्याने कोणचीही हानि होत नाही. ( ३४-३७ )

याप्रमाणे त्या मातेला सांगून संभाषण करणाऱ्यांमध्ये आणि सर्व धनुर्धरांमध्ये श्रेष्ठ असा राम पुनरपि लक्ष्मणाला म्हणाला, "लक्ष्मणा, माझे ठिकाणीं तुझें उत्कृष्ट प्रेम, पराक्रम, धैर्य आणि दुसऱ्याला सहन होण्यास अतिशयच कठिण असें तुझें

धर्मो हि परमो लोके धर्मे सत्यं प्रतिष्ठितम् ।
धर्मसंश्रितमप्येतत्पितुर्वचनमुत्तमम् ४१
संश्रुत्य च पितुर्वाक्यं मातुर्वा ब्राह्मणस्य वा ।
न कर्तव्या वृथा वीर धर्ममाश्रित्य तिष्ठता ४२
सोऽहं न शक्ष्यामि पुनर्नियोगमतिवर्तितुम् ।
पितुर्हि वचनाद्वीर कैकेय्याहं प्रचोदितः ४३
तदेतां विसृजानार्यां क्षत्रधर्माश्रितां मतिम् ।
धर्ममाश्रय मा तैक्ष्ण्यं मद्बुद्धिरनुगम्यताम् ४४
तमेवमुक्त्वा सौहार्दाद्भ्रातरं लक्ष्मणाग्रजः ।
उवाच भूयः कौसल्यां प्राञ्जलिः शिरसा नतः ४५
अनुमन्यस्व मां देवि गमिष्यन्तमितो वनम् ।
शापितासि मम प्राणैः कुरु स्वस्त्ययनानि मे ४६
तीर्णप्रतिज्ञश्च वनात्पुनरेष्याम्यहं पुरीम् ।

तेज हीं सर्व मी जाणीत आहें. हे सुलक्षणा लक्ष्मणा, सत्य आणि शम यांचें तत्त्व विदित नसल्यामुळे माझ्या मातेला मोठें अनुपम दुःख झालेलें आहे. या जगतामध्यें धर्म श्रेष्ठ असून धर्माच्याच आधारावर सत्य आहे आणि माझ्या पित्याचें हें उत्कृष्ट वचनही धर्मालाच अनुसरून आहे. करिता, हे वीरा, सांगण्या-प्रमाणे वागेन असें पित्याला, मातेला अथवा ब्राह्मणाला वचन दिल्यावर धर्माला अनुसरून वागणाऱ्या पुरुषानें तें व्यर्थ करणें योग्य नाही. पित्याच्या आज्ञेचें उल्लंघन करण्यास मी समर्थ नाहीं. हे वीरा, पित्याच्याच आज्ञेवरून कैकेयीनें हें मला सांगितलें आहे. तस्मात् केवळ राजनीतीला अनुसरून असलेली ही कुबुद्धि सोडून दे व संतप्त न होतां धर्माचें अवलंबन कर आणि माझ्या विचाराप्रमाणें वाग." ( ३८--४४ )

याप्रमाणे प्रेमामुळे भ्रात्या लक्ष्मणाला सांगितल्यावर राम हात जोडून व मस्तक नम्र करून कौसल्येला म्हणाला, " हे देवी, तुला माझ्या प्राणांची शपथ आहे, तूं मला येथून वनांत जाण्याला अनुज्ञा दे आणि कल्याणकारक असे आशी-र्वाद तूं मला दे. राजर्षि ययाति पूर्वी स्वर्गांतून च्युत होऊन भूमीवर पडल्यानंतर

ययातिरिव राजर्षिः पुरा हित्वा पुनर्दिवम् ४७
शोकः सन्धार्यतां मातर्हृदये साधु मा शुचः ।
वनवासादिहैष्यामि पुनः कृत्वा पितुर्वचः ४८
त्वया मया च वैदेह्या लक्ष्मणेन सुमित्रया ।
पितुर्नियोगे स्थातव्यमेष धर्मः सनातनः ४९
अम्ब संभृत्य संभारान्दुःखं हृदि निगृह्य च ।
वनवासकृता बुद्धिर्मम धर्म्यानुवर्त्यताम् ५०
एतद्वचस्तस्य निशम्य माता सुधर्म्यमव्यग्रमविक्लवं च ।
मृतेव संज्ञां प्रतिलभ्य देवी समीक्ष्य रामं पुनरित्युवाच ५१
यथैव ते पुत्र पिता तथाहं गुरुः स्वधर्मेण सुहृत्तया च ।
न त्वानुजानामि न मां विहाय सुदुःखितामर्हसि पुत्र गन्तुम् ५२
किं जीवितेनेह विना त्वया मे लोकेन वा किं स्वधयामृतेन ।
श्रेयो मुहूर्तं तव सन्निधानं ममैव कृत्स्नादपि जीवलोकात् ५३

जसा पुनरपि स्वर्गाला गेला, तसा प्रतिज्ञा शेवटास नेऊन मी पुनरपि वनांतून या नगरामध्ये येईन. हे माते, आपल्या मनामध्ये शोक आवरून धर; असा अमंगलकारक शोक करीत बसूं नकोस; पित्याची आज्ञा शेवटास नेल्यानंतर मी पुनरपि वनांतून येथे परत येईन. तूं, मी, विदेहराजकन्या, लक्ष्मण आणि सुमित्रा यांनीं पित्याच्या आज्ञेप्रमाणे वागावें, हाच सनातन धर्म आहे. हे माते, मनामध्ये दुःख आवरून धरून आणि माझ्या वनवासाची तयारी करून वनवासासंबंधी या माझ्या धर्माला अनुसरून असलेल्या विचाराला तूं अनुमोदन दे." ( ४५--५० )

हें अत्यंत धर्मयुक्त, धैर्यसंपन्न आणि निर्भय असें त्याचें भाषण श्रवण केल्यावर मूर्छित झालेली ती राममाता देवी कौसल्या शुद्धीवर येऊन पुनरपि रामाला म्हणाली, " हे पुत्रा, ज्याप्रमाणे पिता तुला पूज्य आहे, तशी स्वधर्म आणि प्रेम हीं लक्ष्यांत घेतलीं असतां, मीही आहें. यास्तव मी तुला जाण्याची अनुज्ञा देत नाहीं; व मी अतिशय दुःखित असतांना माझा त्याग करून जाणें, हे पुत्रा, तुलाही योग्य नाही. तुझा वियोग झाल्यावर जीविताशीं, जगताशीं इतर देव इत्यादिकांच्या पूजनाशीं अथवा मोक्षसाधनाशीं मला काय कर्तव्य आहे ? सर्व लोकांच्या सान्नि-

नरैरिवोल्काभिरपोह्यमानो महागजो ध्वान्तमभिप्रविष्टः ।
भूयः प्रजज्वाल विलापमेवं निशम्य रामः करुणं जनन्याः ५४
स मातरं चैव विसंज्ञकल्पामार्तं च सौमित्रिमभिप्रतप्तम् ।
धर्मे स्थितो धर्म्यमुवाच वाक्यं यथा स एवार्हति तत्र वक्तुम् ५५
अहं हि ते लक्ष्मण नित्यमेव जानामि भक्तिं च पराक्रमं च ।
मम त्वभिप्रायमसंनिरीक्ष्य मात्रा सहाभ्यर्दसि मा सुदुःखम् ५६
धर्मार्थकामाः खलु जीवलोके समीक्षिता धर्मफलोदयेषु ।
ये तत्र सर्वे स्युरसंशयं मे भार्येव वश्याभिमता सपुत्रा ५७
यस्मिंस्तु सर्वे स्युरसंनिविष्टा धर्मो यतः स्यात्तदुपक्रमेत ।
द्वेष्यो भवत्यर्थपरो हि लोके कामात्मता खल्वपि न प्रशस्ता ५८

---

घ्यापेक्षा क्षणभर तुझ्या संनिध असण्यांतच माझें कल्याण आहे. " (५१–५३)

याप्रमाणे मातेचा दीन विलाप श्रवण केल्यावर, हातांत चुडी घेऊन लोक टोचूं लागले असतां रात्रीं अंधकारामध्ये शिरलेल्या महागजाप्रमाणे राम अधिकच क्षुब्ध झाला आणि जवळ जवळ मूर्छित झालेल्या मातेला व संतप्त झालेल्या लक्ष्मणाला उद्देशून तो धर्मनिष्ठ राम धर्माला अनुसरून असें भाषण करूं लागला. अशा प्रकारचें भाषण तशा प्रसंगीं हीं करण्याला तोच एक योग्य होता. तो म्हणाला "( हे लक्ष्मणा, तुझी भक्ति व पराक्रम यांची मला सर्वकाल जाणीव आहे; परंतु तूं माझा अभिप्राय लक्ष्यांत न घेतां मातेसहवर्तमान दुःखित होत आहेस; त्यास तूं इतकें दुःख करूं नकोस. पूर्वार्जित पुण्याचें फल प्राप्त होण्याचा समय आला असतां जगतामध्ये धर्म, अर्थ आणि काम हे जे तिन्ही पुरुषार्थ धर्मफल म्हणून मन्वादिकांनी मानिलेले आहेत. ते सर्वही त्यांपैकीं एक धर्म असला, म्हणजे त्याचे पाठोपाठ हेही अवश्य असतातच; याविषयीं मला कसलाही संदेह नाहीं. सारांश अनुकूल, अभिमत आणि पुत्रवती अशी एक भार्या असली, म्हणजे धर्म, अर्थ आणि काम या तिहींनाही साधनीभूत जशी ना एकटीच होते, तसा एक धर्म असला, म्हणजे तो इतरांच्याही अस्तित्वाला कारणीभूत होतो. ( तस्मात्, धर्मच मुख्य आहे आणि म्हणून त्याचेंच रक्षण करणें योग्य आहे. ) ज्या कर्मामध्ये धर्म, अर्थ आणि काम यांचा कांहीं

गुरुश्च राजा च पिता च वृद्धः क्रोधात्प्रहर्षादथवापि कामात् ।
यद्व्यादिशेत्कार्यमवेक्ष्य धर्मं कस्तं न कुर्यादनृशंसवृत्तिः ५९
न तेन शक्नोमि पितुः प्रतिज्ञामिमां न कर्तुं सकलां यथावत् ।
स ह्यावयोस्तात गुरुर्नियोगे देव्याश्च भर्ता स गतिश्च धर्मः ६०
तस्मिन्पुनर्जीवति धर्मराजे विशेषतः स्वे पथि वर्तमाने ।
देवी मया सार्धमितोऽभिगच्छेत्कथं स्विदन्या विधवेव नारी ६१
मा मानुमन्यस्व वनं व्रजन्तं कुरुष्व नः स्वस्त्ययनानि देवि ।
यथा समाप्ते पुनराव्रजेयं यथा हि सत्येन पुनर्ययातिः ६२
यशो ह्यहं केवलराज्यकारणान्न पृष्ठतः कर्तुमलं महोदयम् ।
अदीर्घकाले न तु देवि जीविते वृणेऽवरामद्य महीमधर्मतः ६३

संबन्ध नसेल, त्या कर्माला आरंभ करूं नये. ज्याच्यापासून धर्मप्राप्ति होईल, त्याचाच उपक्रम करावा; कारण, धर्माची पर्वा न करिता केवळ अर्थाकडे लक्ष्य न देणारा पुरुष लोकांमध्ये द्वेषाला पात्र होतो आणि धर्मविरुद्ध विषय-तत्परता तर अतीच निंद्य आहे. (५४-५८)

तात्पर्य, गुरु, राजा, पिता व वृद्ध इतकीं नातीं लक्ष्यांत घेतलीं असतां तो क्रोधामुळे, हर्षामुळे अथवा विषयवासनेमुळे जें कांही कार्य सांगेल, तें धर्माची चाड बाळगणारा कोण बरें सच्छील पुत्र करणार नाही ? यास्तव पित्याची ही प्रतिज्ञा अगदी पाहिजे तशी पूर्ण रीतीनें सिद्धीस नेल्यावाचून माझ्यानें राहवणार नाहीं. कारण, बा लक्ष्मणा, तो आपला गुरु आपणांला आज्ञा करण्याला मुख्त्यार आहे आणि भर्ता असल्यामुळे मातेचाही आधार व धर्म तोच आहे. भर्ता असतांना स्त्रीला पुत्रावर अवलंबून राहणें योग्य नाही. म्हणून तो धर्मराज विद्यमान असतांना आणि विशेषतः आपल्या मार्गानें वागत असतांना दुसऱ्या एखाद्या विधवा स्त्रीप्रमाणे मातेला माझ्याबरोबर वनामध्ये येथून कसें बरें येतां येईल ? यास्तव, हे देवी, वनांत निघालेल्या मला तूं अनुज्ञा दे आणि आम्हांला वनवासामध्ये कल्याणप्रद होतील, अशीं मंगल कृत्यें कर; म्हणजे सत्याच्या योगानें जसा ययाति राजा पुनरपि स्वर्गास गेला, तसा मी वनवास समाप्त झाल्यावर पुनरपि येथे येईन. केवळ राज्याकरिता महाफलदायक अशा यशाविषयी मला

प्रसादयन्नरवृषभः स मातरं पराक्रमाज्जिगमिषुरेव दण्डकान् ।
अथानुजं भृशमनुशास्य दर्शनं चकार तां हृदि जननीं प्रदक्षिणम् ६४

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकविंशः सर्गः ।२१[९८९]

द्वाविंशः सर्गः ।

अथ तं व्यथया दीनं सविशेषममर्षितम् ।
सरोषमिव नागेंद्रं रोषविस्फारितेक्षणम् १
आसाद्य रामः सौमित्रिं सुहृदं भ्रातरं प्रियम् ।
उवाचेदं स धैर्येण धारयन्सत्त्वमात्मवान् २
निगृह्य रोषं शोकं च धैर्यमाक्रम्य केवलम् ।
अवमानं निरस्यैनं गृहीत्वा हर्षमुत्तमम् ३
उपक्लृप्तं यदैतन्मे अभिषेकार्थमुत्तमम् ।

पराङ्मुख होतां येणार नाही. सारांश, हे देवी, ज्या अर्थी मनुष्याचें जीवित अल्पकालपर्यंत आहे, हें निश्चित आहे, त्या अर्थी अधर्माने आज ही क्षुद्र पृथ्वी प्राप्त करून घेण्याची मी इच्छा करीत नाही. ( ५९-६३ )

याप्रमाणे मातेचें मन वळविणारा तो पुरुषश्रेष्ठ राम पराक्रमाने दंडकारण्यामध्येच जाण्याविषयी उद्युक्त झाला आणि लक्ष्मणाला आपला विचार आणखी समजावून सांगून मातेला प्रदक्षिणा केल्यावर वनवासास जाण्याचाच विचार त्याने मनामध्ये निश्चित केला. ( ६४ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी एकविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २१ ॥

नंतर रामाच्या राज्यहानीचें, त्याच्या इतर मित्रांपेक्षा अधिक दुःख झाल्यामुळे दीन झालेला आणि म्हणून क्रुद्ध नागराजाप्रमाणे सन्तापाने डोळे वटारलेला, पण अत्यन्त सरळ स्वभावाचा, असा जो प्रिय भ्राता लक्ष्मण त्याच्याकडे वळून तो मनोनिग्रही राम मन आवरून धरून धैर्याने त्याला म्हणाला, " रोष आणि शोक आवरून धरून, केवळ धैर्याचें अवलंबन करून, हा अवमान झाला आहे, अशी समजूत टाकून देऊन आणि ' उत्कृष्ट प्रकारचा ' आनंद मानून माझ्या अभिषेकाकरिता जी उत्कृष्ट प्रकारची सामग्री जुळविली आहे, ती सर्व सत्वर एकीकडे

सर्वं निवर्तय क्षिप्रं कुरु कार्यं निरव्ययम् ४
सौमित्रे योऽभिषेकार्थे मम संभारसंभ्रमः ।
अभिषेकनिवृत्त्यर्थे सोऽस्तु संभारसंभ्रमः ५
यस्या मदभिषेकार्थे मानसं परितप्यति ।
माता नः सा यथा न स्यात्सविशङ्का तथा कुरु ६
तस्याः शङ्कामयं दुःखं मुहूर्तमपि नोत्सहे
मनसि प्रतिसंजातं सौमित्रेऽहमुपेक्षितुम् ७
न बुद्धिपूर्वं नाबुद्धं स्मरामीह कदाचन ।
मातृणां वा पितुर्वाहं कृतमल्पं च विप्रियम् ८
सत्यः सत्याभिसन्धश्च नित्यं सत्यपराक्रमः ।
परलोकभयाद्भीतो निर्भयोऽस्तु पिता मम ९
तस्यापि हि भवेदस्मिन्कर्मण्यप्रतिसंहृते ।
सत्यं नेति मनस्तापस्तस्य तापस्तपेच्च माम् १०
अभिषेकविधानं तु तस्मात्संहृत्य लक्ष्मण ।

---

ठेव आणि माझें मुख्य कर्तव्य जें वनामध्ये गमन, तें अडथळा न येतां सिद्धीस जाण्याची तजवीज कर. हे लक्ष्मणा, माझ्या अभिषेकाचें सामान जितक्या त्वरेने जुळविण्यांत आलें आहे, तितक्या त्वरेने वनवासांत जाण्याच्या सामग्रीची तयारी झाली पाहिजे. ( १-५ )

माझ्या अभिषेकामुळे जिच्या मनाला संताप झालेला आहे, ती आपली माता कैकेयी निश्चिंत होईल असें कर. हे लक्ष्मणा, तिच्या मनामध्ये उत्पन्न झालेल्या चिंतादुःखाची एक क्षणभरही उपेक्षा करणें मला गोड वाटणार नाही. मातांना अथवा पित्याला अप्रिय असलेली क्षुल्लकही गोष्ट समजून अथवा न समजून कधीही केल्याचें मला स्मरत नाही. खरें बोलणारा, प्रतिज्ञा खरी करणारा आणि अमोघ पराक्रम असा जो माझा पिता परलोकभीतीस्तव असल्याला भ्याला आहे, तो निर्भय होवो. हें अभिषेककृत्य जर बंद केलें नाही तर, कैकेयीला दिलेलें आपलें वचन सत्य होत नाही, म्हणून त्याच्या मनाला पीडा होईल. ( ६-१० )

तस्मात्, हे लक्ष्मणा, हें अभिषेकविधान एकीकडे सारून या नगरांतून शीघ्र

अन्वगेवाहमिच्छामि वनं गन्तुमितः पुरः ११
मम प्रव्राजनादद्य कृतकृत्या नृपात्मजा ।
सुतं भरतमव्यग्रमभिषेचयतां ततः १२
मयि चीराजिनधरे जटामण्डलधारिणि ।
गतेऽरण्यं च कैकेय्या भविष्यति मनःसुखम् १३
बुद्धिः प्रणीता येनेयं मनश्च सुसमाहितम् ।
तं नु नार्हामि संक्लेष्टुं प्रव्रजिष्यामि माचिरम् १४
कृतान्त एव सौमित्रे द्रष्टव्यो मत्प्रवासने ।
राज्यस्य च वितीर्णस्य पुनरेव निवर्तने १५
कैकेय्याः प्रतिपत्तिर्हि कथं स्यान्मम वेदने ।
यदि तस्या न भावोऽयं कृतान्तविहितो भवेत् १६
जानासि हि यथा सौम्य न मातृषु ममान्तरम् ।
भूतपूर्वं विशेषो वा तस्या मयि सुतेऽपि वा १७
सोऽभिषेकनिवृत्त्यर्थैः प्रवासार्थैश्च दुर्वचैः ।
उग्रैर्वाक्यैरहं तस्या नान्यद्दैवात्समर्थये १८

वनांतच जाण्याची माझी इच्छा आहे. माझ्या वनवासांत जाण्याने राजकन्या कैकयी कृतकृत्य होऊन आपल्या भरतनामक पुत्राला खुशाल राज्याभिषेक करवो. वल्कलें, अजिन व जटाजूट धारण करून मी अरण्यामध्ये गेलों असतां कैकेयीच्या मनाला सुख होईल. ज्याने तिला ही बुद्धि शिकवून तिच्या मनाला पटवून दिलें त्याला दुःख देणें मला योग्य नाही. मी आता विलंब न करितां वनामध्ये जाणार. पुढें आलेलें राज्य हुसकून लावून माझ्या वनवासाविषयी प्रेरणा करणारें दैवच आहे असें समजलें पाहिजे. ( ११--१५ )

कारण, तसें नसतें तर कैकेयीच्या मनांत असें कसें आलें असतें ? यावरून हें कृत्य दैवाचेंच आहे, तिचें नाही, असो. हे सौम्य लक्ष्मणा, सर्व मातांचे ठिकाणीं माझी अंतःकरणवृत्ति सारखी आहे, हेंही तुला माहीत आहे व तीही भरत व मी यांस सारखीच लेखीत असून माझ्या अभिषेकाला विघ्न करून मीं वनांत जावें, म्हणून फार उग्र वाक्यें बोलली, हेंही सर्व दैवाचेंच कृत्य आहे, असें मी समजतों. नाही तर

कथं प्रकृतिसंपन्ना राजपुत्री तथागुणा ।
ब्रूयात्सा प्राकृतेव स्त्री मत्पीड्यं भर्तृसंनिधौ १९
यदचिन्त्यं तु तद्दैवं भूतेष्वपि न हन्यते ।
व्यक्तं मयि च तस्यां च पतितो हि विपर्ययः २०
कश्च दैवेन सौमित्रे योद्धुमुत्सहते पुमान् ।
यस्य नु ग्रहणं किंचित्कर्मणोऽन्यन्न दृश्यते २१
सुखदुःखे भयक्रोधौ लाभालाभौ भवाभवौ ।
यस्य किंचित्तथाभूतं ननु दैवस्य कर्म तत् २२
ऋषयोऽप्युग्रतपसो दैवेनाभिप्रचोदिताः ।
उत्सृज्य नियमांस्तीव्रान्भ्रश्यन्ते काममन्युभिः २३
असंकल्पितमेवेह यदकस्मात्प्रवर्तते
निवर्त्यारब्धमारम्भैर्ननु दैवस्य कर्म तत् २४
एतया तत्त्वया बुद्ध्या संस्तभ्यात्मानमात्मना ।

तशा प्रकारच्या गुणांनी युक्त ती राजकन्या एखाद्या सामान्य स्त्रीप्रमाणे आपल्या पतीसमोर, स्वतः सत्त्वशील असतांना, कसें बरें बोलेल ? मला त्रास देण्यासारखें अतर्क्य असें जें दैव, तें कोणत्याही प्राण्याचे ठिकाणीं कुंठित होत नाही, हें अगदी निश्चित आहे. तस्मात्, त्या दैवामुळेच तिच्या मनामध्ये विपरीत गोष्ट आली असून, माझ्या संबंधानें राज्यलक्ष्मी आलेली नाहीशी होणें हा विपरीत प्रकार त्यामुळेच झालेला आहे. ( १६–२० )

ज्या दैवाचें स्वरूप फलावाचून दुसरें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं, त्या दैवाशीं झगडून, त्याचें निवारण करण्यास कोण बरें समर्थ आहे ? सुख व दुःख, भय आणि क्रोध, लाभ व हानि आणि उत्पत्ति व विनाश यांपैकीं ज्याला जें प्राप्त होतें, तें दैवाचेंच कर्म होय. उग्र तपश्चर्या करणारे ऋषीदेखील दैवानें प्रेरणा केली असतां आपल्या कडकडीत नियमांचा त्याग करितात आणि काम व क्रोध यांच्या तावडींत सापडून तपापासून भ्रष्ट होतात. यत्नांनीं आरंभिलेलें कार्य हाणून पडून मनामध्येही कधीं न आणिलेली गोष्ट ज्या अर्थीं एकाएकीं होत आहे, त्या अर्थीं खरोखर तें दैवाचेंच कर्म होय. यथार्थ विचार लक्ष्यांत घेऊन, स्वतः मन आवरून

व्याहतेऽप्यभिषेके मे परितापो न विद्यते २५
तस्मादपरितापः संस्त्वमप्यनुविधाय माम् ।
प्रतिसंहारय क्षिप्रमाभिषेचनिकीं क्रियाम् २६
एभिरेव घटैः सर्वैरभिषेचनसंभृतैः ।
मम लक्ष्मण तापस्ये व्रतस्नानं भविष्यति २७
अथवा किं ममैतेन राज्यद्रव्यमयेन तु ।
उद्धृतं मे स्वयं तोयं व्रतादेशं करिष्यति २८
मा च लक्ष्मण संतापं कार्षीर्लक्ष्म्या विपर्यये ।
राज्यं वा वनवासो वा वनवासो महोदयः २९
न लक्ष्मणास्मिन्मम राज्यविघ्ने माता यवीयस्यभिशङ्कितव्या ।
दैवाभिपन्ना न पिता कथंचिज्जानासि दैवं हि तथा प्रभावम् ३०

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे द्वाविंशः सर्गः ॥२२॥ [१०१९]

धरिलें असल्यामुळे अभिषेक हाणून पाडला गेला, तरीसुद्धा मला वाईट वाटत नाही. ( २१-२५ )

तस्मात्, संतापून न जातां तूंही माझेंच अनुकरण कर व अभिषेकसमारंभाकरितां धारण केलेले हे अलंकार सत्वर काढून टाक. हे लक्ष्मणा, अभिषेकाकरिता जुळविलेल्या या सर्व कुंभांच्या योगाने तपोरूप व्रताचा संकल्प करण्याकरिता माझें व्रतग्रहणार्थ स्नान होईल अथवा राज्याभिषेकासाठी सिद्ध करून ठेवलेल्या अनेक मंगल पदार्थांनी युक्त असें हें उदक तरी मला कशाला पाहिजे? मी स्वतः आणिलेल्या उदकानेच माझा व्रतग्रहणाचा संकल्प होईल. हे लक्ष्मणा, लक्ष्मीचा उलट प्रकार झाल्याविषयी तूं संतापून जाऊं नकोस; कारण राज्य आणि वनवास यांमध्ये वनवासच अत्यन्त श्रेयस्कर आहे. हे लक्ष्मणा, या राज्यविघ्नाचे मुळाशीं आपली कनिष्ठ माता आहे, अशी तूं मुळींच शंका घेऊं नकोस; कारण ती माता आणि पिता हीं दोन्हीही दैवाधीन झालेलीं आहेत आणि दैवाचाही तसा प्रभाव असल्याचें तूं जाणीत आहेस. ( २६-३० )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी बाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २२ ॥

त्रयोविंशतिः सर्गः ।

इति ब्रुवति रामे तु लक्ष्मणोऽवाक्शिरा इव ।
ध्यात्वा मध्यं जगामाशु सहसा दैन्यहर्षयोः १
तथा तु बद्ध्वा भ्रुकुटीं भ्रुवोर्मध्ये नरर्षभः ।
निशश्वास महासर्पो बिलस्थ इव रोषितः २
तस्य दुष्प्रतिवीक्ष्यं तद् भ्रुकुटीसहितं तदा ।
बभौ क्रुद्धस्य सिंहस्य मुखस्य सदृशं मुखम् ३
अग्रहस्तं विधुन्वंस्तु हस्ती हस्तमिवात्मनः ।
तिर्यगूर्ध्वं शरीरे च पातयित्वा शिरोधराम् ४
अग्राक्ष्णा वीक्षमाणस्तु तिर्यग्भ्रातरमब्रवीत् ।
अस्थाने संभ्रमो यस्य जातो वै सुमहानयम् ५
धर्मदोषप्रसङ्गेन लोकस्यानतिशङ्कया ।
कथं ह्येतदसंभ्रान्तस्त्वद्विधो वक्तुमर्हति ६
यथा ह्येवमशौण्डीरं शौण्डीरः क्षत्रियर्षभः ।
किं नाम कृपणं दैवमशक्तमभिशंससि ७

याप्रमाणे राम भाषण करूं लागला असतां लक्ष्मणानें खाली मान घातल्यासारिखें केलें. रामाच्या भाषणाचा विचार केल्यानंतर त्याचें मन दुःख व हर्ष यांचेमध्यें हेलकावे घेऊं लागलें आणि क्रोधानें भिवया चढवून तो पुरुषश्रेष्ठ लक्ष्मण बिळांतील क्रुद्ध झालेल्या महासर्पाप्रमाणें फुस्कारे टाकूं लागला. तेव्हां क्रोधानें भिवया चढल्यामुळें त्या लक्ष्मणाचें तें मुख क्रुद्ध झालेल्या सिंहाच्या मुखाप्रमाणें पाहण्यालाही फारच भयंकर दिसूं लागलें. तदनंतर हत्ती ज्याप्रमाणें आपली सोंड हालवितो, त्याप्रमाणें आपला उजवा हात हालवीत हालवीत रागानें इकडेतिकडे व खालीवर माना करीत आणि नेत्रकटाक्षानें पहात पहात भ्रात्या रामाला म्हणाला, " पित्याची आज्ञा उल्लंघिली असतां धर्माला विरोध येईल, तो न यावा, एतदर्थ लोकापवादाची वृथा भीति बाळगून वनांत जाण्याचा जो तुझे ठिकाणीं हा अतिशयच उतावीळपणा उत्पन्न झाला आहे, तो भ्रांतिमूलक म्हणून अयोग्य आहे. नाहीतर तुझ्यासारिखा निर्भ्रांत व समर्थ क्षत्रियश्रेष्ठ अशा प्रकारचें पोचट

पापयोस्ते कथं नाम तयोः शङ्का न विद्यते ।
सन्ति धर्मोपधासक्ता धर्मात्मन्किं न बुध्यसे ८
तयोः सुचरितं स्वार्थं शाठ्यात्परिजिहीर्षतोः ।
यदि नैवं व्यवसितं स्याद्धि प्रागेव राघव ९
तयोः प्रागेव दत्तश्च स्याद्वरः प्रकृतश्च सः ।
लोकविद्विष्टमारब्धं त्वदन्यस्याभिषेचनम् १०
नोत्सहे सहितुं वीर तत्र मे क्षन्तुमर्हसि ।
येनैवमागता द्वैधं तव बुद्धिर्महामते ११
सोऽपि धर्मो मम द्वेष्यो यत्प्रसङ्गाद्विमुह्यसि ।
कथं त्वं कर्मणा शक्तः कैकेयीवशवर्तिनः १२
करिष्यसि पितुर्वाक्यमधर्मिष्ठं विगर्हितम् ।

भाषण कसें बरें करील ? अरे, पौरुषाशी टक्कर देण्यास असमर्थ असलेल्या क्षुद्र दैवाची तूं कशाकरिता इतकी प्रतिष्ठा सांगत आहेस ? ( १–७ )

त्या दुष्ट स्त्रीपुरुषासंबंधाने अर्थात् कैकेयी व दशरथ यांच्या संबंधाने तुझ्या मनांत शंका कशी नाहीं ? हे धर्मात्म्या रामा, धर्माचें पांघरूण घेऊन आंतून पुरुष पापासक्त असतात, हें तुला माहीत नाहीं कीं काय ? कपटानें तुझा त्याग करण्याची इच्छा करणाऱ्या त्या उभयतांचा स्वार्थ, तुझ्या वनांत जाण्यानें चांगला साधला आहे, हें तूं जाणीत नाहींस काय ? हे राघवा, असें जर ठरलेलें नसतें, तर प्रस्तुत जो वर पुढे आला आहे, त्याची देवघेव त्यांच्यांत पूर्वीच व्हावयाला पाहिजे होती. ज्या अर्थी असें झालें नाहीं, त्या अर्थी पूर्वी वर देऊं केला होता व तो आजपर्यंत मागावयाचा राहिला होता, हें सर्व कांहीतरी खोटें निमित्त पुढे केलें आहे. तुला टाकून दुसऱ्याला अभिषेक करण्याचा जो यांनी उपक्रम केला आहे, तोही लोकनिंदेस पात्र असल्यामुळे सहन करण्याची माझी इच्छा नाहीं. ( ८–११ )

यास्तव, हे वीरा, त्याबद्दल तूं मला क्षमा कर. ज्याच्या योगानें, हे महामते, तुझी बुद्धि अशी द्विधा झाली, तो धर्मही मला पसंत नाहीं. कारण त्याच्याचमुळे तूं असा मोह पावला आहेस. अरे, पराक्रम करण्यास तूं समर्थ असतांना

यदयं किल्बिषाद्भेदः कृतोऽप्येवं न गृह्यते १३
जायते तत्र मे दुःखं धर्मसङ्गश्च गर्हितः ।
तवायं धर्मसंयोगो लोकस्यास्य विगर्हितः १४
मनसापि कथं कामं कुर्यात्त्वां कामवृत्तयोः ।
त्वयोस्त्वहितयोर्नित्यं शत्र्वोः पित्रभिधानयोः १५
यद्यपि प्रतिपत्तिस्ते दैवी चापि तयोर्मतम् ।
तथाप्युपेक्षणीयं ते न मे तदपि रोचते १६
विक्लवो वीर्यहीनो यः स दैवमनुवर्तते ।
वीराः संभावितात्मानो न दैवं पर्युपासते १७
दैवं पुरुषकारेण यः समर्थः प्रबाधितुम् ।
न दैवेन विपन्नार्थः पुरुषः सोऽवसीदति १८
द्रक्ष्यन्ति त्वद्य दैवस्य पौरुषं पुरुषस्य च ।
दैवमानुषयोरद्य व्यक्ता व्यक्तिर्भविष्यति १९

---

कैकेयीचा दास बनलेल्या पित्याचें, धर्माला अतिशय सोडून असलेलें, निंद्य बोलणें कां बरें ऐकत आहेस? अरे, हें वराचें निमित्त तुझा अभिषेक हाणून पाडण्याच्या दुष्ट बुद्धीने जाणूनबुजून केलेलें आहे, हें इतकें स्पष्ट झालें असूनही तुला तसें वाटत नाही, याबद्दल मला दुःख होत आहे. खरोखर अशा प्रकारची फाजील धर्मनिष्ठा निंद्य आहे. तुझी ही धर्मनिष्ठा या लोकांनाही निंद्य वाटत आहे. अरे, मातापितर हें ज्यांना नुसतें नांव आहे, अशा या अहितकारक व विषयलंपट शत्रूंचा मनोरथ तुझ्यावाचून इतर कोणी सिद्धीस नेण्याचें मनांत तरी कसें आणील? ( ११–१५ )

आतां " त्यांना जी बुद्धि झाली, ती दैवामुळेच झाली, " असें जरी तुझें मत असलें, तरी तें एकीकडे ठेविलें पाहिजे; कारण तें मला पसंत नाही. अरे, जो भित्रा व वीर्यहीन असतो, तो दैवावर अवलंबून राहतो. समर्थ व स्वाभिमानी पुरुष दैवावर कधीही अवलंबून रहात नाहीत. आपल्या पराक्रमाने दैवाचा प्रतिकार करण्यास जो समर्थ असतो, त्याच्या कार्याचा नाश करण्यास दैव कधीही समर्थ होऊं शकत नाही व तो उमेदही सोडीत नाही. फार कशाला, दैव आणि पुरुष यांचें बल

अद्य मे पौरुषहतं दैवं द्रक्ष्यन्ति वै जनाः ।
यैर्दैवादाहतं तेऽद्य दृष्टं राज्याभिषेचनम् २०
अत्यङ्कुशमिवोद्दामं गजं मदजलोद्धतम् ।
प्रधावितमहं दैवं पौरुषेण निवर्तये २१
लोकपालाः समस्तास्ते नाद्य रामाभिषेचनम् ।
न च कृत्स्नास्त्रयो लोका विहन्युः किं पुनः पिता २२
यैर्विवासस्तवारण्ये मिथो राजन्समर्थितः ।
अरण्ये ते विवत्स्यन्ति चतुर्दशसमास्तथा २३
अहं तदाशां धक्ष्यामि पितुस्तस्याश्च या तव ।
अभिषेकविघातेन पुत्रराज्याय वर्तते २४
मद्बलेन विरुद्धाय न स्याद्दैवबलं तथा ।
प्रभविष्यति दुःखाय यथोग्रं पौरुषं मम २५
ऊर्ध्वं वर्षसहस्रान्ते प्रजापाल्यमनन्तरम् ।
आर्यपुत्राः करिष्यन्ति वनवासं गते त्वयि २६

काय आहे, हें आज लोक पहातील आणि दैव व पुरुषप्रयत्न यांचें स्वरूप आज स्पष्टपणें व्यक्त होईल. दैवामुळे तुझा राज्याभिषेक हाणून पडल्याचें ज्यांनी पाहिलें आहे, ते लोक माझ्या पराक्रमाने दैव हाणून पडल्याचें आज पहातील.(१६-२०)

अंकुशालाही न जुमानितां साखळदंड तोडून धावत चाललेल्या मत्त हत्तीप्रमाणे अनावर झालेल्या या दैवाला मी आज आपल्या पराक्रमाने ताळ्यावर आणितों. हे रामा, संपूर्ण लोकपाल जरी जुळून आले अथवा संपूर्ण तिन्ही लोक जरी एकत्र झाले, तरी तुझा अभिषेक हाणून पाडण्याचें त्यांचें सामर्थ्य नाही. मग या वृद्ध पित्याची कथाच काय ? हे राजा, ज्यांनी तुझा वनवास आपआपणांमध्ये ठरविला असेल, त्यांनाच त्याप्रमाणे चवदा वर्षेपर्यंत अरण्यांत रहावें लागेल. तुझा अभिषेक हाणून पाडून आपल्या पुत्राला राज्य द्यावयाचें, ही जी तिची व पित्याची आशा ती मी दग्ध करून टाकीन. माझ्याशीं विरुद्ध वागणाऱ्याला दुःख देण्यास जसें माझें उग्र पौरुष समर्थ आहे, तसें दैवबल नाही. ( २१-२५ )

सहस्र वर्षें प्रजापालन करून तूं वनवासांत गेलास, म्हणजे तुझे पुत्र राज्य

पूर्वराजर्षिवृत्त्या हि वनवासोऽभिधीयते ।
प्रजा निक्षिप्य पुत्रेषु पुत्रवत्परिपालने २७
स चेद्राजन्यनेकाग्रे राज्यविभ्रमशङ्कया ।
नैवमिच्छसि धर्मात्मन्राज्यं राम त्वमात्मनि २८
प्रतिजाने च ते वीर मा भूवं वीरलोकभाक् ।
राज्यं च तव रक्षेयमहं वेलेव सागरम् २९
मङ्गलैरभिषिञ्चस्व तत्र त्वं व्यापृतो भव ।
अहमेको महीपालानलं वारयितुं बलात् ३०
न शोभार्थाविमौ बाहू न धनुर्भूषणाय मे ।
नासिराबन्धनार्थाय न शराः स्तम्भहेतवः ३१
अमित्रमथनार्थाय सर्वमेतच्चतुष्टयम् ।
न चाहं कामयेऽत्यर्थं यः स्याच्छत्रुर्मतो मम ३२

---

करतील. तेव्हांसुद्धा भरतादिकांचा राज्यावर अधिकार नाहीं. मग सांप्रतची तर गोष्ट कशाला पाहिजे पूर्वी जे राजर्षि होऊन गेले, त्यांचा आचार पाहतां पुत्रवत् परिपालन करण्याकरिता पुत्रांचे स्वाधीन प्रजा करून, नंतर जें वनांत जाणें, त्याला वनवास म्हणतात असें दिसतें. आता, हे धर्मात्म्या रामा, दशरथ राजा चित्त स्थिर नसल्यामुळे प्रतिकूल झाला असतांना त्याच्या आज्ञेला मान न देतां आपण जर राज्याचा स्वीकार केला, तर लोकांना तें रुचणार नाहीं व आपल्या हातचें राज्य जाईल, अशी शंका येऊन जर तूं स्वतःला राज्य नको, असें इच्छित असशील तर, हे वीरा, मर्यादा ज्याप्रमाणे सागराचें रक्षण करिते, त्याप्रमाणे मी तुझें राज्य रक्षण करीन. नाहीं तर वीर-लोक मला प्राप्त होणार नाहीत, ही मी प्रतिज्ञा करतों. मंगलावह साधनांनी तूं आपल्याला अभिषेक करून घे आणि आता तूं तिकडेच लक्ष्य देऊन रहा. आपल्या बलाने राजांचें निवारण करण्यास मी एकटा समर्थ आहें. ( २६--३० )

अरे, हे माझे बाहु कांहीं शोभेकरिता नाहीत; हें धनुष्य कांहीं भूषण म्हणून मी बाळगलेलें नाहीं; ही तरवार मी कांहीं नुसती कंबरेला लटकवून फिरण्या-करिताच घेतलेली नाहीं व हे बाणही तूणीरामध्ये स्वस्थ पडून राहण्याकरिता मी

असिना तीक्ष्णधारेण विद्युच्चलितवर्चसा ।
प्रगृहीतेन वै शत्रुं वज्रिणं वा न कल्पये ३३
खड्गनिष्पेषनिष्पिष्टैर्गहना दुश्चरा च मे ।
हस्त्यश्वरथिहस्तोरुशिरोभिर्भविता मही ३४
खड्गधाराहता मेऽद्य दीप्यमाना इवाग्नयः ।
पतिष्यन्ति द्विषो भूमौ मेघा इव सविद्युतः ३५
बद्धगोधाङ्गुलित्राणे प्रगृहीतशरासने ।
कथं पुरुषमानी स्यात्पुरुषाणां मयि स्थिते ३६
बहुभिश्चैकमत्यस्यन्नेकेन च बहूञ्जनान् ।
विनियोक्ष्याम्यहं बाणान्नृवाजिगजमर्मसु ३७
अद्य मेऽस्त्रप्रभावस्य प्रभावः प्रभविष्यति ।
राज्ञश्चाप्रभुतां कर्तुं प्रभुत्वं च तव प्रभो ३८

धारण केलेले नाहीत. या सर्व चारीही वस्तु शत्रूंचा नाश करण्याकरता आहेत. अरे, जो माझा अत्यंत वैरी म्हणून मला समजून आला, त्याला जिवंत असलेला पाहणें मला सहन होत नाही. विद्युल्लतेप्रमाणे चमकणारें व तीक्ष्ण धारेचें हें माझें खड्ग हातांत असल्यावर प्रत्यक्ष वज्रपाणि इन्द्र जरी शत्रु म्हणून पुढे आला, तरी त्याचीदेखील मी पर्वा बाळगीत नाहीं, त्याचेदेखील तुकडेतुकडे करून टाकीन. माझ्या खड्गाच्या आघाताने तुटलेल्या हत्तींच्या सोंडा, अश्वांच्या तंगड्या आणि रथी पुरुषांचीं मस्तकें यांनी ही पृथ्वी गच्च भरून जाऊन, वरून जाण्यायेण्याला देखील ती अत्यन्त अवघड होईल. माझ्या खड्गाच्या धारेने छिन्नभिन्न झाल्यामुळे इकडेतिकडे उडालेल्या देदीप्यमान अग्नीप्रमाणे अथवा विद्युल्लतेसहवर्तमान असलेल्या मेघाप्रमाणे आज माझे शत्रु भूमीवर पडतील. ( ३१–३५ )

अरे, अंगुलीत्राण चढवून आणि हातांत धनुष्य घेऊन उभा राहिलों असतां पुरुषांमध्ये एकतरी स्वतःला पुरुष समजणारा वीर निघेल काय ? पुष्कळ बाणांनी एकाला व एका बाणाने पुष्कळ लोकांना वेध करणारा मी पुरुष, अश्व आणि गज यांचीं मर्मस्थानें बाणांनी फोडून काढीन. हे प्रभो, आज या माझ्या अस्त्रबलाचा प्रभाव दशरथ राजाचें अप्रभुत्व आणि तुझें प्रभुत्व स्थापित

अद्य चन्दनसारस्य केयूरामोक्षणस्य च ।
वसूनां च विमोक्षस्य सुहृदां पालनस्य च ३९
अनुरूपाविमौ बाहू राम कर्म करिष्यतः ।
अभिषेचनविघ्नस्य कर्तॄणां ते निवारणे ४०
ब्रवीहि कोऽद्यैव मया वियुज्यतां तवासुहृत्प्राणयशःसुहृज्जनैः ।
यथा तवेयं वसुधा वशा भवेत्तथैव मां शाधि तवास्मि किंकरः ४१
विमृज्य बाष्पं परिसान्त्व्य चासकृत्स लक्ष्मणं राघववंशवर्धनः ।
उवाच पित्रोर्वचने व्यवस्थितं निबोध मामेष हि सौम्य सत्पथः ४२
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे त्रयोविंशः सर्गः ॥ २३ ॥
[ १०२१ ]

चतुर्विंशः सर्गः ।

तं समीक्ष्य व्यवसितं पितुर्निर्देशपालने ।
कौसल्या बाष्पसंरुद्धा वचो धर्मिष्ठमब्रवीत् १

---

करून दाखवील. हे रामा, उत्तम प्रकारच्या चन्दनाची उटी लावण्याला व बाहुभूषणें धारण करण्याला योग्य, त्याचप्रमाणे अनेक प्रकारचीं दानें देण्याला व सुहृदांचें शत्रूपासून रक्षण करण्याला योग्य, असे हे माझे बाहू तुझ्या अभिषेकाला विघ्न आणणाऱ्यांचें निवारण करण्याचे कामीं आज त्यांना शोभेल असाच योग्य पराक्रम करून दाखवितील. आजच्या आजच तुझ्या कोणत्या शत्रूला प्राण, कीर्ति आणि मित्रगण यांपासून मी वेगळें करूं, तें सांग. तात्पर्य, ही पृथ्वी तुझ्या अधीन होईल, अशा रीतीने तूं मला आज्ञा कर; मी तुझा दास आहें. " याप्रमाणें लक्ष्मण बोलत असतांना राघववंश वृद्धिंगत करणाऱ्या रामाने त्याचे अश्रु पुसून अनेक वेळा त्याचें सांत्वन केलें आणि, " हे सौम्या ! मातापित्यांच्या वचनावरच मी निश्चल आहें व हाच सन्मार्ग आहे, असें तूं समज. " असें त्याला सांगितलें ( ३९--४२ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी तेविसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २३ ॥

पित्याची आज्ञा परिपालन करण्याविषयी त्या रामाचा निश्चय झाला आहे, असें अवलोकन करून अश्रूंनी कंठ दाटून आलेली कौसल्या धर्मिष्ठ रामाला उद्देशून

अदृष्टदुःखो धर्मात्मा सर्वभूतप्रियंवदः ।
मयि जातो दशरथात्कथमुञ्छेन वर्तयेत् २
यस्य भृत्याश्च दासाश्च मृष्टान्यन्नानि भुञ्जते ।
कथं स भोक्ष्यते रामो वने मूलफलान्ययम् ३
क एतच्छ्रद्दधेच्छ्रुत्वा कस्य वा न भवेद्भयम् ।
गुणवान्दयितो राज्ञः काकुत्स्थो यद्विवास्यते ४
नूनं तु बलवाँल्लोके कृतान्तः सर्वमादिशन् ।
लोके रामाभिरामस्त्वं वनं यत्र गमिष्यसि ५
अयं तु मामात्मभवस्तवादर्शनमारुतः।
विलापदुःखसमिधो रुदिताश्रुहुताहुतिः ६
चिन्ताबाष्पमहाधूमस्तवागमनचिन्तजः ।
कर्शयित्वाधिकं पुत्र निश्वासायाससंभवः ७

म्हणाली," ज्याला आजपर्यंत कसलेंही दुःख पाहण्याचा प्रसंग आलेला नाहीं, जो धर्मात्मा आहे, प्राणिमात्राशीं प्रिय भाषण करणारा आहे आणि ( सार्वभौम ) दशरथराजापासून माझे ठिकाणीं उत्पन्न झालेला आहे, असा हा राम शेतांत पडलेले धान्यकण वेचून आपली उपजीविका कशी बरें करील ? ज्याचे पगारी नोकर आणि दासही मिष्ट अन्नें भक्षण करीत असतात, तो हा राम वनामध्ये कशी बरें फलमूलांवर उपजीविका करील ? राजाला अतिप्रिय आणि गुणी अशा ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला वनवासांत पाठवीत आहेत, हें ऐकून कोणाला बरें खरें वाटणार आहे ? आणि हें ऐकल्याबरोबर कोणाला बरें भय वाटणार नाही ? हे रामा, त्रैलोक्यामध्ये सर्व प्राणिमात्रांना आनन्द देणारा असा तूं ज्या अर्थी वनांत जाणार त्या अर्थी या जगतामध्ये दैवच खरोखर बलवत्तर आहे आणि त्याच्याच योजनेप्रमाणे सर्व कांहीं होत आहे, असें वाटतें. ( १–५ )

तूं सुखरूप परत कसा येशील या काळजीमुळे, माझ्या ठिकाणीं उत्पन्न झालेला चिन्तारूप अग्नि तूं आता दृष्टीस पडणार नाहींस अशी जी मनाची भावना हाच कोणी वायु त्याचेमुळे पेटलेला आणि विलाप व दुःख याच कोणी समिधा यांच्या योगाने भडकलेला, रुदन करितांना पडलेले अश्रु हेच घृताहुति ज्यांत दिल्या

त्वया विहीनामिह मां शोकाग्निरतुलो महान् ।
प्रधक्ष्यति यथा कक्ष्यं चित्रभानुर्हिमात्यये ८
कथं हि धेनुः स्वं वत्सं गच्छन्तमनुगच्छति ।
अहं त्वानुगमिष्यामि यत्र वत्स गमिष्यसि ९
यथा निगदितं मात्रा तद्वाक्यं पुरुषर्षभः ।
श्रुत्वा रामोऽब्रवीद्वाक्यं मातरं भृशदुःखिताम् १०
कैकेय्या वञ्चितो राजा मयि चारण्यमाश्रिते ।
भवत्या च परित्यक्तो न नूनं वर्तयिष्यति ११
भर्तुः पुनः परित्यागो नृशंसः केवलं स्त्रियाः ।
स भवत्या न कर्तव्यो मनसापि विगर्हितः १२
यावज्जीवति काकुत्स्थः पिता मे जगतीपतिः ।
शुश्रूषा क्रियतां तावत्स हि धर्मः सनातनः १३
एवमुक्ता तु रामेण कौसल्या शुभदर्शना ।

आहेत व चिन्तारूपी अग्नीमध्ये त्या अश्रूंची झालेली वाफ हाच प्रचंड धूर ज्यांतून निघत आहे आणि अति जोराने चाललेल्या निश्वासामुळे जो सारखा भडकत आहे, असा हा अनुपम व प्रचंड शोकाग्नि तुझा वियोग झालेल्या मला अत्यंत कृश करून, ग्रीष्म ऋतूमध्ये शुष्कतृणमय प्रदेशाला जाळणाऱ्या वणव्याप्रमाणे जाळून टाकील. जशी पुढे चालणाऱ्या आपल्या वासराच्या मागोमाग गाय जात असते, तशी हे वत्सा, जिकडे तूं जाशील, तिकडे मी तुझ्या मागोमाग येईन." (६-९)

हें मातेने केलेलें भाषण रामाने अगदी तिने सांगितल्याप्रमाणे ऐकिलें आणि तें ऐकून घेऊन तो पुरुषश्रेष्ठ राम अत्यंत दुःखित झालेल्या आपल्या मातेला म्हणाला, "राजाला कैकेयीने फसविलें आहे. तेव्हा मी अरण्यांत गेल्यावर तूंही जर त्याचा त्याग केलास, तर खरोखर तो जिवंत राहणार नाही. शिवाय भर्त्याचा त्याग करणें म्हणजे स्त्रीला केवळ निंद्य आहे. तेव्हा मनामध्ये आणण्यासही निंद्य असा भर्तृत्याग तूं करूं नकोस. जोंपर्यंत माझा ककुत्स्थकुलोत्पन्न पृथ्वीपति पिता जिवंत आहे, तोंपर्यंत तूं त्याची शुश्रूषा कर; कारण तसाच सनातन धर्म आहे." ( १०-१३ )

तथेत्युवाच सुप्रीता राममक्लिष्टकारिणम् १४
एवमुक्तस्तु वचनं रामो धर्मभृतां वरः।
भूयस्तामब्रवीद्वाक्यं मातरं भृशदुःखिताम् १५
मया चैव भवत्या च कर्तव्यं वचनं पितुः।
राजा भर्ता गुरुः श्रेष्ठः सर्वेषामीश्वरः प्रभुः १६
इमानि तु महारण्ये विहृत्य नव पञ्च च।
वर्षाणि परमप्रीत्या स्थास्यामि वचने तव १७
एवमुक्ता प्रियं पुत्रं बाष्पपूर्णानना तदा।
उवाच परमार्ता तु कौसल्या सुतवत्सला १८
आसां राम सपत्नीनां वस्तुं मध्ये न मे क्षमम्।
नय मामपि काकुत्स्थ वनं वन्यां मृगीमिव १९
यदि ते गमने बुद्धिः कृता पितुरपेक्षया।
तां तथा रुदतीं रामोऽरुदन्वचनमब्रवीत् २०
जीवन्त्या हि स्त्रिया भर्ता दैवतं प्रभुरेव च।

याप्रमाणे रामानें तिला म्हटलें असतां, त्यांतील चांगलें कोणतें व वाईट कोणतें, याचें तारतम्य जाणणारी कौसल्या प्रसन्न झाली आणि सरळ रीतीनें वागणाऱ्या रामाला "ठीक आहे," असें म्हणाली. येणेंप्रमाणे कौसल्येनें 'बरें आहे' म्हणून अंगीकार केल्यावर तो धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ राम अत्यंत दुःखित झालेल्या त्या आपल्या मातेला फिरून म्हणाला, "मी आणि तूं पित्याच्या वचनाप्रमाणेच वागलें पाहिजे; कारण राजा, भर्ता, गुरु, श्रेष्ठ आणि प्रभु इतकीं नातीं त्याचे ठिकाणीं असल्यामुळे तो आपणां सर्वांचा मुक्त्यार आहे. हीं येवढीं चवदा वर्षें महारण्यात घालविल्यावर मी मोठ्या आनंदानें तुझ्या वचनांत राहीन." (१४–१७)

याप्रमाणें रामानें कौसल्येला सांगितलें असतां अतिशय दुःखित झालेल्या त्या पुत्रवत्सल कौसल्येचें मुख अश्रूंनी भरून गेलें आणि ती आपल्या प्रिय पुत्राला म्हणाली "हे रामा, या सवतींच्या जाचामध्ये माझ्यानें नाहीं रे राहवणार. पित्याकरिता वनांत जाण्याचा जर तुझा निश्चयच झाला असेल, तर हे काकुत्स्था, तूं मलाही वनांत संचार करणाऱ्या हरिणीप्रमाणें अरण्यांत घेऊन जा." (१८–२०)

भवत्या मम चैवाद्य राजा प्रभवति प्रभुः २१
न ह्यनाथा वयं राज्ञा लोकनाथेन धीमता २२
भरतश्चापि धर्मात्मा सर्वभूतप्रियंवदः।
भवतीमनुवर्तेत स हि धर्मरतः सदा २३
यथा मयि तु निष्क्रान्ते पुत्रशोकेन पार्थिवः।
श्रमं नावाप्नुयात्किंचिदप्रमत्ता तथा कुरु २४
दारुणश्चाप्ययं शोको यथैनं न विनाशयेत्।
राज्ञो वृद्धस्य सततं हितं चर समाहिता २५
व्रतोपवासनिरता या नारी परमोत्तमा।
भर्तारं नानुवर्तेत सा च पापगतिर्भवेत् २६
भर्तुः शुश्रूषया नारी लभते स्वर्गमुत्तमम्।
अपि या निर्नमस्कारा निवृत्ता देवपूजनात् २७
शुश्रूषामेव कुर्वीत भर्तुः प्रियहिते रता।
एष धर्मः स्त्रियो नित्यो वेदे लोके श्रुतः स्मृतः २८

त्याप्रमाणे रडत असलेल्या त्या मातेला डोळ्यामध्ये आलेले आपले अश्रु आवरून धरून राम म्हणाला, " स्त्री जिवंत असतांना भर्ता हेंच तिचें दैवत आणि तिचा प्रभु आहे. तेव्हा आज हा राजा तुझा व माझा प्रभु आहे. जगत्पति विचारी राजामुळे आज आपण सनाथ आहोंत. भरतही धर्मात्मा असून लोकांशीं प्रिय भाषण करणारा आहे. तेव्हा तोही तुझ्याच अनुरोधानें वागेल; कारण तो नेहमी धर्माविषयीं रत असतो. मी गेल्यावर राजा पुत्रशोकानें यत्किंचितही क्षीण होणार नाही, अशा रीतीनें दक्ष राहून तूं व्यवस्था ठेव. तात्पर्य हा भयंकर शोक याच्या नाशाला कारण होणार नाही, अशा रीतीनें नेहमी तूं या वृद्ध राजाचें अत्यन्त काळजीपूर्वक हित करीत जा. ( २१-२५ )

आचरणानें सर्वोत्कृष्ट व नेहमी व्रतें आणि उपवास करणारी अशी जरी स्त्री असली तरी भर्त्याच्या अनुरोधानें जर ती वागत नसेल, तर तिला नरकप्राप्ति होते आणि वंदन व देवपूजन हीं न करतांदेखील केवळ पतीच्या सेवेनेच स्त्रीला उत्कृष्ट स्वर्ग प्राप्त होतो. तेव्हा भर्त्याला प्रिय आणि हितकारक असलेली गोष्ट करण्याविषयीं तत्पर

अग्निकार्येषु च सदा सुमनोभिश्च देवताः ।
पूज्यास्ते मत्कृते देवि ब्राह्मणाश्चैव सत्कृताः २९
एवं कालं प्रतीक्षस्व ममागमनकाङ्क्षिणी ।
नियता नियताहारा भर्तृशुश्रूषणे रता ३०
प्राप्स्यसे परमं कामं मयि पर्यागते सति ।
यदि धर्मभृतां श्रेष्ठो धारयिष्यति जीवितम् ३१
एवमुक्ता तु रामेण बाष्पपर्याकुलेक्षणा ।
कौसल्या पुत्रशोकार्ता रामं वचनमब्रवीत् ३२
गमने सुकृतां बुद्धिं न ते शक्नोमि पुत्रक ।
विनिवर्तयितुं वीर नूनं कालो दुरत्ययः ३३
गच्छ पुत्र त्वमेकाग्रो भद्रं तेऽस्तु सदा विभो ।
पुनस्त्वयि निवृत्ते तु भविष्यामि गतक्लमा ३४
प्रत्यागते महाभागे कृतार्थे चरितव्रते ।

राहून भर्त्याची सेवाच करावी, हा स्त्रीचा सनातन धर्म वेदामध्ये व धर्मशास्त्रांत सांगितलेला असून, पुरातन लोकाचारावरुनही सिद्ध आहे. हे देवी, अग्निहोत्रहोमसमयीं माझ्याकरिता पुष्पांनी सर्वदा देवतांचें पूजन करून ब्राह्मणांचा सत्कार करीत जा. अशा रीतीने काळ घालवीत घालवीत माझ्या आगमनाची वाट पहात रहा आणि शुचि व मिताहारी राहून पतिसेवेविषयी तत्पर असत जा. धर्मनिष्ठांमध्ये श्रेष्ठ असलेला माझा पिता मी परत येईतोंपर्यंत जर जिवंत राहिला, तर मी आल्यावर तुला अतिशय इष्ट असलेला तुझा हेतु सिद्धीस जाईल." ( २६--३१ )

याप्रमाणे रामाने सांगितलें असतां कौसल्येचे नेत्र अश्रूंनी अगदी भरून आले आणि पुत्रशोकाने व्याकुल झालेली ती कौसल्या रामाला म्हणाली, "हे पुत्रा, जाण्याचा जो तूं निश्चय केला आहेस, तो फिरविण्याला मी समर्थ नाहीं. तेव्हा हे वीरा, खरोखर काल हा अनुल्लंघनीय आहे, कालाची मर्यादा कोणीही उल्लंघन करूं शकत नाही. हे पुत्रा, तूं जा. मार्गात सर्वत्र सावधपणा ठेव. हे प्रभो, तुझें सर्वदा कल्याण असो. तूं पुनरपि परत आलास, म्हणजे माझे क्लेश नाहीसे होतील. सारांश, मनांत योजिलेलें व्रत संपवून व पित्याच्या ऋणांतून मुक्त

पितुरानृण्यतां प्राप्ते स्वपिष्ये परमं सुखम् ३५
कृतान्तस्य गतिः पुत्र दुर्विभाव्या सदा भुवि ।
यत्त्वां संचोदयति मे वच आविध्य राघव ३६
गच्छेदानीं महाबाहो क्षेमेण पुनरागतः ।
नन्दयिष्यासि मां पुत्र साम्ना श्लक्ष्णेन चारुणा ३७
अपीदानीं स कालः स्याद्वनात्प्रत्यागतं पुनः ।
यत्त्वां पुत्रक पश्येयं जटावल्कलधारिणम् ३८
तथा हि रामं वनवासनिश्चितं ददर्श देवी परमेण चेतसा ।
उवाच रामं शुभलक्षणं वचो बभूव च स्वस्त्ययनाभिकाङ्क्षिणी ३९

इत्यार्षे श्रीमद्रामा० वाल्मी० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चतुर्विंशः सर्गः ।२४। [११००]

पञ्चविंशः सर्गः ।

सा विनीय तमायासमुपस्पृश्य जलं शुचि ।
चकार माता रामस्य मङ्गलानि मनस्विनी १

---

होऊन, कृतकृत्य झालेला तूं महाभाग्यवान् परत आलास, म्हणजे मला मोठ्या सुखाने झोप येईल. ( ३२-३५ )

हे राघवा, ज्या अर्थी माझ्या सांगण्याचा अव्हेर करून तुला वनांत जाण्याविषयीं काल प्रेरणा करीत आहे, त्या अर्थी त्याची गतीच या भूलोकावरलि प्राण्यांना सर्वदा अतर्क्य आहे. महापराक्रमी पुत्रा, तूं आता जा; पुनरपि सुखरूप परत आलास, म्हणजे स्पष्ट आणि मनोहर अशा सांत्वनपूर्वक भाषणाने तूं मला आनंद देशील. हे पुत्रा, जटा व वल्कलें धारण केलेल्या तुला वनांतून परत आलेला मी पाहीन, अशी वेळ येईल काय ? " याप्रमाणे रामाचा वनवासांत जाण्याविषयीं निश्चय झाला आहे, असें अवलोकन करून, देवी कौसल्येने अगदी मनापासून त्याच्याशीं असें शुभ भाषण केलें आणि नंतर ती त्याचें स्वस्तिवाचन करण्याकरिता उद्युक्त झाली. ( ३६--३९ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी चोविसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २४ ॥

आपला तो शोक एकीकडे ठेवून व शुद्धोदकाने आचमन करून ती विचारी

न शक्यते वारयितुं गच्छेदानीं रघूत्तम।
शीघ्रं च विनिवर्तस्व वर्तस्व च सतां क्रमे २
यत्पालयसि धर्मं त्वं प्रीत्या च नियमेन च।
स वै राघवशार्दूल धर्मस्त्वामभिरक्षतु ३
येभ्यः प्रणमसे पुत्र देवेष्वायतनेषु च।
ते च त्वामभिरक्षन्तु वने सह महर्षिभिः ४
यानि दत्तानि तेऽस्त्राणि विश्वामित्रेण धीमता।
तानि त्वामभिरक्षन्तु गुणैः समुदितं सदा ५
पितृशुश्रूषया पुत्र मातृशुश्रूषया तथा।
सत्येन च महाबाहो चिरंजीवाभिरक्षितः ६
समित्कुशपवित्राणि वेद्यश्चायतनानि च।
स्थण्डिलानि च विप्राणां शैला वृक्षाः क्षुपा ह्रदाः।
पतङ्गाः पन्नगाः सिंहास्त्वां रक्षन्तु नरोत्तम ७
स्वस्ति साध्याश्च विश्वे च मरुतश्च महर्षिभिः।
स्वस्ति धाता विधाता च स्वस्ति पूषा भगोऽर्यमा ८
लोकपालाश्च ते सर्वे वासवप्रमुखास्तथा।

---

माता कौसल्या रामाला उद्देशून मंगलकारक वाक्यें उच्चारूं लागली. ती म्हणाली "हे रघूत्तमा, तुझ्या जाण्याला अडथळा आणणें शक्य नाहीं. करिता आतां तूं जा; लवकर परत फीर आणि सज्जनांच्या मार्गानें वागत जा. ज्या धर्माचें तूं प्रेमानें व निश्चयानें पालन करीत आहेस, तो धर्मच, हे रघुवंशजश्रेष्ठा, तुझें सर्व प्रकारें रक्षण करो. हे पुत्रा, देवालयामध्ये तूं ज्यांना प्रणाम करीत असतोस, ते देव महर्षींसहवर्तमान वनामध्ये तुझें रक्षण करोत. विचारी विश्वामित्र मुनींनीं जीं तुला अस्त्रें दिलीं आहेत, तीं सर्वदा गुणसंपन्न असलेल्या तुझें रक्षण करोत. (१-५)

हे महापराक्रमी पुत्रा, पितृसेवा, मातृसेवा आणि सत्य हीं रक्षण करीत असतांना तूं चिरंजीव हो. समिधा, कुश, दर्भ, वेदी, देवालयें, विप्रांचीं स्थानें, पर्वत, वृक्ष, अखूड फांद्यांचीं झाडें, सरोवरें, पक्षी, सर्प आणि सिंह, हे नरोत्तमा, तुझें रक्षण करोत. साध्य, विश्वेदेव, महर्षींसहवर्तमान मरुद्गण, विराट्, सृष्टिकर्ता, पूषा, भग

ऋतवः षट् च ते सर्वे मासाः संवत्सराः क्षपाः ९
दिनानि च मुहूर्ताश्च स्वस्ति कुर्वन्तु ते सदा ।
श्रुतिस्मृतिश्च धर्मश्च पातु त्वां पुत्र सर्वतः १०
स्कन्दश्च भगवान्देवः सोमश्च सबृहस्पतिः ।
सप्तर्षयो नारदश्च ते त्वां रक्षन्तु सर्वतः ११
ते चापि सर्वतः सिद्धा दिशश्च सदिगीश्वराः ।
स्तुता मया वने तस्मिन्पान्तु त्वां पुत्र नित्यशः १२
शैलाः सर्वे समुद्राश्च राजा वरुण एव च ।
द्यौरन्तरिक्षं पृथिवी वायुश्च सचराचरः १३
नक्षत्राणि च सर्वाणि ग्रहाश्च सह दैवतैः ।
अहोरात्रे तथा सन्ध्ये पान्तु त्वां वनमाश्रितम् १४
ऋतवश्चापि षट् चान्ये मासाः संवत्सरास्तथा ।
कलाश्च काष्ठाश्च तथा तव शर्म दिशन्तु ते १५
महावनेऽपि चरतो मुनिवेषस्य धीमतः ।
तथा देवाश्च दैत्याश्च भवन्तु सुखदाः सदा १६

आणि अर्यमा तुझें कल्याण करोत. इंद्रप्रभृति सर्व लोकपाल, सहा ऋतु, सर्व महिने, संवत्सर, रात्री. दिवस आणि मुहूर्त हे तुझें रक्षण करोत आणि हे पुत्रा, श्रुति, स्मृति व धर्म तुझें सर्व बाजूंनी रक्षण करोत. ( ९-१० )

भगवान् स्कंददेव, चंद्र, बृहस्पति, सप्तर्षि आणि नारद हे सर्व बाजूंनी तुझें रक्षण करोत. सिद्ध, दिशा आणि दिक्पाल याचे मी स्तवन केलें आहें. तस्मात्, हे पुत्रा, त्या वनामध्ये ते तुझें नेहमी सर्व बाजूंनी रक्षण करोत. पर्वत, सर्व समुद्र, राजा वरुण, स्वर्ग, अंतरिक्ष, भूमि, चराचरांसहवर्तमान वायु, सर्व नक्षत्रें, अधिदेवता व प्रत्यधिदेवता यांसहवर्तमान सर्व ग्रह, दिवस व रात्री आणि दोन्हीं संध्या, वनाच्या आश्रयाने राहिलेल्या तुझें रक्षण करोत. सहा ऋतु, महिने, संवत्सर, कला आणि काष्ठा तुझें कल्याण करोत. ( ११--१५ )

तूं विचारी मुनिवेष धारण करून महावनामध्ये संचार करीत असतांना देव आणि दैत्य तुला नेहमी सुखदायक होवोत. हे पुत्रा, घोर व क्रूरकर्मा राक्षस

राक्षसानां पिशाचानां रौद्राणां क्रूरकर्मणाम् ।
क्रव्यादानां च सर्वेषां मा भूत्पुत्रक ते भयम् १७
प्लवगा वृश्चिका दंशा मशकाश्चैव कानने ।
सरीसृपाश्च कीटाश्च मा भूवन्गहने तव १८
महाद्विपाश्च सिंहाश्च व्याघ्रा ऋक्षाश्च दंष्ट्रिणः ।
महिषाः शृङ्गिणो रौद्रा न ते द्रुह्यन्तु पुत्रक १९
नृमांसभोजना रौद्रा ये चान्ये सर्वजातियाः ।
मा च त्वां हिंसिषुः पुत्र मया संपूजितास्त्विह २०
आगमास्ते शिवाः सन्तु सिध्यन्तु च पराक्रमाः ।
सर्वसंपत्तयो राम स्वस्तिमान्गच्छ पुत्रक २१
स्वस्ति तेऽस्त्वान्तरिक्षेभ्यः पार्थिवेभ्यः पुनः पुनः ।
सर्वेभ्यश्चैव देवेभ्यो ये च ते परिपन्थिनः २२
शुक्रः सोमश्च सूर्यश्च धनदोऽथ यमस्तथा ।
पान्तु त्वामर्चिता राम दण्डकारण्यवासिनम् । २३

आणि पिशाच व सर्व प्रकारचे मांसभक्षक प्राणी यांपासून तुला भय न होवो. वानर, वनमक्षिका, मशक, सर्प आणि कीटक गहन वनामध्ये तुझ्याजवळदेखील च फिरकूं शकोत. मोठे मोठे गज, सिंह, व्याघ्र, ऋक्ष, विषारी दाढांनी युक्त असलेले प्राणी, महिष आणि क्रूर अशीं हिंस्र जनावरें, हे पुत्रा, तुला अपाय न करोत. नरमांस भक्षण करणाऱ्या ज्या कांही म्हणून दुसऱ्या सर्व जाति आहेत, त्यांचें मी येथे पूजन केलें आहें. यास्तव, हे पुत्रा, त्या तुझी हिंसा न करोत. ( १६-२० )

तुझा मार्ग कल्याणकारक होवो, तुझे पराक्रम सफल होवोत, सर्व प्रकारच्या अपेक्षित समृद्धि वनामध्ये तुला प्राप्त होवोत आणि, हे पुत्रा, तूं कल्याणसंपन्न राहून तुझें गमन होवो. आकाश आणि पृथ्वी यांत वास्तव्य करणारे प्राणी व सर्व देव यांपासून आणि तुझे जे कोणी शत्रु असतील त्यांपासून तुझें कल्याण होवो. हे रामा, शुक्र, चंद्र, सूर्य, कुबेर आणि यम यांचें मी पूजन केलें आहें. करिता तूं दंडकारण्यामध्ये वास्तव्य करीत असतांना तुझें हे रक्षण करोत. अग्नि, वायु, धूम

स फालपिटकं गृह्य गिरिदुर्गाण्यलोकयत् ।
दिशः सर्वास्त्वनुचरन्स यथा पापकर्मकृत् २५
इत्येनमत्यजद्राजा सगरो वै सुधार्मिकः ।
रामः किमकरोत्पापं येनैवमुपरुध्यते २६
न हि कंचन पश्यामो राघवस्यागुणं वयम् ।
दुर्लभो ह्यस्य निरयः शशाङ्कस्येव कल्मषम् २७
अथवा देवि त्वं कंचिद्दोषं पश्यसि राघवे ।
तमद्य ब्रूहि तत्त्वेन तदा रामो विवास्यते २८
अदुष्टस्य हि संत्यागः सत्पथे निरतस्य च ।
निर्दहेदपि शक्रस्य द्युतिं धर्मविरोधवान् २९
तदलं देवि रामस्य श्रिया विहतया त्वया ।
लोकतोऽपि हि ते रक्ष्यः परिवादः शुभानने ३०

अशी त्या पित्याने अधिकारी लोकांना आज्ञा केली. तदनंतर वर सांगितलेलें पापकर्म करणारा तो असमंज एक फाळ व एक पेटारा कंदमुळें वगैरे काढून ठेवण्याकरिता बरोबर घेऊन पर्वतासबंधी गहन प्रदेशावर चारी दिशांमध्ये संचार करूं लागला आणि भक्षणाकरितां कंदमुळें पाहूं लागला. ( २१–२५ )

तात्पर्य, असा तो दुष्ट होता, म्हणून अत्यंत धार्मिक अशाही सगर राजानें त्याचा त्याग केला; परंतु भोग्य वस्तु बरोबर नेण्याचा तूं प्रतिबंध करीत आहेस असें रामानें काय बरें पातक केलें आहे ? या रामाचे ठिकाणीं आम्हांला कोणताच दुर्गुण दिसत नाहीं व चंद्राचे ठिकाणीं मालिन्य जसें दुर्लभ आहे, तसें याचे ठिकाणीं पाप दुर्लभ आहे. अथवा हे राजपत्नी, रामाचे ठिकाणीं तुला जर कांहीं दोष दिसत असेल, तर तो तूं आज खरा खरा सांग; म्हणजे रामाला हाकून देतां येईल. रामाचे ठिकाणीं दोष आहे, असें सिद्ध झाल्यावाचून त्याला हाकून देतां येणार नाहीं. सन्मार्गानें वागण्य विषयीं तत्पर आणि निर्दोष अशाचा त्याग केला असतां तो इंद्राचेंही तेज नाहींसें करील; कारण असा त्याग धर्माविरुद्ध आहे. तस्मात् हे राजपत्नि, रामाचें राज्यवैभव हाणून पाडण्यापासून तुला कांहींएक फायदा नाहीं. तरी आता हा अट्टाहास पुरें झाला.

श्रुत्वा तु सिद्धार्थवचो राजा श्रान्ततरस्वरः ।
शोकोपहतया वाचा कैकेयीमिदमब्रवीत् ३१
एतद्वचो नेच्छसि पापरूपे हितं न जानासि ममात्मनोऽथवा ।
आस्थाय मार्गं कृपणं कुचेष्टा चेष्टा हि ते साधुपथादपेता ३२
अनुव्रजिष्याम्यहमद्य रामं राज्यं परित्यज्य सुखं धनं च ।
सर्वे च राजा भरतेन च त्वं यथासुखं भुङ्क्ष्व चिराय राज्यम् ३३

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षट्त्रिंशः सर्गः ॥३६॥

सप्तत्रिंशः सर्गः ।　　[१५४९]

महामात्रवचः श्रुत्वा रामो दशरथं तदा ।
अभ्यभाषत वाक्यं तु विनयज्ञो विनीतवत् १
त्यक्तभोगस्य मे राजन्वने वन्येन जीवतः ।
किं कार्यमनुयात्रेण त्यक्तसङ्गस्य सर्वतः २
यो हि दत्त्वा द्विपश्रेष्ठं कक्ष्यायां कुरुते मनः ।

लोकापवादाची तरी तुला लाज बाळगणें अवश्य आहे." ( २६-३० )

हें सिद्धार्थ प्रधानाचें भाषण श्रवण केल्यावर, शब्द फारच खोल गेलेला दशरथ राजा शोकाकुल वाणीने कैकेयीला म्हणाला, " हे पापिणी, हे सिद्धार्थ प्रधानाचें म्हणणें जर तूं न ऐकशील, तर तुला माझें अथवा आपल्या स्वतःचेंही हित कळत नाहीं; कारण या निंद्य मार्गाचें अवलंबन करून तूं जें हें अत्यन्त निंद्य कृत्य केलें आहेस, तें सन्मार्गाला अगदीं सोडून आहे. राज्य, सुख आणि धन यांचा त्याग करून मी आज रामाच्या मागोमाग जाईन व अयोध्येंतील सर्व लोकही त्याच्या मागोमाग जातील; मग तूं, राजा भरतासहवर्तमान सुखाने येईल, त्याप्रमाणे चिरकाल राज्याचा उपभोग घे. " ( ३१-३३ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण संज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं छत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३६ ॥

प्रधानाचें भाषण श्रवण केल्यावर विनयज्ञ राम नम्रपणें दशरथाला म्हणाला, ' हे राजा, भोगाचा त्याग करून व सर्वसंगपरित्याग करून वनामध्ये वनांतीलच आहारावर उपजीविका करणाऱ्या मला लवाजम्याशीं काय कर्तव्य आहे ? श्रेष्ठ

रज्जुस्नेहेन किं तस्य त्यजतः कुञ्जरोत्तमम् ३
तथा मम सतां श्रेष्ठ किं ध्वजिन्या जगत्पते ।
सर्वाण्येवानुजानामि चीराण्येवानयन्तु मे ४
खनित्रपिटके चोभे समानयत गच्छत ।
चतुर्दश वने वासं वर्षाणि वसतो मम ५
अथ चीराणि कैकेयी स्वयमाहृत्य राघवम् ।
उवाच परिधत्स्वेति जनौघे निरपत्रपा ६
स चीरे पुरुषव्याघ्रः कैकेय्याः प्रतिगृह्य ते ।
सूक्ष्मवस्त्रमवक्षिप्य मुनिवस्त्राण्यवस्त ह ७
लक्ष्मणश्चापि तत्रैव विहाय वसने शुभे ।
तापसाच्छादने चैव जग्राह पितुरग्रतः ८
अथात्मपरिधानार्थं सीता कौशेयवासिनी ।
संप्रेक्ष्य चीरं संत्रस्ता पृषती वागुरामिव ९

गज देऊन टाकून जो त्याला बांधावयाच्या दोरीवर मन ठेवितो, त्याला उत्कृष्ट गजाचा त्याग केल्यानंतर त्या दोरीशीं काय कर्तव्य असतें ? त्याचप्रमाणे, हे सज्जनश्रेष्ठ जगत्पते, आता सेनेशीं मला काय कर्तव्य आहे ? सर्व कांहीं भोग्य वस्तु मी भरताला देतों. आता मला वल्कलेंच कैकेयीच्या दासींनी आणून द्यावीं. हे दासींनो जा व वनामध्ये चवदा वर्षें वास्तव्य करण्यास सिद्ध झालेल्या मला कुदळ आणि एक पेटारा हीं दोन तुम्ही आणून द्या." ( १–५ )

याप्रमाणे रामाने दासींना सांगितल्यानंतर कैकेयीने स्वतःच वल्कलें आणलीं "आणि हीं नेस" असें यत्किंचितही लाज न बाळगितां ती जनसमुदायामध्ये रामाला म्हणाली. तेव्हा कैकेयीपासून त्या पुरुषश्रेष्ठ रामाने तीं वल्कलें घेतलीं आणि आपलीं बारीक वस्त्रें सोडून ठेऊन मुनींना योग्य अशीं तीं वस्त्रें त्याने परिधान केलीं व लक्ष्मणानेही तेथेच आपलीं चांगलीं वस्त्रें टाकून देऊन पित्याच्या समोर तपस्वी लोकांनाच योग्य असलेल्या त्या वस्त्रांचा स्वीकार केला. ( ६–८ )

तेव्हा पैठणी नेसलेली सीता आपल्याला नेसण्याकरिता कैकेयीने आणून दिलेलें वल्कल पाहून, जाळें पाहिल्यावर त्रस्त होणाऱ्या हरिणीप्रमाणे त्रस्त झाली. तथापि

सा व्यपत्रपमाणेव प्रगृह्य च सुदुर्मनाः ।
कैकेय्याः कुशचीरे ते जानकी शुभलक्षणा १०
अश्रुसंपूर्णनेत्रा च धर्मज्ञा धर्मदर्शिनी ।
गन्धर्वराजप्रतिमं भर्तारमिदमब्रवीत् ११
कथं नु चीरं बध्नन्ति मुनयो वनवासिनः ।
इति ह्यकुशला सीता सा मुमोह मुहुर्मुहुः १२
कृत्वा कण्ठे स्म सा चीरमेकमादाय पाणिना ।
तस्थौ ह्यकुशला तत्र व्रीडिता जनकात्मजा १३
तस्यास्तत्क्षिप्रमागत्य रामो धर्मभृतां वरः ।
चीरं बबन्ध सीतायाः कौशेयस्योपरि स्वयम् १४
रामं प्रेक्ष्य तु सीताया बध्नन्तं चीरमुत्तमम् ।
अन्तःपुरचरा नार्यो मुमुचुर्वारि नेत्रजम् १५
ऊचुश्च परमायत्ता रामं ज्वलिततेजसम् ।
वत्स नैवं नियुक्तेयं वनवासे मनस्विनी १६

शुभ लक्षणांनीं युक्त असलेल्या त्या जनककन्येने लज्जित झाल्यासारिखें करून व अत्यंत खिन्न होऊन कैकेयीपासून तीं वल्कलें घेतलीं आणि अश्रूंनी जिचे नेत्र अगदी भरून आले आहेत, अशी ती धर्मज्ञ व धर्माकडेच नजर देऊन वागणारी सीता आपल्या गंधर्वराजतुल्य भर्त्याला म्हणाली, "वनवासी मुनि वल्कल बांधितात तरी कसें ?" असें म्हणून वल्कल बांधण्याविषयीं अनभिज्ञ असलेली ती सीता वारंवार गोंधळूं लागली. शेवटीं एक वल्कल गळयांत अडकवून आणि एक हातांत घेऊन, ती तें कसें नेसावें याविषयीं ज्ञान नसलेली जनककन्या लज्जित होऊन तेथे उभी राहिली. ( ९-१३ )

तेव्हा धर्मनिष्ठांमध्ये श्रेष्ठ असलेला राम सत्वर तिच्या समीप आला आणि सीतेच्या पैठणीवर त्याने स्वतः तें वल्कल बांधिलें; परंतु तें उत्कृष्ट वल्कल सीतेला राम नेसवीत आहे, असें अवलोकन करून अंतःपुरांतील स्त्रियांच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या आणि अत्यंत खिन्न होऊन त्या स्त्रिया उज्ज्वल तेजाने युक्त असलेल्या रामाला म्हणाल्या, "हे वत्सा, तुझ्याप्रमाणे ही दृढनिश्चयी

पितुर्वाक्यानुरोधेन गतस्य विजनं वनम् ।
तावद्दर्शनमस्या नः सफलं भवतु प्रभो १७
लक्ष्मणेन सहायेन वनं गच्छस्व पुत्रक ।
नेयमर्हति कल्याणी वस्तुं तापसवद्वने १८
कुरु नो याचनां पुत्र सीता तिष्ठतु भामिनी ।
धर्मनित्यः स्वयं स्थातुं न हीदानीं त्वमिच्छसि १९
तासामेवंविधा वाचः शृण्वन्दशरथात्मजः ।
बबन्धैव तथा चीरं सीतया तुल्यशीलया २०
चीरे गृहीते तु तया सबाष्पो नृपतेर्गुरुः ।
निवार्य सीतां कैकेयीं वसिष्ठो वाक्यमब्रवीत् २१
अतिप्रवृत्ते दुर्मेधे कैकेयि कुलपांसनि ।
वञ्चयित्वा तु राजानं न प्रमाणेऽवतिष्ठसि २२
न गन्तव्यं वनं देव्या सीतया शीलवर्जिते ।

सीताही वनवासांत जाण्याचें ठरलेलें नाही. पित्याच्या आज्ञेला अनुसरून तूं निर्जन वनामध्ये गेल्यावर परत येईपर्यंत हिचें तरी दर्शन आम्हांला घडूं दे आणि हे प्रभो, अशा रीतीने आमचें जीवित सफल होऊं दे. हे पुत्रा, लक्ष्मणालाच बरोबर घेऊन तूं वनांत जा. तापसाप्रमाणे या गुणवतीने वनामध्ये वास्तव्य करणें उचित नाही. ( १४–१८ )

हे पुत्रा, हें आमचें मागणें ऐक. सीता येथे राहूं दे. तूं नेहमी धर्माने वागणारा असल्यामुळे जरी सांप्रत येथे राहण्याची इच्छा करीत नसलास, तरी हिला आपली येथेच राहूं दे." अशा प्रकारचीं त्यांचीं भाषणें ऐकत असतांना त्या दशरथपुत्र रामाने, आपल्यासारखाच जिचा स्वभाव आहे अशा, सीतेला वर सांगितल्याप्रमाणे वल्कल नेसविलेंच. तेव्हा सीतेने वल्कलें नेसल्यावर अश्रूंनी नेत्र भरून आलेले राजगुरु वसिष्ठ वनवासांत जाण्याविषयी सीतेचा निरोध करून कैकेयीला म्हणाले, " हे अति अमर्याद कैकेयी, हे दुष्टे, हे कुलकलंकिनी, राजाला फसवूनही तूं आतासुद्धा प्रामाणिकपणाने वागत नाहील. सीतेला वनवासांत पाठविण्याविषयी तूं जर राजापाशी मागणें मागितलेंच नाहीस, तर आता तिच्यापुढे वल्कलें

अनुष्ठास्यति रामस्य सीता प्रकृतमासनम् २३
आत्मा हि दाराः सर्वेषां दारसंग्रहवर्तिनाम् ।
आत्मेयमिति रामस्य पालयिष्यति मेदिनीम् २४
अथ यास्यति वैदेही वनं रामेण संगता ।
वयमत्रानुयास्यामः पुरं चेदं गमिष्यति २५
अन्तपालाश्च यास्यन्ति सदारो यत्र राघवः ।
सहोपजीव्यं राष्ट्रं च पुरं च सपरिच्छदम् २६
भरतश्च सशत्रुघ्नश्चीरवासा वनेचरः ।
वने वसन्तं काकुत्स्थमनुवत्स्यति पूर्वजम् २७
ततः शून्यां गतजनां वसुधां पादपैः सह ।
त्वमेका शाधि दुर्वृत्ता प्रजानामहिते स्थिता २८
न हि तद्भविता राष्ट्रं यत्र रामो न भूपतिः ।
तद्वनं भविता राष्ट्रं यत्र रामो निवत्स्यति २९

---

आणणें तुला उचित नाही. हे सच्छीलशून्य कैकेयी, सीतादेवी वनांत जाणार नाही. रामाला प्रस्तुत प्राप्त होणारें जें सिंहासन त्याचा हीच स्वीकार करून राम येईपर्यंत राज्य करील. सर्व गृहस्थाश्रमी पुरुषांचा स्त्री हा आत्मा आहे. तेव्हा ही रामाचा आत्माच असल्यामुळे तो परत येईपर्यंत पृथ्वीचें परिपालन करील. आता तुझ्या दुराग्रहामुळे सीता जर रामाबरोबर वनांत जाणारच असेल, तर आम्हीही त्याच्या मागोमाग जाऊं व हें सर्व नगरही जाईल. अंतःपुराचे रक्षकही जिकडे राम भार्येसहवर्तमान जाईल तिकडे जातील आणि धन व सामानसुमान बरोबर घेऊन हें नगर व सर्व राष्ट्रही त्याच्या मागोमाग जाईल. ( १९–२६ )

इतकेंच नव्हे परंतु ज्येष्ठ भ्राता राम वनामध्ये वास्तव्य करूं लागला असतां भरतही शत्रुघ्नासहवर्तमान वल्कलें परिधान करून वनचर बनेल आणि रामापाशीं राहील. नंतर प्रजाजनांच्या वाईटावर असलेली तूं एकटी दुराचारिणी शून्य आणि निर्जन अशा पृथ्वीवर व पृथ्वीवरील वृक्षांवर आपला अंमल चालीव. ज्या ठिकाणीं राम राजा नाही, तें राष्ट्रच होणार नाही व ज्या ठिकाणीं राम वास्तव्य करील, तें वनच राष्ट्र होईल. भरत जर खरोखरी दशरथराजापासूनच

न ह्यदत्तां महीं पित्रा भरतः शास्तुमिच्छति ।
त्वयि वा पुत्रवद्वस्तुं यदि जातो महीपतेः ३०
यद्यपि त्वं क्षितितलाद्गगनं चोत्पतिष्यसि ।
पितृवंशचरित्रज्ञः सोऽन्यथा न करिष्यति ३१
तत्त्वया पुत्रगर्धिन्या पुत्रस्य कृतमप्रियम् ।
लोके न हि स विद्येत यो न राममनुव्रतः ३२
द्रक्ष्यस्यद्यैव कैकेयि पशुव्यालमृगद्विजान् ।
गच्छतः सह रामेण पादपांश्च तदुन्मुखान् ३३
अथोत्तमान्याभरणानि देवि देहि स्नुषायै व्यपनीय चीरम् ।
न चीरमस्याः प्रविधीयतेति न्यवारयत्तद्वसनं वसिष्ठः ३४
एकस्य रामस्य वने निवासस्त्वया वृतः केकयराजपुत्रि ।
विभूषितेयं प्रतिकर्मनित्या वसत्वरण्ये सह राघवेण ३५

झालेला असेल, तर पित्याने न दिलेल्या पृथ्वीचें राज्य तो इच्छिणार नाही किंवा पुत्राप्रमाणे तुझ्यासमीप राहण्याचेंही त्याच्या मनांत येणार नाही. फार कशाला तूं या भूतलावरून जरी आकाशांत उडून गेलीस, तरी पितृवंशांतील आचार जाणणारा तो भरत असें भलतेंच करणार नाही. ( २७–३१ )

तस्मात्, पुत्राला राज्य प्राप्त होण्याचा अभिलाष धरून तूं खरोखर पुत्राला अप्रिय असलेलीच गोष्ट केली आहेस. कारण रामाला अनुसरून न वागणारा असा जगतांतही कोणीही नाही, मग रामाला सोडून भरत कसा राज्य करणार ? हे कैकेयी, पशु, सर्प, मृग व पक्षी हे रामाबरोबर जातांना तूं आजच पहाशील; इतकेंच नव्हे परंतु, वृक्षही त्याच्याबरोबर जाण्याकरिता उत्सुक आहेत, असें तुझ्या दृष्टोत्पत्तीस येईल. मग मनुष्यांची तर गोष्ट कशाला पाहिजे ? करिता, हे राजपत्नि, तें वल्कल पलीकडे करून तूं आपल्या स्नुषेला उत्कृष्ट भूषणें दे. हिला वल्कल देणें योग्य नाही. " असें म्हणून वसिष्ठांनी सीतेला तें वल्कल परिधान करण्याचा प्रतिबंध केला आणि पुनरपि ते म्हणाले " हे केकयराजकन्ये, एका रामालाच वनवास तूं मागून घेतला आहेस. यास्तव नेहमी अलंकार धारण करणाऱ्या सीतेला भूषित होऊन अरण्यामध्ये रामाबरोबर वास्तव्य करूं दे. ( ३२–३५ )

यानैश्च मुख्यैः परिचारकैश्च सुसंवृता गच्छतु राजपुत्री ।
वस्त्रैश्च सर्वैः सहितैर्विधानैर्नेयं वृता ते वरसंप्रदाने ३६
तस्मिंस्तथा जल्पति विप्रमुख्ये गुरौ नृपस्याप्रतिमप्रभावे ।
नैव स्म सीता विनिवृत्तभावा प्रियस्य भर्तुः प्रतिकारकामा ३७

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्तत्रिंशः सर्गः ॥ ३७ ॥

अष्टात्रिंशः सर्गः । [१५८६]

तस्यां चीरं वसानायां नाथवत्यामनाथवत् ।
प्रचुक्रोश जनः सर्वो धिक्त्वां दशरथं त्विति १
तेन तत्र प्रणादेन दुःखितः स महीपतिः ।
स निःश्वस्योष्णमैक्ष्वाकस्तां भार्यामिदमब्रवीत् २
सुकुमारी च बाला च सततं च सुखोचिता ।
नेयं वनस्य योग्येति सत्यमाह गुरुर्मम ३
इयं हि कस्यापकरोति किंचित्तपस्विनी राजवरस्य पुत्री ।

साराश, उत्कृष्ट उत्कृष्ट वाहनें, सेवक, सर्व प्रकारचीं वस्त्रें आणि सामानसुमान बरोबर घेऊन ही राजकन्या चांगल्या बंदोबस्तानें जाऊं दे; कारण, वरप्रदान-समयीं तूं हिच्याविषयीं मागणी केलेली नाहींस." याप्रमाणे अनुपम प्रभावानें युक्त असलेले ते द्विजश्रेष्ठ राजगुरु वसिष्ठ जरी बोलत होते, तरी आपल्या प्रिय भर्त्यांचेंच तन्तोतन्त अनुकरण करण्याचीच इच्छा करणाऱ्या त्या सीतेनें वल्कलें परिधान करण्यापासून आपलें मन परावृत्त केलें नाहीं. ( ३६-३७ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं सदतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३७ ॥

ती सीता सनाथ असूनही अनाथाप्रमाणे वल्कल परिधान करूं लागली असतां सर्व लोक "हे दशरथा, तुला धिक्कार असो," असें म्हणाले, तेव्हां आक्रोशानें तो भूपति अधिकच दुःखित झाला आणि उष्ण श्वास टाकून तो इक्ष्वाकुवंशज दशरथ त्या भार्येला म्हणाला, "ही सुकुमार व लहान असून नेहमीं हिला सुखांत राहण्याची सवय आहे. तेव्हां हिनें वनांत जाणें योग्य नाहीं, असें जें माझ्या गुरूंनी सांगितलें आहे, तें सत्य आहे. एखाद्या अपरिचित भिकारणीप्रमाणे

या चीरमासाद्य वनस्य मध्ये जाता विसंज्ञा श्रमणीव काचित् ४
चीराण्यपास्याज्जनकस्य कन्या नेयं प्रतिज्ञा मम दत्तपूर्वा ।
यथासुखं गच्छतु राजपुत्री वनं समग्रा सह सर्वरत्नैः ५
अजीवनार्हेण मया नृशंसा कृता प्रतिज्ञा नियमेन तावत् ।
त्वया हि बाल्यात्प्रतिपन्नमेतत्तन्मा दहेद्वेणुमिवात्मपुष्पम् ६
रामेण यदि ते पापे किंचित्कृतमशोभनम् ।
अपकारः क इह ते वैदेह्या दर्शितोऽधमे ७
मृगीवोत्फुल्लनयना मृदुशीला मनस्विनी ।
अपकारं कमिव ते करोति जनकात्मजा ८
ननु पर्याप्तमेवं ते पापे रामविवासनम् ।
किमेभिः कृपणैर्भूयः पातकैरपि ते कृतैः ९
प्रतिज्ञातं मया तावत्त्वयोक्तं देवि शृण्वता ।

वल्कल परिधान करून वनामध्ये जाण्यास निघालेली ही बिचारी नृपश्रेष्ठ जनक-राजाची कन्या कोणाला कांहीतरी अपकार करीत आहे काय ? जनक-कन्येने वल्कलें टाकून द्यावीं; कारण ही प्रतिज्ञा मी पूर्वी केलेली नाही. यास्तव, सर्व रत्नें बरोबर घेऊन ही राजकन्या वस्त्रालंकारांनी नटलेली अशी खुशाल जाऊं द्या. रामाला वनवासांत पाठवीन, एवढीच दुष्ट प्रतिज्ञा मी मुमूर्षु होऊन शपथपूर्वक केलेली आहे; परंतु, सीतेला वल्कलें परिधान करण्यास लावणें हें तूं मूर्खपणामुळे आरंभिलें आहेस. करिता, स्वतःचें पुष्प ज्याप्रमाणे वेळूंचा नाश करून टाकितें, त्याप्रमाणे तूं आरंभिलेलें हें कृत्य तुला दग्ध न करो, म्हणजे झालें. ( १–६ )

हे पापिणी, हे अधम कैकेयी, रामाने जरी कांही तुझा अपराध केला असला, तरी सीतेने येथे तुला काय अपकार केला आहे ? हरिणीप्रमाणे स्वभावाने गरीब आणि प्रफुल्लित नेत्रकमलांनी युक्त असलेली ही विचारी जनककन्या तुला काय बरें अपकार करीत आहे ? हे दुष्टे, याप्रमाणे तूं रामाला वनवासांत हाकून दिलेंस, हें खरोखर संपूर्ण नरकांचा अनुभव घेण्यास पुरेसें आहे. मग आणखी हीं अनिर्वाच्य दुःखदायक पातकें करून तुला काय प्राप्त करून घ्यावयाचें आहे ? हे देवि,

रामं यदभिषेकाय त्वमिहागतमब्रवीः १०
तत्त्वेतत्समतिक्रम्य निरयं गन्तुमिच्छसि ।
मैथिलीमपि या हि त्वमीक्षसे चीरवासिनीम् ११
एवं ब्रुवन्तं पितरं रामः संप्रस्थितो वनम् ।
अवाक्शिरसमासीनमिदं वचनमब्रवीत् १२
इयं धार्मिक कौसल्या मम माता यशस्विनी ।
वृद्धा चाक्षुद्रशीला च न च त्वां देव गर्हते १३
मया विहीनां वरद प्रपन्नां शोकसागरम् ।
अदृष्टपूर्वव्यसनां भूयः संमन्तुमर्हसि १४
इमां महेन्द्रोपम जातगर्धिनीं तथा विधातुं जननीं ममार्हसि ।
यथा वनस्थे मयि शोककर्शिता न जीवितं न्यस्य यमक्षयं व्रजेत् १५

इत्यार्षे श्रीमद्वा वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डेऽष्टत्रिंशः सर्गः ॥३८॥ [१६०१]

---

अभिषेकाकरिता राम येथे आला असतां तूं जें त्याला बोललास, तें मी ऐकून घेऊन तेवढ्यालाच अनुमति दिलेली आहे. सीतेच्या संबंधानें मी तुला कसल्य.ही प्रकारचें वचन दिलेलें नाहीं; परंतु स्वतः जें तूं मागितलेंस, त्याचाही अतिप्रसंग करून तूं नरकांत जाण्याची इच्छा करीत आहेस; कारण सीतेलाही वल्कलें परिधान केलेली पाहण्याची तुझी इच्छा आहे." ( ७-११ )

याप्रमाणे खालीं मान घालून बसलेला पिता दशरथ कैकेयीला बोलत असतांना वनामध्यें निघालेला राम त्याला म्हणाला, "हे धर्मनिष्ठ भूपते, ही माझी माता यशस्विनी कौसल्या वृद्ध असून क्षुद्र स्वभावाची नाहीं व तुम्हांलाही ती दोष देत नाहीं. यास्तव हे वरप्रद, माझा वियोग झाल्यामुळें शोकसागरांत बुडून जाऊन आजपर्यंत कधींही न अनुभवलेल्या दुःखांत सापडलेल्या हिच्याकडे आपण जरा अधिक दयार्द्र दृष्टि असूं द्यावी. सारांश, हे महेंद्रतुल्य भूपते, मी वनांत गेल्यानंतर ही माझी माता शोकानें कृश झाल्यामुळें जीविताचा त्याग करून यमसदनाला न जाईल, अशा रीतीनें आपण, मला पाहण्याविषयीं सदैव अत्यन्त उत्सुक असलेल्या या माझ्या मातेची योग्य काळजी घ्यावी. ( १२--१५ )

एकोनचत्वारिंशः सर्गः ।

रामस्य तु वचः श्रुत्वा मुनिवेषधरं च तम् ।
समीक्ष्य सह भार्याभी राजा विगतचेतनः १
नैनं दुःखेन संतप्तः प्रत्यवैक्षत राघवम् ।
न चैनमभिसंप्रेक्ष्य प्रत्यभाषत दुर्मनाः २
स मुहूर्तमिवासंज्ञो दुःखितश्च महीपतिः ।
विललाप महाबाहू राममेवानुचिन्तयन् ३
मन्ये खलु मया पूर्वं विवत्सा बहवः कृताः ।
प्राणिनो हिंसिता वापि तन्मामिदमुपस्थितम् ४
न त्वेवानागते काले देहाच्च्यवति जीवितम् ।
कैकेय्या क्लिश्यमानस्य मृत्युर्मम न विद्यते ५
योऽहं पावकसंकाशं पश्यामि पुरतः स्थितम् ।
विहाय वसने सूक्ष्मे तापसाच्छादमात्मजम् ६

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी अडतिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ३८ ॥

रामाचें भाषण श्रवण करून आणि त्याला मुनिवेष धारण केलेला पाहून भार्यासहवर्तमान दशरथराजा मूर्च्छित झाला. अशा प्रकारें दुःखानें संतप्त झाल्यामुळे रामाकडे कांहीं वेळ तो पाहीनासा झाला व कांहीं वेळानें पाहूं लागल्यावरही मनामध्ये खिन्न झाल्यामुळे त्याच्याशी त्या दशरथाला कांहींएक बोलवेना. अशा प्रकारें सुमारें क्षणभर मूर्च्छित झाल्यानंतर दुःखित झालेला तो महापराक्रमी दशरथराजा रामाचेंच चिंतन करून विलाप करूं लागला की, "खरोखर पूर्वी मी पुष्कळांना पुत्रहीन केलेलें आहे किंवा पुष्कळच प्राण्यांची मी हिंसाही केलेली आहे, म्हणून मला आता हें दुःख प्राप्त झालें आहे. कैकेयी क्लेश देत असतांनाही ज्या अर्थी मला मृत्यु येत नाही, त्या अर्थी वेळ आल्यावाचून देहांतून जीव जातच नाही, हें सत्य आहे. ( १–५ )

तेजानें अग्नितुल्य असा आपला पुत्र सूक्ष्म वस्त्रांचा त्याग करून तपस्व्यांनाच योग्य अशा वस्त्रांनी आच्छादित होऊन पुढें उभा असलेला मी पहात आहें. या

एकस्याः खलु कैकेय्याः कृतेऽयं खिद्यते जनः ।
स्वार्थे प्रयतमानायाः संश्रित्य निकृतिं त्विमाम् ७
एवमुक्त्वा तु वचनं बाष्पेण विहतेन्द्रियः ।
रामेति सकृदेवोक्त्वा व्याहर्तुं न शशाक सः ८
संज्ञां तु प्रतिलभ्यैव मुहूर्तात्स महीपतिः ।
नेत्राभ्यामश्रुपूर्णाभ्यां सुमन्त्रमिदमब्रवीत् ९
औपवाह्यं रथं युक्त्वा त्वमायाहि हयोत्तमैः ।
प्रापयैनं महाभागमितो जनपदात्परम् १०
एवं मन्ये गुणवतां गुणानां फलमुच्यते ।
पित्रा मात्रा च यत्साधुर्वीरो निर्वास्यते वनम् ११
राज्ञो वचनमाज्ञाय सुमन्त्रः शीघ्रविक्रमः ।
योजयित्वा ययौ तत्र रथमश्वैरलंकृतम् १२
तं रथं राजपुत्राय सूतः कनकभूषितम् ।
आचचक्षेऽञ्जलिं कृत्वा युक्तं परमवाजिभिः १३

कपटाचा आश्रय करून स्वार्थ साधण्याविषयीं धडपडणाऱ्या एका कैकेयीमुळे हे सर्व लोक दुःखित झाले आहेत. " याप्रमाणे बोलल्यानंतर अश्रूंच्या योगाने कंठ दाटून आल्यामुळे जिव्हा हलेनाशी झाली. तेव्हा " राम " असें एकदाच उच्चारिल्यावर त्याच्या तोंडांतून शब्द निघेनासा झाला. तदनंतर क्षणभरानें सावध झाल्यावर अश्रूंनी नेत्र भरून आलेला तो दशरथराजा सुमंत्राला म्हणाला, ' फिरावयाला जाण्याच्या रथाला उत्कृष्ट अश्व जोडून तूं इकडे ये आणि या महाभाग्यवान् रामाला या देशांच्या पलीकडे नेऊन पोंचीव. ' ( ६-१० )

' सुशील आणि वीर अशा पुत्राला ज्या अर्थी मातापितर वनांत हाकून देत आहेत त्या अर्थी गुणी लोकांमध्ये गुणांचें फल म्हणजे याप्रमाणे पुत्राला हाकून देणें हेंच ठरणार. ' राजाची आज्ञा समजून घेऊन सुमंत्र तेथून सत्वर चालता झाला आणि अलंकारयुक्त अशा रथाला अश्व जोडून तो तेथे घेऊन आला. नंतर " राजकुमाराकरिता सुवर्णभूषित रथ उत्कृष्ट अश्व जोडून तयार आहे, " असें हात जोडून त्या सारथ्याने सांगितलें असतां काल व देश जाणणारा व सर्व प्रकारें

राजा सत्वरमाहूय व्यापृतं वित्तसंचये ।
उवाच देशकालज्ञो निश्चितं सर्वतः शुचि १४
वासांसि च वरार्हाणि भूषणानि महान्ति च ।
वर्षाण्येतानि संख्याय वैदेह्या क्षिप्रमानय १५
नरेन्द्रेणैवमुक्तस्तु गत्वा कोशगृहं ततः ।
प्रायच्छत्सर्वमाहृत्य सीतायै क्षिप्रमेव तत् १६
सा सुजाता सुजातानि वैदेही प्रस्थिता वनम् ।
भूषयामास गात्राणि तैर्विचित्रैर्विभूषणैः १७
व्यराजयत वैदेही वेश्म तत्सुविभूषिता ।
उद्यतोंऽशुमतः काले खं प्रभेव विवस्वतः १८
तां भुजाभ्यां परिष्वज्य श्वश्रूर्वचनमब्रवीत् ।
अनाचरन्तीं कृपणं मूर्ध्न्युपाघ्राय मैथिलीम् १९
असत्यः सर्वलोकेऽस्मिन्सततं सत्कृताः प्रियैः ।
भर्तारं नानुमन्यन्ते विनिपातगतं स्त्रियः २०

शुचिर्भूत असलेल्या धनाध्यक्षाला दशरथराजा सत्वर हाक मारून निश्चयानें म्हणाला, " उत्कृष्ट उत्कृष्ट वस्त्रें आणि मोठमोठीं भूषणें या वनवासविषयक वर्षांची गणना करून तूं सीतेला सत्वर आणून दे. " ( ११-१५ )

याप्रमाणे राजाची आज्ञा झाल्याबरोबर धनाध्यक्ष जामदारखान्यांत गेला आणि राजाच्या आज्ञेप्रमाणे सर्व आणून त्यानें तें सत्वर सीतेला दिलें. तेव्हा वनांत जाण्याला निघालेल्या अयोनिसंभव सीतेनें त्या विचित्र भूषणांच्या योगानें सामुद्रिक शास्त्रोक्त लक्षणांनी युक्त असलेले आपले अवयव भूषित केले आणि किरणांनी युक्त असलेला सूर्य उदय पावूं लागला असतां त्याची प्रभा ज्याप्रमाणें आकाशाला शोभा आणिते, त्याप्रमाणे उत्कृष्ट प्रकारें अलंकृत झालेल्या सीतेनें त्या घराला शोभा आणिली. तेव्हा कधींही अप्रशस्त वर्तन न करणाऱ्या सीतेचें मस्तकी अवघ्राण करून व तिला बाहूंनी कवटाळून धरून सासू कौसल्या तिला म्हणाली, ' नेहमी प्रियवस्तु देऊन सत्कार केलेल्याही ज्या स्त्रिया संकटांत सापडलेल्या, भर्त्याची शुश्रूषा करण्याची हेळसांड करितात, त्यांची सर्व लोकांमध्ये असतीत्वानेच

एष स्वभावो नारीणामनुभूय पुरा सुखम् ।
अल्पामप्यापदं प्राप्य दुष्यन्ति प्रजहत्यपि २१
असत्यशीला विकृता दुर्गा अहृदयाः सदा ।
असत्यः पापसंकल्पाः क्षणमात्रविरागिणः २२
न कुलं न कृतं विद्या न दत्तं नापि संग्रहः ।
स्त्रीणां गृह्णाति हृदयमनित्यहृदया हि ताः २३
साध्वीनां तु स्थितानां तु शीले सत्ये श्रुते स्थिते ।
स्त्रीणां पवित्रं परमं पतिरेको विशिष्यते २४
स त्वया नावमन्तव्यः पुत्रः प्रव्राजितो वनम् ।
तव देवसमस्त्वेष निर्धनः सधनोऽपि वा २५
विज्ञाय वचनं सीता तस्या धर्मार्थसंहितम् ।
कृत्वाञ्जलिमुवाचेदं श्वश्रूमभिमुखे स्थिता २६

गणना होत असते. ( १६–२० )

पूर्वी सुखाचा अनुभव घेऊन पुढे थोडी जरी विपत्ति भोगण्याचा प्रसंग आला तरी भर्त्याला दूषण देण्यास इतकेंच नव्हे परंतु, त्याचा त्याग करण्यासही प्रवृत्त होणें हा दुष्ट स्त्रियांचा स्वभावच आहे. जारिणी स्त्रियांचें असत्य भाषण हेंच शील असून उन्मार्गाला जाणें, हा त्यांचा स्वभाव आहे. भर्त्याचे ठिकाणीं त्यांचें कधींच खरें प्रेम नसते; पाप करण्याविषयीं त्यांची इच्छा असते आणि क्षणमात्र प्रेम करणाऱ्या त्या स्त्रिया नेहमी बिघडलेल्या असतात. कुल, उपकार, धर्माचा उपदेश, दान आणि बंधन यापैकीं, कांहींही दुष्ट स्त्रियांचें हृदय पापवृत्तीपासून परावृत्त करण्यास समर्थ होत नाहीं; कारण त्यांचें चित्त अत्यंत चञ्चल असतें. सदाचरण, सत्य वचन, गुरुजनांचा उपदेश आणि मर्यादा यांनाच अनुसरून वागणाऱ्या पतिव्रता स्त्रियांचें पति हाच उत्कृष्ट पुण्यसाधन आहे आणि म्हणूनच स्त्रीला इतर सर्व पुण्यसाधनांपेक्षा पति अधिक आहे. ( २१—२४ )

तस्मात्, वनांत घालविलेल्या त्या माझ्या पुत्राचा तूं कधीं अवमान करूं नको. हा निर्धन असो अथवा सधन असो तुला देवतुल्य आहे. " हें धर्म व अर्थ यांनी भरलेलें त्या कौसल्येचें भाषण श्रवण केल्यावर संमुख उभी असलेली सीता

करिष्ये सर्वमेवाहमार्या यदनुशास्ति माम्।
अभिज्ञास्मि यथा भर्तुर्वर्तितव्यं श्रुतं च मे २७
न मामसज्जनेनार्या समानयितुमर्हति।
धर्माद्विचलितुं नाहमलं चन्द्रादिव प्रभा २८
नातन्त्री विद्यते वीणा नाचक्रो विद्यते रथः।
नापतिः सुखमेधेत या स्यादपि शतात्मजा २९
मितं ददाति हि पिता मितं भ्राता मितं सुतः।
अमितस्य तु दातारं भर्तारं का न पूजयेत् ३०
साहमेवंगता श्रेष्ठा श्रुतधर्मपरावरा।
आर्ये किमवमन्येयं स्त्रिया भर्ता हि दैवतम् ३१
सीताया वचनं श्रुत्वा कौसल्या हृदयंगमम्।
शुद्धसत्त्वा मुमोचाश्रु सहसा दुःखहर्षजम् ३२

हात जोडून आपल्या सासूला म्हणाली, " सासूबाई जो मला उपदेश करीत आहेत, तें सर्व कांही मी करीन. भर्त्याशीं कसें वागावें, याविषयी मी अभिज्ञ आहें आणि माता पितरांपासूनही मी तें ऐकून ठेविलेलें आहे. सासूबाईंनी दुष्ट स्त्रीशीं माझी बरोबरी करूं नये; कारण चंद्रापासून जशी प्रभा दूर होण्यास समर्थ नाही, तशी धर्मापासून चलित होण्यास मी समर्थ नाही, ज्याप्रमाणे तारेवाचून वीणा ध्वनि उत्पन्न करण्यास समर्थ होत नाही, अथवा ज्याप्रमाणे रथ चाकावाचून गमन करण्यास समर्थ होत नाही, त्याचप्रमाणे शंभर पुत्रही असले तरी स्त्रीला पतीवाचून सुख होत नाही. पिता, भ्राता आणि पुत्र हे सर्व क्षणिक सुख देणारे आहेत. तेव्हा अपरिमित सुख देणाऱ्या भर्त्याचा मान कोण बरें राखणार नाही ! ! ( २७—३० )

"यास्तव, अहो सासूबाई, मला हें सर्व माहीत असून, आपण, माझी आई, अशा श्रेष्ठ स्त्रियांकडून, सामान्य व विशेषरूप धर्माचें श्रवण केलेली असतांना मी पतीचा कसा बरें अवमान करीन ? अहो, भर्ता हेंच स्त्रीचें दैवत आहे. " याप्रमाणे सीतेचें तें मनोवेधक भाषण श्रवण केल्यावर शुद्ध अंतःकरणाने युक्त असलेली कौसल्या एकाएकी हर्षमिश्रित दुःखजन्य अश्रु ढाळूं लागली. तेव्हा मातांमध्ये जिचा अति-

तां प्राञ्जलिरभिप्रेक्ष्य मातृमध्येऽतिसत्कृताम् ।
रामः परमधर्मात्मा मातरं वाक्यमब्रवीत् ३३
अम्ब मा दुःखिता भूत्वा पश्येस्त्वं पितरं मम ।
क्षयोऽपि वनवासस्य क्षिप्रमेव भविष्यति ३४
सुप्तायास्ते गमिष्यन्ति नव वर्षाणि पञ्च च ।
समग्रमिह संप्राप्तं मां द्रक्ष्यसि सुहृद्वृतम् ३५
एतावदभिनीतार्थमुक्त्वा स जननीं वचः ।
त्रयः शतशतार्धा हि ददर्शावेक्ष्य मातरः ३६
ताश्चापि स तथैवार्ता मातृर्दशरथात्मजः ।
धर्मयुक्तमिदं वाक्यं निजगाद कृताञ्जलिः ३७
संवासात्परुषं किंचिदज्ञानादपि यत्कृतम् ।
तन्मे समुपजानीत सर्वाश्चामन्त्रयामि वः ३८
वचनं राघवस्यैतद्धर्मयुक्तं समाहितम् ।
शुश्रुवुस्ताः स्त्रियः सर्वाः शोकोपहतचेतसः ३९

शय सत्कार होत आहे, अशा कौसल्यामातेकडे पाहून तो परम धर्मात्मा राम हात जोडून तिला म्हणाला; " हे माते, तूं दुःखित होऊं नको; माझ्या पित्याकडे तुझें लक्ष्य असूं दे; माझा वनवास लवकरच संपून जाईल. चवदा वर्षें हीं अगदी झोपेंतील चवदा घटिकांप्रमाणे सत्वर निघून जातील आणि सुहृदांनी परिवेष्टित असा मी पुनरपि भ्राता व भार्या यांसहवर्तमान येथे आलेला लवकरच तूं पाहशील. ( ३१-३५ )

याप्रमाणे मातेशीं निश्चित अर्थाचें भाषण करून आपल्या साडेतीनशे मातांचें रामाने वेगळें वेगळें दर्शन घेतलें आणि कौसल्येप्रमाणेच दुःखित झालेल्या त्या मातांना उद्देशून त्या दशरथपुत्र रामाने हात जोडून धर्माने युक्त असलेलें भाषण केलें. तो म्हणाला "सहवासामुळे मी जें कांही कठोर भाषण तुमच्याशीं केलें असेल अथवा अज्ञानामुळे जें कांही कठोर वर्तन माझ्या हातून झालें असेल, त्याची तुम्ही क्षमा करा; मी तुम्हां सर्वांचा आता निरोप घेतों. " हें रामाचें धर्मयुक्त व गंभीर भाषण त्या स्त्रियांनी श्रवण केलें, तेव्हा त्या सर्व स्त्रियांचें अंतःकरण शोकाने

जज्ञेऽथ तासां सन्नादः क्रौञ्चीनामिव निःस्वनः ।
मानवेन्द्रस्य भार्याणामेवं वदति राघवे ४०
मुरजपणवमेघघोषवद्दशरथवेश्म बभूव यत्पुरा ।
विलपितपरिदेवनाकुलं व्यसनगतं तदभूत्सुदुःखितम् ४१

इत्यार्षे श्रीमद्रामा०वाल्मी० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकोनत्रिंशः सर्गः।३९[१६४२]

चत्वारिंशः सर्गः ।

अथ रामश्च सीता च लक्ष्मणश्च कृताञ्जलिः ।
उपसंगृह्य राजानं चक्रुर्दीनाः प्रदक्षिणम् १
तं चापि समनुज्ञाप्य धर्मज्ञः सह सीतया ।
राघवः शोकसंमूढो जननीमभ्यवादयत् २
अन्वक्षं लक्ष्मणो भ्रातुः कौसल्यामभ्यवादयत् ।
अपि मातुः सुमित्राया जग्राह चरणौ पुनः ३
तं वन्दमानं रुदती माता सौमित्रिमब्रवीत् ।
हितकामा महाबाहुं मूर्ध्न्युपाघ्राय लक्ष्मणम् ४

---

गाहिवरून गेलें आणि याप्रमाणे राम बोलूं लागला असतां दशरथराजाच्या त्या भार्यांमध्ये क्रौंच पक्षिणींच्या ध्वनीप्रमाणे शोकध्वनि उत्पन्न झाला आणि मुरज, पणव व मेघ या वाद्यांच्या ध्वनींनी जें दशरथाचे गृह पूर्वी युक्त होतें, तें विलाप आणि रोदन यांनी व्याप्त, संकटांत सापडलेलें आणि अत्यंत दुःखित असें झालें. ( ३६-४१ )

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी एकुणचाळिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ३९ ॥

तदनंतर राम, सीता आणि लक्ष्मण यांनी हात जोडले आणि दीन झालेल्या या त्रिवर्गांनी राजाच्या पायांवर मस्तक ठेवून त्याला प्रदक्षिणा केली. नंतर पित्याची अनुज्ञा घेऊन शोकाकुल झालेल्या त्या धर्मज्ञ रामाने सीतेसहवर्तमान आपल्या मातेला अभिवंदन केलें. भ्रात्याने अभिवंदन केल्याबरोबर लक्ष्मणानेही कौसल्येला अभिवंदन केलें आणि तदनंतर त्याने सुमित्रामातेचे पायावर मस्तक ठेऊन वंदन केलें. तेव्हा पुत्राचें हित इच्छिणारी सुमित्रा माता महापराक्रमी लक्ष्मणाचे

सृष्टस्त्वं वनवासाय स्वनुरक्तः सुहृज्जने ।
रामे प्रमादं मा कार्षीः पुत्र भ्रातरि गच्छति ५
व्यसनी वा समृद्धो वा गतिरेष तवानघ ।
एष लोके सतां धर्मो यज्ज्येष्ठवशगो भवेत् ६
इदं हि वृत्तमुचितं कुलस्यास्य सनातनम् ।
दानं दीक्षा च यज्ञेषु तनुत्यागो मृधेषु हि ७
लक्ष्मणं त्वेवमुक्त्वासौ संसिद्धं प्रियराघवम् ।
सुमित्रा गच्छ गच्छेति पुनः पुनरुवाच तम् ८
रामं दशरथं विद्धि मां विद्धि जनकात्मजाम् ।
अयोध्यामटवीं विद्धि गच्छ तात यथासुखम् ९
ततः सुमन्त्रः काकुत्स्थं प्राञ्जलिर्वाक्यमब्रवीत् ।
विनीतो विनयज्ञश्च मातलिर्वासवं यथा १०

मस्तकीं अवघ्राण करून तो वंदन करीत असतांना रडत रडत त्याला म्हणाली, " हे पुत्रा, तुझें रामावर आत्यन्तिक प्रेम आहे, म्हणूनच वनवासाला जाण्याची मी तुला अनुज्ञा दिली आहे. यास्तव आपल्या सुहृत् जनाच्या ठिकाणीं प्रेम-भावना उत्पन्न करणारा असा तुझा भ्राता राम वनांत जाऊं लागला, म्हणजे तूं कधींही गैरसावध राहूं नकोस. ( १-५ )

" संकटांत सापडलेला असो अथवा समृद्ध असो, हे निष्पापा पुत्रा, हा रामच तुझी गति आहे आणि ज्येष्ठ भ्रात्याला अनुसरून वागणें, हाच जगतामध्ये सज्जनांचा धर्म आहे. ज्येष्ठाला अनुसरून वागणें हें आचरण या कुलाला उचित असून, तें परंपरागत चालत आलेलें आहे व दान, यज्ञदीक्षा आणि युद्धामध्ये देहत्याग हे धर्मही या क्षत्रियकुलाला उचित आहेत. " राम प्रिय असल्यामुळे वनवासांत जाण्याला सिद्ध झालेल्या लक्ष्मणाला याप्रमाणे सांगितल्यावर " जा जा " असें पुनःपुनः सांगून सुमित्रा त्याला म्हणाली, " बा पुत्रा, राम हाच दशरथ, जनक-कन्या हीच मी आणि अरण्य हीच अयोध्या असें समजून तूं खुशाल जा. " तद-नंतर इंद्राला ज्याप्रमाणे मातलि सांगतो, त्याप्रमाणें नम्र व विनयशील असा सुमंत्र सारथी हात जोडून ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला म्हणाला. ( ६-१० )

रथमारोह भद्रं ते राजपुत्र महायशः ।
क्षिप्रं त्वां प्रापयिष्यामि यत्र मां राम वक्ष्यसे ११
चतुर्दश हि वर्षाणि वस्तव्यानि वने त्वया ।
तान्युपक्रमितव्यानि यानि देव्या प्रचोदितः १२
तं रथं सूर्यसंकाशं सीता हृष्टेन चेतसा ।
आरुरोह वरारोहा कृत्वालंकारमात्मनः १३
वनवासं हि संख्याय वासांस्याभरणानि च ।
भर्तारमनुगच्छन्त्यै सीतायै श्वशुरो ददौ १४
तथैवायुधजातानि भ्रातृभ्यां कवचानि च ।
रथोपस्थे प्रविन्यस्य सचर्म कठिनं च यत् १५
अथो ज्वलनसंकाशं चामीकरविभूषितम् ।
तमारुरुहतुस्तूर्णं भ्रातरौ रामलक्ष्मणौ १६
सीतातृतीयानारूढान्दृष्ट्वा रथमचोदयत् ।
सुमन्त्रः संमतानश्वान्वायुवेगसमाञ्जवे १७

"हे महायशस्वी राजपुत्रा, तुझें कल्याण असो; तूं रथावर आरोहण कर. हे रामा, जिकडे सांगशील तिकडे मी तुला सत्वर नेऊन पोचवीन. ज्या अर्थी राजपत्नी कैकेयीने आजच वनांत जावयास सांगितलें आहे, त्या अर्थी वनामध्ये जीं तुला चवदा वर्षे काढावयाचीं आहेत, त्यांना आजच आरंभ झाला पाहिजे." ( याप्रमाणे सुमंत्र सारथ्याने रामाला सांगितल्यानंतर ) वस्त्रालंकारांनी भूषित असलेली सुंदरी सीता (कुंकू लावून) प्रसन्न मनाने त्या सूर्यासारख्या तेजस्वी रथावर आरूढ झाली. तेव्हा वनवासासंबंधी वर्षाचीं गणना करून श्वशुर दशरथराजानें भर्त्याच्या बरोबर जाणाऱ्या सीतेला दिलेलीं वस्त्रें व भूषणें ( रथामध्ये ठेविलीं ) आणि त्याचप्रमाणे भ्रात्या राम-लक्ष्मणाचा आयुधसंमुदाय, कवचें, चर्माने मढविलेला पेटारा व कुदळ रथामध्ये ठेवून दिली. ( ११-१५ )

तदनंतर सुवर्णविभूषित आणि अग्नीसमान तेजस्वी अशा त्या रथावर भ्राते रामलक्ष्मण सत्वर आरूढ झाले. तेव्हा सीतेसहवर्तमान ते दोघे रथावर आरूढ झाले आहेत, असें पाहून वेगामध्ये वायूची बरोबरी करणाऱ्या व सर्वलक्षणसंपन्न

प्रयाते तु महारण्यं चिररात्राय राघवे ।
बभूव नगरे मूर्च्छा बलमूर्च्छा जनस्य च १८
तत्समाकुलसंभ्रान्तं मत्तसंकुपिताद्विपम् ।
हयसिञ्जितनिर्घोषं पुरमासीन्महास्वनम् १९
ततः सबालवृद्धा सा पुरी परमपीडिता ।
राममेवाभिदुद्राव घर्मार्तः सलिलं यथा २०
पार्श्वतः पृष्ठतश्चापि लम्बमानास्तदुन्मुखाः ।
बाष्पपूर्णमुखाः सर्वे तमूचुर्भृशनिःस्वनाः २१
संयच्छ वाजिनां रश्मीन्सूत याहि शनैः शनैः ।
मुखं द्रक्ष्याम रामस्य दुर्दर्शो नो भविष्यति २२
आयसं हृदयं नूनं राममातुरसंशयम् ।
यद्देवगर्भप्रतिमे वनं याति न भिद्यते २३
कृतकृत्या हि वैदेही छायेवानुगता पतिम् ।

असलेल्या अश्वांना प्रेरणा करून सुमंत्राने रथ पुढे हाकला. याप्रमाणें रघुवंशज राम पुष्कळ दिवस वास्तव्य करण्याकरिता महावनांत निघाल्यानंतर नगरांत असलेले सर्व लोक अश्व, गजादि सैन्य आणि पशुपक्षी हे सर्व किंकर्तव्यतामूढ झाले. भांबावून गेले. रामाच्या मागोमाग जाण्याकरिता घाईमुळे जिकडेतिकडे अत्यन्त गडबड उडाल्याकारणाने त्या नगरांतील लोकांना काय करावें, हेंच सुचेनासें झालें. रामाच्या वियोगामुळे आंतील मत्त गज क्रुद्ध झाले व अश्वांच्या खिदळण्याचा घोष सुरू होऊन जिकडे तिकडे हलकल्लोळ उडून गेला. तदनंतर उन्हाने व्याकुल झालेला पुरुष जसा उदकाकडे धावतो, तशी रामवियोग-दुःखामुळे अत्यंत पीडित झालेली ती नगरी बाल व वृद्ध यांसहवर्तमान रामाच्या मागोमाग धावूं लागली. (१६-२०)

सारांश, बाजूंना व मागे लोंबकळून व सारथ्याकडे तोंड करून अश्रूंनी मुख भिजून गेलेले असे सर्व लोक अत्यंत आक्रोश करीत करीत त्याला म्हणाले, "हे सारथ्या, अरे घोड्यांचे लगाम आवरून धर आणि हलके हलके जा. आम्ही रामाचे मुख पाहून घेतों. आता आम्हांला त्याचें दर्शन दुर्लभ होणार आहे. खरोखर रामाच्या मातेचें हृदय निःसंशय लोखंडाचें आहे; कारण आपला स्कंदासारखा पुत्र वनांत निघाला असतांही तें फुटून जात नाही. छायेप्रमाणे पतीला अनुसरणारी ही वैदेही खरोखर कृतकृत्य आहे; कारण, सूर्याची प्रभा ज्याप्रमाणे मेरुपर्वताला

न जहाति रता धर्मे मेरुमर्कप्रभा यथा २४
अहो लक्ष्मण सिद्धार्थः सततं प्रियवादिनम् ।
भ्रातरं देवसंकाशं यस्त्वं परिचरिष्यसि २५
महत्येषा हि ते बुद्धिरेष चाभ्युदयो महान् ।
एष स्वर्गस्य मार्गश्च यदेनमनुगच्छसि २६
एवं वदन्तस्ते सोढुं न शेकुर्बाष्पमागतम् ।
नरास्तमनुगच्छन्ति प्रियमिक्ष्वाकुनन्दनम् २७
अथ राजा वृतः स्त्रीभिर्दीनाभिर्दीनचेतनः ।
निर्जगाम प्रियं पुत्रं द्रक्ष्यामीति ब्रुवन्गृहात् २८
शुश्रुवे चाग्रतः स्त्रीणां रुदतीनां महास्वनः ।
यथा नादः करेणूनां बद्धे महति कुञ्जरे २९
पिता हि राजा काकुत्स्थः श्रीमान्सन्नस्तदा बभौ ।
परिपूर्णः शशी काले ग्रहेणोपप्लुतो यथा ३०

सोडीत नाही, त्याप्रमाणे धर्माचे ठिकाणीं रत असलेली ही सीता आपल्या पतीला सोडून रहात नाही. हे लक्ष्मणा, नेहमी प्रिय भाषण करणाऱ्या आपल्या देवतुल्य भ्रात्याची ज्या अर्थी तुला नित्य सेवा घडणार आहे, त्या अर्थी तूं कृतार्थ आहेस. ही तुझी बुद्धि मोठी प्रशंसनीय आहे; यापासूनच तुझा मोठा भाग्योदय होणार आहे आणि या रामाच्या मागोमाग जात आहेस, हाच स्वर्गाचा मार्ग आहे." ( २१-२६ )

याप्रमाणे ते लोक बोलूं लागले असतां नेत्रांत भरलेले अश्रु त्यांच्याने थांबवून धरवेनात; परंतु ते लोक तसेंच त्या प्रिय इक्ष्वाकुवंशजाच्या मागोमाग चालले. तदनंतर अंतःकरणामध्ये खिन्न झालेला व दीन स्त्रियांनी परिवेष्टित असलेला दशरथ राजा, "प्रिय पुत्राला अवलोकन करितों," असें म्हणत म्हणत घरांतून बाहेर पडला. तेव्हा महागज बद्ध झाला असतां ज्याप्रमाणे हत्तिणी आक्रोश करूं लागतात, त्याप्रमाणे पुढे जांताच रोदन करीत असलेल्या स्त्रियांचा प्रचंड ध्वनि कानीं येऊं लागला. तेव्हा ककुत्स्थकुलोत्पन्न व श्रीमान् पिता दशरथराजा पर्वदिवशीं राहूने ग्रस्त केलेल्या चंद्राप्रमाणे खिन्न होऊन गेला. ( २७-३० )

स च श्रीमानचिन्त्यात्मा रामो दशरथात्मजः ।
सूतं संचोदयामास त्वरितं वाह्यतामिति ३१
रामो याहीति तं सूतं तिष्ठति च जनस्तथा ।
उभयं नाशकत्सूतः कर्तुमध्वनि चोदितः ३२
निर्गच्छति महाबाहौ रामे पौरजनाश्रुभिः ।
पतितैरभ्यवहितं प्रणनाश महीरजः ३३
रुदिताश्रुपरिद्यूनं हाहाकृतमचेतनम् ।
प्रयाणे राघवस्यासीत्पुरं परमपीडितम् ३४
सुस्राव नयनैः स्त्रीणामस्रमायाससंभवम् ।
मीनसंक्षोभचलितैः सलिलं पङ्कजैरिव ३५
दृष्ट्वा तु नृपतिः श्रीमानेकचित्तगतं पुरम् ।
निपपातैव दुःखेन कृत्तमूल इव द्रुमः ३६
ततो हलहलाशब्दो जज्ञे रामस्य पृष्ठतः ।

हें पाहून अचिंत्य धैर्याने युक्त असलेल्या वैभवशाली दशरथपुत्र रामानें "लवकर हाक" म्हणून सारथ्याला सुचविलें. त्या सारथ्याला "चल" म्हणून राम सांगूं लागला आणि "थांब" म्हणून लोक म्हणूं लागले; तेव्हा दोन्ही प्रकारच्या आज्ञा झालेल्या त्या सारथ्याला मार्गामध्ये त्या दोहोंपैकी कांहीच करितां येईना. महापराक्रमी राम नगरांतून जाऊं लागला असतां रथानें उडालेली भूमीवरील धूळ तिच्यावर नगरवासी जनांच्या अश्रूंचा शिडकाव होऊन नाहींशी झाली. रामाच्या प्रयाणसमयीं नगरांतील लोक अत्यंत कष्टी झाले; जिकडे तिकडे दुःखाश्रूंचे पूर लोटून सर्वत्रच उत्साह नाहींसा झाल्याकारणाने हाहाकार उडून सर्व नगरांतले लोक अत्यन्त दुःखाने मूर्च्छित झाले आणि मत्स्यांच्या हालचालीने चलित झालेल्या कमलापासून जसें पाणी गळूं लागतें, तसें स्त्रियांच्या नेत्रांतून गळूं लागलें. याप्रमाणे सर्व नगरांतील लोकांचें चित्त एका दुःखामध्येच मग्न झालेलें आहे, असें दिसून आल्यावर श्रीमान् दशरथराजा मुळें तोडलेल्या वृक्षाप्रमाणे दुःखाने भूमीवर पडला. ( ३१-३६ )

तेव्हा अत्यंत दुःखित होऊन राजा मूर्च्छित झाल्याचें पाहून रामाच्या मागे

नराणां प्रेक्ष्य राजानं सीदन्तं भृशदुःखितम् ३७
हा रामेति जनाः केचिद्राममातेति चापरे।
अन्तःपुरसमृद्धं च क्रोशन्तं पर्यदेवयन् ३८
अन्वीक्षमाणो रामस्तु विषण्णं भ्रान्तचेतसम्।
राजानं मातरं चैव ददर्शानुगतौ पथि ३९
स बद्ध इव पाशेन किशोरो मातरं यथा।
धर्मपाशेन संयुक्तः प्रकाशं नाभ्युदैक्षत ४०
पदातिनौ च यानार्हावदुःखार्हौ सुखोचितौ।
दृष्ट्वा संचोदयामास शीघ्रं याहीति सारथिम् ४१
न हि तत्पुरुषव्याघ्रो दुःखजं दर्शनं पितुः।
मातुश्च सहितुं शक्तस्तोत्रैर्नुन्न इव द्विपः ४२
प्रत्यगारमिवायान्ती सवत्सा वत्सकारणात्।

चाललेल्या लोकांमध्ये हाहाकार उडाला; आणि अंतःपुरासहवर्तमान आक्रोश करीत असलेल्या राजाला अवलोकन करून काही लोक "हे रामा" असें म्हणून व कांही लोक "हे राममाते" असें म्हणून शोक करूं लागले. तेव्हा राम मागे वळून पाहूं लागला असतां राजा व माता आपल्या मागोमाग येत असून राजा खिन्न झाला आहे व त्याचें अंतःकरण गोंधळून गेलें आहे, असें मार्गामध्ये त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें; परंतु पाशानें बद्ध झालेल्या शिंगराला जसें आपल्या मातेकडे मोकळेपणानें पाहतां येत नाही, त्याप्रमाणे धर्मपाशानें बद्ध झालेल्या रामाला वर मान करून उघडपणें त्यांच्याकडे पाहतां येईना. तेव्हा दुःखाचा ज्यांना कधीच अनुभव नाही व नेहमी ज्यांनी सुखच भोगलेलें आहे व रथावर आरोहण करून गमन करणेंच ज्यांना उचित आहे, असे आपले मातापितर पायांनी आपल्या मागोमाग येत आहेत, असें आढळून आल्यावर "लवकर चल" म्हणून रामानें सारथ्याला सांगितलें. ( ३७--४१ )

अंकुशांनी ताडित झालेला गज ज्याप्रमाणे आपल्या पाठीमागें असलेली वस्तु पाहण्यास समर्थ होत नाही, त्याचप्रमाणे पित्याची व मातेची ती दुःखदायक मुद्रा पाहण्यास पुरुषश्रेष्ठ राम समर्थ झाला नाही; परंतु घरांत वासरूं

बद्धवत्सा यथा धेनू राममाताभ्यधावत ४३
तथा रुदन्तीं कौसल्यां रथं तमनुधावतीम् ।
क्रोशन्तीं राम रामेति हा सीते लक्ष्मणेति च ४४
रामलक्ष्मणसीतार्थं स्रवन्ता वारि नेत्रजम् ।
असकृत्प्रेक्षत स तां नृत्यन्तीमिव मातरम् ४५
तिष्ठेति राजा चुक्रोश याहि याहीति राघवः ।
सुमन्त्रस्य बभूवात्मा चक्रयोरिव चान्तरा ४६
नाश्रौषमिति राजानमुपालब्धोऽपि वक्ष्यसि ।
चिरं दुःखस्य पापिष्ठमिति रामस्तमब्रवीत् ४७
स रामस्य वचः कुर्वन्ननुज्ञाप्य च तं जनम् ।
व्रजतोऽपि हयाञ्शीघ्रं चोदयामास सारथिः ४८

---

बांधून ठेविलें असलें म्हणजे गाय परत येतांना वासराकरिता जशी धावत धावत घरीं येते, तशी राममाता रामाच्या मागेमाग धावूं लागली. तेव्हा त्या आपल्या रथाच्या मागोमाग आपली माता कौसल्या रोदन करीत करीत धावत येत आहे, " हे रामा, हे रामा, हे सीते, हे लक्ष्मणा, " असा आक्रोश करीत आहे आणि राम, लक्ष्मण व सीता यांच्याकरिता अश्रु ढाळीत ढाळीत थयथयाट करीत आहे, असे त्या रामाने अवलोकन केलें. ( ४२-४५ )

" थांब थांब " म्हणून दशरथराजा सुमंत्र सारथ्याला ओरडून सांगूं लागला आणि " चल चल " असे त्याला राम म्हणूं लागला. तेव्हा त्या सुमंत्र सारथ्याचे मन एकमेकांवर चालून येणाऱ्या विरोधी दोन चक्रांच्या मध्यभागी असलेल्या पुरुषाप्रमाणे उदासीन झालें. " मी थांब थांब म्हणत असतांनाही तूं थांबत नाहीस, म्हणून राजा जरी तुला रागें भरला तरी ' मला राजाचे म्हणणे ऐकूं आलें नाहीं, ' असें समजून तूं रथ पुढे हांकीत जा; कारण जाण्याला विलंब करणें, हें माझ्या दुःखाचें कारण असल्यामुळे ते फारच वाईट आहे. यास्तव, ' सत्वर चल ' " असें राम त्याला म्हणाला. असें रामाने सांगितल्यानंतर रामाच्या आज्ञेप्रमाणे वागणाऱ्या त्या सुमंत्र सारथ्याने मागोमाग येत असलेल्या त्या लोकांचा निरोप घेऊन स्वेच्छेने जात असलेल्या अश्वांना सत्वर जाण्याकरिता

न्यवर्तत जनो राज्ञो रामं कृत्वा प्रदक्षिणम् ।
मनसाप्याशुवेगेन न न्यवर्तत मानुषम् ४९
यमिच्छेत्पुनरायातं नैनं दूरमनुव्रजेत् ।
इत्यमात्या महाराजमूचुर्दशरथं वचः ५०
तेषां वचः सर्वगुणोपपन्नः प्रस्विन्नगात्रः प्रविषण्णरूपः ।
निशम्य राजा कृपणः सभार्यो व्यवस्थितस्तं सुतमीक्षमाणः ५१
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चत्वारिंशः सर्गः ॥४०॥

एकचत्वारिंशः सर्गः । [ १६९३ ]

तस्मिंस्तु पुरुषव्याघ्रे निष्क्रामति कृताञ्जलौ ।
आर्तशब्दो हि संजज्ञे स्त्रीणामन्तःपुरे महान् १
अनाथस्य जनस्यास्य दुर्बलस्य तपस्विनः ।
यो गतिः शरणं चासीत्स नाथः क्व नु गच्छति २
न क्रुध्यत्यभिशस्तोऽपि क्रोधनीयानि वर्जयन् ।

---

प्रेरणा केली; तेव्हा रामाला प्रदक्षिणा करून राजकीय लोक देहाने परत फिरले; परंतु शीघ्र वेगाने युक्त असलेल्या मनाने ते परत फिरले नाहीत आणि रामाच्या मागोमाग चाललेला इतर मनुष्यसमूह तर देहाने व मनानेही परत फिरला नाही. "जो फिरून परत यावा, अशी आपल्याला इच्छा असेल त्याला लांब पोचविण्यास जाऊं नये," असें अमात्य महाराज दशरथाला सांगूं लागले. तेव्हा खिन्नवदन होऊन सर्वांगाला घाम सुटलेला तो सर्वगुणसंपन्न दीन दशरथराजा त्यांचें सांगणें ऐकून भार्येसहवर्तमान त्या आपल्या पुत्राकडे पहात उभा राहिला. ( ४९-५१ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं चाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४० ॥

तो पुरुषश्रेष्ठ राम हात जोडून बाहेर जाऊं लागला असतां, स्त्रियांच्या अंतःपुरामध्ये मोठाच आक्रोश होऊं लागला. आणि त्या आपल्याशीं म्हणाल्या " आम्ही बिचाऱ्या अनाथ व दुर्बलांचे सर्व संकटांपासून रक्षण करणारा आणि आम्हांला सर्व प्रकारच्या सुखांची प्राप्ति करून देणारा असा तो नाथ राम कोठे हो जात आहे ? कोणीही त्याच्यावर खोटा आरोप केला असतां तो क्रुद्ध होत नाही व

क्रुद्धान्प्रसादयन्सर्वान्समदुःखः क्व गच्छति ३
कौसल्यायां महातेजा यथा मातरि वर्तते ।
तथा यो वर्ततेऽस्मासु महात्मा क्व नु गच्छति ४
कैकेय्या क्लिश्यमानेन राज्ञा संचोदितो वनम् ।
परित्राता जनस्यास्य जगतः क्व नु गच्छति ५
अहो निश्चेतनो राजा जीवलोकस्य संक्षयम् ।
धर्म्यं सत्यव्रतं रामं वनवासे प्रवत्स्यति ६
इति सर्वा महिष्यस्ता विवत्सा इव धेनवः ।
रुरुदुश्चैव दुःखार्ताः सस्वरं च विचुक्रुशुः ७
स तमन्तःपुरे घोरमार्तशब्दं महीपतिः ।
पुत्रशोकाभिसंतप्तः श्रुत्वा चासीत्सुदुःखितः ८
नाग्निहोत्राण्यहूयन्त सूर्यश्चान्तरधीयत ।
व्यसृजन्कवलान्नागा गावो वत्सान्न पाययन् ९
त्रिशङ्कुर्लोहिताङ्गश्च बृहस्पतिबुधावपि ।

प्रजेला क्रोध उत्पन्न होईल, अशीं कृत्यें वर्ज्य करून क्रुद्ध झालेल्या सर्व लोकांचें नेहमी सांत्वन करीत असतो असा व प्रजाजनांना दुःख झालें असतां स्वतः दुःखी होणारा राम कोठे बरें जात आहे ? कौसल्या मातेचे ठिकाणीं व आमचे ठिकाणीं जो सारखाच वागत असतो, तो महात्मा कोठ हो जात आहे ? कैकेयी त्रास देऊं लागल्यामुळे राजानें वनांत जाण्याची आज्ञा केलेला व केवल आमचेंच नव्हे परंतु सर्व जगताचें रक्षण करणारा राम कोठे बरें जात आहे ? ( १--५ )

अहो, धर्माला अनुसरून वागणाऱ्या, सत्यव्रतानें चालणाऱ्या आणि जगताला आधार असलेल्या रामाला वनवासाकरिता हाकून देणारा राजा खरोखर विचारहीन झालेला आहे." अशा रीतीनें वत्सरहित धेनूप्रमाणें दुःखाकुल झालेल्या त्या सर्व राजस्त्रिया रोदन करून उच्च स्वरानें आक्रोश करूं लागल्या, व अंतः-पुरांतील तो घोर आक्रोश श्रवण करून पुत्रशोकानें अतिशय संतप्त झालेला भूपति दशरथराजा अतिशयच दुःखित झाला. राम चालता झाल्यावर अग्निहोत्र-होम होईनासे झाले, सूर्य आच्छादित झाला, हत्ती गवत खाईनासे झाले व गाईही

दारुणाः सोममभ्येत्य ग्रहाः सर्वे व्यवस्थिताः १०
नक्षत्राणि गतार्चींषि ग्रहाश्च गततेजसः।
विशाखाश्च सधूमाश्च नभसि प्रचकाशिरे ११
कालिकानिलवेगेन महोदधिरिवोत्थितः।
रामे वनं प्रव्रजिते नगरं प्रचचाल तत् १२
दिशः पर्याकुलाः सर्वास्तिमिरेणेव संवृताः।
न ग्रहो नापि नक्षत्रं प्रचकाशे न किंचन १३
अकस्मान्नागरः सर्वो जनो दैन्यमुपागमत्।
आहारे वा विहारे वा न कश्चिदकरोन्मनः १४
शोकपर्यायसंतप्तः सततं दीर्घमुच्छ्वसन्।
अयोध्यायां जनः सर्वश्चुक्रोश जगतीपतिम् १५
बाष्पपर्याकुलमुखो राजमार्गगतो जनः।
न हृष्टो लभ्यते कश्चित्सर्वः शोकपरायणः १६
न वाति पवनः शीतो न शशी सौम्यदर्शनः।

वासरांना पाजीनाशा झाल्या. त्रिशंकु, मंगल, बृहस्पति, बुध व इतर सर्व ग्रह दारुण होऊन रात्रीं वक्रगतीने चंद्रासमीप येऊन राहिले. ( ६--१० )

नक्षत्रें निस्तेज झालीं; ग्रहांची कांति नाहीशी झाली व ते ग्रह आपला मार्ग सोडून आकाशामध्ये धूमयुक्त दिसूं लागले. वायूच्या वेगामुळे मेघपंक्ति आकाशांत उद्भवलेल्या सागराप्रमाणेच दिसूं लागली व राम वनांत गेला असतां तें सर्व नगर भूकंपाने हलूं लागलें. अंधकाराने जशा कांही सर्व दिशा व्याप्त होऊन जाऊन ग्रह, नक्षत्रें वगैरे कांहींच प्रकाश देईनासे झाले. नगरांतील सर्व लोकांना एकाएकीं दैन्य प्राप्त झालें आणि खाण्याकडे अथवा व्यवहाराकडे कोणाचेंही लक्ष्य लागेनासें झालें. इतकेंच नव्हे परंतु वारंवार शोकसंतप्त झाल्यामुळे अयोध्येंतील सर्व लोक एकसारखे दीर्घ उच्छ्वास टाकूं लागले, आणि ते भूपति दशरथाच्या नांवाने आक्रोश करूं लागले. ( ११--१५ )

राजमार्गामध्ये असलेल्या लोकांचीं मुखें अश्रूंनी भरून गेलीं आणि सर्वच शोकाकुल झाल्यामुळे आनंदित असा कोणीही दृष्टोत्पत्तीस येईना. थंड वारा

न सूर्यस्तपते लोकं सर्वं पर्याकुलं जगत् १७
अनर्थिनः सुताः स्त्रीणां भर्तारो भ्रातरस्तथा ।
सर्वे सर्वं परित्यज्य राममेवान्वचिन्तयन् १८
ये तु रामस्य सुहृदः सर्वे ते मूढचेतसः ।
शोकभारेण चाक्रान्ताः शयनं नैव भेजिरे १९
ततस्त्वयोध्या रहिता महात्मना पुरन्दरेणेव मही सपर्वता ।
चचाल घोरं भयशोकदीपिता सनागयोधाश्वगणा ननाद च २०

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकचत्वारिंशः सर्गः ॥४१॥

द्विचत्वारिंशः सर्गः । [१७१३]

यावत्तु निर्यतस्तस्य रजोरूपमदृश्यत ।
नैवेक्ष्वाकुवरस्तावत्संजहारात्मचक्षुषी १
यावद्राजा प्रियं पुत्रं पश्यत्यत्यन्तधार्मिकम् ।

---

वाहेनासा झाला, चंद्र पूर्वाप्रमाणे सौम्य दिसेनासा झाला व सूर्य जगताला प्रकाशित करीनासा झाला. सारांश, सर्व ब्रम्हांडच शोकाकुल होऊन गेलें. पुत्र मातापितरांची अपेक्षा धरीनासे झाले आणि भर्ते स्त्रियांची गरज बाळगीनासे झाले आणि भ्राते भ्रात्यांचें आगत्य ठेवीनासे झाले. तात्पर्य, सर्व लोक सर्व कांहीं सोडून देऊन रामाचें चिंतन करूं लागले. रामाचे जे सुहृद् होते, त्यांचें मन अगदींच मोहित होऊन गेलें व शोकभराने व्याप्त झाल्यामुळे त्यांना झोप कसली ती मुळीच येईनाशी झाली. तेव्हा पर्वत आणि मेरुपर्वत यांसहवर्तमान पृथ्वी इंद्ररहित झाली असतां जशी हलूं लागते, त्याप्रमाणे महात्म्या रामाने रहित झालेली अयोध्या भय व शोक यांच्या योगाने जणू काय अगदी पेटून जाऊन भयंकर रीतीने हलूं लागली आणि गज, योद्धे व अश्व यांच्या सैन्यासहवर्तमान ती नगरी आक्रोश करूं लागली. (१६–२०)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी एकेचाळिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ४१ ॥

राम वनांत चालू लागला असतां, त्याच्या रथाने उडालेली धूळ जोंपर्यंत दिसत होती, तोंपर्यंत इक्ष्वाकुवंशजश्रेष्ठ दशरथराजाने आपले नेत्र परत फिरविले

तावद्व्यवर्धतेवास्य धरण्यां पुत्रदर्शने २
न पश्यति रजोऽप्यस्य यदा रामस्य भूमिपः ।
तदार्तश्च विषण्णश्च पपात धरणीतले ३
तस्य दक्षिणमन्वागात्कौसल्या बाहुमङ्गना ।
परं चास्यान्वगात्पार्श्वं कैकेयी सा सुमध्यमा ४
तां नयेन च संपन्नो धर्मेण विनयेन च ।
उवाच राजा कैकेयीं समीक्ष्य व्यथितेन्द्रियः ५
कैकेयि मामकाङ्गानि मा स्प्राक्षीः पापनिश्चये ।
नहि त्वां द्रष्टुमिच्छामि न भार्या न च बान्धवी ६
ये च त्वामनुजीवन्ति नाहं तेषां न ते मम ।
केवलार्थपरां हि त्वां त्यक्तधर्मां त्यजाम्यहम् ७
अगृह्णां यच्च ते पाणिमग्निं पर्यणयं च यत् ।

नाहीत. जोंपर्यंत अत्यंत धार्मिक अशा आपल्या प्रिय पुत्राला राजा अवलोकन करीत होता, तोंपर्यंत पुत्रदर्शनाकरिता भूमीवर त्याचें शरीर जसें कांहीं वृद्धिंगतच होत होतें. सारांश, जोंपर्यंत रथाने उडालेली धूळ दृष्टीस पडण्याचा संभव होता, तोंपर्यंत दशरथराजा पायाच्या चवड्यावर उभा राहून व उंच मान करून तीं पहातच होता; परंतु वनांत जाणाऱ्या रामाच्या रथाने उडालेली धूळसुद्धा जेव्हा दिसेनाशी झाली, तेव्हा दशरथ भूपति व्याकुल व खिन्न होऊन भूतलावर पडला. तेव्हा त्याला उठवून व त्याचा उजवा हात धरून कौसल्या नगरामध्ये परत आली व ती सुंदरी कैकेयी फक्त त्याच्या डाव्या बाजूला राहूनच त्याच्याबरोबर नगरामध्ये आली; कारण न्याय, धर्म व विनय यांनी युक्त असून, अंतःकरणामध्ये क्षुब्ध झालेला तो दशरथराजा कैकेयीला पाहून म्हणाला.( १-५)

"हे कैकेयी, तूं माझ्या अवयवांना स्पर्श करूं नकोस. हे पापनिश्चये, मला तुझें तोंड पाहण्याची इच्छा नाही. तूं माझी भार्या नव्हेस, इतकेंच नव्हे, परंतु लांबची कोणी नातेवाईकसुद्धा नव्हेस. तुझ्या आश्रयाने जे उपजीविका करणारे असतील, त्यांचा मी कोणी नव्हे व तेही माझे कोणी नव्हेत. धर्माचा त्याग करून केवळ स्वार्थाकडे दृष्टि ठेवणाऱ्या तुझा मी त्याग करितों. मी जें तुझें पाणिग्रहण केलें आणि

अनुजानामि तत्सर्वमस्मिँल्लोके परत्र च　८
भरतश्चेत्प्रतीतः स्याद्राज्यं प्राप्यैतदव्ययम् ।
यन्मे स दद्यात्पित्रर्थं मा मां तद्दत्तमागमत्　९
अथ रेणुसमुद्ध्वस्तं समुत्थाप्य नराधिपम् ।
न्यवर्तत तदा देवी कौसल्या शोककर्शिता　१०
हत्वेव ब्राह्मणं कामात्स्पृष्ट्वाग्निमिव पाणिना ।
अन्वतप्यत धर्मात्मा पुत्रं संचिन्त्य राघवम्　११
निवृत्यैव निवृत्यैव सीदतो रथवर्त्मसु ।
राज्ञो नातिबभौ रूपं ग्रस्तस्यांशुमतो यथा　१२
विललाप स दुःखार्तः प्रियं पुत्रमनुस्मरन् ।
नगरान्तमनुप्राप्तं बुध्वा पुत्रमथाब्रवीत्　१३
वाहनानां च मुख्यानां वहतां तं ममात्मजम् ।
पदानि पथि दृश्यन्ते स महात्मा न दृश्यते　१४

---

तुझ्याकडून अग्नीला जी मी प्रदक्षिणा घालविली, त्यांपासून साध्य होणारे इहलोक व परलोकसंबन्धी व्यवहार तुझ्यासह करण्याचें मी आजपासून बन्द करतों. हें अक्षय्य राज्य प्राप्त झाल्याने भरत जर संतुष्ट होईल, तर पिता असें समजून, तो जें कांहीं माझें श्राद्धवगैरे करील, तें मला न पोचो.'' ( ६-९ )

असो. धुळीने भरलेल्या राजाला भूतलावरून उठविल्यावर शोकाकुल झालेली राजपत्नी कौसल्या राजासहवर्तमान परत आली असतां, तो धर्मनिष्ठ दशरथराजा पुत्र रामाचें चिंतन करून ब्राह्मणाचा वध केल्याप्रमाणे अथवा अग्नीला हस्तस्पर्श केल्याप्रमाणे दुःख करूं लागला. ज्या मार्गाने रामाचा रथ गेला, तो मार्ग पुनः-पुनः दशरथ पाहूं लागला असतां त्याला फारच क्लेश होऊं लागले व त्या वेळीं राहुग्रस्त झालेल्या सूर्याप्रमाणे त्या राजाचें रूप तेजोहीन दिसूं लागलें आणि पुत्र नगराबाहेर गेला, असें जेव्हा त्याला समजून आलें, तेव्हा त्या प्रिय पुत्राचें स्मरण करून दुःखाकुल झालेला तो दशरथराजा असा विलाप करूं लागला. '' त्या माझ्या पुत्राला वाहून नेणाऱ्या श्रेष्ठ अश्वांचीं पाउलें मार्गामध्ये दिसत आहेत; परंतु तो महात्मा कोठें दिसत नाहीं. ( १०-१४ )

यः सुखेनोपधानेषु शेते चन्दनरूषितः।
वीज्यमानो महार्हाभिः स्त्रीभिर्मम सुतोत्तमः १५
स नूनं क्वचिदेवाद्य वृक्षमूलमुपाश्रितः।
काष्ठं वा यदि वाश्मानमुपधाय शयिष्यते १६
उत्थास्यति च मेदिन्याः कृपणः पांसुगुण्ठितः।
विनिःश्वसन्प्रस्रवणात्करेणूनामिवर्षभः १७
द्रक्ष्यन्ति नूनं पुरुषा दीर्घबाहुं वनेचराः।
राममुत्थाय गच्छन्तं लोकनाथमनाथवत् १८
सा नूनं जनकस्येष्टा सुता सुखसदोचिता।
कण्टकाक्रमणक्रान्ता वनमद्य गमिष्यति १९
अनभिज्ञा वनानां सा नूनं भयमुपैष्यति।
श्वापदानर्दितं श्रुत्वा गम्भीरं रोमहर्षणम् २०
सकामा भव कैकेयि विधवा राज्यमावस।
न हि तं पुरुषव्याघ्रं विना जीवितुमुत्सहे २१

उत्कृष्ट अलंकार धारण केलेल्या स्त्रिया वारा घालीत असतांना चंदनाची उटी लाविलेला जो माझा उत्कृष्ट पुत्र गाद्यागिरद्यांवर पडत असे, तो आज खरोखर वृक्षमूलांचा आश्रय करून, काष्ठ अथवा पाषाण उशाशीं घेऊन कोठेतरी पडेल. हत्तिणींचा पति पर्वतशिखरप्रभृति प्रदेशावरून जसा उठतो, तसा धुळीने भरलेला तो दीन राम सुस्कारे टाकीत टाकीत पृथ्वीवरून उठेल व तो आजानुबाहु जगत्पति राम उठून जाऊं लागला असतां, खरोखर वनांत संचार करणारे लोक अनाथाप्रमाणे त्याला अवलोकन करतील. नेहमी सुखाचा उपभोग घेण्याची संवय झालेल्या त्या प्रिय जनककन्येला कांट्यांतून चालल्याने क्लेश होतील आणि अशी ती आज वनामध्ये जाईल. वनांविषयी माहिती नसलेल्या त्या जनककन्येने गंभीर आणि अंगावर कांटा आणणारी अशी श्वापदांची गर्जना ऐकिली, म्हणजे तिला खरोखर भय प्राप्त होईल. ( १६–२० )

हे कैकेयी, तुझे मनोरथ आता परिपूर्ण होऊं दे; तूं विधवा होऊन राज्य कर; कारण त्या पुरुषश्रेष्ठ रामावाचून मला जिवंत रहावेसें वाटत नाही. ” याप्रमाणे

इत्येवं विलपन्राजा जनौघेनाभिसंवृतः ।
अपस्नात इवारिष्टं प्रविवेश गृहोत्तमम् २२
शून्यचत्वरवेश्मान्तां संवृतापणवेदिकाम् ।
क्लान्तदुर्बलदुःखार्तां नात्याकीर्णमहापथाम् २३
तामवेक्ष्य पुरीं सर्वां राममेवानुचिन्तयन् ।
विलपन्प्राविशद्राजा गृहं सूर्य इवाम्बुदम् २४
महाह्रदमिवाक्षोभ्यं सुपर्णेन हृतोरगम् ।
रामेण रहितं वेश्म वैदेह्या लक्ष्मणेन च २५
अथ गद्गदशब्दस्तु विलपन्वसुधाधिपः ।
उवाच मृदु मन्दार्थं वचनं दीनमस्वरम् २६
कौसल्याया गृहं शीघ्रं राममातुर्नयन्तु माम् ।
न ह्यन्यत्र ममाश्वासो हृदयस्य भविष्यति २७

जनसमुदायांनी परिवेष्टित असलेला राजा विलाप करीत करीत मृताला पोहोचवून स्नान करून घरांत जाणाऱ्या पुरुषाप्रमाणे दुःखित होऊन आपल्या उत्कृष्ट गृहामध्ये प्रविष्ट झाला. तात्पर्य, सर्व लोक रामाच्या मागोमाग गेले असल्यामुळे जिच्यांतील घरांच्या पुढल्या बाजूला व मध्यभागांतही कोणी नव्हतें, जिच्यांतील दुकानें बंद केलेलीं होतीं, जिच्यांतील लोक कष्टी, दुर्बल व दुःखी झालेले होते आणि जिच्यांतील मोठमोठे मार्गही विशेषसे गजबजलेले दिसत नव्हते, अशी ती सर्व नगरी अवलोकन करून रामाचेंच चिंतन करणारा तो दशरथराजा मेघांमध्ये प्रवेश करणाऱ्या सूर्याप्रमाणे विलाप करीत करीत गृहामध्ये प्रविष्ट झाला. (२१–२४)

त्या घरामध्ये राम, सीता व लक्ष्मण नसल्यामुळे तें घर गरुडाने आंतील सर्प नाहींसे केल्यामुळे क्षोभरहित झालेल्या महासरोवराप्रमाणे स्तब्ध दिसूं लागलें. असो. घरांत आल्यानंतर दुःखामुळे ज्याचा शब्द अडखळत आहे, असा तो भूपति दशरथराजा विलाप करीत करीत अतिशयच सावकाश, फारच हळू आणि म्हणूनच अर्थबोधरहित अशा दीनवाणीने म्हणाला, " राममाता कौसल्येच्या घरीं मला लवकर न्या; दुसऱ्या ठिकाणीं माझ्या अंतःकरणाला बरें वाटणार

तथा विलपतां तेषामतृप्तानां च राघवः ।
अचक्षुर्विषयं प्रायाद्यथार्कः क्षणदामुखे ७
ततो धान्यधनोपेतान्दानशीलजनाञ्छिवान् ।
अकुतश्चिद्भयान्रम्यांश्चैत्ययूपसमावृतान् ८
उद्यानाम्रवणोपेतान्संपन्नसलिलाशयान् ।
तुष्टपुष्टजनाकीर्णान् गोकुलाकुलसेवितान् ९
रक्षणीयान्नरेन्द्राणां ब्रह्मघोषाभिनादितान् ।
रथेन पुरुषव्याघ्रः कोसलानत्यवर्तत १०
मध्येन मुदितं स्फीतं रम्योद्यानसमाकुलम् ।
राज्यं भोज्यं नरेन्द्राणां ययौ धृतिमतां वरः ११
तत्र त्रिपथगां दिव्यां शीततोयामशैवलाम् ।
ददर्श राघवो गङ्गां रम्यामृषिनिषेविताम् १२

करून प्रदक्षिणा केली आणि घोर विलाप करीत करांत ते लोक ठिकठिकाणीं उभे राहिले. तेव्हा रामाच्या दर्शनाविषयीं तृप्त न झालेले ते लोक विलाप करीत असतांना प्रदोषसमयीं ज्याप्रमाणे सूर्य दृष्टीच्या टप्प्यांतून निघून जातो त्याप्रमाणे राम त्यांच्या दृष्टीच्या आटोक्यांतून पलीकडे गेला. तदनंतर धनधान्यसंपन्न, दानशूर पुरुषांनी युक्त, कल्याणकारक, सर्वथा निर्भय, रम्य, देवताधिष्ठानभूत वृक्षांनी व यज्ञस्तंभांनी व्याप्त, उपवनें, आम्रवृक्षांचीं वनें आणि समृद्ध जलाशयें यांनी युक्त, संतुष्ट अशा प्रजाजनांनी व्याप्त, गाईंच्या खिल्लारांनीं अतिशय गजबजून गेलेला, राजांनी रक्षण करण्यास योग्य व वेदघोषाने नादित असा कोसल देश रथाने ओलांडून तो पुरुषश्रेष्ठ राम पलीकडे गेला व तो देश ओलांडिल्यावर मध्यगर्तीने धैर्यवानांमध्ये श्रेष्ठ असलेला तो राम इतर राजांच्या ताब्यांत असलेल्या आनंदित, समृद्ध व रमणीय उपवनांनी व्याप्त अशा देशांतून चालला. ( ६-११ )

अयोध्येच्या राज्यापासून दक्षिण दिशेस असलेल्या त्या देशामध्ये रामाने तीन मार्गांनी जाणारी, दिव्य, रमणीय, ऋषींनी सेवित, शीत उदकाने युक्त आणि शेवाळें नसलेली अशी गंगा अवलोकन केली. तीरापासून जवळच असलेल्या भव्य

आश्रमैरविदूरस्थैः श्रीमद्भिः समलङ्कृताम् ।
कालेऽप्सरोभिर्हृष्टाभिः सविताम्भोह्रदां शिवाम् १३
देवदानवगन्धर्वैः किंनरैरुपशोभिताम् ।
नागगन्धर्वपत्नीभिः सेवितां सततं शिवाम् १४
देवाक्रीडशताकीर्णां देवोद्यानयुतां नदीम् ।
देवार्थमाकाशगतां विख्यातां देवपद्मिनीम् १५
जलाघाताट्टहासोग्रां फेननिर्मलहासिनीम् ।
क्वचिद्वेणीकृतजलां क्वचिदावर्तशोभिताम् १६
क्वचित्स्तिमितगम्भीरां क्वचिद्वेगसमाकुलाम् ।
क्वचिद्गम्भीरनिर्घोषां क्वचिद्भैरवनिःस्वनाम् १७
देवसङ्घाप्लुतजलां निर्मलोत्पलसंकुलाम् ।
क्वचिदाभोगपुलिनां क्वचिन्निर्मलवालुकाम् १८

---

आश्रमांनी ती भूषित झालेली होती आणि क्रीडासमयीं अप्सरा आनंदित होऊन त्या पुण्यगंगेच्या डोहाचा आश्रय करीत असत. देव, दानव, गंधर्व आणि किन्नर यांच्या योगाने तिला शोभा आलेली होती व नागपत्न्या आणि गंधर्वपत्न्या त्या शुभ गंगेचें सतत सेवन करीत होत्या. देवांच्या शेकडों क्रीडापर्वतांनी ती नदी गजबजलेली होती, देवांच्या उपवनांनी ती युक्त होती आणि देवांकरिता आकाशामध्ये गेलेल्या त्या गंगेमध्ये देवांनाच उपभोग घेण्यास योग्य अशीं सुवर्णकमलें होतीं. जलाघातरूप अट्टाहासामुळे ती उग्र दिसत होती, फेनरूप निर्मल हास्याने ती युक्त होती, कोठे कोठे आंत येऊन मिळालेल्या उदकामुळे ती वेणीसारखी दिसत होती आणि कोठे कोठे भोवऱ्यांनी तिला शोभा आलेली होती. ( १२–१६ )

कोठे कोठे ती निश्चल व गंभीर होती, कांही ठिकाणीं वेगाने ती खवळून गेली होती, कोठे कोठे गंभीर ध्वनीने ती युक्त होती आणि कोठे कोठे भयंकर शब्दानेही ती संपन्न होती. देवगण तिच्या उदकामध्ये येऊन स्नान करीत होते, निर्मल कमलांनी ती व्याप्त झालेली होती, कोठे कोठे तिच्या तीरीं विस्तृत वाळवंटें होतीं आणि कोठे कोठे निर्मल वाळूने ती युक्त झाली होती. हंस व सारस

हंससारससंघुष्टां चक्रवाकोपशोभिताम् ।
सदा मत्तैश्च विहगैरभिपन्नामनिन्दिताम् १९
क्वचित्तीररुहैर्वृक्षैर्मालाभिरिव शोभिताम् ।
क्वचित्फुल्लोत्पलच्छन्नां क्वचित्पद्मवनाकुलाम् २०
क्वचित्कुमुदखण्डैश्च कुड्मलैरुपशोभिताम् ।
नानापुष्परजोध्वस्तां समदामिव च क्वचित् २१
व्यपेतमलसंघातां मणिनिर्मलदर्शनाम् ।
दिशागजैर्वनगजैर्मत्तैश्च वरवारणैः २२
देवराजोपवाह्यैश्च संनादितवनान्तराम् ।
प्रमदामिव यत्नेन भूषितां भूषणोत्तमैः २३
फलपुष्पैः किसलयैर्वृतां गुल्मैर्द्विजैस्तथा ।
विष्णुपादच्युतां दिव्यामपापां पापनाशिनीम् २४
शिंशुमारैश्च नक्रैश्च भुजङ्गैश्च समन्विताम् ।
शंकरस्य जटाजूटाद्भ्रष्टां सागरतेजसा २५

पक्ष्यांनी ती नादित झालेली होती, चक्रवाक पक्ष्यांनी तिला शोभा आलेली होती आणि त्या निर्दोष गंगेचा नेहमी मत्त असलेल्या पक्ष्यांनी आश्रय केलेला होता. कोठे कोठे तीरावर वाढलेल्या वृक्षांमुळे माळा घातल्याप्रमाणे तिला शोभा आलेली होती, कोठे कोठे प्रफुल्लित कमलांनी ती आच्छादिलेली होती आणि कोठे कोठे कमलवनांनी ती गजबजून राहिलेली होती. कोठे कोठे उमलूं लागलेल्या कमल-कलिकांच्या समूहांनी तिला शोभा आलेली होती आणि कोठे कोठे अनेक प्रकारच्या पुष्पपरागांनी युक्त झाल्यामुळे ती मत्त स्त्रीप्रमाणे दिसत होती. (१७-२१)

पापसमूह जिने नाहींसा केला आहे, अशा त्या गंगेचें स्वरूप मोत्यांप्रमाणे निर्मल दिसत होतें; दिग्गज, वनगज आणि सुराधिपतींनाच बसण्यास योग्य अशा इतर श्रेष्ठ गजांनी तिच्या तीरावरील वनें नादित झालेलीं होतीं आणि यत्नपूर्वक उत्कृष्ट भूषणांनी भूषित केलेल्या स्त्रीप्रमाणे ती दिसत होती; कारण दिव्य, पापरहित आणि पापनाशक अशी ती विष्णुपदापासून च्युत झालेली गंगा फलें, पुष्पें, पल्लव, झुडपें आणि पक्षी यांनी व्याप्त झालेली होती.

समुद्रमहिषीं गङ्गां सारसक्रौञ्चनादिताम्।
आससाद महाबाहुः शृङ्गवेरपुरं प्रति २६
तामूर्मिकलिलावर्तामन्ववेक्ष्य महारथः।
सुमन्त्रमब्रवीत्सूतमिहैवाद्य वसामहे २७
अविदूरादयं नद्या बहुपुष्पप्रवालवान्।
सुमहानिङ्गुदीवृक्षो वसामोऽत्रैव सारथे २८
प्रेक्षामि सरितां श्रेष्ठां संमान्यसलिलां शिवाम्।
देवमानवगन्धर्वमृगपन्नगपक्षिणाम् २९
लक्ष्मणश्च सुमन्त्रश्च बाढमित्येव राघवम्।
उक्त्वा तमिङ्गुदीवृक्षं तदोपययतुर्हयैः ३०
रामोऽभियाय तं रम्यं वृक्षमिक्ष्वाकुनन्दनः।
रथादवतरत्तस्मात्सभार्यः सह लक्ष्मणः ३१
सुमन्त्रोऽप्यवतीर्याथ मोचयित्वा हयोत्तमान्।

---

जळमाकडें, मगर आणि भुजंग यांनीं तीं युक्त होतीं आणि भगीरथाच्या तपश्चर्येमुळे शंकराच्या जटाकलापापासून ती भ्रष्ट झालेली होती. ( २२–२५ )

असो. सारस व क्रौंच पक्ष्यांनी नादित झालेली ती समुद्रपत्नी गंगा महापराक्रमी रामाला शृंगवेरपुराजवळ लागली. तेव्हा जिच्यांतील भोवऱ्यांमध्ये लाटा मिसळल्या आहेत, अशा त्या गंगेला अवलोकन करून तो महारथि राम सुमंत्र सारथ्याला म्हणाला " आज आपण येथेच वास्तव्य करूं. या नदीच्या जवळच एक प्रचंड इंगुदीवृक्ष आहे व त्याला असंख्य पुष्पें व पल्लव आहेत. तेव्हा, हे सारथ्या, आपण येथेच वास्तव्य करूं. देव, मनुष्य, गंधर्व, मृग, भुजंग आणि पक्षी यांना जिचें उदक संमत आहे, अशी ही शुभ व श्रेष्ठ नदी मी अवलोकन करितों. " ( २६–२९ )

याप्रमाणे रामाने सारथ्याला सांगितलें असतां ' ठीक आहे ' असें रामाला म्हणून लक्ष्मण व सुमंत्र अश्वांच्या योगानें त्या इंगुदीवृक्षाजवळ गेले. तेव्हा त्या रम्य वृक्षाजवळ गेल्यानंतर इक्ष्वाकुवंशज राम भार्या आणि लक्ष्मण यासहवर्तमान त्या रथांतून खाली उतरलीं. नंतर सुमंत्रही खाली उतरला आणि ते उत्तम अश्व

वृक्षमूलगतं राममुपतस्थे कृताञ्जलिः ३२
तत्र राजा गुहो नाम रामस्यात्मसमः सखा ।
निषादजात्यो बलवान्स्थपतिश्चेति विश्रुतः ३३
स श्रुत्वा पुरुषव्याघ्रं रामं विषयमागतम् ।
वृद्धैः परिवृतोऽमात्यैर्ज्ञातिभिश्चाप्युपागतः ३४
ततो निषादाधिपतिं दृष्ट्वा दूरादुपस्थितम् ।
सह सौमित्रिणा रामः समागच्छद्गुहेन सः ३५
तमार्तः संपरिष्वज्य गुहो राघवमब्रवीत् ३६
यथायोध्या तथेदं ते राम किं करवाणि ते ।
ईदृशं हि महाबाहो कः प्राप्स्यत्यतिथिं प्रियम् ३७
ततो गुणवदन्नाद्यमुपादाय पृथग्विधम् ।
अर्घ्यं चापानयच्छीघ्रं वाक्यं चेदमुवाच ह ३८
स्वागतं ते महाबाहो तवेयमखिला मही ।
वयं प्रेष्या भवान्भर्ता साधु राज्यं प्रशाधि नः ३९

सोडिल्यावर वृक्षमूलांशीं बसलेल्या रामासमीप जाऊन तो हात जोडून उभा राहिला. त्या ठिकाणीं रामाचा आत्मतुल्य मित्र असा एक गुहनामक राजा होता. तो जातीचा निषाद असून बलाढ्य आणि प्रख्यात असा निषादांचा अधिपति होता. पुरुषश्रेष्ठ राम आपल्या प्रदेशाला आल्याचें ऐकून वृद्ध अमात्य आणि ज्ञातिबांधव यांनीं परिवेष्टित असलेला तो गुह रामाचे समीप आला. ( ३०-३४ )

तेव्हा निषादाधिपति आला आहे, असें दुरून पाहून लक्ष्मणासहवर्तमान रामानें त्याची भेट घेतली असतां, दुःखित झालेला तो गुह रामाला कडकडून भेटल्यावर म्हणाला "हे रामा, जशी अयोध्या तसें हें नगर आपलेंच आहे. मी आपलें काय कार्य करावें ? हे महापराक्रमी रामा, अशा प्रकारच्या प्रिय अतिथीचा लाभ कोणाला बरें होणार आहे ?" असें म्हटल्यानंतर नानाप्रकारचें चांगलें चांगलें अन्न व पूजासामग्री सत्वर आणून तो गुह रामाला म्हणाला "हे महापराक्रमी रामा, आपलें स्वागत असो; ही संपूर्ण पृथ्वी आपली आहे; आम्ही आपले

भक्ष्यं भोज्यं च पेयं च लेह्यं चैतदुपस्थितम् ।
शयनानि च मुख्यानि वाजिनां खादनं च ते ४०
गुहमेवं ब्रुवाणं तु राघवः प्रत्युवाच ह ।
अर्चिताश्चैव हृष्टाश्च भवता सर्वदा वयम् ४१
पद्भ्यामभिगमाच्चैव स्नेहसंदर्शनेन च ।
भुजाभ्यां साधुवृत्ताभ्यां पीडयन्वाक्यमब्रवीत् ४२
दिष्ट्या त्वां गुह पश्यामि ह्यरोगं सह बान्धवैः ।
अपि ते कुशलं राष्ट्रे मित्रेषु च वनेषु च ४३
यत्त्विदं भवता किंचित्प्रीत्या समुपकल्पितम् ।
सर्वं तदनुजानामि न हि वर्ते प्रतिग्रहे ४४
कुशचीराजिनधरं फलमूलाशनं च माम् ।
विद्धि प्रणिहितं धर्मे तापसं वनगोचरम् ४५
अश्वानां खादनेनाहमर्थी नान्येन केनचित् ।

---

सेवक आहोंत आणि आपण आमचे प्रभु आहांत; यास्तव आपण खुशाल आमचें राज्य करा. हें भक्ष्य, भोज्य, पेय आणि लेह्य येथे तयार असून उत्कृष्ट शय्या व आपल्या घोड्यांना वैरण हींही तयार आहेत." ( ३६–४० )

याप्रमाणे तो गुह बोलत असतांना राम त्याला म्हणाले " तूं जो येथपर्यंत पायांनी आलास आणि हें जें प्रेम दाखविलेंस, यामुळे तूं आमचें सर्वदा पूजन केलें आहेस आणि आम्हांला हर्ष झाला आहे. " असें बोलून आपल्या चांगल्या गरगरीत बाहूंनी त्याला कडकडून भेटून राम त्याला म्हणाले " गुहा, बांधवां-सहवर्तमान मी तुला आज सुदैवाने आरोग्यसंपन्न अवलोकन करीत आहें. राष्ट्र, मित्र व वनें यासंबंधाने तुझें कुशल आहे ना ? हें जे तूं कांही प्रेमाने येथे आणिलें आहेस, त्याला मान देऊन मी तें सर्व तुला परत देतों; कारण, मी भोग-विषयक प्रतिग्रह घेत नाही· मी कुश, वल्कलें आणि अजिनें धारण करून व फल-मूलांवर उपजीविका करून पित्राज्ञापालनरूप धर्माविषयीं दक्ष, तापस व बनवासी बनलों आहें, असें तूं समज. ( ४१–४५)

अश्वांच्या घास दाण्याची मला मात्र अपेक्षा आहे; दुसऱ्या कसल्याच गोष्टीची मला

एतावताऽत्र भवता भविष्यामि सुपूजितः ४६
एते हि दयिता राज्ञः पितुर्दशरथस्य मे ।
एतैः सुविहितैरश्वैर्भविष्याम्यहमार्चितः ४७
अश्वानां प्रतिपानं च खादनं चैव सोऽन्वशात् ।
गुहस्तत्रैव पुरुषांस्त्वरितं दीयतामिति ४८
ततश्चीरोत्तरासंगः सन्ध्यामन्वास्य पश्चिमाम् ।
जलमेवाददे भोज्यं लक्ष्मणेनाहृतं स्वयम् ४९
तस्य भूमौ शयानस्य पादौ प्रक्षाल्य लक्ष्मणः ।
सभार्यस्य ततोऽभ्येत्य तस्थौ वृक्षमुपाश्रितः ५०
गुहोऽपि सह सूतेन सौमित्रिमनुभाषयन् ।
अन्वजाग्रत्ततो राममप्रमत्तो धनुर्धरः ५१
तथा शयानस्य ततो यशस्विनो मनस्विनो दाशरथेर्महात्मनः ।
अदृष्टदुःखस्य सुखोचितस्य सा तदा व्यतीता सुचिरेण शर्वरी ५२

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चाशः सर्गः ५०[१९९२]

---

इच्छा नाही. तूं जें हें प्रेम दाखविलेंस तेवढ्याने आज माझें अतिशयच आदरातिथ्य होईल. माझ्या पित्या दशरथ राजाचे हे आवडते घोडे आहेत, तेव्हा तूं या अश्वांची उत्तम तऱ्हेने व्यवस्था लाविलीस, म्हणजे माझें आदरातिथ्य होईल. ( ४६-४७ )

याप्रमाणे रामाने सांगितल्यानंतर " त्या अश्वांना खुराक व वैरण सत्वर द्या, " म्हणून त्या गुहाने त्याच ठिकाणीं आपल्या सेवकांना आज्ञा केली. तदनंतर वल्कलाचेंच प्रावरण घेतलेल्या रामाने सायंसंध्या केली आणि लक्ष्मणाने स्वतः आणलेल्या उदकाचाच भोजनाचेऐवजीं स्वीकार केला. तदनंतर भार्येसहवर्तमान त्या रामाने भूमीवर शयन केलें असतां लक्ष्मणाने पाय धुतले आणि तेथून उठून जवळच वृक्षापाशी येऊन बसला व सुमंत्र सारथ्यासहवर्तमान धनुर्धर गुहही रामाचें संरक्षण करण्याकरिता दक्ष राहून लक्ष्मणाशीं संभाषण करीत करीत जागत राहिला. असो. पूर्वी कधीही दुःखाचा अनुभव नसतांना सुखाचा उपभोग घेत असलेला तो यशस्वी व दृढप्रतिज्ञ महात्मा दशरथपुत्र राम तशा प्रकारें

एकपञ्चाशः सर्गः ।

तं जाग्रतमदम्भेन भ्रातुरर्थाय लक्ष्मणम् ।
गुहः संतापसंतप्तो राघवं वाक्यमब्रवीत् १
इयं तात सुखा शय्या त्वदर्थमुपकल्पिता ।
प्रत्याश्वसिहि साध्वस्यां राजपुत्र यथासुखम् २
उचितोऽयं जनः सर्वः क्लेशानां त्वं सुखोचितः ।
गुप्त्यर्थं जागरिष्यामः काकुत्स्थस्य वयं निशाम् ३
न हि रामात्प्रियतमो ममास्ते भुवि कश्चन ।
ब्रवीम्येव च ते सत्यं सत्येनैव च ते शपे ४
अस्य प्रसादादाशंसे लोकेऽस्मिन्सुमहद्यशः ।
धर्मावाप्तिं च विपुलामर्थकामौ च पुष्कलौ ५
सोऽहं प्रियसखं रामं शयानं सह सीतया ।

भूमीवर शयन करीत असतांना झोप चांगली न आल्यामुळे ती रात्र पुष्कळ वेळाने गेल्यासारिखी त्याला भासली. (४८–५२)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी पन्नासावा सर्ग समाप्त झाला. ॥ ५० ॥

अकृत्रिम प्रेमाने भ्रात्याच्या रक्षणाकरिता जागत बसलेल्या त्या रघुवंशज लक्ष्मणाला दुःखसंतप्त झालेला गुह म्हणाला, "बा राजपुत्रा, ही सुखकारक शय्या तुझ्याकरिता तयार केलेली आहे; तूं विश्रांति घे आणि सुख होईल त्या रीतीने तूं खुशाल या शय्येवर शयन कर. आम्हां सर्व लोकांना क्लेश भोगण्याची सवय असून तूं आजपर्यंत सुखाचाच उपभोग घेत आला आहेस. तेव्हा ककुत्स्थकुलोत्पन्न रामाच्या रक्षणाकरिता आम्ही रात्रभर जागूं. रामाशिवाय या पृथ्वीमध्ये दुसरा कोणीही मला अत्यंत प्रिय नाही, हें मी तुला सत्याची शपथ वाहून सांगत आहें. या जगतामध्ये याच्याच प्रसादामुळे फारच मोठी कीर्ति, पुण्यप्राप्ति आणि पुष्कळ अर्थ व काम यांची समृद्धि हीं प्राप्त होत असतात, असें मी समजतों. ( १–५ )

"तेव्हा सीतेसहवर्तमान शयन करणाऱ्या प्रिय मित्र रामाचें मी आपल्या ज्ञातीं-

रक्षिष्यामि धनुष्पाणिः सर्वथा ज्ञातिभिः सह ६
न मेऽस्त्यविदितं किंचिद्वनेऽस्मिंश्चरतः सदा ।
चतुरङ्गं ह्यतिबलं सुमहत्संतरेमहि ७
लक्ष्मणस्तु ततोवाच रक्ष्यमाणास्त्वयानघ ।
नात्र भीता वयं सर्वे धर्ममेवानुपश्यता ८
कथं दाशरथौ भूमौ शयाने सह सीतया ।
शक्या निद्रा मया लब्धुं जीवितं वा सुखानि वा ९
यो न देवासुरैः सर्वैः शक्यः प्रसहितुं युधि ।
तं पश्य सुखसंसुप्तं तृणेषु सह सीतया १०
यो मन्त्रतपसा लब्धो विविधैश्च पराक्रमैः ।
एको दशरथस्यैष पुत्रः सदृशलक्षणः ११
अस्मिन्प्रव्राजिते राजा न चिरं वर्तयिष्यति ।
विधवा मेदिनी नूनं क्षिप्रमेव भविष्यति १२
विनद्य सुमहानादं श्रमेणोपरताः स्त्रियः ।

सहवर्तमान हातांत धनुष्य घेऊन सर्व प्रकारें रक्षण करीन. नेहमी या वनांत संचार करणाऱ्या माझ्या गैरमाहितींतलें असें कांहींही नाही. शत्रूचें अतिशय प्रचंड चतुरंग बल जरी असलें, तरी आम्ही युद्धामध्ये जिंकूं." यावर लक्ष्मण म्हणाला, "हे निष्पापा, या देशामध्ये आम्हांला कोणाला कसलीही भीति नाही; कारण धर्माकडेच दृष्टि देऊन वागणारा तूं आमचें रक्षण करणारा आहेस; परंतु दाशरथी राम सीतेसहवर्तमान भूमीवर पडला असतां मला निद्रा, सुखी जीवित अथवा सुखोपभोग प्राप्त होणें शक्य कसें आहे ? सर्व देवदैत्यांनाही युद्धामध्ये ज्याचा पराक्रम सहन होणें अशक्य आहे, त्या रामाला सीतेसहवर्तमान तृणावर खुशाल गाढ झोप लागली आहे, हें पहा. ( ६-१० )

"जप, तप व मोठ्या कष्टाने केलेलीं नाना प्रकारचीं अनुष्ठानें यांमुळे लक्षणांनी स्वतःसारखा असा हा अद्वितीय पुत्र दशरथाला प्राप्त झाला आहे. हा वनांत गेल्याकारणानें राजा फार दिवस जगणार नाही. खरोखर पृथ्वी सत्वरच अनाथ होऊन जाईल. राजगृहांतील आणि अयोध्यानगरांतील स्त्रिया अतिशयच मोठा

निर्घोषोपरतं तात मन्ये राजनिवेशनम् १३
कौसल्या चैव राजा च तथैव जननी मम ।
नाशंसे यदि जीवन्ति सर्वे ते शर्वरीमिमाम् १४
जीवेदपि हि मे माता शत्रुघ्नस्यान्ववेक्षया ।
तद्दुःखं यदि कौसल्या वीरसूर्विनशिष्यति १५
अनुरक्तजनाकीर्णा सुखालोकप्रियावहा ।
राजव्यसनसंसृष्टा सा पुरी विनशिष्यति १६
कथं पुत्रं महात्मानं ज्येष्ठपुत्रमपश्यतः ।
शरीरं धारयिष्यन्ति प्राणा राज्ञो महात्मनः १७
विनष्टे नृपतौ पश्चात्कौसल्या विनशिष्यति ।
अनन्तरं च मातापि मम नाशमुपैष्यति १८
अतिक्रान्तमतिक्रान्तमनवाप्य मनोरथम् ।
राज्ये राममनिक्षिप्य पिता मे विनशिष्यति १९
सिद्धार्थाः पितरं वृत्तं तस्मिन्काले ह्युपस्थिते ।

---

आक्रोश करून श्रम झाल्यामुळे स्वस्थ झाल्या असतील आणि बा गृहा, राजगृहांतही थकवा आल्यामुळे विलाप शब्द बंद होऊन, शुकशुकाट झाला असेल, असें मला वाटतें. कौसल्या, राजा आणि त्याचप्रमाणे माझी माता हे सर्व जिवंत राहतील, असें मला दिसत नाही. फारतर हीच रात्र ते सर्व जिवंत राहतील. शत्रुघ्नाकडे पाहून माझी माता कदाचित् जगेलही; परंतु, वीरमाता कौसल्या नाहीशीच होईल व तें तर अतिशयच दुःखप्रद होईल. ( ११–१५ )

"रामाचे ठिकाणीं प्रेम करणाऱ्या प्रजाजनांनी गजबजलेली आणि सर्वदा सुखोत्पादक व प्रिय अशा गोष्टींनीच युक्त असलेली ती नगरी राजाच्या मरणदुःखानें युक्त होऊन नाश पावेल. महात्मा ज्येष्ठ पुत्र दिसेनासा झाल्यावर महात्म्या दशरथराजाचे प्राण शरिराला धरून राहतील कसे ? राजाचा नाश झाल्यानंतर कौसल्याही नाश पावेल आणि तदनंतर माझ्या मातेलाही मरण येईल. रामराज्याभिषेकरूप मनोरथ प्राप्त न झाल्यामुळे " घात झाला, घात झाला," असें म्हणत म्हणत माझा पिता परत आलेल्या रामाला राज्यावर न बसवितांच नाश पावेल. तो समय

प्रेतकार्येषु सर्वेषु संस्करिष्यन्ति राघवम् २०
रम्यचत्वरसंस्थानां संविभक्तमहापथाम् ।
हर्म्यप्रासादसंपन्नां गणिकावरशोभिताम् २१
रथाश्वगजसंबाधां तूर्यनादनिनादिताम् ।
सर्वकल्याणसंपूर्णां हृष्टपुष्टजनाकुलाम् २२
आरामोद्यानसंपन्नां समाजोत्सवशालिनीम् ।
सुखिता विचरिष्यन्ति राजधानीं पितुर्मम २३
अपि जीवेद्दशरथो वनवासात्पुनर्वयम् ।
प्रत्यागम्य महात्मानमपि पश्याम सुव्रतम् २४
अपि सत्यप्रतिज्ञेन सार्धं कुशलिनो वयम् ।
निवृत्ते वनवासेऽस्मिन्नयोध्यां प्रविशेमहि २५
परिदेवयमानस्य दुःखार्तस्य महात्मनः ।
तिष्ठतो राजपुत्रस्य शर्वरी सात्यवर्तत २६
तथा हि सत्यं ब्रुवति प्रजाहिते नरेन्द्रसूनौ गुरुसौहृदाद्गुहः ।

प्राप्त झाला असतां मृत झालेल्या रघुवंशज पित्याचा ज्यांच्या हातून सर्व प्रकारच्या क्रियेसंबंधाने सत्कार होईल, ते खरोखर कृतकृत्य होत. ( १६-२० )

रमणीय चव्हाटे व धर्मशाळा, परिमित अंतरावर असलेले मोठमोठे मार्ग, वाडे आणि देवालयें यांनी संपन्न, उत्कृष्ट गणिकांनी सुशोभित, रथ, अश्व आणि गज यांनी व्याप्त, तूर्यवाद्यांच्या ध्वनीने नादित, सर्व प्रकारच्या कल्याणांनी संपूर्ण, आनंदित व पुष्ट जनांनी व्याप्त, उपवनें व बागा यांनी समृद्ध व समाजविषयक उत्सवांनी शोभणाऱ्या माझ्या पित्याच्या राजधानीमध्ये भरतप्रभृति सुखी होऊन संचार करतील. दशरथ जिवंत राहण्याचा संभव आहे काय ? आम्ही परत येऊन, त्या सदाचरणसंपन्न महात्म्याला अवलोकन करूं, हें संभवनीय आहे काय ? सत्यप्रतिज्ञ रामासहवर्तमान आम्ही कुशल राहून हा वनवास संपल्यावर पुनरपि अयोध्येंत प्रविष्ट होण्याचा संभव आहे काय ? " याप्रमाणे तो महात्मा राजकुमार लक्ष्मण दुःखाकुल होऊन शोक करीत बसला असतांनाच ती रात्र निघून गेली आणि प्रजाजनांच्या हिताविषयी तत्पर असलेला तो राजकुमार लक्ष्मण त्याप्रमाणे

**मुमोच बाष्पं व्यसनाभिपीडितो ज्वरातुरो नाग इव व्यथातुरः** २७

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकपञ्चाशः सर्गः ।५१।

द्विपञ्चाशः सर्गः । [२०१९]

**प्रभातायां तु शर्वर्यां पृथुवक्षा महायशाः ।**
**उवाच रामः सौमित्रिं लक्ष्मणं शुभलक्षणम्** १
**भास्करोदयकालोऽसौ गता भगवती निशा ।**
**असौ सुकृष्णो विहगः कोकिलस्तात कूजति** २
**बर्हिणानां च निर्घोषः श्रूयते नदतां वने ।**
**तराम जाह्नवीं सौम्य शीघ्रगां सागरंगमाम्** ३
**विज्ञाय रामस्य वचः सौमित्रिर्मित्रनन्दनः ।**
**गुहमामन्त्र्य सूतं च सोऽतिष्ठद्भ्रातुरग्रतः** ४
**स तु रामस्य वचनं निशम्य प्रतिगृह्य च ।**
**स्थपतिस्तूर्णमाहूय सचिवानिदमब्रवीत्** ५

---

सत्य भाषण करूं लागला असतां, श्रीरामाविषयींच्या पराकाष्ठेच्या प्रेमामुळे, अन्तःकरणाला अतिशय दुःख झाल्याकारणाने, ज्याप्रमाणे ज्वरातुर गज अत्यन्त अस्वस्थ होतो, त्याप्रमाणे अत्यन्त अस्वस्थचित्त झालेला तो गुह नेत्रांतून अश्रु ढाळूं लागला. ( २१-२७ )

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी एकावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५१ ॥

रात्र उजाडल्यानंतर विशाल वक्षःस्थलाने युक्त असलेला महायशस्वी राम शुभ-लक्षणसंपन्न सुमित्रापुत्र लक्ष्मणाला म्हणाला, "हा सूर्योदयाचा समय झाला; भगवती रात्र निघून गेली. बा लक्ष्मणा, हा अत्यंत कृष्णवर्ण कोकिलपक्षी शब्द करीत आहे आणि वनामध्ये गर्जना करणाऱ्या मयूर पक्ष्यांचाही ध्वनि कानावर येत आहे. तेव्हा, हे सौम्या, वेगयुक्त व समुद्रगामिनी जान्हवी आपण तरून जाऊं." हें रामाचें बोलणें ऐकून घेऊन मित्रांना आनंद देणारा तो सुमित्रापुत्र लक्ष्मण गुहाला व सारथ्याला हाक मारून ' लवकर नाव आणा,' असें सांगून पुनरपि आपल्या भ्रात्यापुढे येऊन उभा राहिला. ( १-४ )

अस्य वाहनसंयुक्तां कर्णग्राहवतीं शुभाम् ।
सुप्रतारां दृढां तीर्थे शीघ्रं नावमुपाहर ६
तं निशम्य गुहादेशं गुहामात्यो गतो महान् ।
उपोह्य रुचिरां नावं गुहाय प्रत्यवेदयत् ७
ततः स प्राञ्जलिर्भूत्वा गुहो राघवमब्रवीत् ।
उपस्थितेयं नौर्देव भूयः किं करवाणि ते ८
तवामरसुतप्रख्य तर्तुं सागरगामिनीम् ।
नौरियं पुरुषव्याघ्र शीघ्रमारोह सुव्रत ९
अथोवाच महातेजा रामो गुहमिदं वचः ।
कृतकामोऽस्मि भवता शीघ्रमारोप्यतामिति १०
ततः कलापान्सन्नह्य खड्गौ बद्ध्वा च धन्विनौ ।
जग्मतुर्येन तां गङ्गां सीतया सह राघवौ ११

तेव्हा रामाचें तें वचन ऐकून व शिरसामान्य करून, तो निषादराज गुह सत्वर आपल्या सचिवांना हाक मारून म्हणाला, " पाणी तोडून नाव तीराला नेऊन पोंचविणारें सुकाणू लावलेली सुखाचे तरून जातां येईल अशी, बळकट आणि शुभ नाव सुकाणू चालविणाऱ्यासहवर्तमान उतारावर सत्वर घेऊन ये. " ही गुहाची आज्ञा ऐकून घेऊन त्याचा एक मोठा अमात्य गेला आणि एक मनोहर नाव समीप आणल्यावर त्याने तसें त्याला कळविलें. तदनंतर तो गुह हात जोडून रामाला म्हणाला, " हे राजा, ही नाव तयार आहे; आता आपलें आणखी काय कार्य मी करावें ? हे देवकुमारतुल्य पुरुषश्रेष्ठा, समुद्रगामिनी गंगा तुम्हांला तरून जातां येण्याकरिता ही नाव आणलेली आहे. हे सदाचरणसंपन्न, आता सत्वर हिच्यामध्ये बसा. " ( ५–९ )

यानंतर महातेजस्वी राम गुहाला म्हणाला, " तूं आमचें मोठें काम केलें आहेस; करिता सामानसुमान नावेमध्ये सत्वर ठेवून निघण्याची तयारी करा. " इतकें झाल्यावर कवच चढवून आणि भाते व खड्ग बांधून घेऊन ते धनुर्धारी रामलक्ष्मण सीतेसहवर्तमान ज्या मार्गाने लोक नावेंत बसून गंगा तरून जात असत, त्या मार्गाने गंगा उतरून जाण्याकरिता निघाले. याप्रमाणे धर्मवेत्ता राम

राममेवं तु धर्मज्ञमुपागत्य विनीतवत् ।
किमहं करवाणीति सूतः प्राञ्जलिरब्रवीत् ११
ततोऽब्रवीद्दाशरथिः सुमन्त्रं स्पृशन्करेणोत्तमदक्षिणेन ।
सुमन्त्र शीघ्रं पुनरेव याहि राज्ञः सकाशे भव चाप्रमत्तः १२
निवर्तस्वेत्युवाचैनमेतावद्धि कृतं मम ।
रथं विहाय पद्भ्यां तु गमिष्यामो महावनम् १४
आत्मानं त्वभ्यनुज्ञातमवेक्ष्यार्तः स सारथिः ।
सुमन्त्रः पुरुषव्याघ्रमैक्ष्वाकमिदमब्रवीत् १५
नातिक्रान्तमिदं लोके पुरुषेणेह केनचित् ।
तव सभ्रातृभार्यस्य वासः प्राकृतवद्वने १६
न मन्ये ब्रह्मचर्ये वा स्वधीते वा फलोदयः ।
मार्दवार्जवयोर्वापि त्वां चेद्व्यसनमागतम् १७
सह राघव वैदेह्या भ्रात्रा चैव वने वसन् ।

निघाला असतां सुमंत्रसारथि त्याच्या समीप आला आणि " मी आता काय करावें ?" म्हणून हात जोडून नम्रपणें त्याला म्हणाला. तेव्हा दाशरथि राम उत्कृष्ट अशा आपल्या उजव्या हाताने सुमंत्राला स्पर्श करून म्हणाला, " हे सुमंत्रा, तूं पुनरपि सत्वर परत जा आणि राजापाशी सावधपणाने असत जा. ( १०–१३ ).

"आतापर्यंत राजाच्या आज्ञेने आम्ही रथांत बसून आलों; आता मला या रथाची गरज नाही; कारण रथ सोडून देऊन आम्हांला पायांनीच महावनामध्ये जावयाचें आहे. तस्मात् तूं आता कांहीएक मनामध्ये न आणतां परत फीर." असें राम सुमंत्राला म्हणाला असतां, आपणांला जाण्याची अनुज्ञा झाली, असें जाणून तो सुमंत्रसारथि दुःखाकुल झाला आणि पुरुषश्रेष्ठ इक्ष्वाकुवंशज रामाला म्हणाला, " भ्राता आणि भार्या यांसहवर्तमान ज्याने तुला क्षुद्र जनांप्रमाणे वनांत वास्तव्य करणें भाग पाडलें आहे, त्या या दैवाचें उल्लंघन या जगतामध्ये कोणत्याही पुरुषाला करितां आलें नाही. ज्या अर्थी तुला हें असलें संकट प्राप्त झालें आहे, त्या अर्थी ब्रह्मचर्य, उत्कृष्ट वेदाध्ययन, दया आणि सरलपणा हीं सर्व निष्फल आहेत, असें मला वाटतें. हे वीर रामा, सीता आणि भ्राता लक्ष्मण यांसहवर्तमान

त्वं गतिं प्राप्स्यसे वीर त्रींल्लोकांस्तु जयन्निव १८
वयं खलु हता राम यत्त्वया ह्युपवञ्चिताः ।
कैकेय्या वशमेष्यामः पापाया दुःखभागिनः १९
इति ब्रुवन्नात्मसमं सुमन्त्रः सारथिस्तथा ।
दृष्ट्वा दूरगतं रामं दुःखार्तो रुरुदे चिरम् २०
ततस्तु विगते बाष्पे सूतं स्पृष्टोदकं शुचिम् ।
रामस्तु मधुरं वाक्यं पुनः पुनरुवाच तम् २१
इक्ष्वाकूणां त्वया तुल्यं सुहृदं नोपलक्षये ।
यथा दशरथो राजा मां न शोचेत्तथा कुरु २२
शोकोपहतचेताश्च वृद्धश्च जगतीपतिः ।
कामभारावसन्नश्च तस्मादेतद्ब्रवीमि ते २३
यद्यथा ज्ञापयेत्किंचित्स महात्मा महीपतिः ।
कैकेय्याः प्रियकामार्थं कार्यं तदविकाङ्क्षया २४
एतदर्थं हि राज्यानि प्रशासति नराधिपाः

वनामध्ये पित्याची आज्ञा शेवटाला नेण्याकरिता वास्तव्य करून त्रैलोक्य जिंकल्याप्रमाणे तुझा उत्कर्ष होईल. हे रामा, तूं आमचा त्याग केल्यामुळे आम्हां सर्वांचाच घात झाला आहे. आता आम्ही दुष्ट कैकेयीच्या आधीन होऊन दुःखाचे वाटेकरी होणार." ( १४--१९ )

याप्रमाणे आपल्या नांवाला योग्य असें भाषण करीत करीत तो सुमंत्रसारथी राम आतामात्र खरोखरच दूर चालला, हें पाहून दुःखाकुल झाला आणि पुष्कळ वेळपर्यंत रडत बसला. तदनंतर अश्रु थांबल्यावर तो पवित्र सारथी गंगोदकाचें आचमन करूं लागला असतां राम पुन्हा मधुर वाणीने त्याला म्हणाला, "इक्ष्वाकुवंशजांचा तुझ्यासारखा सुहृद् मला कोणी दिसत नाही. यास्तव दशरथराजा माझ्याकरिता शोक न करील असें तूं कर. त्या भूपतीचें मन शोकाने अगदी ग्रस्त झालें आहे व तो वृद्ध झाला असून, त्याचे सर्व मनोरथ भग्न झाले आहेत, म्हणून मी हें तुला सांगत आहें. कैकेयीचा मनोरथ सिद्धीस नेण्याकरिता तो महात्मा भूपति जी जी कांही आज्ञा करील, ती ती तूं निःशंकपणें सिद्धीस ने;

यदेषां सर्वकृत्येषु मनो न प्रतिहन्यते २५
यद्यथा स महाराजो नालीकमधिगच्छति ।
न च ताम्यति शोकेन सुमन्त्र कुरु तत्तथा २६
अदृष्टदुःखं राजानं वृद्धमार्यं जितेन्द्रियम् ।
ब्रूयास्त्वमभिवाद्यैव मम हेतोरिदं वचः २७
न चाहमनुशोचामि लक्ष्मणो न च शोचति ।
अयोध्यायाश्च्युताश्चेति वने वत्स्यामहेति वा २८
चतुर्दशसु वर्षेषु निवृत्तेषु पुनः पुनः ।
लक्ष्मणं मां च सीतां च द्रक्ष्यसे शीघ्रमागतान् २९
एवमुक्त्वा तु राजानं मातरं च सुमन्त्र मे ।
अन्याश्च देवीः सहिताः कैकेयीं च पुनः पुनः ३०
आरोग्यं ब्रूहि कौसल्यामथ पादाभिवन्दनम् ।
सीताया मम चार्यस्य वचनाल्लक्ष्मणस्य च ३१
ब्रूयाश्चापि महाराजं भरतं क्षिप्रमानय ।

---

कारण कोणत्याही कृत्यासंबंधाने आपला मनोभंग होऊं नये, एतदर्थच राजे राज्य करीत असतात. ( २०–२५ )

"तस्मात्, हे सुमंत्रा, त्या महाराजाचा ज्या रीतीने मनोभंग होणार नाहीं आणि ज्या रीतीने तो शोकाने खिन्न होणार नाही, त्या रीतीने तूं व्यवस्था ठेवीत जा आणि वृद्ध, सभ्य, जितेंद्रिय आणि दुःखाचा अनुभव नसलेल्या राजाला माझ्याकडून अभिवंदन करून तूं असें सांग की, आम्ही अयोध्येला मुकून वनामध्ये वास्तव्य करीत आहोंत, म्हणून मला अथवा लक्ष्मणाला मुळीच वाईट वाटत नाही. चौदा वर्षे निघून गेलीं, म्हणजे लवकरच परत आलेल्या लक्ष्मणाला, मला व सीतेला आपण वारंवार अवलोकन कराल. ( २६–२९ )

याप्रमाणे राजाला, माझ्या मातेला, माझ्या मातेबरोबर असलेल्या इतर राजभार्यांना आणि कैकेयीला फिरून फिरून सांगून, हे सुमंत्रा, मी आरोग्यसंपन्न आहें असें तूं सर्वांना सांग; कौसल्येला सीतेचा, माझा व आर्य लक्ष्मणाचा माझ्या वचनावरून प्रणिपात कळीव; भरताला सत्वर आणा, म्हणून महाराजांनाही

आगतश्चापि भरतः स्थाप्यो नृपमते पदे ३२
भरतं च परिष्वज्य यौवराज्येऽभिषिच्य च ।
अस्मत्सन्तापजं दुःखं न त्वामभिभविष्यति ३३
भरतश्चापि वक्तव्यो यथा राजनि वर्तसे ।
तथा मातृषु वर्तेथाः सर्वास्वेवाविशेषतः ३४
यथा च तव कैकेयी सुमित्रा चाविशेषतः ।
तथैव देवी कौसल्या मम माता विशेषतः ३५
तातस्य प्रियकामेन यौवराज्यमवेक्षता ।
लोकयोरुभयोः शक्यं नित्यदा सुखमेधितुम् ३६
निवर्त्यमानो रामेण सुमन्त्रः प्रतिबोधितः ।
तत्सर्वं वचनं श्रुत्वा स्नेहात्काकुत्स्थमब्रवीत् ३७
यदहं नोपचारेण ब्रूयाः स्नेहादविक्लवम् ।
भक्तिमानिति तत्तावद्वाक्यं त्वं क्षन्तुमर्हसि ३८
कथं हि त्वद्विहीनोऽहं प्रतियास्यामि तां पुरीम् ।

सांग आणि भरत आला, म्हणजे दशरथाच्या अनुमतीने त्याला राज्यावर बसविण्याची व्यवस्था होऊं द्या. तूं भरताला भेटून त्याला यौवराज्याचा अभिषेक करविलास, म्हणजे आम्हांकरिता संताप उत्पन्न होऊन, तुला दुःख होणार नाही. भरताला माझा असा निरोप सांग की, " जसा तूं राजाशीं वागत असतोस, तसाच कांहीएक भेद मनांत न आणतां सर्वही मातांशीं वागत जा. ( ३०-३४ )

"ज्याप्रमाणे तुला कैकेयी व सुमित्रा यांमध्ये भेद नाही, त्याचप्रमाणे माझी माता कौसल्या हिलाही तूं त्यांच्यासारखीच समजत जा. पित्याचें प्रिय करण्याचा उद्देश धरून तूं यौवराज्याचा अंगिकार केलास, म्हणजे उभयलोकीं सर्वदा तुझें सुख वृद्धिंगत होणें शक्य आहे. " याप्रमाणे सुमंत्राला परत पाठवितांना रामाने बोध केला असतां, त्याचें तें सर्व भाषण श्रवण करून तो सुमंत्र प्रेमामुळे त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला म्हणाला, " मी तुझ्याशीं सत्कारपूर्वक भीत भीत भाषण न करितां प्रेमामुळे निर्भयपणाने भाषण करीत आहें; परंतु मी भक्तिमान् आहें, असें समजून तूं त्या भाषणाबद्दल मात्र मला क्षमा कर. बा रामा, तुझ्या

तव तात वियोगेन पुत्रशोकातुरामिव ३९
सराममपि तावन्मे रथं दृष्ट्वा तदा जनः ।
विना रामं रथं दृष्ट्वा विदीर्येतापि सा पुरी ४०
दैन्यं हि नगरी गच्छेद् दृष्ट्वा शून्यमिमं रथम् ।
सूतावशेषं स्वं सैन्यं हतवीरमिवाहवे ४१
दूरेऽपि निवसन्तं त्वां मानसेनाग्रतः स्थितम् ।
चिन्तयन्तोऽद्य नूनं त्वां निराहाराः कृताः प्रजाः ४२
दृष्टं तद्धि त्वया राम यादृशं त्वत्प्रवासने ।
प्रजानां संकुलं वृत्तं त्वच्छोकक्लान्तचेतसाम् ४३
आर्तनादो हि यः पौरैरुन्मुक्तस्त्वत्प्रवासने ।
सरथं मां निशाम्येव कुर्युः शतगुणं ततः ४४
अहं किं चापि वक्ष्यामि देवीं तव सुतो मया ।
नीतोऽसौ मातुलकुलं सन्तापं मा कृथा इति ४५

---

वियोगामुळे पुत्रशोक झाल्यासारिख्या दुःखित झालेल्या त्या अयोध्या नगरीला तुझ्याशिवाय मी कसा बरें परत जऊं ! ( ३५–३९ )

"नगरांतून बाहेर निघतांना रामासहवर्तमान माझा रथ अवलोकन करून लोक अतिशय दुःखित झाले, मग रामावाचून रथ परत आलेला पाहून तर ती नगरी दुःखाने विदीर्णच होऊन जाईल. युद्धामध्ये वीरांचा वध झाल्यामुळे वीररहित झालेल्या अनाथ सैन्याप्रमाणे सारथीच ज्यांत शिल्लक राहिला आहे, असा हा शून्य रथ अवलोकन करून सर्व नगरी दीन होऊन जाईल. तूं दूर रहात असतांनाही समोर असल्याप्रमाणेच मनामध्ये तुझें चिंतन करणारे प्रजाजन आज खरोखर मी एकटा परत गेलों, म्हणजे, मरेपर्यन्त निराहाराचा संकल्प करून बसतील. हे रामा, तूं अनवासांत निघालास, त्या वेळीं तुझ्या शोकाने भांबावून गेलेल्या एकंदर सर्व लोकांच्या वर्तनांत काय गडबड उडाली, ती तूं पाहिलीच आहेस. तूं प्रवासाला निघतेवेळीं नगरांतील लोकांनी जो दुःखाने आक्रोश केला, त्या आक्रोशापेक्षा रथासहवर्तमान मला अवलोकन करितांक्षणीं, ते शंभरपटीने जास्त आक्रोश करूं लागतील. मी कौसल्यादेवीला तरी काय सांगूं बरें ? " मी तुझ्या मुलाला

असत्यमपि नैवाहं ब्रूयां वचनमीदृशम् ।
कथमप्रियमेवाहं ब्रूयां सत्यमिदं वचः ४६
मम तावन्नियोगस्थास्त्वद्बन्धुजनवाहिनः ।
कथं रथं त्वया हीनं प्रवाह्यन्ति हयोत्तमाः ४७
तन्न शक्ष्याम्यहं गन्तुमयोध्यां त्वदृतेऽनघ ।
वनवासानुयानाय मामनुज्ञातुमर्हसि ४८
यदि मे याचमानस्य त्यागमेव करिष्यसि ।
सरथोऽग्निं प्रवेक्ष्यामि त्यक्तमात्र इह त्वया ४९
भविष्यन्ति वने यानि तपोविघ्नकराणि ते ।
रथेन प्रतिबाधिष्ये तानि सर्वाणि राघव ५०
त्वत्कृतेन मया प्राप्तं रथचर्याकृतं सुखम् ।

आजोळीं पोचविलें आहे; तूं उगीच संताप करून घेऊं नको, '' असें का मी तिला सांगूं ? ( ४०–४५ )

''अशा प्रकारें बोलणें जरी तिला प्रिय होणारें आहे. तरी असत्य म्हणून मी तें कधीही बोलणार नाहीं आणि त्याचप्रमाणे रामाला मी मोठ्या अरण्यांत सोडलें हें सांगणें जरी सत्य आहे, तरीही पण तें अप्रिय म्हणून माझ्यानें होणार नाही. सारांश, मला आता अयोध्येमध्ये परत जातां येत नाहीं; शिवाय, हा रथही मला तिकडे नेतां येणार नाहीं; कारण, हे उत्कृष्ट अश्व एक मीच हाकणारा असलों, म्हणजेच चालणारे आहेत आणि मी जरी हाकणारा असलों, तरी तुमच्या कुटुंबांतील माणसें जर आंत बसलेलीं असतील तरच ते रथ ओढीत असतात. तेव्हा तुझ्याशिवाय हे अश्व रथ ओढून नेतील कसा ? तस्मात् , हे निष्पापा रामा, तुझ्याशिवाय मला अयोध्येंत जातां येणें शक्य नाही. तेव्हा तुझ्याबरोबरच वनवासाला येण्याची तूं मला अनुज्ञा दे. मी ही प्रार्थना करीत असतांही तूं जर माझा त्याग करशील, तर तूं त्याग करितांक्षणींच येथल्या येथेच मी रथासहवर्तमान अग्नीमध्ये प्रवेश करीन. ( ४६–४९ )

'' वनामध्ये तुझ्या तपाला कांही विघ्न करणाऱ्या गोष्टी प्राप्त होण्याचा संभव आहे, त्या सर्वांचा, हे राघवा, मी रथाच्या योगाने प्रतिकार करीन. तुझ्या

आशंसे त्वत्कृतेनाहं वनवासकृतं सुखम् ५१
प्रसीदेच्छामि तेऽरण्ये भवितुं प्रत्यनन्तरः ।
प्रीत्याभिहितमिच्छामि भव मे प्रत्यनन्तरः ५२
इमेऽपि च हया वीर यदि ते वनवासिनः ।
परिचर्यां करिष्यन्ति प्राप्स्यन्ति परमां गतिम् ५३
तव शुश्रूषणं मूर्ध्ना करिष्यामि वने वसन् ।
अयोध्यां देवलोकं वा सर्वथा प्रजहाम्यहम् ५४
न हि शक्या प्रवेष्टुं सा मयायोध्या त्वया विना ।
राजधानी महेन्द्रस्य यथा दुष्कृतकर्मणा ५५
वनवासे क्षयं प्राप्ते ममैष हि मनोरथः ।
यदनेन रथेनैव त्वां वहेयं पुरीं पुनः ५६
चतुर्दश हि वर्षाणि सहितस्य त्वया वने ।
क्षणभूतानि यास्यन्ति शतसंख्यानि चान्यथा ५७
भृत्यवत्सल तिष्ठन्तं भर्तृपुत्रगते पथि ।

---

कृपेने, तुझा रथ हाकावयास मिळाल्यामुळे लाभणारें तुझ्या सहवासाचें सुख येथे प्राप्त झालें. आता तुझ्याच कृपेने, वनवासांतही तें तुझ्या सहवासाचें सुख मिळावें, अशी इच्छा आहे. तूं मजवर कृपा कर; मी अरण्यामध्ये तुझ्यासमीप राहण्याची इच्छा करीत आहें व " तूं माझ्याजवळ रहा, " असें प्रीतीने तुझें भाषण कानीं पडावें, अशी माझी इच्छा आहे. हे वीरा, हे अश्वही तूं वनवासामध्ये असतांना जर तुझी सेवा करतील तर यांना उत्कृष्ट गति प्राप्त होईल. ( ५०–५३ )

"वनामध्ये राहून मी अत्यंत नम्रपणाने तुझी सेवा करीत जाईन आणि अयोध्येचाच नव्हे, परंतु देवलोकाचाही तुझ्याकरिता मी सर्वस्वी त्याग करीन. पापकर्म केलेल्या पुरुषाचा इंद्राच्या अमरावती राजधानीमध्ये प्रवेश होणें जसें अशक्य आहे, तसेंच तुझ्यावाचून अयोध्येमध्ये माझा प्रवेश होणें अशक्य आहे. वनवास समाप्त झाल्यानंतर याच रथाने मी तुला पुनरपि अयोध्यानगरींत घेऊन जाईन, हा माझा मनोरथ आहे. तुझ्यासहवर्तमान माझीं वनामध्ये चौदा वर्षे एका क्षणाप्रमाणे निघून जातील; नाहीं तर तीं मला शेकडो वर्षांसारखीं होतील.

भक्तं भृत्यं स्थितं स्थित्या न मां त्वं हातुमर्हसि ५८
एवं बहुविधं दीनं याचमानं पुनः पुनः ।
रामो भृत्यानुकम्पी तु सुमन्त्रमिदमब्रवीत् ५९
जानामि परमां भक्तिमहं ते भर्तृवत्सल ।
शृणु चापि यदर्थं त्वां प्रेषयामि पुरीमितः ६०
नगरीं त्वां गतं दृष्ट्वा जननी मे यवीयसी ।
कैकेयी प्रत्ययं गच्छेदिति रामो वनं गतः ६१
विपरीते तुष्टिहीना वनवासं गते मयि ।
राजानं नातिशङ्केत मिथ्यावादीति धार्मिकम् ६२
एष मे प्रथमः कल्पो यदम्बा मे यवीयसी ।
भरतारक्षितं वृत्तं पुत्रराज्यमवाप्स्यते ६३
मम प्रियार्थं राज्ञश्च सुमन्त्र त्वं पुरीं व्रज ।
संदिष्टश्चापि यानर्थांस्तांस्तान्ब्रूयास्तथा तथा ६४

हे सेवकांवर प्रेम करणाऱ्या रामा, आपल्या धन्याच्या पुत्राने स्वीकारलेल्या मार्गाचें अवलंबन करून मर्यादेने वागत असलेल्या मजसारख्या भक्त सेवकाचा त्याग करणें तुला योग्य नाही." ( ५४-५८ )

याप्रमाणे नाना प्रकारांनी अरण्यांत राहण्याविषयी काकुळतीने प्रार्थना करणाऱ्या सुमंत्राला सेवकावर दया करणारा राम म्हणाला, " हे राजनिष्ठा, तुझी उत्कृष्ट भक्ति मी समजून आहें; परंतु मी तुला कशाकरिता अयोध्यानगरीमध्ये पाठवीत आहें, तें तूं ऐकून घे. नगरीमध्ये परत गेल्याचें पाहून माझ्या कनिष्ठ माता कैकेयीला " राम वनामध्ये खरोखर गेला," असा विश्वास वाटेल. नाहीतर मी वनवासाला गेलों असतांनाही तिला संतोष होणार नाही. तस्मात्, " मिथ्यावादी " म्हणून धार्मिक अशा राजाविषयी तिला भलतीच शंका न येईल, असें केलें पाहिजे. माझ्या कनिष्ठ माता कैकेयीला भरताने रक्षिलेल्या विस्तीर्ण अशा पुत्रराज्याचें सुख प्राप्त व्हावें, हा माझा तुला अयोध्यानगरीमध्ये पाठविण्याचा मुख्य उद्देश आहे. ( ५९-६३ )

" करिता, हे सुमंत्रा, तूं माझें आणि राजाचें प्रिय करण्याकरिता नगरीमध्ये

इत्युक्त्वा वचनं सूतं सान्त्वयित्वा पुनः पुनः ।
गुहं वचनमक्लीबो रामो हेतुमदब्रवीत् ६५
नेदानीं गुह योग्योऽयं वासो मे सजने वने ।
अवश्यमाश्रमे वासः कर्तव्यस्तद्गतो विधिः ६६
सोऽहं गृहीत्वा नियमं तपस्विजनभूषणम् ।
हितकामः पितुर्भूयः सीताया लक्ष्मणस्य च ६७
जटाः कृत्वा गमिष्यामि न्यग्रोधक्षीरमानय ।
तत्क्षीरं राजपुत्राय गुहः क्षिप्रमुपाहरत् ६८
लक्ष्मणस्यात्मनश्चैव रामस्तेनाकरोज्जटाः ।
दीर्घबाहुर्नरव्याघ्रो जटिलत्वमधारयत् ६९
तौ तदा चीरसंपन्नौ जटामण्डलधारिणौ ।
अशोभेतामृषिसमौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ ७०
ततो वैखानसं मार्गमास्थितः सह लक्ष्मणः ।

---

जा आणि मी जें जें सांगितलें आहे, तें तें सर्व तसें तसें तेथे सांग. " याप्रमाणे सारथ्याला सांगून व पुन्हापुन्हा त्यांचें सांत्वन करून, तो वीर राम गुहाला म्हणाला, " हे गुहा, ज्यांत माणसें आहेत, अशा वनामध्ये हें माझें वास्तव्य योग्य नाही; निर्जन अशा आश्रमामध्ये मला वास्तव्य करणें अवश्य आहे. तस्मात्, आश्रमवासाला योग्य असा विधि आता केला पाहिजे. सारांश, ( वन्य-आहार, भूमीवर शयन वगैरे ) नेम धरून आणि तपस्वी लोकांच्या भूषणांचा स्वीकार करून सीता आणि लक्ष्मण यांच्या अनुमतीने पित्याचें हित करण्याचा माझा उद्देश आहे. ( ६४-६७ )

"तात्पर्य, मी आता जटा धारण करून पुढे जाणार आहें. करिता वडाचा चीक घेऊन ये. " ( याप्रमाणे रामाने सांगितलें असतां ) गुहाने त्या राजकुमाराला तो चीक सत्वर आणून दिला व त्याच्या योगाने आजानुबाहु पुरुषश्रेष्ठ रामाने लक्ष्मणाकरिता व आपणांकरिता जटा करून जटिलत्व धारण केलें. तेव्हा वल्कलें व जटामंडल धारण केलेले ते भ्राते रामलक्ष्मण ऋषींप्रमाणे शोभूं लागले. तदनंतर वानप्रस्थाश्रमांतील धर्म स्वीकारण्याचा उद्देश धरून लक्ष्मणासहवर्तमान

व्रतमादिष्टवान् रामः सहायं गुहमब्रवीत् ७१
अप्रमत्तो बले कोशे दुर्गे जनपदे तथा ।
भवेथा गुह राज्यं हि दुरारक्षतमं मतम् ७२
ततस्तं समनुज्ञाप्य गुहमिक्ष्वाकुनन्दनः ।
जगाम तूर्णमव्यग्रः सभार्यः सहलक्ष्मणः ७३
स तु दृष्ट्वा नदीतीरे नावमिक्ष्वाकुनन्दनः ।
तितीर्षुः शीघ्रगां गङ्गामिदं वचनमब्रवीत् ७४
आरोह त्वं नरव्याघ्र स्थितां नावमिमां शनैः ।
सीतां चारोपयान्वक्षं परिगृह्य मनस्विनीम् ७५
स भ्रातुः शासनं श्रुत्वा सर्वमप्रतिकूलयन् ।
आरोप्य मैथिलीं पूर्वमारुरोहात्मवांस्ततः ७६
अथारुरोह तेजस्वी स्वयं लक्ष्मणपूर्वजः ।
ततो निषादाधिपतिर्गुहो ज्ञातीनचोदयत् ७७
राघवोऽपि महातेजा नावमारुह्य तां ततः ।

---

रामाने वानप्रस्थव्रताचा अंगिकार केला आणि तो राम त्या सहाय्यकर्त्या गुहाला म्हणाला, ' हे गुहा! सैन्य, खजिना, किल्ले आणि देश यांसंबंधाने तूं दक्ष रहात जा; कारण राज्य रक्षण करणें अतिशय कठिण आहे." ( ६८-७२ )

असें सांगून त्या इक्ष्वाकुवंशज रामाने त्या गुहाला परत जाण्याची अनुज्ञा दिली आणि भार्या व लक्ष्मण यांसहवर्तमान तो दक्ष राम सत्वर निघाला. नदीचे तीरीं तयार असलेली नाव अवलोकन करून वेगाने वाहणारी गंगा तरून जाण्याच्या उद्देशाने तो इक्ष्वाकुनंदन राम ( लक्ष्मणाला ) म्हणाला, " हे पुरुष-श्रेष्ठा, या उभ्या असलेल्या नावेवर प्रथम तूं आरोहण कर व लागलीच या विचारी सीतेला हातांचा आधार देऊन हलकेच वर चढीव. ही भ्रात्याची आज्ञा श्रवण करून त्याच्या आज्ञेविरुद्ध यत्किंचितही न वागणारा तो जितेंद्रिय लक्ष्मण सीतेला प्रथम वर चढवून नंतर आपणही त्या नावेवर आरूढ झाला. ( ७३-७६ )

तदनंतर तेजस्वी राम नौकेंत बसल्यावर निषादराज गुहाने आपल्या जात-भाईंना जाण्याविषयीं आज्ञा केली व महातेजस्वी रामही नावेंत आरूढ होऊन,

ब्रह्मवत्क्षत्रवच्चैव जजाप हितमात्मनः ७८
आचम्य च यथाशास्त्रं नदीं तां सह सीतया ।
प्रणमत्प्रतिसन्तुष्टो लक्ष्मणश्च महारथः ७९
अनुज्ञाय सुमन्त्रं च सबलं चैव तं गुहम् ।
आस्थाय नावं रामस्तु चोदयामास नाविकान् ८०
ततस्तैश्चालिता नौका कर्णधारसमाहिता ।
शुभस्फ्यवेगाभिहता शीघ्रं सलिलमत्यगात् ८१
मध्यं तु समनुप्राप्य भागीरथ्यास्त्वनिन्दिता ।
वैदेही प्राञ्जलिर्भूत्वा तां नदीमिदमब्रवीत् ८२
पुत्रो दशरथस्यायं महाराजस्य धीमतः ।
निदेशं पालयत्वेनं गङ्गे त्वदभिरक्षितः ८३
चतुर्दश हि वर्षाणि समग्राण्युष्य कानने ।
भ्रात्रा सह मया चैव पुनः प्रत्यागमिष्यति ८४
ततस्त्वां देवि सुभगे क्षेमेण पुनरागता ।

आपलें हित होण्याच्या उद्देशानें ब्राह्मण व क्षत्रिय या उभयतांनाही जपण्यास योग्य अशा नौकारोहणसंबंधी मंत्राचा जप करूं लागला. नंतर, यथाविधि आचमन करून, सीतेसहवर्तमान रामानें व महारथि लक्ष्मणानें संतुष्ट होऊन, त्या गंगेला प्रणाम केला. नंतर रामानें सुमंत्र सारथ्याला व सैन्यासहवर्तमान आलेल्या त्या गुहाला जाण्याची अनुज्ञा दिली आणि नावेमध्यें नीट बसून त्यानें नावाड्यांना नाव हाकण्यास सांगितलें. ( ७७–८० )

तेव्हां सुकाणू धरणाऱ्यानें सज्ज ठेविलेली ती नाव ते नावाडी वल्हवूं लागले आणि जोरानें वल्हीं मारून चालविलेली ती नाव शीघ्र वेगानें पाणी कापीत चालली. भागीरथीच्या मध्यधारेमध्यें आल्यावर निष्पाप सीता हात जोडून त्या गंगेला म्हणाली, "हे गंगे, हा विचारी दशरथ महाराजांचा पुत्र तुझ्या संरक्षणाच्या बळावर आपल्या पित्याची आज्ञा शेवटास नेण्यास समर्थ होवो. संपूर्ण चौदा वर्षें वनामध्यें वास्तव्य करून भ्राता व मी यांसहवर्तमान तो पुनरपि परत येईल, तेव्हां हे देवि, हे भाग्यशाली गंगे, सर्व मनोरथ परिपूर्ण होऊन मी सुखरूप

यक्ष्ये प्रमुदिता गङ्गे सर्वकामसमृद्धिनी ८५
त्वं हि त्रिपथगे देवि ब्रह्मलोकं समक्षसे ।
भार्या चोदधिराजस्य लोकेऽस्मिन्संप्रदृश्यसे ८६
सा त्वां देवि नमस्यामि प्रशंसामि च शोभने ।
प्राप्तराज्ये नरव्याघ्रे शिवेन पुनरागते ८७
गवां शतसहस्रं च वस्त्राण्यन्नं च पेशलम् ।
ब्राह्मणेभ्यः प्रदास्यामि तव प्रियचिकीर्षया ८८
सुराघटसहस्रेण मांसभूतौदनेन च ।
यक्ष्ये त्वां प्रीयतां देवि पुरीं पुनरुपागता ८९
यानि त्वत्तीरवासीनि दैवतानि च सन्ति हि ।
तानि सर्वाणि यक्ष्यामि तीर्थान्यायतनानि च ९०
पुनरेव महाबाहुर्मया भ्रात्रा च संगतः ।
अयोध्यां वनवासात्तु प्रविशत्वनघोऽनघे ९१
तथा संभाषमाणा सा सीता गङ्गामनिन्दिता ।
दक्षिणा दक्षिणं तीरं क्षिप्रमेवाभ्युपागमत् ९२

परत आलें, म्हणजे तुझें मोठ्या आनंदाने पूजन करीन. ( ८१-८५ )

" हे त्रैलोक्यगामिनी देवी, तूं ब्रह्मलोक व्याप्त करीत आहेस आणि महासागराची भार्या म्हणून या लोकामध्ये दृष्टोत्पत्तीस येत आहेस. हे देवि हे कल्याणि, माझा पुरुषश्रेष्ठ भर्ता वनांतून सुखरूप परत येऊन राज्य करूं लागला, म्हणजे मी तुला वन्दन करीन, तुझें स्तवन करीन आणि तुला संतुष्ट करण्याकरिता लक्ष गोप्रदानें, वस्त्रें आणि उत्तम अन्न ब्राह्मणांना देईन. इतकेंच नव्हे, परंतु हे देवि, मी अयोध्यानगरीला परत आलें, म्हणजे सहस्र घट मद्य आणि मांसमिश्र ओदन यांचा तुला बली देईन; गंगे ! तूं मला प्रसन्न हो. तुझ्या तीराचे ठिकाणीं ज्या कांही देवता, तीर्थें आणि पुण्यस्थानें असतील, त्या सर्वांचें मी पूजन करीन; परंतु हे निष्पाप गंगे, मी आणि भ्राता लक्ष्मण यांसहवर्तमान माझा महापराक्रमी निष्पाप भर्ता वनवासांतून अयोध्येंत प्रविष्ट होवो. " ( ८६-९१ )

याप्रमाणे गंगेला उद्देशून बोलत असलेली ती निष्पाप व सरळ स्वभावाची

तीरं तु समनुप्राप्य नावं हित्वा नरर्षभः।
प्रातिष्ठत सह भ्रात्रा वैदेह्या च परन्तपः ९३
अथाब्रवीन्महाबाहुः सुमित्रानन्दवर्धनम्।
भव संरक्षणार्थाय सजने विजनेऽपि वा ९४
अवश्यं रक्षणं कार्यं मद्विधैर्विजने वने।
अग्रतो गच्छ सौमित्रे सीता त्वामनुगच्छतु ९५
पृष्ठतोऽनुगमिष्यामि सीतां त्वां चानुपालयन्।
अन्योन्यस्य हि नो रक्षा कर्तव्या पुरुषर्षभ ९६
न हि तावदतिक्रान्ता सुकरा काचन क्रिया।
अद्य दुःखं तु वैदेही वनवासस्य वेत्स्यति ९७
प्रणष्टजनसम्बाधं क्षेत्रारामविवर्जितम्।
विषमं च प्रपातं च वनमद्य प्रवेक्ष्यति ९८
श्रुत्वा रामस्य वचनं प्रतस्थे लक्ष्मणोऽग्रतः।

---

सीता लवकरच गंगेच्या दक्षिण तीराला जाऊन पोचली व तीर प्राप्त झाल्यानंतर नाव सोडून देऊन तो शत्रुतापन पुरुषश्रेष्ठ राम, भ्राता लक्ष्मण व विदेहकन्या सीता यांसहवर्तमान पुढे निघाला आणि जातांना तो महापराक्रमी राम सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या लक्ष्मणाला म्हणाला, " कोणताही प्रदेश निर्जन असो अथवा जनयुक्त असो, त्यांत तूं सीतेच्या संरक्षणाकरिता सावध रहात जा. निर्जन वनामध्ये माझ्यासारख्यांनी तुमच्यासारख्यांचें रक्षण अवश्य केलें पाहिजे. यास्तव, हे लक्ष्मणा, तूं पुढे हो; सीतेला तुझ्या मागोमाग येऊं दे आणि मी सीतेचें व तुझें रक्षण करण्याकरिता तिच्या मागून येईन. हे पुरुषश्रेष्ठा, आपण एकमेकांचें रक्षण केलें पाहिजे. ( ९२–९६ )

"आजपर्यंत आपल्या शक्तीबाहेर असें कोणतेंही दुष्कर कर्म करण्याचा आपणांला प्रसंग आला नाही; पण आतापासून तशा प्रकारचे प्रसंग येण्याला आरंभ झाला, असें तूं समज. आज वनवासाचें दुःख सीतेला कळून येईल; कारण ज्यांत माणसाची रहदारी मुळीच नाही आणि शेतें अथवा उपवनें यांचें जेथे नांव नाही असें उंच, सखल व खाचखळगे असलेल्या वनामध्ये आज तिला प्रवेश करावा

अनन्तरं च सीताया राघवो रघुनन्दनः ९९
गतं तु गङ्गापरपारमाशु रामं सुमन्त्रः सततं निरीक्ष्य ।
अध्वप्रकर्षाद्विनिवृत्तदृष्टिर्मुमोच बाष्पं व्यथितस्तपस्वी १००
स लोकपालप्रतिमप्रभावस्तीर्त्वा महात्मा वरदो महानदीम् ।
ततः समृद्धाञ्शुभसस्यमालिनः क्षणेन वत्सान्मुदितानुपागमत् ॥
तौ तत्र हत्वा चतुरो महामृगान्वराहमृश्यं पृषतं महारुरुम् ।
आदाय मेध्यं त्वरितं बुभुक्षितौ वासाय काले ययतुर्वनस्पतिम् १०२

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे द्विपञ्चाशः सर्गः ॥ ५२ ॥

त्रिपञ्चाशः सर्गः । [ २१२१ ]

स तं वृक्षं समासाद्य सन्ध्यामन्वास्य पश्चिमाम् ।
रामो रमयतां श्रेष्ठ इति होवाच लक्ष्मणम् १
अद्येयं प्रथमा रात्रिर्याता जनपदाद्बहिः ।

---

लागेल." रामाचें बोलणें ऐकून लक्ष्मण पुढे निघाला आणि नंतर सीतेच्या मागून रघुनंदन राम जाऊं लागला. गंगेच्या पलीकडल्या तीराला सत्वर गेलेल्या रामाकडे सुमंत्र एकसारखा पहात होता आणि जेव्हा फारच अंतर पडलें, तेव्हा आपली दृष्टि त्याच्या मार्गापासून निवृत्त करून तो बिचारा सुमंत्र दुःखित होऊन अश्रु ढाळूं लागला. ( ९७-१०० )

असो. लोकपालाप्रमाणे ज्याचा प्रभाव आहे, असा तो महात्मा वरप्रद राम महानदी तरून गेल्यावर एका क्षणामध्ये समृद्ध आणि उत्कृष्ट पिकें व आनंदित प्रजा यांनी युक्त असलेल्या वत्स देशामध्ये गेला. तेथे त्या क्षुधेने पीडित झालेल्या राम-लक्ष्मणांनी ऋश्य, पृषत व महारुरु हीं तीन प्रकारचीं हरणें आणि वराह असे चार मोठे मृग मारून त्यांच्या पवित्र मांसाचा सत्वर स्वीकार केला आणि सायंकाळीं ते वास्तव्य करण्याकरिता एका वृक्षासमीप गेले. ( १०१-१०२ )

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी बावन्नावा सर्ग समाप्त झाला. ॥ ५२ ॥

त्या वृक्षासमीप उतरून सायंसंध्या केल्यावर चित्त-रंजन करणाऱ्यांमध्ये श्रेष्ठ असलेला तो राम लक्ष्मणाला म्हणाला," सुमंत्र सारथ्याशिवाय मनुष्यवसतीच्या

या सुमन्त्रेण रहिता तां नोत्कण्ठितुमर्हति २
जागर्तव्यमतन्द्रिभ्यामद्यप्रभृति रात्रिषु ।
योगक्षेमौ हि सीताया वर्तेते लक्ष्मणावयोः ३
रात्रिं कथंचिदेवेमां सौमित्रे वर्तयामहे ।
अपवर्तामहे भूमावास्तीर्य स्वयमर्जितैः ४
स तु संविश्य मेदिन्यां महार्हशयनोचितः ।
इमाः सौमित्रये रामो व्याजहार कथाः शुभाः ५
ध्रुवमद्य महाराजो दुःखं स्वपिति लक्ष्मण ।
कृतकामा तु कैकेयी तुष्टा भवितुमर्हति ६
सा हि देवी महाराजं कैकेयी राज्यकारणात् ।
अपि न च्यावयेत्प्राणान्दृष्ट्वा भरतमागतम् ७
अनाथश्च हि वृद्धश्च मया चैव विना कृतः ।
किं करिष्यति कामात्मा कैकेय्या वशमागतः ८
इदं व्यसनमालोक्य राज्ञश्च मतिविभ्रमम् ।

---

बाहेरची आजची ही पहिलीच रात्र होय. करिता तूं आता अयोध्येचें स्मरण होऊं देऊं नकोस. आजपासून आपल्याला सावध राहून रात्रीं जागलें पाहिजे; कारण हे लक्ष्मणा, सीतेचा योगक्षेम आपणांवर अवलंबून आहे. हे लक्ष्मणा, ही रात्र आपण कशीतरी काढूं आणि स्वतः आणलेलीं पानें वगैरे भूमीवर अंथरून आपण कसेंतरी पडूं.” ( १-४ )

याप्रमाणे लक्ष्मणाला सांगून मोठमोठ्या मूल्यवान् मंचकावर शयन करण्याची सवय असलेला तो राम भूमीवर पडला आणि लक्ष्मणाला या शुभ गोष्टी सांगूं लागला.“ हे लक्ष्मणा, आज महाराज निःसंशय दुःख करीत शय्येवर पडले असतील. कैकेयी मात्र मनोरथ सिद्धीस गेल्यामुळे संतुष्ट असणें शक्य आहे; परंतु ती राजपत्नी कैकेयी भरत आलेला पाहून राज्य-कारणाकरिता महाराजांना प्राणत्याग करावयाला लावल्यावाचून राहील, असें दिसत नाही. अनाथ, वृद्ध आणि त्यांतूनही माझा वियोग झालेला आणि विषयलोलुप असल्यामुळे कैकेयीच्या तावडींत सापडलेला पिता काय बरें करील ? हें संकट आणि राजाच्या बुद्धीला पडलेला भ्रम

काम एवार्थधर्माभ्यां गरीयानिति मे मतिः ९
को ह्यविद्वानपि पुमान्प्रमदायाः कृते त्यजेत् ।
छन्दानुवर्तिनं पुत्रं तातो मामिव लक्ष्मण १०
सुखी बत सुभार्यश्च भरतः कैकयीसुतः ।
मुदितान्कोसलानेको यो भोक्ष्यत्यधिराजवत् ११
स हि राज्यस्य सर्वस्य सुखमेकं भविष्यति ।
ताते तु वयसातीते मयि चारण्यमाश्रिते १२
अर्थधर्मौ परित्यज्य यः काममनुवर्तते ।
एवमापद्यते क्षिप्रं राजा दशरथो यथा १३
मन्ये दशरथान्ताय मम प्रव्राजनाय च ।
कैकेयी सौम्य संप्राप्ता राज्याय भरतस्य च १४
अपीदानीं तु कैकेयी सौभाग्यमदमोहिता ।
कौसल्यां च सुमित्रां च सा प्रबाधेत मत्कृते १५

यांचा विचार केला, म्हणजे अर्थ आणि धर्म यांपेक्षा कामच प्रबल आहे, असें मला वाटतें ( १–९ )

"( असें जर नसेल तर ) हे लक्ष्मणा, पित्याने ज्याप्रमाणे माझा त्याग केला, त्याप्रमाणे कोणता बरें अज्ञानीसुद्धा पुरुष स्त्रीकरिता आपल्या मर्जीप्रमाणे वागणाऱ्या पुत्राचा त्याग करील ? खरोखर कैकेयीचा पुत्र भरत आपल्या भार्येसहवर्तमान सुखी आहे; कारण, आनंदित अशा कोशल देशाचा सार्वभौम राजाप्रमाणे तो एकटा उपभोग घेणार आहे. पिता वयातीत झाला असून मी अरण्याचा आश्रय केल्यामुळे आता सर्व राज्यसुखाचा उपभोग तो एकटाच घेणार आहे. धर्म आणि अर्थ सोडून देऊन जो कामाचेंच अवलंबन करतो, त्याला दशरथ राजाप्रमाणे अशी सत्वर विपत्ति प्राप्त होते. हे सौम्या, दशरथाच्या मृत्यूकरिता, मला हाकून देण्याकरिता आणि भरताला राज्य प्राप्त करून देण्याकरिता कैकेयीचा जन्म आहे, असें मला वाटतें. ( १०–१४ )

"पति आपल्या मुठींत आहे, या मदाने धुन्द झालेली कैकेयी अजूनसुद्धा माझ्याकरिता कौसल्येला व सुमित्रेला पीडा तर देणार नाही ? आणि आपल्या-

मातास्मत्कारणाद्देवी सुमित्रा दुःखमावसेत् ।
अयोध्यामित एव त्वं काले प्रविश लक्ष्मण १६
अहमेको गमिष्यामि सीतया सह दण्डकान् ।
अनाथाया हि नाथस्त्वं कौसल्याया भविष्यसि १७
क्षुद्रकर्मा हि कैकेयी द्वेषादन्यायमाचरेत् ।
परिद्द्याद्धि धर्मज्ञ गरं ते मम मातरम् । १८
नूनं जात्यन्तरे तात स्त्रियः पुत्रैर्वियोजिताः ।
जनन्या मम सौमित्रे तदप्येतदुपस्थितम् १९
मया हि चिरपुष्टेन दुःखसंवर्धितेन च ।
विप्रयुज्यत कौसल्या फलकाले धिगस्तु माम् २०
मा स्म सीमन्तिनी काचिज्जनयेत्पुत्रमीदृशम् ।
सौमित्रे योऽहमम्बाया दद्मि शोकमनन्तकम् २१
मन्ये प्रीतिविशिष्टा सा मत्तो लक्ष्मण सारिका ।
यस्तस्याः श्रूयते वाक्यं शुक पादमरेर्दश २२

करिता माता सुमित्रादेवीला दुःखाने दिवस कंठावे लागतील. तस्मात्, हे लक्ष्मणा, अजून वेळ निघून गेली नाही, तोंच तूं येथूनच अयोध्येला परत जा. सीतेसहवर्तमान मी एकटा दंडकारण्यांत आणि तूं अयोध्येंत गेलास, म्हणजे सध्या अनाथ असलेल्या कौसल्येचें रक्षण करशील. कैकेयी ही दुष्ट कर्म करणारी आहे. या कारणस्तव हे धर्मवेत्त्या लक्ष्मणा, द्वेषामुळे ती आपल्या मातांसंबंधांत अन्यायाचें वर्तन करील आणि त्यांना विषदेखील घालील. बा लक्ष्मणा, माझ्या मातेने जन्मान्तरीं कांही स्त्रियांचा पुत्रांशीं वियोग केलेला आहे आणि त्यामुळे आज हें पुत्रवियोगदुःख तिला प्राप्त झालें आहे. ( १५-१९ )

“ पुष्कळ दिवसपर्यंत कौसल्येने मला पोसून कष्टाने वाढविलें आणि शेवटीं इतके कष्ट सोसल्याचें फल प्राप्त होण्याचा समय आला असताना माझा तिला वियोग झाला. तस्मात्, मला धिक्कार असो ! हे लक्ष्मणा, मी आपल्या मातेला अक्षय्य दुःख देत आहें. तस्मात् कोणत्याही स्त्रीला असा ( माझ्यासारखा ) पुत्र न होवो ! हे लक्ष्मणा, माझ्या मातेने पालन करून बोलण्याला शिकविलेली

शोचन्त्याश्चाल्पभाग्याया न किंचिदुपकुर्वता ।
पुत्रेण किमपुत्राया मया कार्यमरिन्दम २३
अल्पभाग्या हि मे माता कौसल्या रहिता मया ।
शेते परमदुःखार्ता पतिता शोकसागरे २४
एको ह्यहमयोध्यां च पृथिवीं चापि लक्ष्मण ।
तरेयमिषुभिः क्रुद्धो ननु वीर्यमकारणम् २५
अधर्मभयभीतश्च परलोकस्य चानघ ।
तेन लक्ष्मण नाद्याहमात्मानमभिषेचये २६
एतदन्यच्च करुणं विलप्य विजने बहु ।
अश्रुपूर्णमुखो दीनो निशि तुष्णीमुपाविशत् २७
विलापोपरतं रामं गतार्चिषमिवानलम् ।
समुद्रमिव निर्वेगमाश्वासयत लक्ष्मणः २८

सारिका माझ्यापेक्षा माझ्या मातेचे ठिकाणीं अधिक प्रीति करणारी आहे, असें मला वाटतें; कारण, '' हे शुका, शत्रूच्या पायाला दंश कर.'' असें तरी त्या सारिकेचें वाक्य तिच्या कानावर पडत असतें; परंतु, शत्रूचा पराभव करण्यासंबंधाने तसे नुसते माझे शब्ददेखील तिच्या कानावर पडत नाहीत. हे शत्रुदमना लक्ष्मणा भाग्यहीनतेमुळे पुत्र असूनही निपुत्रिकाप्रमाणे शोक करीत बसलेल्या माझ्या मातेला यत्किंचितही उपकार न करणाऱ्या या पुत्राचा काय बरें उपयोग आहे? माझी माता कौसल्या निःसंशय दुर्दैवी आहे आणि म्हणूनच माझ्या वियोगामुळे शोकसागरांत पडलेली ती सध्या अत्यंत दुःखाकुल स्थितींत आहे. ( २०-२४ )

"हे लक्ष्मणा, मी एकटा क्रुद्ध झालों असतां अयोध्याच काय, सर्व पृथ्वीदेखील बाणांनी जिंकून टाकीन; परंतु, वीर्याचा या प्रसंगीं कांही उपयोग नाही. हे निष्पापा लक्ष्मणा, मी अधर्माला भीत असून, परलोकाचें भय बाळगीत आहें आणि म्हणूनच आज आपणांला अभिषेक करून घेत नाहीं." व अशाच प्रकारच्या दीनपणाने त्या निर्जन वनामध्ये पुष्कळ विलाप करून अश्रूंनी मुख व्याप्त झालेला तो दीन राम रात्रीं स्वस्थ बसला. विलाप करून स्वस्थ बसलेल्या आणि

ध्रुवमद्य पुरी राम अयोध्या युधिनां वर ।
निष्प्रभा त्वयि निष्क्रान्ते गतचन्द्रेव शर्वरी २९
नैतदौपयिकं राम यदिदं परितप्यसे ।
विषादयसि सीतां च मां चैव पुरुषर्षभ ३०
न च सीता त्वया हीना न चाहमपि राघव ।
मुहूर्तमपि जीवावो जलान्मत्स्याविवोद्धृतौ ३१
न हि तातं न शत्रुघ्नं न सुमित्रां परन्तप ।
द्रष्टुमिच्छेयमद्याहं स्वर्गं चापि त्वया विना ३२
ततस्तत्र समासीनौ नातिदूरे निरीक्ष्य ताम् ।
न्यग्रोध सुकृतां शय्यां भेजाते धर्मवत्सलौ ३३
स लक्ष्मणस्योत्तमपुष्कलं वचो निशम्य चैवं वनवासमादरात् ।
समाः समस्ता विदधे परंतपः प्रपद्य धर्मं सुचिराय राघवः ३४

---

म्हणूनच ज्वालारहित झालेल्या अग्नीप्रमाणे अथवा वेगरहित झालेल्या समुद्राप्रमाणे दिसत असलेल्या त्या रामाचें लक्ष्मण सांत्वन करूं लागला की, " हे योध्यांमध्ये श्रेष्ठ रामा, तूं निघून गेल्यामुळे चंद्र अस्तास गेलेल्या रात्रीप्रमाणे आज अयोध्या-नगरी निःसंशय निस्तेज झाली असेल. ( २५-२९ )

" परंतु, हे पुरुषश्रेष्ठा रामा, असा शोक करीत बसणें योग्य नाही. यामुळे तूं सीतेला व मला अधिक दुःखी करीत आहेस. हे राघवा, उदकांतून बाहेर काढलेले मासे ज्याप्रमाणे जिवंत रहणें अशक्य आहे, त्याचप्रमाणे तुझा वियोग झाला असतां सीतेला अथवा मला क्षणभरदेखील जिवंत राहणें अशक्य आहे. हे शत्रुतापना रामा, तुझ्याशिवाय पिता, शत्रुघ्न, सुमित्रा अथवा स्वर्ग हीं आज मला दृष्टीपुढेदेखील पाहण्याची इच्छा नाहीं." याप्रमाणे लक्ष्मणाने सांगितल्या-नंतर प्रथमतः त्या वटवृक्षापाशीच बसलेले ते धर्मवत्सल सीताराम जवळच चांगली तयार करून ठेविलेली ती शय्या अवलोकन करून तिच्यावर जाऊन पडले. याप्रमाणे वनवासासंबंधाने आदरपूर्वक लक्ष्मणाने केलेलें अत्यंत श्रेष्ठ भाषण श्रवण करून आणि पुष्कळ काल लोटेपर्यंत स्वतः वनवासधर्माने वागण्याचें ठरवून त्या शत्रुतपन रामाने सर्व वर्षे संपेपर्यंत लक्ष्मणाला वनवासाची अनुज्ञा दिली

ततस्तु तस्मिन्विजने महाबलौ महावने राघववंशवर्धनौ ।
न तौ भयं संभ्रममभ्युपेयतुर्यथैव सिंहौ गिरिसानुगोचरौ ३५

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे त्रिपञ्चाशः सर्गः ॥५३॥

चतुष्पञ्चाशः सर्गः । [ २१५६ ]

ते तु तस्मिन्महावृक्षे उषित्वा रजनीं शुभाम् ।
विमलेऽभ्युदिते सूर्ये तस्माद्देशात्प्रतस्थिरे १
यत्र भागीरथीं गङ्गां यमुनाभिप्रवर्तते ।
जग्मुस्तं देशमुद्दिश्य विगाह्य सुमहद्वनम् २
ते भूमभागान्विविधान्देशांश्चापि मनोहरान् ।
अदृष्टपूर्वान्पश्यन्तस्तत्र तत्र यशस्विनः ३
यथा क्षेमेण सपश्यन्पुष्पितान्विविधान्द्रुमान् ।
निवृत्तमात्रे दिवसे रामः सौमित्रिमब्रवीत् ४
प्रयागमभितः पश्य सौमित्रे धूममुत्तमम् ।

---

व तदनंतर पर्वतशिखरावरून हिंडणाऱ्या सिंहांप्रमाणे त्या निर्जन महावनांत असलेल्या त्या महाबलाढ्य रघुवंशवर्धक राम-लक्ष्मणांना भय वाटलें नाहीं आणि ते घाबरूनही गेले नाहींत. (३०-३५)

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं त्रेपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५३ ॥

त्या मोठ्या वृक्षासमीप ती शुभ रात्र काढून चांगला सूर्योदय झाल्यावर ते त्या प्रदेशांतून पुढे चालते झाले आणि फारच मोठें वन ओलांडून गेल्यावर जेथें यमुनेचा भागीरथीशीं संगम होत आहे, त्या प्रयाग देशाला जाण्याकरिता ते निघाले. पूर्वी कधी न पाहिलेले असे नाना प्रकारचे भूमिप्रदेश आणि मनोहर देश ठिकठिकाणीं अवलोकन करीत करीत ते यशस्वी रामलक्ष्मण चालले आणि नाना प्रकारचे प्रफुल्लित वृक्ष त्यांनीं यथेष्ट अवलोकन केले. जातां जातां दिवस अस्ताला जाण्याची वेळ होतांक्षणींच राम लक्ष्मणाला म्हणाला, " हे लक्ष्मणा, भगवान् अग्नीचें चिन्ह असा उत्कृष्ट धूम तूं या प्रयागापाशी अवलोकन कर. यावरून या ठिकाणीं

अग्नेर्भगवतः केतुं मन्ये सन्निहितो मुनिः ५
नूनं प्राप्ताः स्म संभेदं गङ्गायमुनयोर्वयम् ।
तथा हि श्रूयते शब्दो वारिणोर्वारिघर्षजः ६
दारूणि परिभिन्नानि वनजैरुपजीविभिः ।
छिन्ना चाप्याश्रमे चैते दृश्यन्ते विविधा द्रुमाः ७
धन्विनौ तौ सुखं गत्वा लम्बमाने दिवाकरे ।
गङ्गायमुनयोः संधौ प्रापतुर्निलयं मुनेः ८
रामस्त्वाश्रममासाद्य त्रासयन्मृगपक्षिणः ।
गत्वा मुहूर्तमध्वानं भरद्वाजमुपागमत् ९
ततस्त्वाश्रममासाद्य मुनेर्दर्शनकाङ्क्षिणौ ।
सीतयानुगतौ वीरौ दूरादेवावतस्थतुः १०
स प्रविश्य महात्मानमृषिं शिष्यगणैर्युतम् ।
शंसितव्रतमेकाग्रं तपसा लब्धचक्षुषम् ११

मुनि असावेत, असें वाटतें. ( १–५ )

“ खरोखर आपण गंगा-यमुनांच्या संगमाजवळ आलों आहोंत; कारण त्यांचीं उदकें एकमेकांवर आदळल्याकारणानें, उत्पन्न झालेला त्यांचा ध्वनि कानावर येत आहे. वनावर उपजीविका करणाऱ्या वनचरांनी ज्यांचीं काष्ठें तोडून नेलीं आहेत, असे हे नाना प्रकारचे तुटके वृक्षही आश्रमांत दिसत आहेत. ” याप्रमाणे बोलणें चाललें आहे, तोंच सूर्य कलला असतांना सुखानें मार्ग चालून आलेले ते धनुर्धारी राम-लक्ष्मण गंगायमुनांच्या संगमासंनिध असलेल्या मुनींच्या निवासस्थानाजवळ गेले. राम आश्रमासंनिध प्राप्त झाला असतां त्यानें धनुष्य धारण केलें असल्यामुळे तेथील पशुपक्षी भीतिग्रस्त झाले. एक क्षणभर मार्ग चालून पुढे गेल्यावर तो राम भरद्वाज मुनींच्या अगदी आश्रमासमीप गेला. तदनंतर भरद्वाज मुनींच्या दर्शनाची इच्छा धरून ते वीर राम-लक्ष्मण बरोबर येत असलेल्या सीतेसह आश्रमांत येऊन दूर उभे राहिले. ( ६–१० )

पुढे आंत येण्याची अनुज्ञा मिळाल्यावर राम पर्णकुटिकेमध्यें गेला, तों शिष्यगणांनी परिवेष्टित असे महात्मे भरद्वाज ऋषि त्याच्या दृष्टीस पडले. त्यांचें व्रता-

हुताग्निहोत्रं दृष्ट्वैव महाभागः कृताञ्जलिः ।
रामः सौमित्रिणा सार्धं सीतया चाभ्यवादयत् ११
न्यवेदयत चात्मानं तस्मै लक्ष्मणपूर्वजः ।
पुत्रौ दशरथस्यावां भगवन् रामलक्ष्मणौ १२
भार्या ममेयं कल्याणी वैदेही जनकात्मजा ।
मां चानुयाता विजनं तपोवनमनिन्दिता १४
पित्रा प्रव्राज्यमानं मां सौमित्रिरनुजः प्रियः ।
अयमन्वगमद्भ्राता वनमेव धृतव्रतः १५
पित्रा नियुक्ता भगवन्प्रवेक्ष्याम तपोवनम् ।
धर्ममेवाचरिष्यामस्तत्र मूलफलाशनाः १६
तस्य तद्वचनं श्रुत्वा राजपुत्रस्य धीमतः ।
उपानयत धर्मात्मा गामर्घ्यमुदकं ततः १७
नानाविधानन्नरसान्वन्यमूलफलाश्रयान् ।
तेभ्यो ददौ तप्ततपा वासं चैवाभ्यकल्पयत् १८

चरण मोठें कडकडीत होतें; तपःसामर्थ्यानें सर्व जगतांतील सर्व कालच्या वृत्तांताचें त्यांना ज्ञान होतें. आणि अग्निहोत्र होम देऊन ते एकाग्र बसले होते. त्यांचें दर्शन होतांक्षणीं महाभाग्यवान् रामानें लक्ष्मणासहवर्तमान हात जोडून त्यांना अभिवंदन केलें व सीतेकडूनही त्यांना नमस्कार करविला. तदनंतर त्या मुनींना राम आपला वृत्तान्त सांगूं लागला कीं, "हे भगवन्, आम्ही रामलक्ष्मण दशरथाचे पुत्र आहोंत. ही माझी कल्याणी भार्या वैदेही जनकराजाची कन्या आहे व निष्पाप अशी ही माझ्याबरोबर निर्जन तपोवनामध्यें आली आहे. पिता मला वनवासांत पाठवूं लागला असतां हा माझा कनिष्ठ भ्राता सुमित्रापुत्र प्रिय लक्ष्मणही माझ्यासारखें व्रत धारण करून माझ्याबरोबर वनामध्यें आला. (११–१५)

"हे भगवन्, पित्याची आज्ञा झाली असल्यामुळें आम्ही तपोवनामध्यें जाणार आणि तेथें फलमूलांवर उपजीविका करून वानप्रस्थ धर्माचेंच अवलंबन करणार आहोंत." हें त्या विचारी राजकुमाराचें भाषण श्रवण करून धर्मात्म्या भरद्वाजमुनींनी मधुपर्काकरितां गाय, अर्घ्य आणि उदक हीं तेथें आणविलीं; वनांतील

मृगपक्षिभिरासीनो मुनिभिश्च समन्ततः ।
राममागतमभ्यर्च्य स्वागतेनागतं मुनिः १९
प्रतिगृह्य तु तामर्चामुपविष्टं स राघवम् ।
भरद्वाजोऽब्रवीद्वाक्यं धर्मयुक्तमिदं तदा २०
चिरस्य खलु काकुत्स्थ पश्याम्यहमुपागतम् ।
श्रुतं तव मया चैव विवासनमकारणम् २१
अवकाशो विविक्तोऽयं महानद्योः समागमे ।
पुण्यश्च रमणीयश्च वसत्विह भवान्सुखम् २२
एवमुक्तस्तु वचनं भरद्वाजेन राघवः ।
प्रत्युवाच शुभं वाक्यं रामः सर्वहिते रतः २३
भगवन्नित आसन्नः पौरजानपदो जनः ।
सुदर्शमिह मां प्रेक्ष्य मन्येऽहमिममाश्रमम् २४
आगमिष्यति वैदेहीं मां चापि प्रेक्षको जनः ।
अनेन कारणेनाहमिह वासं न रोचये २५

---

फळें व मुळें यांचे तयार केलेले नाना प्रकारचे अन्नरस त्या मुनींनी त्यांना दिले व त्या तपस्वी भरद्वाजमुनींनी त्यांच्या वसतिस्थानाचीही सोय केली. राम तेथे आला असतां मृग, पक्षी आणि मुनि यांसहवर्तमान भरद्वाज मुनींनी त्याचें स्वागत केलें आणि मुनींसहवर्तमान ते त्याच्या भोंवतालीं बसले. तेव्हा त्यांच्या त्या आदरातिथ्याचा स्वीकार करून राम बसला असतां धर्माला अनुसरून भरद्वाजमुनि त्याला असें म्हणाले. ( १६–२० )

"हे ककुत्स्थवंशजा रामा, बराच काळ लोटल्यावर तुला मी आज येथे आलेला पहात आहें व तुला निष्कारण वनवासांत पाठविल्याचेंही मी ऐकलें आहे. महानद्यांच्या संगमावर असलेला हा प्रदेश जनशून्य, पुण्य व रमणीय आहे. तेव्हा तूं येथे सुखानें रहा." याप्रमाणे भरद्वाजमुनींनी सांगितलें असतां सर्वांच्या हिताविषयी तत्पर असलेला रघुवंशज राम त्यांच्याशीं शुभ भाषण करूं लागला. "हे भगवन्, या आश्रमापासून नगरांतील व देशांतील लोक अगदी जवळच आहेत आणि ते या आश्रमामध्ये माझी सहज भेट होते, असें समजून सीतेला

एकान्ते पश्य भगवन्नाश्रमस्थानमुत्तमम् ।
रमते यत्र वैदेही सुखार्हा जनकात्मजा २६
एतच्छ्रुत्वा शुभं वाक्यं भरद्वाजो महामुनिः ।
राघवस्य तु तद्वाक्यमर्थग्राहकमब्रवीत् २७
दशक्रोश इतस्तात गिरिर्यस्मिन्निवत्स्यसि ।
महर्षिसेवितः पुण्यः पर्वतः शुभदर्शनः २८
गोलाङ्गूलानुचरितो वानरर्क्षनिषेवितः ।
चित्रकूट इति ख्यातो गन्धमादनसन्निभः २९
यावता चित्रकूटस्य नरः शृङ्गाण्यवेक्षते ।
कल्याणानि समाधत्ते न मोहे कुरुते मनः ३०
ऋषयस्तत्र बहवो विहृत्य शरदां शतम् ।
तपसा दिवमारूढाः कपालशिरसा सह ३१

व मला पाहण्याच्या उद्देशाने या आश्रमांत येऊं लागतील, असें मला वाटतें. तस्मात्, या कारणामुळे येथे वास्तव्य करणें मला योग्य वाटत नाही.(२१-२५)

"हे भगवन्, एकांत प्रदेशामध्ये एखादें उत्कृष्ट आश्रमस्थान असल्यास पहा; म्हणजे सुखाचा उपभोग घेत आलेली ही जनककन्या वैदेही तेथे सुखाने आनंदांत राहील." हें शुभ वाक्य श्रवण करून महर्षि भरद्वाज राघवाने दर्शविलेला उद्देश सिद्धीस जाईल, अशा रीतीने त्याला म्हणाले, "बा रामा, येथून दहा कोसांवर एक पर्वत आहे, त्या ठिकाणीं तूं वास्तव्य कर. त्या पुण्यपर्वताचा महर्षींनी आश्रय केलेला आहे व त्याचें दर्शनही शुभकारक आहे. गाईच्या शेपटाप्रमाणे शेपूट असलेले गोलांगूलसंज्ञक वानर तेथे संचार करीत असतात व इतर वानर आणि अस्वलें तेथे वास्तव्य करीत असतात. गंधमादन पर्वताप्रमाणे असलेला तो पर्वत चित्रकूट म्हणून प्रसिद्ध आहे. चित्रकूटपर्वताच्या शिखराचें दर्शन झाल्याबरोबर मनुष्याच्या मनांत सद्विचारच येऊं लागतात; मोहाकडे त्याची प्रवृत्तीच होत नाही. त्या ठिकाणीं अनेक ऋषि शेकडो वर्षेपर्यंत शंकरासहवर्तमान× क्रीडा करून तपाच्या योगाने स्वर्गाला गेलेले आहेत.(२६-३१)

× 'कपालशिरसा' या पदाचा अर्थ शंकर असा सरळ होत असतांना टीकाकारांनी ओढूनताणून कांहीतरी अर्थ केलेला आहे, तो योग्य दिसत नाही.

प्रविविक्तमहं मन्ये तं वासं भवतः सुखम्।
इह वा वनवासाय वस राम मया सह ३२
स रामं सर्वकामैस्तं भरद्वाजः प्रियातिथिम्।
सभार्यं सह च भ्रात्रा प्रतिजग्राह हर्षयन् ३३
तस्य प्रयागे रामस्य तं महर्षिमुपेयुषः।
प्रपन्ना रजनी पुण्या चित्राः कथयतः कथाः ३४
सीतातृतीयः काकुत्स्थः परिश्रान्तः सुखोचितः।
भरद्वाजाश्रमे रम्ये तां रात्रिमवसत्सुखम् ३५
प्रभातायां तु शर्वर्यां भरद्वाजमुपागमत्।
उवाच नरशार्दूलो मुनिं ज्वलिततेजसम् ३६
शर्वरीं भगवन्नद्य सत्यशील तवाश्रमे।
उषिताः स्मोऽह वसतिमनुजानातु नो भवान् ३७
रात्र्यां तु तस्यां व्युष्टायां भरद्वाजोऽब्रवीदिदम्।
मधुमूलफलोपेतं चित्रकूटं व्रजेति ह ३८

"मला वाटतें, त्या ठिकाणीं तुझें वास्तव्य एकांतामध्यें सुखानें होईल अथवा हे रामा, वनवासाकरिता तूं येथेच माझ्या संनिध रहा." तदनंतर सर्व इष्ट वस्तु अर्पण करून त्या भरद्वाजमुनींनी, भार्या सीता आणि भ्राता लक्ष्मण यांसहवर्तमान त्या प्रिय अतिथि रामाचें त्याला आनंद होईल, अशा रीतीने आदरातिथ्य केलें. असो. तेव्हा प्रयागतीर्थाचे ठिकाणीं त्या महर्षींची भेट घेऊन राम अद्भुत कथा सांगत असतांना शुभकारक अशी रात्र झाली. तेव्हा सुखाची सवय असलेला व श्रांत झालेला राम भरद्वाजमुनींच्या रम्य आश्रमामध्ये सीता व लक्ष्मण यांसहवर्तमान ती रात्र सुखाने राहिला नंतर रात्र उजाडल्यावर अग्नीप्रमाणे तेजस्वी असलेल्या त्या भरद्वाजमुनीकडे जाऊन तो पुरुषश्रेष्ठ राम त्यांना म्हणाला, " हे भगवन्, हे सत्यशील मुने, ही रात्र आपल्या आश्रमामध्ये आम्ही वास्तव्य केलें. आता आपण आम्हांला जाण्याची अनुज्ञा द्या." ( ३२-३७ )

त्या वेळीं ती रात्र निघून गेल्यावर भरद्वाज त्याला म्हणाले, " मध, मुळें आणि फळें यांनी युक्त असलेल्या चित्रकूटपर्वतावर जा. हे महाबलाढ्य रामा, त्या

वासमौपयिकं मन्ये तव राम महायशः ।
नानानगगणोपेतः किन्नरोरगसेवितः ३९
मयूरनादाभिरतो गजराजनिषेवितः ।
गम्यतां भवता शैलश्चित्रकूटः स विश्रुतः ।
पुण्यश्च रमणीयश्च बहुमूलफलायुतः ४०
तत्र कुञ्जरयूथानि मृगयूथानि चैव हि ।
विचरन्ति वनान्तेषु तानि द्रक्ष्यसि राघव ४१
सरित्प्रस्रवणप्रस्थान्दरीकन्दरनिर्झरान् ।
चरतः सीतया सार्धं नन्दिष्यति मनस्तव ४२
प्रहृष्टकोयष्टिभकोकिलस्वनैर्विनोदयन्तं च सुखं परं शिवम् ।
मृगैश्च मत्तैर्बहुभिश्च कुञ्जरैः सुरम्यमासाद्य समावसाश्रयम् ४३

इत्यार्षे श्रीमद्रामा० वाल्मी० आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चतुष्पञ्चाशः सर्गः ५४ [२१९९]

ठिकाणीं तुझें वास्तव्य होणें योग्य आहे, असें मला वाटतें. त्या पर्वतावर नाना प्रकारचे वृक्षसमुदाय आहेत. किन्नर आणि उरग तेथे वास्तव्य करीत आहेत. मयूरपक्ष्यांच्या ध्वनींनीं तो गर्जून राहिलेला आहे व मोठमोठ्या गजांनीं त्याचा आश्रय केलेला आहे. चित्रकूट म्हणून तो प्रख्यात आहे आणि पवित्र व रमणीय असून नाना प्रकारच्या फलमूलांनीं संपन्न आहे. करिता अशा पर्वतावर तूं जा. हे राघवा, त्या ठिकाणीं वनांतून गजांचे व मृगांचे कळप संचार करीत असतात, ते तूं अवलोकन करशील व लहान लहान जलप्रवाहांनीं युक्त असलेलीं पर्वत-शिखरें, दऱ्या, गुहा व झरे हींही तुझ्या अवलोकनांत येतील आणि सीतेसहवर्तमान तेथे तूं संचार करूं लागलास, म्हणजे तुझ्या मनाला आनंद होईल. आनंदित झालेल्या टिट्टिभ व कोकिल पक्ष्यांच्या शब्दांनीं चित्ताला आनंद देणारा, सुखावह, अत्यंत कल्याणकारक आणि मत्त मृग व अनेक गज यांमुळे अत्यंत रमणीय असा जो आश्रमस्थानभूत असलेला चित्रकूट पर्वत तेथे तूं वास्तव्य कर. (३८-४३)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं चोपन्नावा सर्ग समाप्त झाला. ॥ ५४ ॥

पञ्चपञ्चाशः सर्गः ।

उषित्वा रजनीं तत्र राजपुत्रावरिन्दमौ ।
महर्षिमभिवाद्याथ जग्मतुस्तं गिरिं प्रति १
तेषां स्वस्त्ययनं चैव महर्षिः स चकार ह ।
प्रस्थितान्प्रेक्ष्य तांश्चैव पिता पुत्रानिवौरसान् २
ततः प्रचक्रमे वक्तुं वचनं स महामुनिः ।
भरद्वाजो महातेजा रामं सत्यपराक्रमम् ३
गङ्गायमुनयोः संधिमादाय मनुजर्षभ ।
कालिन्दीमनुगच्छेतां नदीं पश्चान्मुखाश्रिताम् ४
अथासाद्य तु कालिन्दीं प्रतिस्रोतः समागताम् ।
तस्यास्तीर्थं प्रचरितं प्रकामं प्रेक्ष्य राघव ५
तत्र यूयं प्लवं कृत्वा तरतांशुमतीं नदीम् । ६
ततो न्यग्रोधमासाद्य महान्तं हरितच्छदम् ।
परीतं बहुभिर्वृक्षैः श्यामं सिद्धोपसेवितम् ७
तस्मिन्सीताञ्जलिं कृत्वा प्रयुञ्जीताशिषं क्रियाम् ।

---

त्या भरद्वाज मुनींच्या आश्रमामध्ये ती रात्र काढल्यावर ते शत्रुदमन करणारे राजपुत्र राम-लक्ष्मण भरद्वाज महर्षींना अभिवंदन करून त्या पर्वताकडे निघाले असतां, त्यांना निघालेले पाहून ज्याप्रमाणे औरस पुत्रांकरिता पिता पुण्याहवाचन करितो, त्याप्रमाणे त्यांनी त्यांच्याकरिता पुण्याहवाचन केलें. नंतर महातेजस्वी भरद्वाज महामुनींनी अमोघपराक्रमी रामाशीं भाषण करण्यास आरंभ केला कीं, " हे पुरुषश्रेष्ठा रामा, गंगा आणि यमुना यांच्या संगमापर्यन्त जाऊन, तेथून पश्चिमेस यमुना नदीच्या काठाकाठाने तुम्ही जा आणि ती नदी जेथे उलटी वहात आहे, तेथे अतिशय प्रचारांत असलेला नावेचा उतार दृष्टोत्पत्तीस आल्यावर, हे राघवा, त्या ठिकाणीं तुम्ही कांहीतरी तरून जाण्याचें साधन करा आणि यमुना नदी तरून जा. ( १-६ )

"तदनंतर हिरव्या पानांनी युक्त, अनेक वृक्षांनी परिवेष्टित, श्यामवर्ण आणि सिद्धांनी आश्रित असा मोठा वटवृक्ष लागला, म्हणजे सीतेने हात जोडून त्याची

समासाद्य च तं वृक्षं वसेद्वातिक्रमेत वा ।
क्रोशमात्रं ततो गत्वा नीलं प्रेक्ष्य च काननम् ८
सल्लकीबदरीमिश्रं राम वन्यैश्च यामुनैः ।
स पन्थाश्चित्रकूटस्य गतस्य बहुशो मया ९
रम्यो मार्दवयुक्तश्च दावैश्चैव विवर्जितः ।
इति पन्थानमावेद्य महर्षिः संन्यवर्तत १०
अभिवाद्य तथेत्युक्त्वा रामेण विनिवर्तितः ।
उपावृत्ते मुनौ तस्मिन्रामो लक्ष्मणमब्रवीत् ११
कृतपुण्याः स्म भद्रं ते मुनिर्यन्नोऽनुकम्पते ।
इति तौ पुरुषव्याघ्रौ मन्त्रयित्वा मनस्विनौ १२
सीतामेवाग्रतः कृत्वा कालिन्दीं जग्मतुर्नदीम् ।
अथासाद्य तु कालिन्दीं शीघ्रस्रोतस्विनीं नदीम् १३
चिन्तामापेदिरे सद्यो नदीजलतितीर्षवः ।
तौ काष्ठसंघाटमथो चक्रतुः सुमहाप्लवम् १४

प्रार्थवी करावी आणि त्या वृक्षापाशीं आल्यावर तुम्ही तेथें रहावें अथवा तेथून पुढें जावें. तेथून एक कोसभर गेल्यानंतर सल्लकी व बदरी या वृक्षांनी युक्त व यमुनातीराला असलेल्या श्वापदांनीं संपन्न असें नीलवर्ण वन दृष्टोत्पत्तीस आलें, म्हणजे तोच चित्रकूट पर्वताचा मार्ग होय; मी त्या मार्गानें पुष्कळ वेळ गेलों आहें. तो मोठा रमणीय व मृदु असून, त्यांत कधीं वणवे लागत नाहींत." (७-१०)

याप्रमाणें मार्ग सांगितल्यावर महर्षि परत फिरले व "ठीक आहे," असें म्हणून रामानेही अभिवंदनपूर्वक त्यांना परत फिरविलें. ते मुनि परत फिरल्यावर राम लक्ष्मणाला म्हणाला, "तुझें कल्याण असो. ज्या अर्थी भरद्वाजमुनि आपणांवर दया करीत आहेत, त्या अर्थी आपण कांहींतरी पुण्य केलें आहे." याप्रमाणें ते विचारी पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण आपआपसांत बोलून आणि सीतेला पुढें घालून यमुनानदीकडे गेले. तदनंतर शीघ्रप्रवाहानें युक्त असलेल्या यमुनानदीसमीप आल्यावर त्या नदीच्या उदकांतून लगेच तरून जाण्याची इच्छा करणाऱ्या त्या त्रिवर्गाना भरद्वाजांनी सांगितल्याचें (प्लव तयार करण्यासंबंधीं) स्मरण झालें. तेव्हां काष्ठें

शुष्कैर्वंशैः समाकीर्णमुशीरैश्च समावृतम्।
ततो वैतसशाखाश्च जम्बुशाखाश्च वीर्यवान् १५
चकार लक्ष्मणश्छित्त्वा सीतायाः सुखमासनम्।
तत्र श्रियमिवाचिन्त्यां रामो दाशरथिः प्रियाम् १६
ईषत्सलज्जमानां तामध्यारोपयत प्लवम्।
पार्श्वे तत्र च वैदेह्या वसने भूषणानि च १७
प्लवे कठिनकाजं च रामश्चक्रे सहायुधैः।
आरोप्य सीतां प्रथमं संघाटं परिगृह्य तौ १८
ततः प्रतेरतुर्यत्तौ प्रीतौ दशरथात्मजौ १९
कालिन्दीमध्यमायाता सीता त्वेनामवन्दत।
स्वस्ति देवि तरामि त्वां पारयेन्मे पतिर्व्रतम्॥
यक्ष्ये त्वां गोसहस्रेण सुराघटशतेन च २०
स्वस्ति प्रत्यागते रामे पुरीमिक्ष्वाकुपालिताम्।
कालिन्दीमथ सीता तु याचमाना कृताञ्जलिः २१

एकत्र बांधून त्यांनी एक मोठासा पेटा तयार केला व वनांतील वाळलेलीं काष्ठें त्यांत घातलीं आणि काळ्या वाळ्यानें तो मढविला. ( ११-१५ )

तदनंतर वीर्यवान् लक्ष्मणानें वेतस वृक्षांच्या व जंबू वृक्षांच्या फांद्या तोडून आणून सुखानें बसतां येईल, अशी जागा सीतेकरितां तयार केली. अचिंत्य प्रभावानें युक्त असलेली लक्ष्मीच की काय, अशा त्या किंचित् सलज्ज अशा आपल्या प्रियेला दाशरथि रामानें पेट्यावर चढविलें आणि त्या पेट्यावर एका बाजूला सीतेचीं वस्त्रें, भूषणें, कुदळ व पेटी हें सामान आयुधांसुद्धां ठेवून दिलें. मग त्या दोघांनीं तो पेटा, हातांनीं धरून ठेऊन, प्रथम सीतेला त्यावर बसवून, नन्तर स्वतः बसून ते जितेंद्रिय दशरथपुत्र आनंदानें तरून जाऊं लागले. यमुनेच्या मध्यभागीं आल्यानंतर सीता वंदन करून तिला म्हणाली, " हे देवी, मी जशी तुझ्यांतून तरून जात आहें तसें माझ्या पतीनें स्वीकारलेलें व्रत पार पडावें. इक्ष्वाकुवंशजांनीं रक्षण केलेल्या अयोध्यानगरीला राम सुखरूप परत आल्यावर सहस्र गाई व शंभर मद्यघट यांच्या योगानें मी तुझें पूजन करीन." ( १६-२१ )

तीरमेवाभिसंप्राप्ता दक्षिणं वरवर्णिनी ।
ततः प्लवेनांशुमतीं शीघ्रगामूर्मिमालिनीम् २२
तीरजैर्बहुभिर्वृक्षैः संतेरुर्यमुनां नदीम् ।
तेषु ते प्लवमुत्सृज्य प्रस्थाय यमुनावनात् २३
श्यामं न्यग्रोधमासेदुः शीतलं हरितच्छदम् ।
न्यग्रोधं समुपागम्य वैदेही चाभ्यवन्दत २४
नमस्तेऽस्तु महावृक्ष पारयेन्मे पतिव्रतम् ।
कौसल्यां चैव पश्येम सुमित्रां च यशस्विनीम् २५
इति सीताञ्जलिं कृत्वा पर्यगच्छन्मनस्विनी ।
अवलोक्य ततः सीतामायाचन्तीमनिन्दिताम् २६
दयितां च विधेयां च रामो लक्ष्मणमब्रवीत् ।
सीतामादाय गच्छ त्वमग्रतो भरतानुज २७
पृष्ठतोऽनुगमिष्यामि सायुधो द्विपदां वर ।
यद्यत्फल प्रार्थयते पुष्पं वा जनकात्मजा २८

याप्रमाणे सीता यमुनेची हात जोडून प्रार्थना करीत असतांनाच ती श्रेष्ठ स्त्री नदीच्या दक्षिण तीराला जाऊन पोचली आणि येणेप्रमाणे तीरावर असलेल्या अनेक वृक्षांनी, लाटांनी व शीघ्रप्रवाहाने युक्त असलेली सूर्यकन्या यमुनानदी ते तरून गेले व त्या तीरावरील वृक्षांमध्ये तो पेटा टाकून देऊन ते यमुनेच्या वनांतून पुढे गेले असतां हिरव्या पानांनी युक्त, शीतल आणि श्यामवर्ण असा वटवृक्ष त्यांना लागला व त्या वटवृक्षासमीप आल्यानंतर सीता अभिवंदनपूर्वक त्याला म्हणाली, “ हे महावृक्षा, तुला माझा नमस्कार असो. माझ्या पतीच्या हातून चौदा वर्षे वनवास कारण्याचें व्रत शेवटास जावें आणि कौसल्येचें व यशस्विनी सुमित्रेचें मला दर्शन व्हावें. ” याप्रमाणे हात जोडून प्रार्थना करीत करीत त्या विचारी सीतेने त्या वटवृक्षाला प्रदक्षिणा केली. ( २२-२६ )

तेव्हा प्रिय, आज्ञेंत वागणारी आणि निष्पाप अशी सीता वृक्षाची प्रार्थना करीत आहे, असें अवलोकन करून राम लक्ष्मणाला म्हणाला, “ हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, तूं सीतेला घेऊन पुढे चल; मी धनुष्य घेऊन मागून येतों. ही जनक-

तत्तत्प्रयच्छ वैदेह्या यत्रास्या रमते मनः ।
एकैकं पादपं गुल्मं लतां वा पुष्पशालिनीम् २९
अदृष्टरूपां पश्यन्ती रामं पप्रच्छ साबला ।
रमणीयान्बहुविधान्पादपान्कुसुमोत्करान् ३०
सीतावचनसंरब्ध आनयामास लक्ष्मणः ३१
विचित्रवालुकजलां हंससारसनादिताम् ।
रेमे जनकराजस्य सुता प्रेक्ष्य तदा नदीम् ३२
क्रोशमात्रं ततो गत्वा भ्रातरौ रामलक्ष्मणौ ।
बहून्मेध्यान्मृगान्हत्वा चेरतुर्यमुनावने ३३
विहृत्य ते बर्हिणपूगनादिते शुभे वने वारणवानरायुते ।
समं नदीवप्रमुपेत्य सत्वरं निवासमाजग्मुरदीनदर्शनाः ३४

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चपञ्चाशः सर्गः ॥५५॥

[२२३३]

कन्या जें जें फल अथवा पुष्प मागेल आणि ज्या ज्या वस्तूवर हिचें मन जाईल, ती ती तूं हिला आणून दे. याप्रमाणे रामाने लक्ष्मणाला सांगितल्यानंतर वृक्ष, क्षुद्रुप अथवा पुष्पवेली असें जें कांही पूर्वी पाहण्यांत न आलेलें सीतेच्या दृष्टोत्पत्तीस येऊं लागलें, त्या प्रत्येकाबद्दल ती अबला रामाला वेगवेगळें विचारूं लागली आणि सीतेने सांगतांक्षणीं लक्ष्मणही त्वरा करून नाना प्रकारच्या रमणीय वृक्षांचे पुष्पगुच्छ तिला आणून देऊं लागला. जातां जातां आश्चर्यकारक वाळू व उदक यांनी युक्त आणि हंस सारस पक्ष्यांनी नादित अशी यमुना नदी अवलोकन करून जनककन्येच्या चित्ताला आनंद वाटला. ( २७-३२ )

असो. तेथून एक कोस गेल्यावर भ्राते राम-लक्ष्मण अनेक पवित्र मृग मारून यमुनेच्या वनांत संचार करूं लागले आणि मयूर पक्ष्यांच्या समुदायांनी नादित व गज आणि वानर यांनी युक्त अशा त्या शुभ वनामध्ये विहार केल्यावर सत्वर नदीच्या तीरीं येऊन ते भव्य त्रिवर्ग निवासस्थानाला गेले. ( ३३-३४ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी पंचावन्नावा सर्ग समाप्त झाला. ॥ ५५ ॥

श्री वाल्मीकि–रामायणांतील

# अयोध्या काण्डाच्या पूर्वार्धाचें

# निरीक्षण

## प्रास्ताविक

श्री महर्षि वाल्मीकीच्या रामायणांतील बालकाण्डाचें निरीक्षण प्रथम भागामध्ये करून, त्या काळच्या ऋषींनीं त्या वेळच्या तरुणांचीं मनें रावणाचें साम्राज्य उलथून पाडण्याच्या व धर्माचें ( राम–) राज्य स्थापण्याच्या कल्पनेनें कशीं भारलीं, हें दाखविलें. या विचारक्रान्तीचा परिणाम हळूहळू जसा व्हावयाचा तसाच झाला. दशरथाच्या विख्यात राजसूय यज्ञांत ऋषि व देव यांनी मिळून "रावणाच्या पाशवी शक्तीनें उभारलेल्या साम्राज्याचा नाश करण्याचा जो ठराव केला होता," तो कसा सफल झाला, याचें वर्णन यापुढील काण्डांत हळूहळू यावयाचें आहे.

बालकाण्डाच्या पुढचें अयोध्याकाण्ड आहे. या काण्डांत राजा दशरथाच्या घरची कौटुम्बिक स्थिति प्रथमतः प्रामुख्यानें वर्णिलेली दिसते. राजा दशरथाच्या तीन मुख्य राण्या होत्या. कौसल्या, सुमित्रा व कैकेयी या त्या तीन राण्या होत. यांशिवाय तीनशे साडे तीनशे लग्नाच्या बायका त्यास होत्या ! या इतर बायकांचें फारसें वर्णन या काव्यांत नाही. पण वरील तीन राण्यांमध्ये आपसांत धुसपूस होती व त्यामुळे दशरथाचें मन आंतून अस्वस्थच होतें, हें मात्र रामायणांत स्पष्ट दिसतें. पुष्कळ बायका असल्या, म्हणजे नवऱ्याची कशी स्थिति होते, त्याचें उत्तम चित्र दशरथ राजाच्या गृहस्थितींत पाहण्यासारखें आहे.

कौसल्या राणी ही पट्टराणी व सर्वांत मुख्य महाराणी होती. नांवाचा मोठेपणाच काय तो हिला लाभलेला होता. राम वनांत जाईपर्यंत म्हणजे तो २८ वर्षांचा होईपर्यंत हिला फारसे सुखाचे दिवस लाभले नव्हते व हें सर्व राम,

तत्तत्प्रयच्छ वैदेह्या यत्रास्या रमते मनः ।
एकैकं पादपं गुल्मं लतां वा पुष्पशालिनीम् २९
अदृष्टरूपां पश्यन्ती रामं पप्रच्छ साबला ।
रमणीयान्बहुविधान्पादपान्कुसुमोत्करान् ३०
सीतावचनसंरब्ध आनयामास लक्ष्मणः ३१
विचित्रवालुकजलां हंससारसनादिताम् ।
रेमे जनकराजस्य सुता प्रेक्ष्य तदा नदीम् ३२
क्रोशमात्रं ततो गत्वा भ्रातरौ रामलक्ष्मणौ ।
बहून्मेध्यान्मृगान्हत्वा चेरतुर्यमुनावने ३३
विहृत्य ते बर्हिणपूगनादित शुभे वने वारणवानरायुते ।
समं नदीवप्रमुपेत्य सत्वरं निवासमाजग्मुरदीनदर्शनाः ३४

इत्यार्षे श्रीमद्रामायण वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चपञ्चाशः सर्गः ॥५५॥

[२२३३]

कन्या जें जें फल अथवा पुष्प मागेल आणि ज्या ज्या वस्तूवर हिचें मन जाईल, ती ती तूं हिला आणून दे. याप्रमाणे रामाने लक्ष्मणाला सांगितल्यानंतर वृक्ष, क्षुद्रुप अथवा पुष्पवेली असें जें कांहीं पूर्वी पाहण्यांत न आलेलें सीतेच्या दृष्टोत्पत्तीस येऊं लागलें, त्या प्रत्येकाबद्दल ती अबला रामाला वेगवेगळें विचारूं लागली आणि सीतेने सांगतांक्षणीं लक्ष्मणही त्वरा करून नाना प्रकारच्या रमणीय वृक्षांचे पुष्पगुच्छ तिला आणून देऊं लागला. जातां जातां आश्चर्यकारक वाळू व उदक यांनी युक्त आणि हंस सारस पक्ष्यांनी नादित अशी यमुना नदी अवलोकन करून जनककन्येच्या चित्ताला आनंद वाटला. ( २७-३२ )

असो. तेथून एक कोस गेल्यावर भ्राते राम-लक्ष्मण अनेक पवित्र मृग मारून यमुनेच्या वनांत संचार करूं लागले आणि मयूर पक्ष्यांच्या समुदायांनी नादित व गज आणि वानर यांनी युक्त अशा त्या शुभ वनामध्ये विहार केल्यावर सत्वर नदीच्या तीरीं येऊन ते भव्य त्रिवर्ग निवासस्थानाला गेले. ( ३३-३४ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकी पंचावन्नावा सर्ग समाप्त झाला. ॥ ५५ ॥

*

श्री वाल्मीकि-रामायणांतील

# अयोध्या काण्डाच्या पूर्वार्धाचें

# निरीक्षण

## प्रास्ताविक

श्री महर्षि वाल्मीकीच्या रामायणांतील बालकाण्डाचें निरीक्षण प्रथम भागामध्ये करून, त्या काळच्या ऋषींनीं त्या वेळच्या तरुणांचीं मनें रावणाचें साम्राज्य उलथून पाडण्याच्या व धर्माचें ( राम-) राज्य स्थापण्याच्या कल्पनेने कशीं भारलीं, हें दाखविलें. या विचारक्रान्तीचा परिणाम हळूहळू जसा व्हावयाचा तसाच झाला. दशरथाच्या विख्यात राजसूय यज्ञांत ऋषि व देव यांनी मिळून "रावणाच्या पाशवी शक्तीने उभारलेल्या साम्राज्याचा नाश करण्याचा जो ठराव केला होता," तो कसा सफल झाला, याचें वर्णन यापुढील काण्डांत हळूहळू यावयाचें आहे.

बालकाण्डाच्या पुढचें अयोध्याकाण्ड आहे. या काण्डांत राजा दशरथाच्या घरची कौटुम्बिक स्थिति प्रथमतः प्रामुख्याने वर्णिलेली दिसते. राजा दशरथाच्या तीन मुख्य राण्या होत्या. कौसल्या, सुमित्रा व कैकेयी या त्या तीन राण्या होत. यांशिवाय तीनशे साडे तीनशे लग्नाच्या बायका त्यास होत्या ! या इतर बायकांचें फारसें वर्णन या काव्यांत नाही. पण वरील तीन राण्यांमध्ये आपसांत धुसपूस होती व त्यामुळे दशरथाचें मन आंतून अस्वस्थच होतें, हें मात्र रामायणांत स्पष्ट दिसतें. पुष्कळ बायका असल्या, म्हणजे नवऱ्याची कशी स्थिति होते, त्याचें उत्तम चित्र दशरथ राजाच्या गृहस्थितींत पाहण्यासारखें आहे.

कौसल्या राणी ही पट्टराणी व सर्वांत मुख्य महाराणी होती. नांवाचा मोठेपणाच काय तो हिला लाभलेला होता. राम वनांत जाईपर्यंत म्हणजे तो २८ वर्षांचा होईपर्यंत हिला फारसे सुखाचे दिवस लाभले नव्हते व हें सर्व राम,

लक्ष्मण, दशरथ, सुमंत्र या सर्वांस पूर्णपणें माहीत होतें. म्हणजे ही घरगुती गुप्त गोष्ट उघड होण्याइतकी प्रकट होती !

दशरथराजा म्हातारा होता व त्यानें उतार वयांत कैकेयीशीं लग्न केलें होतें. म्हातारपणामुळे केकय राजा आपली मुलगी दशरथास देण्यास तयार होईना, तेव्हा "**हिच्या ( कैकेयीच्या ) मुलास गादी देईन,**" असा गुप्त करार दशरथानें केकयराजाशीं केला व या मुलीशीं लग्न केलें ! म्हातारा नवरा, तरुण नवरीच्या मुठींत जातो, त्याप्रमाणे राजा दशरथ कैकेयीच्या कह्यांत सर्वस्वीं गेला होता. रात्रंदिवस तो कैकेयीच्या वाड्यांत पडून असे व त्यामुळे कैकेयीचा कुर्रा फारच वाढला होता व तो इतर राण्यांस वारंवार जाचकही होत असे. यामुळे या राण्यांची वारंवार आपसांत धुसफुस चालत असे; पण कैकेयीचें पारडें दशरथाच्या तेथेंच पडून राहण्यानें नेहेमीच जड झालेलें सर्वांच्या प्रत्ययास येई !

दशरथाची ही गृहस्थिति मुळींच समाधानकारक नव्हती. त्याचें मन कैकेयी-विषयीं साशंकच होतें. त्याचें वचनही पूर्वी सांगितल्याप्रमाणे गुंतलेलें होतें. या वचनामुळे कैकेयी फारच चढेल बनलेली होती. बाहेरून ती सर्वांस सारखें वागवी; पण आंतून तिला या वचनाचें सामर्थ्य माहीत होतें.

हें वचन फोल ठरवावें, म्हणून दशरथानें भरत–शत्रुघ्नांना आजोळीं पाठवलें, तें १२ वर्षें झालीं, तरी परत आणलें नाहीं; इतकेंच नव्हे तर त्यांना न बोलावतां व त्यांच्या मामालाहि न बोलावतांच रामाला गादीवर बसवण्याचाही त्यानें प्रयत्न केला ! एवढ्यानें साधेल, असें दशरथास वाटलें होतें; पण तें साधलें नाहीं व कैकेयीच्या पक्षाच्या प्रयत्नांस शेवटीं यश आलें.

राजाचें लग्न झालें म्हणजे राणीबरोबर माहेरचे बरेच लहानमोठे लोक येऊन सासरच्या गावीं रहात असत. यांत कांहीं नातलग मोठे मानकरीहि असत व कांहीं दासदासीहि असत. यांचेच पक्ष बनत, वाढत व यांची आपसांत धुसपूस नेहमी चालत असे.

**कौसल्या, सुमित्रा व कैकेयी** यांचे परिवार अयोध्येंत अशा रीतीनें येऊन

बसले होते व वाढलेहि होते. ते सर्व अयोध्येचे नागरिकच बनले होते. दशरथराजाचा गोतावळा तर फारच मोठा होता व तो स्वतः राज्यच करीत असल्याने त्याच्या शब्दास मान्यता फार मोठी होती . यामुळेच जरी वचन गेलेलें असलें, तरी भरतास १२ वर्षे बाहेर काढला, म्हणजे रामाचा राज्याभिषेक आपल्या स्वतःच्या वजनाने निर्विघ्नपणें पार पडेल, असें त्यास वाटलें, तें मुळीच अयोग्य नव्हतें; पण कैकेयीने त्यास त्याच्याच वचनांत पकडून घट्ट धरल्यामुळे त्यास मुळीच हालचाल करतां आली नाही व शेवटीं तिच्या म्हणण्याप्रमाणे त्याला करणें भाग पडलें. अशा रीतीने या सम्राटाला स्वतःच्या मर्जीविरुद्ध करण्यास भाग पाडण्याइतकें सामर्थ्य या पारिवारिक लोकांच्या पक्षांत होतें, हें येथे पाहण्यासारखें आहे.

दशरथ कोसल देशाचा अधिपति होता व त्याच देशांतील दुसऱ्या प्रांतांतील राजपुत्री कौसल्या ही होती. कोसलराजाची कोसलकन्या ही स्त्री असल्यामुळे बौद्धांनी हें बहिणभावांचें लग्न होतें, असें केवल नालस्ती करण्यासाठीच लिहून ठेवलें ! वस्तुतः यांत ऐतिहासिक सत्य मुळीच नाहीं. बुद्धांनी वैदिक धर्मीयांची अशी पुष्कळ प्रकारें नालस्ती केलेली आहे. ती त्या वेळीं जरी त्यांस आपला संप्रदाय वाढवण्यास उपयोगी पडली असली, तरी ती आज उपेक्षणीयच ठरण्यासारखी आहे. कोसल देशाचे दोन भाग होते व दोन स्वतंत्र राजे त्यांवर राज्य करीत होते, हें पाहिलें म्हणजे वरील कोडें सहज उलगडण्यासारखें आहे.

रामाच्या आईचें नांव सबंध रामायणांत नाही व तसेंच तें भरताच्या आईचेंहि नाही. '**कौसल्या**' व '**कैकेयी**' हीं देशनांवें किंवा आडनांवें आहेत. सध्या '**कोसलकर**' व '**केकयकर**' (अथवा कोसलकरीण किंवा केकयकरीण) म्हणावें, त्याप्रमाणे हीं देशनांवें आहेत. या मुख्य राण्यांचीं नांवें सर्व रामायणांत नाहींत; पण मधल्या '**सुमित्रे**'चें मात्र नांव आहे. पण या सुमित्रेस रामायणांतील राजकारणांत फारसे महत्त्व नाही. कौसल्या पट्टराणी म्हणून व कैकेयी आवडती म्हणून जशा मानाने झळकतात, तसें सुमित्रेचें नाही. ती इतरांची मनधरणी करीत, गरीबीने पडतें घेऊन वागत असलेली दिसते. नेहेमी पडतें घेणाऱ्या सुमित्रेचें नांव दिलें जातें व मानसन्मान असलेल्या कौसल्या व कैकेयी-

चें नांव दिलें जात नाहीं, यावरून प्रतिष्ठित स्त्रियांचें नांव सन्मानासाठीच घेतलें जात नसे, असें दिसतें, असें कित्येक म्हणतात; पण **सीते**चें नांव रामायणभर आलेलें आहे. '**वैदेही, मैथिली**' हीं 'तिचीं आडनांवें जशीं आहेत, तसेंच '**सीता**' हें हे नांव रामायणांत प्रसिद्ध आहे. मग कौसल्या–कैकेयींचीं नांवें न येण्याचें कारण दुसरें कांहीतरी असावें, असें म्हणणें भाग पडतें. त्या सीतेच्या सास्वा असल्यामुळे रामायणांत त्यांचा मान मोठा असणें स्वाभाविक आहे व सीता जरी आदर्श स्त्री असली, तरी ती त्यांची 'सून' च आहे. सासू-पेक्षा सुनेचा मान कमीच असणेंही अस्वाभाविक नाही. हें कौसल्या–कैकेयींच्या नांवांचा उल्लेख नसण्याचें कारण या त्या वेळच्या मानपानाच्या कल्पनांत आहे कीं दुसरीकडे कोठें सापडण्यासारखें आहे, तें सूज्ञ वाचकांनी पहावें.

दशरथाची ही कौटुंबिक परिस्थिति लक्षांत घेतली, म्हणजे त्याच्या मनाची स्थिति कशी असेल, याची कल्पना करतां येणें शक्य आहे. यासंबंधींचें सविस्तर वर्णन आपण पुढे पाहणारच आहों. तत्पूर्वी कवीने जो आदर्शपुरुष राष्ट्राच्या पुढे ठेवला आहे व त्याकडून शत्रूचा निःपात करविला आहे, तो आदर्श पुरुष कसा आहे, तें प्रथम पाहूं—

## आदर्श युवराज.

आदर्श युवराज कसा असावा, त्यामध्ये वैयक्तिक व सार्वजनिक सद्गुण कोणते असावे, कोणत्या गुणांनी मण्डित झालेला युवराज राज्यधुरा वाहण्यास योग्य आहे असें समजलें जात असे, तें वाल्मीकि ऋषींनी श्रीरामचन्द्राच्या वर्णनामध्ये दाखवलें आहे. तें युवराजाचें वर्णन हें आहे—

### वीरत्व.

**वीर्यवान्** १ । ९; १ । १३; **संग्रामे क्रुद्धैः सुरासुरैरपि अप्रधृष्यः** १।३०; **वीर्ये शचीपतेस्तुल्यः**। १ । ३२, २।३०; **अप्रधृष्यपराक्रमः** १।३४; **यमशक्रसमो वीर्ये** १ । ३९; **पुरंदरसमो वीर्ये** २ । ११; **परपुरंजयः** २ । १; **दिव्यैः गुणैः शक्रसमः** २ । १८; **सत्यपराक्रमः** २ । १८, २ । ४८; **महेष्वासः** २ । ४१; **शौर्यवीर्यपराक्रमैः लोका-**

**भिरामः २ । ४४; सर्वशत्रुनिबर्हणः २।५३; विख्यातपौरुषः ३।२९; महासत्वः ३ । १८; गंधर्वराजप्रतिमः ३ । १८; आत्मवान् १ । ११; स्वेन महता वीर्येण न विस्मितः १ । १३; क्षात्रं स्वधर्मं बहु मन्यते १ । १६; क्षात्रात् महत्स्वर्गफलं मन्यते १ । १६; इष्वस्त्रे पितुः श्रेष्ठः १ । २०; अदीनः १ । २१; अदीनात्मा २ । ३५; धनुर्वेदविदां श्रेष्ठः १ । २९; लोके अतिरथसंमतः १ । २९; अभियाता १ । २९; प्रहर्ता १ । २९ सेनानयविशारदः १ । २९; देवासुरमनुष्याणां सर्वास्त्रेषु विशारदः २ । ३४; यदा संग्रामं व्रजति नाविजित्य विवर्तते १ । ३६-३७; कृतात्मा ३ । २३॥**

शूर, पराक्रमी, वीर्यवान्, मोठें धनुष्य वापरणारा, महा बलवान्, इन्द्राप्रमाणे व यमाप्रमाणे शूर व पराक्रमी, युद्धामध्ये ज्याचा कधीहि पराजय होत नाही असा शूर, शत्रूचे किल्ले जिंकणारा, लढाईवर गेला तर विजय मिळवूनच परत येणारा, गंधर्वराजाप्रमाणे प्रतापी, ज्याचें पौरुष जगांत प्रसिद्ध आहे, क्षत्रियांची कर्तव्यें करून स्वर्ग प्राप्त होतो असें मानणारा, ज्यामध्ये दैन्य मुळीच नाही, धनुर्विद्येंत प्रवीण, अतिरथ्यांनी मान देण्यास योग्य, आपल्या वडिलांपेक्षाही युद्धविद्येंत अधिक निपुण, शत्रूवर चाल केव्हा करावी हें ज्यास उत्तमपणानें समजतें, शत्रूवर प्रहार करणारा, आपल्या सैन्याच्या हालचाली करण्यांत प्रवीण, तत्काळ निर्णय करणारा, देव राक्षस व मानव यांच्या सर्व शस्त्रास्त्रांमध्ये प्रवीण, अप्रतिम शूर असा जो युवराज असतो, तो सर्वांस प्रिय होतो.

## विद्वत्ता व बुद्धिमत्ता.

युवराजाची विद्वत्ता व बुद्धिमत्ता कशी असावी, याविषयी वाल्मीकि ऋषि वर्णन करतात—

**बुद्धिमान् १ । १३; स्मृतिमान् १ । २२; प्रतिभानवान् १ । २२; स्थिरप्रज्ञः १ । २४; बुद्धया बृहस्पतेस्तुल्यः १ । ३२; बृहस्पतिसमो मतौ १ । ३९; स्थिरचित्तः २ । ३२; महामतिः २ । ३५; कुलोचितमतिः १ । १६ ॥**

युवराज बुद्धिमान्, स्मृतिमान्, स्थिरबुद्धीने युक्त अर्थात् ज्याच्या बुद्धीमध्ये चञ्चलता नाही, असा महामति असावा, बृहस्पतीसमान बुद्धिवान् असावा, प्रतिभायुक्त ज्याची बुद्धि आहे, असा व आपल्या कुलाला शोभेल अशी ज्याची बुद्धि आहे, असा असावा. तसेंच—

**विद्वान् १।१४; सर्वविद्याव्रतस्नातः १।२०; सम्यग् विद्याव्रतस्नातः २।३४; शास्त्रसमूहेषु श्रैष्ठ्यं प्राप्तः १।२७; व्यामिश्रिकेषु श्रैष्ठ्यं प्राप्तः १।२७; यथावत् सांगवेदावित् १।२०; २।३४; शास्त्रज्ञः १।२५; गान्धर्वे श्रेष्ठः २।३५॥**

युवराज विद्वान् असावा, सर्व विद्यांचें व वेदवेदांगाचें उत्तम अध्ययन केलेला, सर्व शास्त्रांचा ज्ञाता असावा, तो गानविद्येंतही निपुण असावा. तसेंच—

**वाग्मी १।१८; मधुराभाषी १।१३; स्मितपूर्वाभिभाषी २।४२; प्रियंवदः १।१३; प्रियवादी २।३२; पूर्वभाषी १।१३; न अनृतकथः १।१४; मृदुपूर्वं भाषते १।१०; सत्यवाक् १।२१; सत्यवादी २।३२; २।४१; न दुर्वचः १।२४; उत्तरोत्तरयुक्तीनां वक्ता बृहस्पतिर्यथा १।१७; २।४३॥**

युवराज उत्तम वक्ता असावा, त्याच्या वक्तृत्वामध्ये दोष नसावा, तो प्रिय व मधुर भाषण करणारा असावा, स्मित करून बोलणारा असावा, खोटें बोलणारा नसावा, कठोर व दुष्ट भाषण करणारा नसावा, बोलण्याने त्याने श्रोत्यांस वश करून घ्यावें अशी त्याची वाणी असावी, उत्तमोत्तम युक्त्या योजून आपलें म्हणणें श्रोत्यांस पटवणारा तो असावा. तसेंच—

**धर्मज्ञः १।१५; २।३१; धर्मार्थतत्त्वज्ञः १।२२; सर्वात्मना धर्मं श्रितः २।४२; अश्रेयसि न रतः १।१७; न विरुद्धकथारुचिः १।१७; देशकालवित् १।१८; ऋजुः १।२१; साधुः १।२१; २।३५; एकः साधुः १।१८; अर्थधर्मौ च संगृह्य सुखतन्त्रः १।२७; धर्मभृतां वरः १।११; सत्यः सत्यपरायणः २।२९; श्रेयसां सम्यग्योक्ता २।४२; न विगृह्य कथारुचिः २।३२; शुचिः १।१५; सक्षात् धर्मः २।२९; दृढभक्तिः १।२४**

युवराज धार्मिक असावा, धर्माचें सर्व तत्त्व जणणारा असावा, श्रेयःप्राप्तीच्या कार्यात ज्याची प्रवृत्ति आहे असा असावा, देश व काल यांचा संबंध ओळखून वागणारा असावा, सदाचारी सत्यनिष्ठ व सर्व प्रकारें धर्माचें पालन करणारा असावा, धर्म व अर्थ यांची प्राप्ति झाल्यावर मग सुखाकडे प्रवृत्त होणारा असावा, उगीच गप्पा हाकणारा अथवा लोकांच्या व्यर्थ कुटाळक्या करणारा नसावा, सर्व प्रकारें श्रेयःप्राप्तीचीं कामें वाढवणारा असा सज्जन असावा. तसेंच—

**अनसूयकः १।९; २।३२; अनसूयः १।३०, २।३१; न मत्सरी १।३० ॥**

असूया, मत्सर आदि हीन मनःप्रवृत्ति युवराजामध्ये कधीहि असूं नयेत, दुसऱ्यांचा उन्नति पाहून त्यास आनंद वाटावा, कधीहि त्यांचा हेवा त्याने करूं नये. तसेंच—

**वृद्धानां प्रतिपूजकः १ । १४; वृद्धसेवी २ । ४१; ब्राह्मणप्रतिपूजकः १ । १५; कल्याणाभिजनः १ । २१; धर्मार्थदर्शिभिः वृद्धैः द्विजैः अभिविनीतः १ । २१; श्रेष्ठैः धर्मार्थनिपुणैः द्विजैः अभिविनीतः २ । ३६; सत्पुरुषः २ । २६; बहुश्रुतानां वृद्धानां ब्राह्मणानां उपासिता २ । ३३; अस्त्रयोग्यान्तरेष्वपि शीलवृद्धैः ज्ञानवृद्धैः वयोवृद्धैश्च सज्जनैः नित्यं कथयन्नस्ति १ । १२; ॥**

वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध, शीलवृद्ध धर्मज्ञ अशा लोकांना आपल्याजवळ नेहमी बाळगणारा युवराज असावा. यांच्या सहवासाने बहुश्रुतपणा येतो व धर्मव्यवहार समजतो, थोडा वेळ मिळेल त्या वेळींहि अशा सज्जनांबरोबरच युवराजाने भाषण करावें. असे सज्जन सहवासांत असले, म्हणजे राजपुत्र सहसा बिघडत नाहीत. म्हणून राजपुत्राला अशा थोर, सदाचारी लोकांचा सहवास मिळावा. उपरी व भुरट्या लोकांच्या सहवासांत राजपुत्राने राहूं नये.

**नित्यं प्रशान्तात्मा १ । १०; विनीतः ३ । ४२; सानुक्रोश १।१५; जितक्रोधः १ । १५; २ । ३०; नित्यं प्रग्रहवान् १ । १५; कृतकल्पः १ । २२; गुप्तमंत्रः १।२३; त्यागसंयमकालवित् १ । २३; नासद्ग्राही**

**१ । २४; अप्रमत्तः १ । २४; कृतज्ञः १ । २५; २ । ३१; वृत्तसंपन्नः १।३४; सत्यसंधः २।३१; शीलवान् २।३१; क्षान्तः २।३१; सान्त्वयिता २ । ३१; श्लक्ष्णः २ । ३१; विजितेन्द्रियः २ । ३१; न रागोपहितेन्द्रियः २ । ४४; २ । ४१; मृदुः २ । ३२; सदा भव्यः २ । ३१; गुणसंपन्नः २ । ४८; गुणैः विरोचते २ । ४७; गुणज्येष्ठः ३ । ४०; गुणवान् ३ । ४२; श्रेष्ठैः गुणैः युक्तः १ । १९; बहुभिः अनुपमैः गुणैः युक्तः १ । ३५; सर्वैः गुणैः श्रेष्ठः २ । २१ ॥**

युवराज नेहमी शान्त असावा, नम्र असावा, रागीट नसावा, इन्द्रियें स्वाधीन ठेवणारा असावा, त्याचे राजकीय बेत गुप्त रहावे, दान व संयम यांचा योग्य काल कोणता तें जाणणारा असावा, उन्मत्त नसावा, कृतज्ञ असावा, सदाचारी व शीलसंपन्न असावा, वचन पालन करणारा असावा, प्रेमळ असावा, स्नेह ठेवणारा असावा, स्वभावानें मृदु असावा, सर्व श्रेष्ठ गुणांनी संपन्न असावा, भव्य असावा, वाईट विचारांचें ग्रहण करणारा नसावा. तसेंच—

**प्रजाभिः अनुरक्तः १ । १४; प्रजाः अनुरज्यते १ । १४; दीनानुकम्पी १ । १५; स्वगुणैः प्रजा अनुरञ्जिताः ३ । ४१; क्षमागुणैः युक्तः १ । ३२; २ । ३० ॥**

युवराज प्रजांवर प्रीति करणारा, आपल्या गुणांनी प्रजांना आनन्द देणारा, क्षमा करणारा, दीनांवर दया करणारा असावा. तसेंच—

**वपुष्मान् १ । १८; तरुणः १ । १८; अरोगः १ । १८; रूपोपसंपन्नः १ । ९; अनुपमः १ । ९; सुभ्रूः २ । ४३; आयतताम्राक्षः २ । ४३; दीर्घबाहुः ३ । २८; चन्द्रकान्ताननः ३ । २९; प्रियदर्शनः ३ । २९; मत्तमातंगगामी ३ । २८; राजीवपत्राक्षः ४ । ९; लोकपालोपमः १ । ३४; भुवि श्रेष्ठः २ । ३५;**

युवराज तरुण असावा, निरोगी असवा, सुरूप असून शरीर सुदृढ व दिसावयास भव्य असावें. डोळे कमलाप्रमाणे असावे, चन्द्राप्रमाणे तोंड असावें, भुवया उत्तम असाव्या, बाहु मोठे असून पुष्ट असावे, मत्त हत्तीप्रमाणे डौलाने चालणारा

असावा. रोगी, खुजा, कृश, हीनदीन असा राजपुत्र नसावा. राजपुत्राचा एकंदर प्रभाव लोकांवर पडेल, असा तो असावा. तसेंच—

**लोके पुरुषसारज्ञः १ । १८; पुरुषान्तरकोविदः १ । २५; स्वदोषपरदोषवित् १।२४; सर्वभूतानुकम्पकः १।३८; महीधरसमो वृत्यां १ । ३१ ॥**

मनुष्यांच्या अन्तःकरणांत काय आहे, तें समजणारा युवराज असावा, समोर मनुष्य येतांच त्याच्या अन्तःकरणाचा ठाव घेणारा, मनुष्याची परीक्षा करणारा, आपले व दुसऱ्याचे दोष जाणणारा व ते सुधारावे कसे, तें ज्यास समजतें, असा तो असावा. सर्व प्राण्यांवर दया करणारा युवराज असावा. तसेंच—

**न स्मरति अपकाराणां शतं १।११;**
**एकेन उपकारेण तुष्यति १।११;**
**उच्यमानोऽपि परुषं नोत्तरं प्रतिपद्यते । १।१० ॥**

एक उपकार केला, तरी तेवढ्याने राजपुत्राला संतोष वाटावा, कोणी अनेक अपकार केल, तरी त्यांकडे त्याने पहूं नये, कोणी कठोर भाषण केलें तरी युवराजाने कधींहि कठोर भाषण करूं नये, असा गंभीर व थोर मनाचा युवराज असावा. तसेंच—

**निस्तन्द्री १।२४; न अलसः १।२७; निभृतः १।२३; संवृताकारः १।२३; न दृप्तः १।३० ॥**

युवराज आळशी नसावा, तो उद्योगी, सभ्य, शान्त, असतांही आपल्या अन्तःकरणांतील गुप्त बेतांची गुप्तता नीट रीतीने जो ठेवूं शकतो, असा गंभीर असावा. उथळ मनाचा नसवा. गर्विष्ठ, घमंडखोर नसावा.

**वैहारिकाणां शिल्पानां विज्ञातार्थविभागवित् । १।२८;**
**वारणवाजिनां आरोहे विनये चैव युक्तः १ । २८ ॥**

काव्यनाटकादि विहारशिल्पांमध्ये निपुण असतांहि त्याची धर्मानुकूल मर्यादा पालन करणारा युवराज असावा व हत्ती आणि घोडे यांच्यवर बसण्यांत व त्यांना शिकवण्यांत प्रवीण असावा. काव्यनाटकादींमध्ये त्याने गढूनच जाऊं

नये, आपलेपणा सोडूं नये व आपली मर्यादा उल्लंघिली न जाईल इकडे त्याने त्याने लक्ष्य द्यावें. तसेंच—

**प्रजाजसुखे चन्द्रतुल्यः २ । ३०; सर्वप्रजाकान्तैः प्रीतिसंजननैः गुणैः युक्तः १।३२; उत्सवेषु पितेव परितुष्यति २।४१; मनुष्याणां व्यसनेषु भृशं दुःखितो भवति २।४०; संग्रामाद्दागत्य पौरान् कुशलं परि पृच्छति २।३८; प्रजापालनसंयुक्तः २।४४; सर्वलोकस्य हिते निविष्टः २।५४; युनक्ति अर्थे प्रहृष्टः २।४६; दान्तैः सर्वप्रजाकान्तैः प्रीतिसंजननैः गुणैः विरोचमानः । २ । ४७ बहिश्चर इव प्राणः गुणतः प्रजानां प्रियः १।१९ ॥**

युवराज प्रजाजनांचें हित पाहणारा, प्रजाजनांना सुख होईल असें करणारा, प्रजांना सुख झालें असतां ज्याला आनंद होतो, प्रजांच्या दुःखाने ज्याला दुःख होतें, प्रजाचें पालन करण्याच्या कार्यामध्ये जो सदोदित गुंतलेला, प्रजांची आर्थिक सुधारणा करण्याचा विचार करणारा, प्रजांना सुख देणारे शुभ गुण ज्यामध्ये आहेत व त्यामुळे प्रजांना प्राणाहूनहि जो प्रिय वाटतो, असा युवराज असावा. तसेंच—

**लौकिके समयाचारे विशारदः १।२२; अमोघक्रोधहर्षः १।२३; नास्य क्रोधः प्रसादश्च निरर्थकः २।४५; प्रग्रहानुग्रहयोर्यथान्यायं विचक्षणः १।२५; निग्रहस्य स्थानवित् १।२६; आयकर्मण्युपायज्ञः १।२६; संदृष्टव्ययकर्मवित् १।२६; सत्संग्रहानुग्रहणे स्थानवित् १।२६; वध्यानेष नियमात् हन्ति २।४६; अवध्येषु न कुप्यति २।४६; सहाय्यवान् १।२३ ॥**

युवराज लौकिक व्यवहारामध्ये प्रवीण असावा. त्याचा क्रोध व्यर्थ नसावा, म्हणजे ज्यावर तो प्रसन्न होईल, त्यांचें कल्याण व्हावें व ज्यावर तो रागावेल त्याला योग्य शासन व्हावें. दण्ड देणें व अनुग्रह करणें हीं ज्याच्याकडून यथान्याय होत असतात, दुष्टांचा निग्रह कसा करावा, हें ज्यास समजतें, आय, व्यय यांचें तत्त्व ज्याला समजतें म्हणजे राष्ट्राचें धन कसें वाढवावें व योग्य खर्च कसा करावा, तें ज्यास समजतें, सज्जनांचा संग्रह करावा व त्यांवर अनुग्रह कसा करावा व

दण्डनीयांचा निग्रह करून त्यांस दण्ड कसा द्यावा, हें ज्यास उत्तम कळतें, तसेंच अशा सुयोग्य मित्रांचें ज्यास सहाय्य आहे, असा युवराज असावा.

**भूतानां न अवज्ञेयः १।३१;**

**न कालवशानुगः १।३१;**

**संमतः त्रिषु लोकेषु १।३२;**

**अस्य अतुलो कीर्तिः यशः तेजश्च वर्धते २।३३**

युवराज सर्व प्रजाजनांना प्रिय असावा, कालाचीच अपेक्षा न करीत बसतां जो पुरुषार्थानें कालाला आपल्या अनुकूल बनवितो, म्हणून जो सर्वांना प्रिय होतो व ज्याची कीर्ति, यशस्विता व तेजस्विता चहूंकडे वाढत असते, असा युवराज असावा.

## तरुणांचें शिक्षण.

युवराज किंवा राजपुत्र या गुणांनी युक्त असावा. राजपुत्रांच्या पुढे किंवा सरदारांच्या मुलांपुढे हा आदर्श वाल्मीकि ऋषींनी ठेवला आहे. या गुणांचा अधिक विचार वाचकांनी करावा. देशांतील पुढील पिढी कशी बनवावी, तिच्या पुढे आदर्श काय ठेवावा व तिचें शिक्षण कसें व्हावें, याचा उलगडा येथे होण्यासारखा आहे.

तरुणांचें शिक्षण असें व्हावें व त्यांमध्ये हे गुण विकास पावलेले दिसावे, हें ध्येय येथे आहे.

श्रीरामचन्द्र या गुणांनी संपन्न होता, हा तरुणांचा आदर्श आहे. तरुणांनी आपली तुलना या आदर्शाशीं करावी व आपणांला असें बनावयाचें आहे, असें मनांत बाळगावें.

विजयी राष्ट्रांतील तरुणांनी हा आदर्श आपणांपुढे नेहमी ठेवण्यासारखा आहे.

# रामायण-कालचे राजवाडे व नगरें.

रामायणामध्ये दशरथराजाच्या व रामाच्या राजवाड्यांचें वर्णन आहे. तसेंच वानरराज सुग्रीव, राक्षसराज रावण यांच्या मोठमोठ्या महालांचें वर्णनही पुढे येणार आहे. या वर्णनावरून हे राजवाडे फार मोठे, फार भव्य व गगनचुंबित होते, असें म्हणणें प्राप्त आहे.

## सात–मजली घरें.

'**विमान**' हा शब्द कमींत कमी सात मजले असलेल्या राजवाड्यांचा वाचक संस्कृतमध्ये प्रसिद्ध आहे.

**विमानो व्योमयाने च सप्तभूमिगृहेऽपि च ।**

'विमान' हा शब्द आकाशयान व सात मजले असलेल्या घराचा वाचक आहे. वराहमिहिराच्या बृहत्संहितेमध्ये दहा मजल्यांपर्यंत राजमहालांचें मोजमाप दिलेलें आहे. यावरून दहा मजले मोठमोठ्या राजवाड्यांना पूर्वी असत, असें दिसतें. भारत–चंपूमध्ये हस्तनापूरच्या उंच उंच घरांतून चन्द्राला जावें लागे, त्यामुळे रात्रौ जळत असलेल्या दिव्यांची जी काजळी चन्द्राला लागली, ती अजून धुतली गेली नाही, असें तेथील उंच घरांचें वर्णन केलेलें आहे ! ही अतिशयोक्ति असली, तरी त्यावरून पूर्वी घरें सातसात मजली तरी उंच होती, हें सिद्ध होऊं शकतें. प्रत्येक मजला दहा फूट उंच धरला, तरी दहा मजल्यांसाठी १०० फूट म्हणजे सुमारें ७० हात उंची असली पाहिजे, हें निर्विवाद आहे.

वाल्मीकि रामायणामध्ये राजवाड्याला '**हिमालया**' ची उपमा दिलेली आढळते. ती त्याच्या भव्यतेची, उंचीची व शुभ्र वर्णाची द्योतक आहे. राजवाड्यांना '**सुधा**' म्हणजे चुना लावलेला असे. म्हणून त्यांस '**सौध**' असें म्हणत. गिलावाही चुन्याचाच असे. यामुळे सौध हे हिमालयाप्रमाणे दिसणें शक्य आहे–

**पुत्रैरनुगतः श्रीमान् श्रीमद्भिश्च महायशाः ।**
**प्रविवेश गृहं राजा हिमवत्सदृशं प्रियम् ॥**

(वा० रा० बाल० ७७।९)

राजपुत्रांचीं लग्नें होऊन मुलांसह व सुनांसह राजा दशरथानें आपल्या राजवाड्यांत प्रवेश केला, तेव्हाचें हें वर्णन आहे. " आपल्या पुत्रांसह महायशस्वी राजानें हिमालयासारख्या आपल्या राजवाड्यांत प्रवेश केला." राजवाडा हिमालयासारखा होता, याचा अर्थ राजवाडा उंच, लांबरुंद, भव्य व पांढराशुभ्र होता, असा आहे. निदान सात मजले तरी हा राजवाडा उंच असावा. कित्येक चौक आंत असल्यानें, हा फारच लांबरुन्दही असावा, चुनेगच्ची असल्यानें तो पांढराशुभ्र असावा.

गावांतील देवतेच्या मन्दिराचें शिखर जितकें उंच असेल, त्यापेक्षा राहण्याचीं घरें कमी उंचीचीं असावीं, असा प्राचीन परिपाठ आहे. यावरून अयोध्येंतील देवतामन्दिरें हीं या राजवाड्याच्यापेक्षाहि उंच असावीं व त्यापेक्षा राजवाडे उंचीनें कमी असावे, असें दिसतें. या राजवाड्यांपेक्षा इतर श्रीमंत लोकांचीं व सरदारांचीं घरें हीं कमी उंचीचीं असावीं, हें क्रमप्राप्तच आहे. तसेंच—

**अवतार्य सुमन्त्रस्तु राघवं स्यन्दनोत्तमात् ।**
**पितुः समीपं गच्छन्तं प्राञ्जलिः पृष्ठतोऽन्वगात् ॥**
**स तं कैलासशृंगाभं प्रासादं रघुनन्दनः ।**
**आरुरोह नृपं द्रष्टुं सहसा तेन राघवः ॥**

(वा० रा० अयोध्या. ३ । ३०-३२ )

' सुमन्त्रानें रथांतून रामाला उतरून घेतलें व तो रामाच्या मागोमाग चालूं लागला. रथांतून उतरल्यानंतर कैलास-शिखराप्रमाणें असलेल्या त्या राजवाड्यामध्यें राजाचें दर्शन घेण्यासाठीं राम त्वरेनें वर चढून गेला.'

(**कैलास-शिखराभं प्रासादं**) हिमालयाच्या कैलास नामक शिखराप्रमाणें उंच दशरथाचा राजवाडा होता व त्या राजवाड्यांत जाण्यासाठीं ( **आरुरोह** ) पायऱ्या चढून वर जावें लागत असे. म्हणजे पहिला मजला निदान आठदहा हात तरी जमिनीपासून उंच असावा व सर्व पायऱ्या चढल्याशिवाय राजवाड्यांत प्रवेश होणें शक्य नसावें, असें या वर्णनावरून वाटतें.

मोठ्या घरांचा पहिला मजला असाच उंच करण्याची वहिवाट फार प्राचीन आहे. जमिनीबरोबरच घर असलें, तर थोडा अधिक पाऊस पडतांच पाणी घरांत शिरण्याचा संभव असतो. पहिला मजलाच जमिनीपासून ८–१० हात उंच असला, म्हणजे खालचा पायाही मजबूत बांधून काढतां येतो. वाड्याची शोभा वाढते व पावसाचें पाणी आंत येण्याची कांहीं भीति रहात नाही. दशरथाचा राजवाडा हा असा पायऱ्या चढून आंत प्रवेश करतां येण्याजोगा भव्य व उंच होता. रामाला गादीवर बसवण्याचा निश्चय करण्यासाठीं जी राजसभा भरली होती, त्यांत बसण्यासाठी राम जात आहे, त्या वेळचें हें वर्णन आहे. तसेंच आणखी पहा—

उपवासयितुं वीरं मन्त्रविन्मन्त्रकोविदम्।
ब्राह्मं रथवरं युक्तं आस्थाय सुधृतव्रतः॥
स रामभवनं प्राप्य पाण्डुराभ्रघनप्रभम्।
तिस्रः कक्ष्या रथेनैव विवेश मुनिसत्तमः॥
तमागत ऋषिं रामत्वरन्निव ससंभ्रमम्।
मानयिष्यन् स मानार्हं निश्चक्राम निवेशनात्॥
अभ्येत्य त्वरमाणोऽथ रथाभ्याशं मनीषिणः।
ततोऽवतारयामास परिगृह्य रथात्स्वयम्।
( वा. रा. अयोध्या. ५।४–७ )

रामाला दुसऱ्या दिवशीं राज्याभिषेक व्हावयाचा असल्यामुळे " पूर्व दिवशीं त्याला उपवास करावयास सांगण्यासाठी वसिष्ठ ऋषि ब्राह्मणाला बसण्यास योग्य अशा रथांत बसून रामचन्द्राच्या पांढऱ्या मेघाप्रमाणे स्वच्छ शुभ्र चमकत असलेल्या वाड्याकडे गेले. त्यांचा रथ तीन चौक ओलांडून आंत गेला. वसिष्ठ ऋषि स्वतः आले आहेत, असें समजतांच गडबडीने राम आपल्या वाड्यांतून उतरून रथाजवळ गेला व त्याने स्वतः वसिष्ठांना हात देऊन उतरून घेतलें. "

## चुनेगची वाडे.

या ठिकाणीं रामाच्या वाड्याचें वर्णन ( **पाण्डुराभ्रघनप्रभं** ) पांढऱ्या

मेघाप्रमाणे चमकत असणारा असें आहे. या वाड्यांच्या आंत (**तिस्रः कक्ष्याः**) तीन चौक आंत वसिष्ठांचा रथ गेला. घोड्यांसह रथ तीन चौकांचीं तीन महाद्वारें ओलांडून आंत गेला. यावरून हा मार्ग जरी सार्वजनिक नसला, तरी तो वसिष्ठ, दशरथ, कौसल्या व श्रीराम यांचे रथ जाण्यास योग्य होता, हें उघड आहे. तीन भिंतींचे तीन दरवाजे रथ आंत जाण्याजोगे मोठे होते. कांहीं नाहीं तरी दहा हात, किंवा पंधरा हात तरी हा रस्ता रुंद असावा. कदाचित् येथपर्यंत हत्तीहि येत होते, असें मानलें तर हा मार्ग याहीपेक्षा रुंद मानावा लागेल व दरवाजे पुष्कळच उंच मानावे लागतील; पण रथ जाण्याजोगा मार्ग व दरवाजा होता, एवढेंच तूर्त मानून रस्त्याची रुंदी कमींत कमी दहा बारा हात व द्वाराची उंची कमींत कमी १२-१५ हात मानणें भाग आहे, एवढेंच आपण येथें पाहिलें आहे. या तीन कक्ष्या म्हणजे हा वाड्याचा सार्वजनिक भागच होय; कारण याच्या आंत अन्तर्गृहाचे चौक होते.

## राजवाडा.

**स कक्ष्या धन्विभिर्गुप्तास्तिस्रोऽतिक्रम्य वाजिभिः।**
**पदातिरपरे कक्ष्ये द्वे जगाम नरोत्तमः ॥२१॥**
**स सर्वाः समतिक्रम्य कक्ष्या दशरथात्मजः।**
**सन्निवर्त्य जनं सर्वं शुद्धान्तःपुरमत्यगात् ॥२२॥**

(अयोध्या. १७)

" तो राम राजवाड्यांत प्रविष्ट झाला. त्या राजवाड्याच्या पहिल्या तीन चौकांत धनुष्यधारी वीरांचा पहारा चालू होता. हे तीन चौक रामाने घोड्यांसह चाललेल्या रथांत बसूनच ओलांडले. तेथे राम उतरला व त्यांपुढचे दोन चौक रामाने पायांनी ओलांडिले. यापुढे राजाचें ' **शुद्धान्तःपुर** ' लागलें व रामाने त्यांत प्रवेश केला. " यावरून राजवाड्याचा विस्तार लक्ष्यांत येईल.

तीन चौक रथांत बसून ओलांडले, पुढले दोन चौक पायांनी ओलांडले, त्यापुढे शुद्धअन्तःपुर होतें व तेथें राजा बसलेला होता. रामाचा किंवा वसिष्ठाचा रथ तीन चौकांपर्यंत जाणें शक्य होतें; पण इतरांस आपलें वाहन पहिल्या चौकाच्या

बाहेरच सोडणें आवश्यक होत असावें, असें वाटतें. तीन चौक हे खड्या पाहरे-वाल्यांनी दक्षतेने रक्षिले ज्ञात व आंतील चौकांतहि पहारे असत; पण ते इतके कडक नसावे. या वर्णनावरून त्या वेळच्या बंदोबस्ताची कल्पना वाचकांस येणें स्वाभाविक आहे.

## कौसल्येचा वाडा.

जेव्हा रामाने वनांत जावें, असें ठरलें, तेव्हा लक्ष्मणासह राम कौसल्येच्या महालांत गेला. तेव्हा तेथील वर्णनहि पाहण्यासारखें आहे—

सोऽपश्यत् पुरुषं तत्र वृद्धं परमपूजितम् ।
उपविष्टं गृहद्वारि तिष्ठतश्चापरान् बहून् ॥९॥
दृष्ट्वैव तु तदा रामं ते सर्वे समुपस्थिताः ।
जयेन जयतां श्रेष्ठं वर्धन्ति स्म राघवम् ॥१०॥
प्रविश्य प्रथमां कक्ष्यां द्वितीयायां ददर्श सः ।
ब्राह्मणान् वेदसंपन्नान् वृद्धान् राज्ञाभिसत्कृतान् ॥११॥
प्रणम्य रामस्तान् वृद्धान् तृतीयायां ददर्श सः ।
स्त्रियो बालाश्च वृद्धाश्च द्वाररक्षणतत्पराः ॥१२॥
वर्धयित्वा प्रहृष्टास्ताः प्रविश्य च गृहं स्त्रियः ।
न्यवेदयन्त त्वरितं राममातुः प्रियं तदा ॥१३॥
ददर्श मातरं तत्र हावयन्तीं हुताशनम् ॥१६॥
( अयोध्या. २० )

" राम कौसल्येच्या वाड्यांत गेला, तेव्हा त्याने बाहेरच्या महाद्वारावर वृद्ध व मान्य असा पहारेकरी पाहिला. त्याशिवायही अनेक रक्षक तेथे उभे होते. रामाला पाहतांच ते उठून उभे राहिले व त्याचा त्यांनी जयजयकार केला. या पहिल्या चौकांतून तो दुसऱ्या चौकांत गेला. तेथे वेदवेत्ते ब्राह्मण बसलेले होते. त्यानंतर राजाने ज्यांचा सत्कार केला आहे, असे वृद्ध लोक जमलेले होते. त्या सर्वांस रामाने प्रणाम केला व तिसऱ्या चौकांत त्याने प्रवेश केला. तेथे स्त्रिया, बालक व वृद्ध होते व द्वारपालही होते. राम तेथे पोचतांच तेथील स्त्रियांनी राम आल्याचे

वृत्त कौसल्येस निवेदन केलें. त्या वेळीं कौसल्या अग्नीमध्ये हवन करीत व करवीत होती. ”

अर्थात् तेथे ब्राह्मण जमून हवन व पूजन करीत होते व रामाचें अभीष्ट चिंतण्यांत सर्व गर्क झालेले होते. अशा आनंदाच्या शिखरावर असतांना कौसल्येस रामानें आपल्या वनवासाचें वृत्त निवेदन केलें. तें ऐकून त्या माउलीस काय वाटलें असेल, याची कल्पनाच केलेली बरी !

या ठिकाणच्या वर्णनांत स्त्रियांच्या महालावरील पहारेकरी वृद्ध असत व तिसऱ्या चौकाच्या आंत स्त्रियाच असत, असें दिसतें. दुसऱ्या चौकांत ब्राह्मण, तिसऱ्या चौकांत वृद्ध व त्यापुढे स्त्रिया, बालक व वृद्ध असत. यावरून कोणत्या चौकांत कोणाची पोंच असे, तें समजूं शकेल. या कालांतील राजवाड्यांत कोण कोठे बसत, हेंहि या वर्णनावरून समजून येणें शक्य आहे.

हे अन्तर्गृहाचे चौक निदान चार तरी असतील. बाहेरचे उघडे चौक तीन असले, तर बंदिस्थ चौक चारतरी असतीलच. मृच्छकटिकांत वर्णिलेला वसंतसेनेचा महालही पांचचार चौकी होता. मग तो राजकुमार रामचन्द्राचा वाडा सात चौकांचा असला, तर तें कांही अयोग्य आहे, असें कोणीहि म्हणूं शकणार नाही.

लहानांत लहान चौक शंभर हात तरी लांबरुंद असतो; कारण अशा चौकांत मध्ये मोकळें अंगण, उद्यान, कारंजीं, रस्ते, लतागृहें वगैरे असतात. म्हणून शंभर हात लांबरुंद चौक मानला, तर तो अगदी लहानसाच होईल. असे सात चौक रामाच्या वाड्यांत होते, असें मानलें, तर सातशे हात लांबीचा वाडा ७ चौकांच्या हिशोबानें होता, असें दिसत आहे. तीन चौकांत जेथे रथच जातो, तेथे एवढा वाडा असणें शक्य आहे.

राजवाड्यांतच रहावें लागलें, शत्रूचा वेढा पडला, तर आंतल्या आंतच थोर लोकांचे सर्व व्यवहार सुखानें व्हावे, अशी योजना आंतल्या आंत असते. यावरून लक्ष्यांत येईल की, आम्ही जें या वाड्यांचें माप मानलें आहे, तें लहानांत लहान आहे. पुण्यांतील पूर्वीचे वाडे, तसेंच सध्या हैदराबाद, लष्कर, बडोदें येथे

दिसणारे राजवाडे विस्ताराने यापेक्षा मोठे आहेत.

प्रत्येक चौकांत जलाशय, उद्यानें, पशुपक्ष्यांचे पिंजरे, लतागृहें, कंदुकक्रीडेची जागा, पाण्याचे फवारे, यांस थोडथोडी जरी जागा दिली, तरी एक एक चौक शेदोनशे हात मोठा मानणें भाग असतें. याबाहेर घर व कचेऱ्यांच्या जागा असणार.

दशरथाचा मुख्य राजवाडा तर याहीपेक्षा कितीतरी मोठा होता, असें वाटतें; कारण त्याच्या सर्व साम्राज्याच्या उलाढाली त्या वाड्यांतच होत होत्या. ज्या ठिकाणीं दशरथाचा हा दरबार भरला, तेथे तर सोन्यारत्नाने मढवलेलीं आसनें होतीं व अशा आसनांवर शेकडो माण्डलिक राजे, सरदार, मानकरी व प्रतिष्ठित प्रजाजन बसलेले होते. एवढ्या प्रशस्त जागा जेथे दरबारासाठी असत, तेथे एकंदर राजवाड्याचा अगदी बाहेरचा घेर पाव कोस तरी असणें शक्य आहे. याच्याबाहेर महा उद्यान असतें. सध्या सरदारांचीं आवारें मैल अर्धा मैल लांबीचीं असलेलीं आपण पाहतों. तोच थाट या अयोध्येंत असावा.

## ब्राह्मण बसण्याचे रथ.

वसिष्ठ रामभवनांत गेले, ते ( **ब्राह्मं रथवरं** ) ब्राह्मणाला बसावयास योग्य अशा श्रेष्ठ रथांत बसून गेले होते. यावरून ब्राह्मण, क्षत्रियें, राजे, राजकुमार वैश्य व शूद्र यांचे रथ निरनिराळया प्रकारचे असत कीं काय, अशी शंका येते. रथ चाललेला पाहूनच त्यांतून कोण चालला आहे, तें समजावें, अशासाठीं असा रथांचा निरनिराळेपणा असावा, असें वाटतें. आपलें साम्राज्य असलें, पिढ्यान् पिढ्या राज्यश्री चालत आलेली असली, म्हणजे असे प्रकार व अशा पद्धति होणें स्वाभाविक आहे.

जसा रथावरून हा ब्राह्मणाचा रथ चालला आहे, असें बाहेरूनच समजावें, तसेंच हा राजा चालला आहे व हा व्यापारी चालला आहे असें समजावें, यासाठी कांही बाह्य चिन्हें रथाला असलीं तर तें अयोग्य आहे, असें कोणीहि म्हणणार नाही. ब्राह्मणादि चार वर्णांचे रंग पांढरा, लाल, पिवळा व काळा असें क्रमाने होते, असें मानण्यांत येतें. तसे वर्ण असोत किंवा तशा खुणा असोत, कांही तरी

असें चिन्ह या रथावर होतें की, त्यावरून हा रथ ब्राह्मण बसण्यासच योग्य आहे, असें सर्वांस बाहेरूनच समजत असे.

वसिष्ठ रामभवनांत आले, तेव्हा दुरून रथावरूनच वसिष्ठ आले, हें रामास समजलें व वसिष्ठ रथांतून उतरण्यापूर्वीच राम आपल्या वाड्यांतून रथ थांबण्याच्या जागीं पोचला व त्याने स्वतः वसिष्ठांस रथांतून उतरून घेतलें. यावरून पुरोहिताचा आदर राजेलोक किती ठेवीत, हें समजून येतें व हा आदर आज समूळ नष्ट झाला आहे, हें पाहून मन उद्विग्न होऊन जातें. एकंदर समाजाची स्थितीच इतकी बदललेली आहे.

वसिष्ठ रामाला उपवास करण्यास सांगून पुनः राजभवनामध्ये गेला, तेव्हाच्या वर्णनांतहि राजवाड्याचें वर्णन असें आहे–

**सिताभ्रशिखरप्रख्यं प्रासादमधिरुह्य च ।**

( वा. रा. अयोध्या. ५।२२ )

" शुभ्र पांढऱ्या हिमालयाच्या शिखराप्रमाणे असणाऱ्या त्या राजवाड्यांत वसिष्ठ चढून वर गेले " व वसिष्ठांनी राजाला ' सर्व काम झालें ( **कृतं** )' असें सांगितलें. या ठिकाणीं असलेलें वर्णन हें राजवाड्याची उंची व लांबीरुन्दी दाखवीत आहे व ( **अधिरुह्य** ) वर चढून जाऊन वसिष्ठ आंत पोचले. या वर्णनावरून पहिल्या मजल्याची उंची व तेथे पोचण्यासाठी चढाव्या लागणाऱ्या पायऱ्या सुचविल्या जात आहेत.

कैकेयीचा महालही ( **प्रासादं चन्द्रसंकाशं आरुरोह** वा. रा. अयोध्या० ७।१ ) **कैलासशिखराकारात् प्रासादादवरोहत** । ( वा. रा. अयोध्या ७।१२ ) चन्द्रासारख्या कैकेयीच्या महालाच्या गच्चीवर कुब्जा मन्थरा चढली व कैलासशिखरासारख्या वाड्यावरून खाली उतरली, असें लिहिलें आहे, त्यावरून कैकेयीचा महालही चन्द्रासारखा पांढरा स्वच्छ होता व त्यास कित्येक मजले होते, असें दिसतें; कारण गच्चीवर जातांच तिला सर्व नगर शृंगारलें आहे, हें दिसलें, असें येथे म्हटलें आहे. सर्व नगराचें दृश्य दिसण्यासाठीं उंच वाडा असलाच पाहिजे, यांत शंका नाही. वाडा ठेंगू असला, तर नगराची सर्व

शोभा गच्चीवरूनहि दिसणार नाही.

जर कैकयाचा वाडा असा मोठा होता, तर त्याहींपेक्षा मोठा कौसल्येचा होता असेल. निदान त्यापेक्षा लहान तरी नसेलच. दशरथाचा वाडा, कौसल्या, सुमित्रा, कैकेयी यांचे महाल व राम आणि भरत यांचे वाडे निरनिराळे होते व ते असे प्रचण्ड होते. म्हणून एका वाड्यांतून दुसऱ्या वाड्यांत जाण्यासाठी बराच मार्ग आक्रमावा लागत असे. प्रत्यक्ष राजासाठी आंतला जवळचा मार्ग म्हणून स्वतंत्र मार्ग असेलही कदाचित्; पण रथांतून जाणाऱ्यांसाठी राजवाड्यांतून रामभवनापर्यंत पाव कोस अन्तर तरी ओलांडावें लागे, असें दिसतें. राम राजवाड्यांत गेला, आला व पुनः गेला तो रथानेच गेला आहे. पायांनी सहज जाण्याजोगें हें अन्तर नव्हतें, ही गोष्ट निर्विवाद होय.

वानरराज सुग्रीवाच्या किष्किंधा नगरींतहि अशींच मोठमोठीं वानरांच्या सरदारांचीं भवनें होतीं, असें वर्णन किष्किंधाकांडांत आहे पहा—

## किष्किंधेंतील वानरांचे वाडे.

हर्म्यप्रासादसंबाधां नानारत्नोपशोभिताम् ।
एतेषां कपिमुख्यानां राजमार्गे महात्मनाम् ।
ददर्श गृहमुख्यानि महासाराणि लक्ष्मणः ।
पांडुराभ्रप्रकाशानि गन्धमाल्ययुतानि च ॥
पांडुरेण तु शैलेन परिक्षिप्तं दुरासदम् ।
वानरेन्द्रगृहं रम्यं महेन्द्रसदनोपमम् ।
शुक्लैः प्रासादशिखरैः कैलासशिखरोपमैः ।
स सप्त कक्ष्या धर्मात्मा यानासनसमावृताः ।
ददर्श सुहमद्गुप्तं ददर्शान्तःपुरं महत् ।
हैमराजतपर्यंकैर्बहुभिश्च वरासनैः ॥
महार्हास्तरणोपेतैस्तत्र तत्र समावृतम् ।
( वा. रा. किष्किंधा. ३३ । ५-२० )

' लक्ष्मण जेव्हा किष्किंधा नगरीमध्ये शिरला, तेव्हा राजमार्गाच्या दोनही

बाजूंना मोठमोठे राजवाडे, गगनचुंबित घरें, हर्म्य व प्रासादांचीं उंच उंच शिखरें त्याने पाहिलीं. वानर सरदारांचीं मोठमोठीं गगनचुंबित सर्व घरें त्याला दिसलीं. घरें पांढरीं शुभ्र चुनेगची व चांगलीं मजबूत बांधणीचीं होतीं. इन्द्राच्या राजवाड्यांप्रमाणे तीं विस्तीर्ण होतीं. कैलासशिखराप्रमाणे त्यांचे मनोरे उंच व शोभायमान होते. हिमालयाप्रमाणे ती शोभा दिसत होती. घरांमध्ये सोन्यारुप्याचे पलंग असून, त्यांवर बहुमोल वस्त्रें पसरलेलीं व आच्छादिलेलीं होतीं. सात चौक ओलांडून लक्ष्मण सुग्रीवाकडे पोचला.'

या वर्णनावरून वानरांचीं घरेंही '**कैलासशिखरा**' प्रमाणे उंच, स्वच्छ, पांढरीं, चुनेगची व विस्तीर्ण होतीं, हें निःसंशय ठरत आहे. जे लोक वानरांना रानटी व जंगली अथवा असभ्य म्हणतात, त्यांनी हें या वानरांच्या राजधानीचें व त्यांच्या राजवाडयांचें वर्णन अवश्य पहावें. म्हणजे वानरांच्या संस्कृतीची कल्पना त्यांस येईल.

सुग्रीवाच्या राहण्याच्या ठिकाणीं पोचावयास लक्ष्मणाला ( **सप्त कक्ष्याः** ) सात चौक ओलांडावे लागले व या सात कक्ष्यांमध्ये निरनिराळीं यानें व आसनें व्यवस्थेने ठेवलेलीं होतीं. हें वर्णन लक्ष्यपूर्वक पाहिलें, म्हणजे या राजवाडयांचा मोठेपणा व त्यांचे वैभव तेव्हाच ध्यानीं येईल. वानरांचीं जर अशीं मोठीं घरें होतीं, तर दशरथ व राम यांचीं याहीपेक्षा मोठीं होतीं, असें मनांत येणे शक्य आहे. असो. आता रावणाच्या लंकेंतील घरें कशीं होतीं, तें पाहूं—

## राक्षसांचे लंकेंतील वाडे.

**आससाद च लक्ष्मीवान् राक्षसेन्द्रनिवेशनम् ।**
**प्राकारेणार्कवर्णेन भास्वरेणाभिसंवृतम् ॥२॥**
**समीक्ष्यमाणो भवनं चकाशे कपिकुञ्जरः ॥३॥**
**रूप्यकोपहितैश्चित्रैस्तोरणैर्हेमभूषणैः ।**
**विचित्राभिश्च कक्ष्याभिर्द्वारैश्च रुचिरावृतम् ॥४॥**
**महात्मनो महावेश्म महारत्नपरिच्छदम् ॥१५॥**
**गृहाद्गृहं राक्षसानां उद्यानानि च सर्वशः ।**

वीक्षमाणोऽप्यसंत्रस्तः प्रासादांश्च चचार सः ॥ ३५॥
शिबिका विविधाकाराः स कपिर्मारुतात्मजः ।
लतागृहाणि चित्राणि चित्रशालागृहाणि च ॥३६॥
क्रीडागृहाणि चान्यानि दारुपर्वतकानि च ।
कामस्य गृहकं रम्यं दिवागृहकमेव च ॥३७॥
ददर्श राक्षसेन्द्रस्य रावणस्य निवेशने ।
स मन्दरसमप्रख्यं मयूरस्थानसंकुलम् ॥३८॥

( वा. रा. सुन्दर. स. ७ )

' मारुतीनें लंकेमध्ये प्रवेश केला व तेथे त्यानें रावणाचा राजवाडा व इतर राक्षससरदारांचे वाडे पाहिले. राजवाडयाबाहेर मोठमोठे विस्तीर्ण व उंच प्राकार होते, ते सोन्यारुप्याच्या विलक्षण कलाकुसरीच्या कारागिरीने चमकत होते. हें वैभव पाहून मारुती चकित झाला. विलक्षण उंच भिंती, उत्तम नक्षीचे दरवाजे, मनोहर चौक, त्यांत रमणीय नकशी, आंतबाहेर भरगच्च ऐश्वर्य दिसत होतें. जिकडे पहावें तिकडे सोनें, रत्नें, हिरे व इतर जडजवाहीर चमकत होतें. बाहेर उद्यानें होतीं, आंत विहारमन्दिरें होतीं, रथ, गाडया, पालख्या हीं सर्व वाहनें योग्य स्थानावर झळकत होतीं, बागेंत विविध लतागृहें, विचित्र शालागृहें, खेळण्याच्या जागा, लांकडाचे व दगडाचे कृत्रिम पर्वत व डोंगर, ठिकाठिकाणीं करून कृत्रिम वनश्रीचें दृश्य बनवलें होतें, तें फार मनोहर दिसत होतें. दिवसाला विहार करण्याची जागा निराळी व रात्रीचा विहार करण्याची जागा निराळी होती. ' असें वैभव मारुतीनें लंकेमध्ये पाहिलें.

मारुतीचें स्वतःचें घर किष्किंधेंत कांहीं लहान नव्हतें व सुग्रीवाचा राजवाडा तर सातांपेक्षा अधिक चौकांचा होता. तेथेही श्रीमंतीचा थाट होताच; पण लंकेंतील ऐश्वर्य बघून मारुतीही थक्क झाला. तेव्हा तेथील ऐश्वर्य अधिकच होतें यांत शंका नाही. लंका खरोखर सोन्यानें मढवल्याप्रमाणेच दिसत होती.

आपण अयोध्या, किष्किन्धा व लंका या तीन राजधान्यांतील घरांचीं वर्णनें पाहिलीं. त्यांत लंकेंतील श्रीमंतीची भपका फारच अधिक होता ती श्रीमंतीची बाब सोडून दिली, तर सात सात मजले उंचच उंच घरें व आठ आठ चौक

असलेलीं घरें या राजधान्यांत होतीं, हें उघड आहे. लहान, संकुचित व कोंदट घरांची कल्पनासुद्धा या रामायणांत दिसत नाही.

लंकेंतील घरांवर तर चांदीसोन्याचें काम चमकत होतेंच, पण अयोध्येंतही घरांवर सोन्याचें काम केलेलें होतें. (**अष्टापदाकारां**। वा. रा. बाल. ५।१६) अष्टापद हें एक प्रकारचें सुवर्ण आहे. त्याचे निरनिराळे आकार घरांवर शोभेसाठी लावलेले असतात, किंवा सोन्याच्या रंगाने भिंतींवर विविध चित्रें काढलेलीं असतात, त्यांचें वर्णन अयोध्येच्या वर्णनांत आलेलें आहे.

या अयोध्येंत सात सात मजली घरें एकमेकांस भिडलेलीं होतीं, बाहेर प्राकार होता, त्यावर बुरुजांवर तोफा लावून शत्रूला अभेद्य अशी ही अयोध्या ( अ-योध्या ) नगरी वसवलेली व तयार केलेली होती. तटाच्या बाहेर खंदक होते. आंतल्या बाजूस सुंदर घरें, उपवनें वगैरे सर्व कांही सुखसोई या नगरींत होत्या.

घरें उंच, लांबरुंद व सुशोभित अशीं होतीं. तीं बहुतेक सर्व चुनेगच्ची होतीं. गोपुरें गगनचुंबीत होतीं. पाहणारास आपण हिमालयाचीं शिखरेंच पहात आहों कीं काय, असें वाटत असे.

राजवाडे तर आठ आठ दहा दहा चौकांचे व सात सात मजल्यांचे भव्य होते. चौकांत बाग, लतागृहें, क्रीडास्थानें, कारंजीं, पशुपक्षीगृहें असल्यामुळे चहूंकडे पुष्कळ शोभा वाढलेली दिसत असे. येथे सर्वत्र प्रशस्तपणा, टापटीप व ऐश्वर्य दिसत असे. यासंबंधीचें कैकेयीच्या महालाचें वर्णन येथे पाहण्यासारखें आहे---

## बागेची शोभा

**स कैकेय्या गृहं श्रेष्ठं प्रविवेश महायशाः ॥१२॥**
**पाण्डुराभ्रमिवाकाशं राहुयुक्तं निशाकरः ।**
**शुकबर्हिसमायुक्तं क्रौंचहंसरुतायुतम् ॥१३॥**
**लतागृहैश्चित्रगृहैश्चम्पकाशोकशोभितैः ।**
**दान्तराजतसौवर्णवेदिकाभिः समायुतम् ॥१४॥**
**नित्यपुष्पफलैर्वृक्षैर्वापीभिरुपशोभितम् ।**

दान्तराजतसौवर्णैः संवृतं परमासनैः ॥१५॥
उपपन्नं महार्हैश्च भूषणैस्त्रिदिवोपमम् ॥

( वा. रा. अयोध्या. स. १० )

‘ दशथराजा कैकेयीच्या महालांत गेला. तो महाल स्वच्छ पांढऱ्या मेघाप्रमाणे चमकत होता. त्या वाड्याच्या आवारांत पोपट, मैना, क्रौंच, मोर, हंस हे पक्षी शब्द करीत होते. यांच्या शब्दांनी तो गजबजून गेला होता. सुंदर लतागृहें व चित्रविचित्र उद्यान-गृहांनी त्याची शोभा वाढवली होती. चाफे, अशोक व इतर नेहमी फुलणाऱ्या व फळणाऱ्या वृक्षांनी सजलेली ती बाग होती. सुवर्ण व रजत यांच्या आसनांनी ती जागा शोभिवंत झालेली होती. नाना प्रकारचीं मूल्यवान् वस्त्रें व भूषणें यांनी तें स्थान सजवल्यामुळे तें स्वर्गाप्रमाणे शोभिवंत दिसत होतें.

जसा कैकेयीचा महाल शोभिवंत होता, तसाच तो इतर राण्यांचाहि असणें स्वाभाविक आहे व त्याचप्रमाणे राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न यांचे वाडेहि सुशोभित होते. अयोध्येंतील श्रीमंत, सरदार, शेट, सावकार यांचे वाडेहि तसेच डौलदार असणें अगदी स्वाभाविक आहे. दशरथाच्या वेळच्या श्रीमंतांची यावरून कल्पना येईल व त्या वेळच्या ( Engineesing & Architeclure ) स्थापत्यकौशल्याचीहि कल्पना यावरून येणें शक्य आहे.

अयोध्येंतील रस्ते विस्तीर्ण होते, रस्त्यांच्या दुतर्फा घरें होतीं, तीं स्वच्छ, सुंदर, डौलदार, मनोहारी व मजबूत बांधणीचीं चुनेगची ( **विमानगृहशोभितां** ) सात सात मजली होतीं. कांही कमी श्रीमंतांचीं दुमजली किंवा तिमजलीहि असतील. या घरांच्या भिंतींवर बाहेरून सौंदर्य आणण्यासाठी चित्रें व नाना प्रकारची नकशी काढलेली होती व फार श्रीमंत लोकांच्या घरावर ती सोन्याच्या पत्र्याने अथवा मुलाम्याने केलेलीही होती. सर्व घरांना चुनेगच्ची गच्च्या होत्या व त्यांवर बसून चांदण्या रात्रीच्या वेळीं लोक करमणूक करीत असत.

## श्रीमंतीचा थाट.

एकंदरीत बाहेरील देखावा असा दिसे की, या नगरींत एकही गरीब नाही; कारण जो मनुष्य रस्त्यावर दिसे, तो ( **न अकुंडली, न अमुकुटी** ) किरीट,

कुंडलें व नाना सुवर्णरत्नांचे अलंकार घालून नीटनेटका होऊन बाहेर पडत असे. प्रत्येकाच्या गळ्यांत उत्तम फुलांच्या माळा दिसत, अंगाला चंदन, अत्तर वगैरे लावलेलें असे, गंध वगैरे लावलें जाई. हातांत कडीं, तोडे, बाहूमध्ये कडीं असे अलंकार शरिरांवर दिसत. कपडे स्वच्छ, शरिरें भव्य व चेहऱ्यावर विद्वत्तेची कांति दिसत असे. हीन, दीन, क्षीण, मलीन, असा मनुष्यच अयोध्येत दिसत नसे.

## स्वच्छता.

रस्ते स्वच्छ झाडलेले असून, त्यांवर सुरेख रांगोळया घातलेल्या असत. दुतर्फा घरें झाडून सारवून पुष्पमालांनीं उत्तम सजविलेलीं असत. घरोघर हवन होत असल्याने हवनाचा सुगन्ध व फुलांचा आमोद या सर्व वरील शोभेस बहार आणीत असे. रात्रीच्या वेळीं दुतर्फा घरांच्या द्वारांच्या दोनही बाजूस दिवे लावीत, त्यामुळे सर्व रस्त्यावर उत्तम प्रकाश पडत असे व रस्त्यामध्ये मधूनमधून दीपस्तंभहि उभारलेले असत. हे रात्रीचा अंधकार दूर करीत व रस्त्यांची शोभा वाढवीत असत.

चहूकडे वेदघोष, मंगल वाद्यांचा ध्वनि अशाच प्रकारचे इतर आनंदाचे शब्द ऐकूं येत. यामुळेही अयोध्या म्हणजे देवांची नगरीच आहे कीं काय, असें वाटत असे. ( पहा बालकाण्ड सर्ग ५-६ )

अयोध्येची ही राहणी पाहिली, म्हणजे ही फारच उत्तम राहणी होती, असें म्हणावयास हरकत नाही. उत्तर हिंदुस्थानांत रस्ते झाडून त्यांवर दुतर्फा घराच्या मालकांनी रांगोळ्या घालून शोभा आणणें व आपआपलीं घरें दारें झाडूनपुसून पुष्पमालांनी सजाविणें ही आर्यांची प्राचीन पद्धति मुसलमानी अमदानीमुळे लोपली आहे; पण ही पद्धति अंशतः दक्षिणेकडे अद्यापीही दिसत आहे. ही उत्तम पद्धति आहे, यांत शंका नाही.

प्रत्येक घराचा मालक दररोज आपल्या प्रयत्नाने आपलें घर व घरापुढचा रस्ता साफ व स्वच्छ करीत असल्यामुळे सूर्योदयापूर्वीच सर्व नगर प्राचीन काळीं स्वच्छ होत असे. सध्या ही स्वच्छतेची बाब म्युनिसिपालिटी स्थापून तिच्याकडून

केली जात आहे, त्यामुळे प्रत्येक घर या स्वच्छतेच्या कामीं उदास झालें व म्युनिसिपालिटीकडूनच जेवढें होईल तेवढेंच नगर स्वच्छ होणार. यापेक्षा प्रत्येक घरामध्ये स्वच्छतेची व शोभेची जर चढाओढ लागली, तर नगराची स्वच्छता अधिक होईल व प्रत्येकास स्वच्छतेसाठी अधिक प्रयत्न करावा लागेल, असें वाटते. असो.

यावरून दशरथराजा राज्य करीत असतांना नगरें व घरें, उद्यानें व सार्वजनिक स्थानें कशीं होतीं, त्याची कल्पना येईल.

या राजवाड्यांमध्ये '**क्रोधागार**' म्हणजे राग आला असतां, तेथे जाऊन **रुसून बसण्याची** निराळी खोली असे, असें दिसतें. सध्या कोठे '**क्रोधागार**' म्हणून कांही खोल्या कोणी बांधलेल्या ऐकण्यांत नाहीत. घराच्या इतर भागांत कोणींहि रुसावयाचें किंवा रागवावयाचें नाही. राग आला तर क्रोधागारांत जावें व तेथे रुसणें, फुगणें करावें, असा निर्बंध असला तर तो बरा आहे; पण रामायणाशिवाय ही कल्पना फारशी कोठे दिसत नाही.

याशिवाय '**अग्निशाला, देवतायतन** (देवघर)' असेही भाग या घरांमध्ये असत. **सूपशाला, नर्तनशाला, शयनमंदिर, क्रीडामंदिर** असेही घराचे भाग असत. अर्थात् हे मोठमोठ्या हवेल्यांचे व प्रासादांचे असत, हें निराळें सांगण्याचें कारण नाही.

## देवालयें, देवघरें व उपासनाविधि

अयोध्येमध्ये दशरथराजा राज्य करीत असतांना जसें घरोघर देवघर म्हणजे देवपूजेची खोली, हवन करण्याचें यज्ञगृह किंवा संध्या करण्याची जागा असे, त्याचप्रमाणे गावांमध्ये देवतांचीं मंदिरें म्हणजे देवालयें किंवा देवळेंहि असत. यासंबंधीचें रामायणामध्ये आलेले कांही उल्लेख येथे पाहण्यासारखे आहेत—

**मंगलालापनैर्होमैः शोभिताः क्षौमवाससः ।**
**देवतायतनान्याशु सर्वास्ताः प्रत्यपूजयन् ॥**

(वा. रा. बाल. ७७ । १२)

दशरथ, राजकुमार, सर्व स्त्रिया व सुना राजवाड्यांत पोचल्यानंतर "त्या सर्वांनी ( **क्षौमवाससः** ) रेशमी वस्त्रें परिधान केलीं, अलंकार वगैरे धारण करून सुशोभित होऊन, त्यांनी मंगल होमहवन केलें व ( **देवतायतनानि** ) देवतांच्या मंदिरांत जाऊन ( **आशु** ) तत्काल त्यांनी ( **प्रत्यपूजयन्** ) तेथील प्रत्येक देवतेची पूजा केली."

या वर्णनामध्ये '**देवतायतन**' हा शब्द फार महत्त्वाचा आहे. हें देवतेचें स्थान घरोघरीं असणारेंहि असूं शकेल व गल्लोगल्लीं असणाऱ्या सार्वजनिक मंदिराचेंहि असूं शकेल; पण हें वर्णन राजवाड्यांतील गृहप्रवेशाचें असल्याने, हें मन्दिर राजवाड्याच्या आंतलेंच असणें स्वाभाविक आहे. दशरथाच्या राजवाड्या-जवळच हें मन्दिर असावें. येथे '**देवतायतनानि**' असा बहुवचनी शब्द प्रयोग आहे. यावरून हीं तिहींपेक्षा अधिक मन्दिरें असावीं, असें वाटतें. निदान तीनतरी असतीलच. हीं निरनिराळ्या देवतांचीं होतीं का काय, हें समजत नाहीं. कोणत्या देवता आंत होत्या, तेंहि कांहीं समजत नाहीं.

जेव्हा रामाला राज्याभिषेक होणार हें कौसल्येस समजलें, तेव्हा ती ध्यानस्थ बसली होती—

**सीता चानायिता श्रुत्वा प्रियं रामाभिषेचनम् ॥३१॥**
**तस्मिन्कालेऽपि कौसल्या तस्थावामीलितेक्षणा ॥**
**सुमित्रयान्वास्यमाना सीतया लक्ष्मणेन च ॥३२॥**
**श्रुत्वा पुष्ये च पुत्रस्य यौवराज्येऽभिषेचनम् ।**
**प्राणायामेन पुरुषं ध्यायमाना जनार्दनम् ॥३३॥**
**तथा सनियमामेव सोऽभिगम्याभिवाद्य च ।**
**उवाच वचनं रामो हर्षयंस्तामिदं वरम् ॥३४॥**

( वा. रा. अयोध्या. ४ )

**गोविंदराज-टीका**— प्राणायामेन प्राणायामपूर्वकं पुरुषं पुरुषसूक्तप्रतिपाद्य-पुरुषशब्दवाच्यं जनार्दनं नारायणं ध्यायमाना ध्यायन्ती आमीलितेक्षणा तस्थौ ।

**रामायणशिरोमणिटीका**— प्राणायामेन जनार्दनं महाजनैः प्रार्थितं पुरुषं ध्यायमाना ।

" जेव्हा कौसल्येनें उद्याच रामाला राज्याभिषेक होणार, अशी आनंदाची वार्ता ऐकली, तेव्हा ती (**तस्मिन् काले**) त्याच वेळीं म्हणजे तीन प्रहर झाल्यानंतर (**आमीलितेक्षणा तस्थौ**) डोळे बंद करून ध्यानस्थ बसली. तेथेच सुमित्रा, सीता व लक्ष्मण हीं तिघेंही होतींच. आपल्या मुलाला उद्या पुष्यनक्षत्रावर यौवराज्याभिषेक होणार, हें प्रिय वृत्त ऐकून ती कौसल्या प्राणायाम करून " **जनार्दन** " नामक देवाचें ध्यान करूं लागली. ती याप्रमाणे धर्मनियमांत गर्क असताच राम तिच्याजवळ गेला व त्यानें तिला नमस्कार करून, हें प्रिय वृत्त कथन केलें." यावरून असें दिसतें कीं –

( १ ) कौसल्येला रामराज्याभिषेकाचें वृत्त समजलें,

( २ ) तेंच तिनें **प्राणायाम** केले व

( ४ ) डोळे मिटून '**जनार्दन पुरुषा**' चें ध्यान करण्यास तिनें प्रारंभ केला.

या ठिकाणीं ' **जनार्दन पुरुष** ' या पदाचें स्पष्टीकरण टीकाकार ' पुरुषसूक्तामध्यें ज्या नारायणाचें प्रतिपादन आहे व ज्याचें सर्व लोक आराधन करतात, तो पुरुष ' होय, असें करीत आहेत. अर्थात् या वेळीं कौसल्या ज्या देवाचें डोळे मिटून व प्राणायाम करून ध्यान करीत होती, तो पुरुषसूक्तांत वर्णिलेला ' **पुरुष** ' होय. यावरून असें म्हणतां येतें कीं–

( ५ ) कौसल्येला पुरुषसूक्तांत प्रतिपादन केलेल्या पुरुषाचें ज्ञान होतें व त्या देवाचें ध्यान ती करीत असे.

येथे प्राणायाम करणें व पुरुषसूक्तप्रतिपादित नारायण देवाचें डोळे मिटून ध्यान करणें या गोष्टी वैदिक ज्ञान प्राप्त झाल्यानंतरच होण्यासारख्या आहेत कीं वेदज्ञानाशिवाय होणें शक्य आहेत, हा मोठ्या विचाराचा प्रश्न आहे. उपनयनाशिवाय वेदाचें साक्षात् ज्ञान होणें शक्य नाहीं. सध्या स्त्रियांचें उपनयन होत नाहीं व त्या प्राणायामहि करीत नाहीत; पण कौसल्या येथे प्राणायाम करीत असल्याचें वर्णन आहे. प्राणायाम करण्यास उपनयनाची आवश्यकता आहे कीं काय, हाही येथे महत्त्वाचा प्रश्न आहे.

प्राणायामपूर्वक पुरुषसूक्त प्रतिपादित नारायणाचें डोळे मिटून ध्यान कौसल्या करीत होती. या वर्णनावरून रामायणकालच्या आर्यस्त्रियांना अशा ध्यानधारणेंत

एक उच्च प्रतीचा दर्जा प्राप्त झालेला होता, असें म्हणावें लागेल. कौसल्या ही तर क्षत्रिया आहे. जर ही अशी ध्यानधारणेंत उच्च भूमिकेवर आरूढ होती, तर ब्राह्मण स्त्रियाहि अशाच किंवा यापेक्षा कदाचित् अधिक उच्च स्थितीला पोंचल्या असतीलही.

प्राणायाम करावयाचा, म्हणजे त्यासाठीं आसनावर बसून, सुखासन किंवा दुसरें एखादें आसन, आसनमांडी घालून बसून, करावा लागतो. उगीच उभ्या-उभ्या प्राणायाम करतां येत नाहीं. प्राणायाम करून ती कौसल्या ध्यानस्थ बसली होती. यासाठीं हिने विधिपूर्वक शास्त्रशुद्ध आसन घालून, मगच तिने प्राणायाम करून ध्यान केलें असलें पाहिजे, हें उघड आहे.

रामाला उद्या पुष्यनक्षत्रावर राज्याभिषेक होणार, यासाठीं पूर्वदिवशीं संध्या-काळीं रामाकडे पुरोहित वसिष्ठ ऋषि आले व त्यांनी सीतेसहवर्तमान रामाला त्या रात्रीं उपवास करण्यास सांगितलें व या वेळीं काय करावयाचें तेंहि त्यांनी त्यांस समजाऊन सांगितलें. त्या वसिष्ठ ऋषींच्या सांगण्याप्रमाणे रामाने सीतेसह केलें, तें असें—

गते पुरोहिते रामः स्नातो नियतमानसः ।
सह पत्न्या विशालाक्ष्या नारायणमुपागतम् ॥१॥
प्रगृह्य शिरसा पात्रीं हविषो विधिवत्ततः ।
महते दैवतायाज्यं जुहाव ज्वलितानले ॥२॥
शेषं च हविषस्तस्य प्राश्याऽऽशास्यात्मनः प्रियम् ।
ध्यायन्नारायणं देवं स्वास्तीर्णे कुशसंस्तरे ॥३॥
वाग्यतः सह वैदेह्या भूत्वा नियतमानसः ।
श्रीमानायतने विष्णोः शिश्ये नरवरात्मजः ॥४॥
एकयामावशिष्टायां रात्र्यां प्रतिविबुध्य सः ।
पूर्वां संध्यामुपासीनो जजाप सुसमाहितः ॥६॥
तुष्टाव प्रणतश्चैव शिरसा मधुसूदनम् ॥
विमलक्षौमसंवीतो वाचयामास स द्विजान् ॥७॥

( वा. रा. अयोध्या. ६ )

राजपुरोहित वसिष्ठ ऋषि रामाला उपवासाचा विधि समजावून सांगून निघून गेल्यानंतर रामानें स्नान केलें, मनाचा संयम केला व सीतेसह **नारायणाची उपासना** करण्यास प्रारंभ केला. हवनपात्र घेऊन विधीप्रमाणे **अग्नि-प्रज्वलित** करून, त्याने त्यामध्ये ( महते दैवताय ) मोठ्या देवतेच्या उद्देशाने **हवन केलें.** हुतशेष घृत प्राशन करून, आपलें हित करण्यासाठी त्या देवतेची प्रार्थना रामाने केली. आपण स्वतःच दर्भाचें आसन पसरून वाणीचा आणि **मनाचा संयम करून,** सीतेसह **नारायण** देवतेचें ध्यान करण्यास त्याने प्रारंभ केला. अशा रीतीने ध्यानस्थ होऊन रामाने त्या **विष्णूच्या मंदिरांतच** त्या रात्रीं शयन केलें. एक प्रहर रात्र शिल्लक राहिली असतां, उठून, स्नान आदि आटोपून पूर्वदिशेकडे लक्ष्य लावून करावयाची **प्रातःसंध्या** त्याने केली व शान्त अन्तःकरणाने गायत्री मंत्राचा जप केला. **मधुसूदनाला** आपल्या **मस्तकाने नमस्कार करून** धौत रेशमी वस्त्र नेसलेल्या रामाने ब्राह्मणाला पुण्याह-वाचन करावयास सांगितलें. ”

कौसल्या ‘ **जनार्दन पुरुषा** ’ ची उपासना करीत होती, असें वर वर्णन आलें आहे. रामाने सीतेसह बसून जी उपासना केली आहे, ती ‘ **नारायण मधुसूदन** ’ या देवाची आहे.

१ ( **रामः पत्न्या सह नारायणं उपागमत्** )= राम पत्नीसह नारायणा-जवळ गेला व त्याने नारायणाची उपासना केली.

२ ( **ज्वलितानले महते दैवताय आज्यं जुहाव** )= प्रज्वलित अग्नी-मध्ये मोठ्या दैवताच्या उद्देशाने घृताचें हवन केलें.

३ ( **विष्णोः आयतने शिश्ये** )= विष्णूच्या देवालयामध्ये राम त्या रात्रीं निजला.

४ ( **पूर्वां संध्यां उपासीनः जजाप** )= सकाळची संध्या करतांना त्याने जप केला ( गायत्रीमंत्राचा जप केला. )

५ ( **मधुसूदनं शिरसा प्रणतः** )= मधुसूदनाला मस्तक नम्र करून प्रणाम केला.

रामानें केलेल्या उपासनेच्या वर्णनांत हीं पांच वाक्यें महत्त्वाचीं आहेत. ( १ ) नारायणाची उपासना, ( २ ) मोठ्या देवतेच्या उद्देशानें हवन, ( ३ ) विष्णूच्या मंदिरांत शयन, ( ४ ) सकाळची संध्या व गायत्रीचा जप आणि ( ५ ) मधुसूदनाला प्रमाण, हे पांच विधि रामानें त्या रात्रीं केले. याशिवाय वाणी, मन व इतर इंद्रियें यांचा संयम व उपवास हेहि विधि केले आहेत. यांत '**नारायण, विष्णु व मधुसूदन**' हीं तीनही नांवें एकाच देवाचीं आहेत, हें उघड आहे. कौसल्येनें ज्या '**जनार्दन पुरुषा**' ची उपासना डोळे मिटून केली, तो पुरुष व हा '**नारायण**' एकच होय. हाच पुरुषसूक्तांत वर्णिलेला पुरुष होय. अर्थात् कौसल्येनें ज्या देवाचें ध्यान केलें, त्याच देवाचें रामानें सीतेसह ध्यान केलें, असें वाटतें.

'**महत् दैवतं**' या देवाच्या उद्देशानें रामानें हवन केलें, तें '**महत् दैवतं**' ही हाच नारायण होय; कारण पुरुषसूक्त–प्रतिपादित नारायणाशिवाय आणखी मोठें दैवत दुसरें तिसरें कोणतेंहि नाही. तसेंच (**विष्णोः आयतनं**) विष्णूचें देवालय म्हणून जें वर्णन या ठिकाणीं आलें आहे, तेंहि याच नारायणाचें देवालय होय. अर्थात् '**महत् दैवत, पुरुष, नारायण, विष्णु, मधुसूदन, जनार्दन,**' हीं सर्व नांवें एकाच देवतेचीं समजणें योग्य आहे.

या देवतेची उपासना कशी करीत असत, तें येथे समजत नाही. कौसल्येनें डोळे मिटून प्राणायामपूर्वक ध्यान केलें आहे, रामानें हवन केलें आहे व मस्तक वाकवून नमन केलें आहे. रामानें संध्या, ध्यान व उपासना हीं केलीं आहेत. जप केला, तो गायत्री मंत्राचाच जप होय.

या उपासना मूर्तीच्या कीं काय, हा प्रश्न येथे उद्भवतो. ज्या अर्थी '**विष्णोः आयतनं**' असे शब्द वर आले आहेत, त्या अर्थी या देवतागृहामध्ये विष्णूची मूर्ति होती, असें वाटतें. तसेंच रामानें अग्नीमध्ये हवनही केलें आहे, तेव्हा याच देवतेजवळ हवनकुण्डही असावें, असें दिसतें. मन्दिरामध्ये मूर्ति असावी, त्याच्याजवळच हवन कुंण्डहि असावें. रामानें अग्नि प्रज्वलित करून हवन केलें, असें वर्णन आहे. तत्पूर्वी तो सीतेसह नारायणाजवळ गेला (**नारायणं उपागमत्**) असें वर्णन आहे. ही नारायणाची मूर्ति असावी, असें वाटतें.

नारायण म्हणजेच कांहीं अग्नि नव्हे. राम स्नान करून नारायणाचें दर्शन घेण्यासाठीं नारायणाच्या मूर्तीजवळ गेला. त्यानें त्या देवाचें दर्शन घेतलें. नंतर अग्नि प्रदीप्त करून त्यानें त्यांत घृताचें हवन केलें, त्यानंतर हुतशेष घृत प्राशन केलें. त्यापुढें त्यानें नारायणाचें ध्यान केलें व तेथेंच त्या विष्णुमन्दिरांत दर्भासनावर शयन केलें. हा रामाचा पूर्वरात्रीचा कार्यक्रम आहे.

यांत प्रथम व नंतर नारायणाचें दर्शन व मध्यें हवन असा क्रम दिसत आहे. सर्व नांवें हीं **अग्नी**चींच मानून, ही सर्व उपासना अग्नीचीच आहे, असें कांहीं येथें म्हणतां येणार नाहीं. अग्नीशिवाय निराळ्या मूर्तिरूपी देवतेसाठींच येथील '**विष्णु**' व '**नारायण**' हे शब्द आहेत, असें वाटतें.

कौसल्येनें आपल्या महालांत सुमित्रा, सीता व लक्ष्मण यांस जवळ बसवून (**सीतया सुमित्रया लक्ष्मणेन च अन्वास्यमाना**) जनार्दनाची उपासना चालविली होती. हें जनार्दनाचें उपासनागृह कौसल्येच्या महालांतीलच होतें.

राम सीतेसह विष्णूच्या मंदिरांत निजला. नारायणाच्या जवळ जाऊन त्याची उपासना केली व अग्नीमध्यें हवन केलें. हें उपासनेचें स्थान रामाच्या वाड्यांतीलच होय.

तसेंच सर्व सुनांसह ज्या देवतागृहांमध्यें जाऊन सर्वांनीं मिळून पूजा केल्याचा उल्लेख बालकाण्डाच्या ७७ व्या सर्गांत आहे, तीं देवतामंदिरेंहि राजवाड्यांतील असतील, अथवा कदाचित् सार्वजनिकही असतील. यावरून प्रत्येकाचें आपआपल्या घरीं देवगृह असे व सर्वांचें मिळून सार्वजनिक देवालयही असे, असें म्हणावें लागतें.

कैकेयीच्या आग्रहानें व हट्टानें राज्यरोहणाच्या मुहूर्तावरच रामाला वनांत जावें लागलें. हें दुखःमय वृत्त कौसल्येस सांगण्यासाठीं राम कौसल्येच्या मंदिरांत गेला, तेव्हां कौसल्या पूजा व हवन करीत बसली होती. रामाला राज्य मिळून त्याचें कल्याण होवो, अशी प्रार्थना या वेळीं ती करीत होती. या वेळच्या देवपूजेचें वर्णनहि उपासनाविधीच्या दृष्टीनें मननपूर्वक पाहण्यासारखें आहे. कौसल्या यावेळीं आनंदाच्या भरांत होती, तिचे सर्व मनोरथ आज सफळ झाले, असें तिला वाटत

होतें, अशा स्थितींत ती मोठ्या भक्तीने देवपूजा करीत होती, ती अशी—

**कौसल्याऽपि तदा देवी रात्रिं स्थित्वा समाहिता।**
**प्रभाते चाकरोत् पूजां विष्णोः पुत्रहितैषिणी ॥१४॥**
**सा क्षौमवसना हृष्टा नित्य व्रतपरायणा।**
**अग्निं जुहोति स्म तदा मंत्रवत् कृतमंगला ॥१५॥**
**प्रविश्य तु तदा रामो मातुरन्तःपुरं शुभम्।**
**ददर्श मातरं तत्र हावयन्तीं हुताशनम् ॥१६॥**
**देवकार्यनिमित्तं च तत्रापश्यत् समुद्यतम्।**
**दध्यक्षतघृतं चैव मोदकान् हविषस्तथा ॥१७॥**
**लाजान् माल्यानि शुक्लानि पायसं कृसरं तथा।**
**समिधः पूर्णकुम्भांश्च ददर्श रघुनन्दनः ॥१८॥**
**तां शुक्लक्षौमसंवीतां व्रतयोगेन कर्शिताम्।**
**तर्पयन्तीं ददर्शाद्भिः देवतां वरवर्णिनीम् ॥१९॥**

(वा. रा. अयोध्या. स. २०)

"कौसल्या पूर्व रात्रीं व्रतस्थ राहिली होती. ती सकाळीं उठली व तिने आपल्या पुत्राचें कल्याण व्हावें, यासाठी ( **विष्णोः पूजां अकरोत्** ) विष्णूची पूजा केली. व्रतेंवैकल्यें करणारी ती कौसल्या सोवळें रेशमी वस्त्र नेसून मंगलमांगल्य करून ( **मन्त्रवत्** ) समंत्रक ( **अग्निं जुहोति स्म** ) अग्नीमध्ये हवन करीत बसली होती. इतक्यांत रामाने तेथे प्रवेश केला व आपली आई हवन करवीत आहे, असें त्याने पाहिलें. या देवकृत्यासाठी जमवलेला पुष्कळसा संभार तेथे जवळच होता, तोहि त्याने पाहिला. दही, अक्षता, तूप, मोदक, हविर्द्रव्य, लाह्या, पांढरीं फुलें, पायस, तिलमिश्रित अन्न, खिचडी, समिधा, पूर्ण कुम्भ हें सर्व तेथे होतें व ब्राह्मणांच्या द्वारें तेथे हवन चाललेलें होतें, असें रामाने तेथे पाहिलें. कौसल्या व्रत व उपवास यांनीं कृश झालेली होती व ती पांढरें रेशमी वस्त्र नेसली होती. ती देवतेचें जलाच्या योगाने तर्पण करीत होती, असें रामाने पाहिलें." या वर्णनावरून असें दिसतें की—

( १ ) पूजेच्या वेळीं, ध्यानधारणेच्या वेळीं किंवा होमहवनाच्या वेळीं रेशमी वस्त्र सोवळें वस्त्र नेसत असत.

( २ ) स्त्रिया पूजा करीत, ( **जुहाव** ) हवन करीत, प्राणायामपूर्वक ध्यान-धारणाही करीत.

( ३ ) तसेंच स्त्रिया ( ब्राह्मणांकडून ) हवन करवीत. ( **हावयन्ती** ) या शब्दप्रयोगावरून हवन करवीत, असेंहि दिसतें.

( ४ ) पूजेचें साहित्य फुलें व जल हें असे व हवनाचें साहित्य लाह्या, तूप, लाडू, मोदक, अक्षता, पायस, ( खिचडी ) मुद्गतिलान्न, हें असे. पाण्याने भरलेले कलश हवनाजवळ ठेवीत असत.

( ५ ) वर विष्णूचें पूजन कौसल्येने सकाळींच केलें, असें म्हटलें आहे. त्यावरून स्त्रिया विष्णुपूजा करीत, असें दिसतें.

( ६ ) कौसल्येने हें आपल्या राहत्या महालांतच केलेलें आहे, त्यावरून प्रत्येक घरांत '**देवघर**' असे, असें वाटतें.

कौसल्येने आपल्या वाड्यांत व रामाने आपल्या वाड्यांत पूजा, अर्चा, हवन हें सर्व केलेलें आहे. यावरून यांना स्वतः हीं कृत्यें करतां येण्याइतकें कर्म करण्याचें ज्ञान होतें, असें उघड होतें. विशेष आन्हिक असलें, तर मग ब्राह्मणास बोलवीत व त्यांच्याकडून तें विशेष कृत्य करवीत. किंवा ब्राह्मण पूजा सांगत व कौसल्यादि स्त्रिया पूजा करीत, असेंहि असेल.

वर ( **मन्त्रवत् जुहाव** ) कौसल्येने समंत्रक हवन केलें, असें म्हटलें आहे. यावरील टीका अशा आहेत—

१ **तिलकटीका**- अग्निं अग्निहोत्रं मन्त्रवत् जुहोति स्म ज्येष्ठपत्नीत्वात् ऋत्विजा इति शेषः ॥ १५ ॥

२ **रामायणशिरोमणिटीका**- मंत्रवत् मन्त्रविशिष्टं यथा स्यात् तथा अग्निं जुहोति स्म ॥१५॥

३ **गोविंदराजटीका**- जुहोति हावयति ब्राह्मणैरिति शेषः ।

हे सर्व टीकाकार ती ब्राह्मणांकडून समंत्रक हवन करवीत होती, असें म्हणतात. कौसल्या पट्टराणी असल्याने हिला समंत्रक हवन करवण्याचा अधिकार होता, असें सर्व टीकाकारांनी लिहिलें आहे.

रामाला स्वतः सर्व वैदिक कर्मे समंत्रक करतां येत होतीं. त्याला तीं वसिष्ठांनी शिकविलीं होतीं. चित्रकूटपर्वतावर जेव्हा भरताकडून त्यास दशरथ मेल्याचें समजलें, तेव्हा त्याने स्वतःच तेथल्या जलप्रवाहावर जाऊन त्याची उत्तरक्रिया केल्याचा उल्लेख आहे. ज्यास स्वतः समंत्रक उत्तर क्रिया करतां येते, त्यास पूजा व होमहवन करतां येईल, हें कांही निराळें सांगण्याची आवश्यकता नाही.

## संध्या व हवन.

राम, लक्ष्मण हे प्रवासांत असतां व अयोध्येहून विश्वामित्राच्या आश्रमास जात असतां, न चुकतां सकाळ-संध्याकाळ संध्या करीत होते, असें बालकाण्डावरून दिसतें, तसेंच अयोध्याकाण्डावरूनहि दिसतें. तें पहा—

### प्रातःसंध्या.

**स्नात्वा कृतोदकौ वीरौ जेपतुः परमं जपम् ॥ ३ ॥**
**कृताह्निकौ महावीर्यौ विश्वामित्रं तपोधनम् ॥**
**अभिवाद्यातिसंहृष्टौ गमनायाभितस्थतुः ॥४॥**

(वा. रा बाल. स. २३)

**ततः प्रभाते विमले कृताह्निकमरिंदमौ ॥१॥**

(वा. रा. बाल. स. २४)

**सुप्रभाता निशा राम पूर्वा संध्या प्रवर्तते ।**
**उत्तिष्ठोत्तिष्ठ भद्रं ते गमनायाभिरोचय ॥२॥**
**तच्छ्रुत्वा वचनं तस्य कृतपूर्वाह्णिकक्रियः ॥३॥**

(वा. रा. बाल. स. ३५)

**पूर्वां संध्यां उपासीनो जजाप सुसमाहितः ।**

(वा. रा. अयोध्या. ६।६)

## सायं-संध्या.

**स्नाताश्च कृतजप्याश्च हुतहव्या नरोत्तम ॥१८॥**

( वा. रा. बाल. स. २३ )

हा संध्याकाल प्रहररात्र उलटेपर्यंत असतो, य विषयी पुढील वचन पहा—

**शनैर्विसृज्यते संध्या नभो नेत्रैरिवावृतम् ॥१६॥**

( वा. रा. बाल. स. ३४ )

फार रात्र पडल्यामुळे संध्येचा समय निघून जात आहे, असें येथे म्हटलें आहे. जनकराजाने प्रातःकालीं करावयाचीं संध्यादिक धर्मकृत्यें केलीं, असें पुढील श्लोकांत म्हटलें आहे—

**ततः प्रभाते जनकः कृतकर्मा महर्षिभिः ॥१॥**

(वा. रा. बाल. स. ७०)

या सर्व वचनांत सकाळीं सूर्योदयीं व संध्याकाळीं सूर्यास्तसमयीं नियमपूर्वक संध्या केली जात असे, असें स्पष्ट दिसतें. ही संध्या वैदिक संध्याच होय. क्षत्रिय कुमारांना वेदमंत्रांनी संध्या करण्याचा अधिकार आहेच. या संध्येंत—

( १ ) (**परमं जपं जेपतुः कृतजप्याः**) गायत्री मंत्राचा जप मुख्य होता.

( २ ) ( **कृताह्निकौ** ) आन्हिक असें यास नांव होतें. आन्हिक म्हणजे दरदिवशीं करावयाचें कर्म. ( **कृतकर्मा** )

( ३ ) (**कृतोदकौ**) जलाने तर्पण, मार्जन वगैरे कर्म या वेळीं केलें जात असे.

( ४ ) (**कृतपूर्वाह्णिकक्रियाः**) अगदी सकाळच्या प्रहरीं करावयाचें धर्मकृत्य असें यास म्हटलेलें आहे.

( ५ ) (**हुतहव्याः**) संध्येनंतर हवनही करीत असत, असें यावरून वाटतें.

( ६ ) (**स्नात्वा**) स्नान करूनच हें कर्म केलें जात असे. कदाचित् सायंसंध्येला नेहमी स्नान करीत नसतीलही.

( ७ ) संध्येचा काळ एक प्रहर रात्र होऊन जाईपर्यंत समजला जात असे. कांही अडचणींमुळे कोणास वेळेवर संध्या करतां न आली, तर ती त्याने

एक प्रहरपर्यंत पुढेही करावी, असा नियम असे. ( बाल. ३४।१६ ) संध्या, हवनादि, आन्हिकाचा भाग हा त्रैवर्णिकांना निदान ब्राह्मणक्षत्रियांना तरी शिकवला जात असे असे वाटतें. श्रीरामाला श्रौतस्मार्तसकलधर्मरहस्य जाणणारा असें म्हटलेलें आहे. **'वेदवेदाङ्गतत्त्वज्ञः, सर्वशास्त्रार्थतत्त्वज्ञः'** ही योग्यता श्रीरामाची होती. तेव्हा सर्व श्रौतकर्माची माहिती रामाला होती, हें उघड आहे. आवश्यक कर्मे त्यास स्वतःसुद्धा करतां येत असत.

राम, लक्ष्मण किंवा विश्वामित्र यांनी प्रवासांत **विष्णु नारायण** किंवा **जनार्दन** यांची पूजा केल्याचा उल्लेख नाहीं. तेव्हा प्रवासांत अशा देवतांची पूजा होत नसे, असें दिसतें; पण देवतांच्या प्रार्थना प्रवासांतही केल्या जात.

प्रत्येक घरामध्ये **( देवतायतन )** देवघर असे, त्या देवघरामध्ये **'विष्णु, नारायण, जनार्दन,'** यांच्या मूर्ति असत व त्यांची पूजाअर्चा केली जात असे. प्राणायामपूर्वक ध्यान बायकाही करीत असत. याच देवघरामध्ये हवनकुण्ड असे व त्यांत हवन केलें जात असे. हें हवन महान् देवतेच्या उद्देशाने होत असे व वर लिहिलेली नारायणाची उपासना ही पुरुषसूक्तांत वर्णिलेल्या पुरुषाची उपासना असे. याशिवाय प्रत्येकाची वैयक्तिक उपासना, संध्या, जपजाप्य, वगैरे जें काय आन्हिक असे, तें ज्याचा तो वेळेवर करीत असे. हें सर्व रेशमी वस्त्र नेसून केलें जात असे.

मूर्तींच्या पूजेसाठी फुलें, फुलांच्या माळा वापरल्या जात व चन्दन, सुगंधी उटणीं वगैरे हीं वापरलीं जात असत. याशिवाय आणखी कांही उपासनेचा जर प्रकार असला, तर तो वाल्मीकि रामायणांत शोधला पाहिजे.

## सार्वजनिक देवळें.

उंच उंच शिखरें असलेल्या सार्वजनिक देवळांचा उल्लेख रामायणांत आहे. पहा—

**सिताभ्रशिखराभेषु देवतायतनेषु च ।**
**चतुष्पथेषु रथ्यासु चैत्येषु अट्टालकेषु च ॥**

(वा. रा. अयोध्या. स. ६।११)

'स्वच्छ पांढऱ्या मेघांप्रमाणे चमकणारीं शिखरें ज्यांना आहेत, अशीं (**देवतायतनेषु**) देवालयें अयोध्येंत होतीं. (**चैत्येषु**) उंच देवतास्थानें, धार्मिक पूजास्थानें, मन्दिरें, (**अट्टालक**) तटाला असलेले बुरूज ज्यांमध्ये शत्रूशीं लढावयाचीं साधनें असतात. या ठिकाणीं ध्वजपताका लाऊन शोभा आणावी, अशी राजाज्ञा राज्याभिषेकाच्या पूर्वदिवशीं झालेली होती.

या ठिकाणचा '**चैत्य**' शब्द बौद्ध मंदिराचा वाचक आहे, असें गोविंदराज-टीकेंत म्हटलेलें आहे—

(१) **गोविंदराज-टीका—** चैत्येषु बौद्धालयेषु, अट्टालकेषु प्राकारोपरि युद्धार्थं परिकल्पितचतुःस्तंभमण्डपेषु ।

(२) **रामायणशिरोमणि-टीका—** चैत्येषु चैत्यं चैतन्यमास्ति येषु... ...चैत्येषु बौद्धालयेषु इति गोविन्दाचारिव्याख्यानं तु... त्यक्तव्यम् ॥

(अयो. ६।११)

'चैत्य' याचा अर्थ 'देवालय, उंच शिखराने युक्त असलेलें देवस्थान' असा आहे. बौद्धदेवस्थानाचें हें नांव आहे, असें गोविन्दराज म्हणतात व रामायण-शिरोमणिकार त्यांचें '**हें मत त्याज्य आहे,**' असें म्हणतात. चैत्य शब्दाला बौद्ध मंदिर असा अर्थ पुढील संस्कृतमध्ये आलेला आहे, हें खरें आहे; पण हाच कांही केवळ अर्थ या शब्दाचा होतो, असें खात्रीने म्हणतां येणार नाही. तेव्हा याच शब्दावरून बौद्धांनंतर हा रामायणग्रंथ झाला, असें म्हणणें योग्य होणार नाही. यासंबंधाचीं अन्य प्रमाणें पाहून याचा निर्णय करणें योग्य होईल. याचा ऊहापोह याच लेखांत आजच करण्याचें आम्हांस कारण दिसत नाही.

या देवालयांच्या द्वारांना पांढरा स्वच्छ रंग लावीत असत, असें दिसतें. पहा—

**शुक्लदेवगृहद्वारां** ॥ (वा. रा. अयोध्या. ७।४)

'देवघरांचीं द्वारें पांढरीं रंगविलेलीं असत.' शिखरें मेघांप्रमाणे स्वच्छ असत, हें मागे आलें आहेच. या कालांत कोणत्या देवता मानल्या जात होत्या, तें पुढील वर्णनांत दिसेल. पहा—

**शृण्वन्तु त्रयस्त्रिंशद्देवाः सेन्द्रपुरोगमाः ॥१३॥**
**चन्द्रादित्यौ नभश्चैव ग्रहा राऽयहनी दिशः ।**
**जगच्च पृथिवी चेयं सगन्धर्वाः सराक्षसाः ॥१४॥**
**निशाचराणि भूतानि गृहेषु गृहदेवताः ।**
**यानि चान्यानि भूतानि जानीयुर्भाषितं तव ॥१५॥**

( वा. रा. अयोध्या ११ )

'इन्द्रासह तेहेतीस देवता, चन्द्र सूर्य, आकाश, गृह, रात्र, दिवस, दिशा, जगत्, ही पृथ्वी, गन्धर्व व राक्षसांसह सर्व निशाचर भूतें, घरांतील गृहदेवता व जीं दुसरीं भूतें आहेत, हीं सर्व दशरथ काय बोलत आहे, तें ऐकोत.' असें कैकेयी ओरडून म्हणत आहे.

या ठिकाणीं अनेक देवतांचा उल्लेख आहे; पण हा उल्लेख शास्त्रीय दिसत नाहीं. ३३ देवतांमध्ये चन्द्र, सूर्य, पृथ्वी यांचा समावेश होत असावा; पण येथे असावधानाने त्यांची गणना निराळी केलली आहे. कदाचित् कैकेयीच्या या वेळच्या मनोवृत्तीस साजेसें हें भाषण असेल. पण यांत ( **गृहेषु गृहदेवताः** ) हा उल्लेख महत्त्वाचा आहे. घरोघर घरांत पूजल्या जाणाऱ्या देवता असत, ही गोष्ट यावरून उघड होत आहे. घरांतील देवघरांत याच देवता असत, सार्वजनिक देवळांत सार्वजनिक पूजले जाणारे देव होते. वरील कैकेयीच्या भाषणांत गंधर्व, राक्षस व अन्यान्य भूतांचा उल्लेख आहे; पण यांची पूजा आर्य करीत होते, असें वाटत नाही. भगवद्गीमध्ये—

**यान्ति देवव्रता देवान् पितॄन् यान्ति पितृव्रताः ।**
**भूतानि यान्ति भूतेज्याः यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥**

( भ. गी. ९।२५ )

असें म्हटलें आहे. यांत '**देव, पितर, भूत व भगवान्**' यांची पूजा या वेळीं होती, असें दिसतें; पण यांतील भूत शब्द व वरील भूत शब्द एका अर्थाचा आहे, असें वाटत नाही. दशरथ कैकेयीच्या भाषणाने संतापून कैकेयीस म्हणत आहे—

**स्वर्गेऽपि खलु रामस्य कुशलं दैवतैरहम्।**
**प्रत्यादेशादभिहितं धारयिष्ये कथं बत ॥६॥**

( वा. रा. अयोध्या. स. १२ )

" हे कैकेयी! मी मेल्यानंतर स्वर्गात पोचेन, तेव्हा तेथील देवांनी जर मला विचारलें की, 'राम खुशाल आहे ना?' तर मी त्यांस काय बरें सांगूं?"

या ठिकाणीं स्वर्गातील देवांचा उल्लेख आहे; पण हे देव कांही माणसांनी पूजावयाचे देव नव्हत. जे स्वर्गात जातात, ते सर्वच देव बनतात. हे सर्वच देव कांही मानवांचे उपास्य नव्हेत. यांपैकी कांही उपास्य असतील व कांही नसतील. यापेक्षा या रामायणामध्ये देवतांच्या उपासनेसंबंधी कांही उल्लेख आढळले तर ते बारकाईने पाहिले पाहिजेत. येथपर्यंतचे उल्लेख आलेले आहेत, ते हे आहेत.

## देवपूजेचीं साधनें.

देवपूजेला काय काय वापरीत, याचा विचार फारच महत्त्वाचा आहे. सध्या षोडश उपचार देवाच्या पूजेमध्ये सांगितले आहेत. पाहुणा मनुष्य घरीं आला असतां प्रथम त्याला बसावयाला आसन देतात, पाय धुवावयास पाणी देतात, चार प्रशंसेचे शब्द बोलतात, खावयास व प्यावयास खाद्यपेय देतात, वेळ सकाळची असेल, तर स्नानास पाणी, नंतर वस्त्र, चन्दन देऊन पुष्पहार, तुरे देतात. नंतर भोजन वगैरे होतें, नंतर नाच, निदान गाणें बजावणें करून त्याची करमणूक करतात. नंतर त्यास गाडींत बसवून फिरावयास नेतात. हेच प्रकार रामायण-कालीन पूजेमध्ये असावे, असें वाटतें. हेच षोडशोपचार होत. तेव्हा पूर्वी रामायणकालीं माणसें कशीं परस्परांचा सत्कार करीत व स्वतः कशीं वागत, तें समजलें, म्हणजे देवपूजेमध्ये कोणते उपचार केले जात, तें समजणें शक्य आहे, म्हणून तें आपण पाहूं.

रामाच्या राज्याभिषेकासाठीं जें सामान आगळें होतें, त्यांत आपणांस पूजा-साहित्यासंबंधी कांहीतरी सापडेल, असें वाटतें; म्हणून येथे आता तें साहित्य पाहूं या—

## राज्याभिषेकाचा संभार

राज्याभिषेकाच्या सामानाचें वर्णन अयोध्याकाण्ड सर्ग ३, श्लोक ९ ते १२ पर्यंत आलेलें आहे, त्यांत पुढील वस्तूंचा निर्देश आहे– [ १ ] सुवर्णादि सर्व रत्नें, [ २ ] **(बलीन् = पूजाद्रव्याणि)** पूजेला लागणारीं द्रव्यें, [ ३ ] सर्व औषधि, [ ४ ] पांढरीं फुलें, [ ५ ] लाह्या, [ ६ ] मध, [ ७ ] तूप, [ ८ ] ( **अहतानि वासांसि** ) कोरीं न वापरलेलीं नवीं वस्त्रें, [ ९ ] रथ व सर्व आयुधें, [ १० ] चतुरंग सेना, [ ११ ] सुलक्षणी हत्ती, [ १२ ] चवरी व पंखा, [ १३ ] ध्वज, [ १४ ] पांढरें छत्र, [ १५ ] सोन्याचे शंभर कलश, [ १६ ] सोन्याने मढवलेल्या शिंगांचा बैल, [ १७ ] समग्र अखण्ड व्याघ्रचर्म.

यांत रत्नें, पूजाद्रव्यें, फुलें, मध, तूप, वस्त्रें, छत्र, चामर, व्यजन हें सर्व सत्काराचें साहित्य आहे. हेंच पूजासाहित्य आहे.

यापुढचे आदेशहि पूजेचा विचार करतांना पाहण्यासारखे आहेत—

## द्वारपूजा.

**अन्तःपुरस्य द्वाराणि सर्वस्य नगरस्य च ।**
**चन्दनस्रग्भिरर्च्यन्तां धूपैश्च घ्राणहारिभिः ॥**

( वा. रा. अयोध्या स. ३ । १३ )

" अन्तःपुराचीं सर्व दारें, नगरांतील सर्व द्वारें, चन्दन, पुष्पहार व उत्तम सुगंधित धूप यांनीं सुपूजित करा. "

या वर्णनावरून ' **द्वारपूजा** ' रामायणकालीं केली जात असे, असें स्पष्ट दिसतें. सध्या उत्तरभारतमध्यें द्वारपूजा लुप्त झाल्यासारखी आहे. दक्षिण भारतामध्ये मात्र अजूनही द्वारपूजा आदराने केली जाते. वेदामध्ये ही ' **देवीः-द्वारः** ' ही देवता मानलेली आहे. यांची पूजा चन्दन, फुलें व धूप यांनी केली जात असे. तेव्हा पूजासाहित्यामध्ये चन्दन, फुलें, पुष्पमाला, धूप यांचा समावेश होत होता, हें निर्विवाद आहे.

राज्याभिषेकाच्या साहित्याचें वर्णन पुनः सर्ग १४, श्लो. २६–४१ व सर्ग

१५ श्लो. ४–८ पर्यंत आलेलें आहे. पूर्वी न आलेल्या ज्या वस्तु यांत गणल्या आहेत, त्या तेवढ्या आपण आता पाहूं—

[ १ ] चन्दन, अगुरु व धूप चारही बाजूंना घातले होते, [ २ ] गंगोदकाच्या व समुद्रजलाच्या सोन्याच्या घागरी, [ ३ ] औदुंबराचें आसन, [ ४ ] सर्व प्रकारचीं बीजें, [ ५ ] सुगन्ध, [ ६ ] फुलें, दूध, दहीं, मध, लाह्या, दर्भ, [ ७ ] आठ कन्या, [ ८ ] सिंह, [ ९ ] समिधा, [ १० ] अग्नि. इ०

यांत स्नानासाठीं गंगोदक, समुद्रजल व चन्दन, धूप, आसन, सुगंध ( अत्तरें ) हें सर्व पूजासाहित्यच दिसत आहे. तसेंच स. १५ श्लो. ४–१३ मध्ये नाना नद्यांचें जल व इतर पूर्वी लिहिलेलेच सर्व पदार्थ येथे पुनः सांगितले आहेत. या तीनही ठिकाणच्या वस्तूंतून सोळा उपचार पूजेसाठीं कोणते वापरीत, तें सहज कळूं शकतें.

राज्याभिषेक ही राजाची महापूजाच आहे. दररोजची अल्पशी पूजा करावयाची असतांना आपण थोडेंसें साहित्य जमा करतों, तेथे तें मोठ्या प्रमाणांत जमा केलेलें असतें; पण साहित्य जवळ जवळ एकच असतें, निदान जेवढा पूजेचा भाग आहे, तेवढा दोनही ठिकाणीं सारखाच असतो, हें सहज समजण्यासारखें आहे.

**ध्यान**, **आवाहन** [ बोलावणें ], **आसन**, **पाद्य** [ पाय धुण्यास पाणी ], **अर्घ्य**, **आचमनीय** [ तोंड धुण्यास पाणी, ], **स्नान**, **वस्त्र**, **अलंकार-समर्पण**, **चन्दन**, नाना परिमलद्रव्यें, **पुष्प**, **धूप**, **दीप**, **नैवेद्य--भोजन**, **आरति**, **तांबूल**, **पुष्पांजलि**.-- हार, तुरे, गजरे, अत्तर गुलाब देणें. याबरोबरच **छत्र**, **चामर व्यजन**, **नृत्य**, **वाद्य** आदि राजोपचार समर्पण करणें, हा आदरसत्काराचा कार्यक्रम होता. सध्याही जवळ जवळ तोच आहे. कांहीं उपचार कमी झाले असून, दुसरे कांहीं वाढले आहेत; पण सर्वसाधारण रीति व पद्धति होती तशीच आजही आहे. देवपूजेचा कार्यक्रमहि हाच आहे, हें आपण आतापर्यंत पाहिलें आहे.

## चन्दन लावीत असत.

स्नान झाल्यानंतर चन्दन व शरिरावर उटणें लावण्याचा परिपाठ रामायण-कालीं होता, असें दिसतें पहा—

**वराहरुधिराभेण शुचिना च सुगन्धिना ।**
**अनुलिप्तं परार्ध्येन चन्दनेन परंतपम् ॥ ९ ॥**

( वा. रा. अयोध्या. स. १६ )

' शुद्ध, सुगन्धित, अत्यंत मूल्यवान् **लाल रंगाचें चन्दन** रामानें अंगावर लावलेलें होतें. ' यावरून त्या वेळीं स्नानानंतर चन्दन लावीत असत, असें सिद्ध होतें. देवपूजेमध्येंहि हा एक उपचार यामुळेच आलेला आहे.

रामाच्या अंगावर या वेळीं शिवलेला कपडा नव्हता, हें उघड आहे. शिवलेला कपडा, सदरा, कोट, कुडता वगैरेसारखा कांहीं कपडा त्यानें घातलेला असता तर त्याच्या अंगावरचें चन्दन बाहेरून दिसलें नसतें.

## रस्त्यावर धूप जाळीत.

पुष्कळ गर्दी असेल, त्या वेळीं रस्त्यांवर हवाशुद्धीसाठीं धूप जाळीत असत, असें दिसतें—

**राजमार्गं ययौ रामो मध्येनागुरुधूपितम् ।**
**चन्दनानां च मुख्यानां अगुरूणां च संचयैः ॥ ३ ॥**
**उत्तमानां च गंधानां क्षौमकौशाम्बरस्य च ।**
**आविद्धाभिश्च मुक्ताभिः उत्तमैः स्फाटिकैरपि ॥ ४ ॥**
**शोभमानमसंबाधं तं राजपथमुत्तमम् ।**
**संवृतं विविधैः पुष्पैः भक्ष्यैरुच्चावचैरपि ॥ ५ ॥**

( वा. रा. अयोध्या. स. १७ )

" राजमार्गावर चन्दन, अगुरु यांच्या लाकडांचे ( **संचयैः** ) ढीग जाळीत असत. या सुगंधानें सर्व शहर अगदी दरवळून गेलें होतें. सर्व राजमार्ग फुलें, रेशमी वस्त्रें व इतर वस्तूंनी भरगच्च भरून गेलेला होता. "

रामाने हा असा सुन्दर देखावा पाहिला. रस्त्यावर चन्दनाचीं लाकडें जाळीत असत, असें यावरून वाटतें. शहराची स्वच्छता राखण्यासाठी हें चन्दन जाळीत कीं चवाठ्याची पूजा करण्याच्या वेळीं जाळीत, हें पाहणें येथे इष्ट आहे. पहा—

**ददर्श तं राजपथं दिवि देवपतिर्यथा ॥ ६ ॥**
**दध्यक्षतहविर्लाजैर्धूपैरगुरुचन्दनैः ।**
**नानामाल्योपगन्धैश्च सदाभ्यर्चितचत्वरम् ॥ ७ ॥**

(वा. रा. अयोध्या. स. १७).

"चवाठ्याची पूजा केल्यामुळे ठिकठिकाणीं दही, अक्षता, हवि, लाह्या, धूप, अगुरु, चन्दन व अनेक प्रकारचीं फुलें दिसत होतीं.' अशी चवाठ्यांची पूजा केल्यामुळे तेथे चन्दन, अगुरु यांचे ढीग जळत होते व त्यांचा सुगंध शहरभर पसरला होता.

चवाठ्याची पूजा होत असल्यामुळे चन्दन जाळीत असोत अथवा हवा शुद्ध करण्यासाठी जाळीत असोत, उघड्या जागेंत अयोध्येच्या रस्त्यावर असें चन्दन जाळीत होते व त्या योगाने शहरभर सुवास पसरलेला होता व तो सुवास सर्व लोकांस आनंद देत होता, हें निर्विवाद आहे. ही वेळ म्हणजे सकाळीं सूर्योदयाची वेळ होय. सूर्योदय होऊन घटकाभर अवकाश झाला असेल, या वेळीं इतका घमघमाट होईल, इतकें चन्दन जळलें गेलें होतें. याशिवाय घरोघर जें हवन होत होतें, त्यांतही चन्दनाच्या समिधा असतीलही कदाचित्. अशी ही धार्मिक पद्धति फारच उत्तम आहे. धर्मविधि व हवाशुद्धि यांची कशी उत्तम सांगड येथे घातली होती, तें पहा.

सध्या म्युनिसिपालिट्या गंधक जाळतात व फिनेल टाकतात. त्याची रस्तो-रस्तीं घाण येत असते; पण **रामायणकालीं सकाळीं सूर्योदयापूर्वीच सर्व रस्ते स्वच्छ होत, द्वारपूजा केली जाई, द्वारावर चंदन लावलें जाई, पुष्पमाला टांगल्या जात व धूपही दाराजवळ जाळला जाई व ( चत्वारपूजा ) चवाठ्याची पूजा होऊन तेथे चंदनाचे ढीग जाळले जात.** या दोन जुन्या व नव्या पद्धतींपैकी चांगली कोणती,

तें विचारी लोकांनी ठरवावें.

**देवालयें, देवघरें व देवतोपासनेसंबंधानें** एवढा विचार झाला. यावरून रामायणकालीन धार्मिक व्यवहाराची कल्पना वाचकांस होईल. देवपूजेसंबंधीं आणखीहि थोड्या वचनांचा विचार केला पाहिजे, तो आता करूं—

## देवपूजा

जी स्त्री ( **निवृत्ता देवपूजनात्** । अयोध्या. २४।२७ ) देवपूजा न करतां पतीची सेवा करते, त्या स्त्रीला स्वर्ग मिळतो, इतकें पतिसेवेचें महत्त्व आहे.

**भर्तुः शुश्रूषया नारी लभते स्वर्गमुत्तमम् ।**
**अपि या निर्नमस्कारा निवृत्ता देवपूजनात् ॥**

( रा. अयोध्या. २४।२७ )

येथे स्त्रियांच्या देवपूजेचा उल्लेख आहे. येथलि हें देवपूजन म्हणजे देवांच्या मूर्तींचेंच पूजन होय. तसेंच—

**अग्निकार्येषु च सदा सुमनोभिश्च देवताः ।**
**पूज्यास्त मत्कृते देवि ब्राह्मणाश्चैव सत्कृताः ॥**

( रा. अयोध्या. २४।२९ )

' अग्नीमध्ये हवन करण्याच्या वेळीं उत्तम फुलांनी देवतांचें पूजनही ( मत्कृते ) माझें हित व्हावें, म्हणून कर व ब्राह्मणांचा सत्कार कर. ' या ठिकाणीं फुलांनी देवतांचें पूजन करण्याचा निर्देश आहे व हें पूजन अरण्यांत जाणाऱ्या रामाचें कल्याण व्हावें, यासाठी आहे. कौसल्या पुनः म्हणते—

**येभ्यः प्रणमसे पुत्र देवेष्वायतनेषु च ।**
**ते च त्वामभिरक्षन्तु वने सह महर्षिभिः ॥४॥**

( रा. अयोध्या. २५ )

' हे रामा, ज्या देवांना व देवालयांतील दैवतांना तूं नमस्कार करतोस, ते देव तुझें अरण्यांत संरक्षण करोत.' या कौसल्येच्या भाषणामध्येहि देवालयांतील देवतांना नमन केलें जात होतें, हें सिद्ध होत आहे. कौसल्या आणखीहि म्हणत आहे—

**नृमांसभोजना रौद्रा ये चान्ये सर्वजातियाः ।**
**मा च त्वां हिंसिषुः पुत्र मया संपूजितास्त्विह ॥२०॥**
(रा. अयोध्या. २५)

'नरमांस भक्षण करणाऱ्या ज्या कांही जाति आहेत, त्यांचें पूजन मी येथे करीन. त्या पूजेने संतुष्ट होऊन, त्या तुझें हिंसन करणार नाहीत.'

येथे देवांप्रमाणे हिंसक जातींचेंहि पूजन करण्याचा प्रकार या वेळीं चालू होता कीं काय, अशी शंका येते व या यांच्या पूजनाने या जाति संतुष्ट होतात व त्या संतुष्ट झाल्या, म्हणजे त्या वनांत हिंडणाऱ्या रामाला खाणार नाहीत, ही अपेक्षा येथे या पूजेमध्ये आहे, हेंहि पाहण्यासारखें आहे. जर या हिंसक जीवांची पूजा या वेळीं होत असेल, तर पूजनीय देवतागण फारच मोठा असणें अगदी संभवनीय आहे.

कौसल्येने या वेळीं रामाचें अभीष्ट-चिंतन केलें व या निमित्ताने कित्येक देवतांचा निर्देश केला आहे. त्या देवता येथे पाहणें योग्य आहेत. यांमध्ये या वेळच्या पूजनीय देवता आहेत व इतरही पूज्य वस्तु आहेत.

(रा. अयोध्या २५।७-३० ) समिधा, दर्भ, वेदी, **देवालयें**, स्थण्डिलें, शैल, वृक्ष, झुडुपें, ह्रद, पक्षी, सर्प, सिंह, **साध्य, विश्वेदेव, मरुत्, महर्षि, धाता, विधाता, पूषा, भग, अर्यमा, लोकपाल, इन्द्रप्रमुख देव, सहा ऋतु, महिने, संवत्सर, रात्री, दिवस, मुहूर्त, श्रुति, स्मृति, धर्म, स्कंद, चन्द्र, बृहस्पति, सप्तर्षि, नारद, सिद्ध, दिशा व दिशांचे अधिपति, पर्वत, समुद्र, राजा वरुण, द्युलोक, अन्तरिक्ष, पृथिवी, वायु, नक्षत्रें, ग्रह, अहोरात्र, दोनही संध्याकाल**, कला, काष्ठा, **देव, दैत्य,** हे सर्व तुझें रक्षण करोत. राक्षस, पिशाच, भयंकर क्रूरकर्मे जे कोणी असतील, त्यांपासून तुला भय न होवो. कृमि-कीट-पतंग वगैरेंपासून तुला भय न होवो. कोणापासूनही तुला भय न होवो. **शुक्र, सोम, सूर्य, कुबेर, यम** हे सर्व तुझें रक्षण करोत. **अग्नि, वायु, धूम, मन्त्र, ब्रह्मदेव, ऋषि,** इतर **देव** हे सर्व तुझें संरक्षण करोत. असें म्हणून फुलें, गंध आदि साहित्याने

कौसल्येने या देवगणांचें पूजन केलें. ब्राह्मणाच्या द्वाराने विधिपूर्वक हवन करविलें. तूप, पांढरीं फुलें, समिधा, मोहऱ्या या साहित्याने यथायोग्य विधीने पूजा व हवन करविलें. नंतर बाहेर जाऊन—

**हुतहव्यावशेषेण ब्राह्मं बलिमकल्पयत्।**

(वा. रा. अयोध्या २५।२९)

'शिल्लक राहिलेल्या अवशिष्ट हविर्द्रव्यांनी बलिहरण केलें. मध दही, अक्षता व तूप या साहित्याने हें सर्व कृत्य करून तिने रामाचें स्वस्त्ययन केलें.

या ठिकाणीं पुष्कळच देवतांचा उल्लेख आहे. यांतील बहुतेक मुख्य देवता वैदिक आहेत. यांत **राक्षस, पिशाच** व **सर्प** यांचाही उल्लेख आहे, तो पाहण्यासारखा आहे. सर्पपूजा आपल्यांत अजून आहे व ती नागपंचमीस केली जाते. सर्पाचीं देवालयें आहेत व कित्येक जातींत सर्पाची पूजा अजून प्रचलित आहे, हीच रामायणाच्या वेळीं दिसत आहे. शेवटीं कौसल्या म्हणते—

**मयार्चिता देवगणाः शिवादयो महर्षयो भूतगणाः सुरोरगाः।**
**अभिप्रयातस्य वनं चिराय ते हितानि कांक्षन्तु दिशश्च राघव॥**

(रा. अयोध्या. २५।४३)

'शिव आदि देवगण, महर्षि, भूतगण, सुर, सर्प व दिशा हे सर्व तुझें हित इच्छोत. मी यांची पूजा करून, त्यांना संतुष्ट करीन.'

यानंतर कौसल्येने रामाला प्रदक्षिणा केली व अश्रुपूर्ण नेत्रांनी त्याकडे पाहून, त्यास हातांनी कवटाळून धरलें. रामानेहि आईच्या चरणांवर आपलें मस्तक ठेवलें व तेथून राम सीतेच्या मंदिराकडे निघाला.

या उताऱ्यांत पूजनीय अशा अनेक देवतांचा उल्लेख आहे. या सर्वच देवतांच्या मूर्ति संभवत नाहीत. यांचें कशावर तरी आवाहन करून मग त्यांची पूजा गंध, फूल व अक्षता आदि उपचारांनी होत असावी, असें वाटतें. अर्थात् कांही देवतांच्या मूर्ति होत्या व कांही देवांची पूजा त्यांचे कशावर तरी आवाहन करून होत असावी. सध्याही असेंच पूजन होत असलेलें आपण पाहतों. तोच प्रकार या वेळीं

होता, असें दिसतें. सध्या सुपारीवर देवतांचें आवाहन करून पूजा करतात व किल्येक मूर्तीही आहेत. तसाच हा विधि दिसत आहे.

राम राजवाड्यांत गेला होता. सीता रामाच्या वाड्यांतच होती. रामाला लवकरच राज्याभिषेक होणार, हें ठरलेंलेंच होतें. अशा वेळीं सीतेने रामाचें यशश्चिंतन करण्यासाठी देवपूजन केल्याचा उल्लेख आहे—

**देवकार्यं स्म सा कृत्वा कृतज्ञा हृतचेतना ।**
**अभिज्ञा राजधर्माणां राजपुत्री प्रतीक्षती ॥**

(रा. अयोध्या. २६ । ४)

' सीतेने त्या वेळीं देवपूजन केलें व त्यामुळे ती आनंदित झालेली होती. ' सीतेचें स्नान प्रातःकालींच झालें होतें. रामाबरोबर तिनेहि देवपूजा सकाळींच केली असली पाहिजे. त्यानंतर तास दोन तासांनी पुनः हें देवकार्य केलें, असा येथे उल्लेख आहे. याचा अर्थ असा दिसतो की, सीतेने पतीचें राज्याभिषेचन निर्विघ्न व्हावें, म्हणून या वेळीं तिने पुनः आपल्या वाड्यांतील देवतेला फुलें किंवा पुष्पहार घातले. देवपूजा झाल्यानंतर अशा रीतीने पुनः पुष्पहार अर्पण करण्याची चाल अजूनही आहे. या वचनांत सीता ही ( **राजधर्माणां अभिज्ञा राजपुत्री** ) राजकारणांतील गुंतागुंत जाणणारी होती, असें म्हटलें आहे. यावरून सीतेलाहि या राज्याभिषेकांत कांहीतरी विघ्न होईल, असें वाटत असावें व हें विघ्न दूर व्हावें, म्हणून पुनः देवाची पूजा करून तिने प्रार्थना केली असावी. असो. या उल्लेखावरून मुख्य पूजा झाल्यानंतर अशा उपपूजा होत असत, असें स्पष्ट दिसतें.

रामाचें वनवासांत जाण्याचें ठरलें, तेव्हा सीतेचा निरोप घेतल्यानंतर आपण गेल्यानंतर सीतेने मागें कसें वागावें, हें तिला राम समजावीत असतांना, सकाळीं देवपूजा कर, असें सांगण्यास तो चुकला नाही; पहा—

**कल्यमुत्थाय देवानां कृत्वा पूजां यथाविधि ।**
**वन्दितव्यो दशरथः पिता मम जनेश्वरः ॥ ३० ॥**

( वा. रा. अयोध्या. २६ )

' सकाळीं ऊठ, यथाविधि देवांची पूजा कर व राजादशरथाला वन्दन कर. प्रातःकालीं उठून स्नान करून देवपूजा करण्याचा हा परिपाठ दिसतो. राजवाड्यांतील सुनांना ही पूजा करावी लागे, मग इतर सरदार व ब्राह्मण वगैरेंच्या मुली व मुलगे आप-आपल्या घरीं देवपूजा करीत असत, हें काय सांगावयास पाहिजे ?

## अतिथिपूजा.

सीतेने मीहि वनांत येतें, असें रामास सांगितलें, तेव्हा वनवासांत कसें वागावें लागतें, तें राम तिला समजावितांना म्हणतो-

**देवतानां पितृणां च कर्तव्यं विधिपूर्वकम् ।**
**प्राप्तानामतिथीनां च नित्यशः प्रतिपूजनम् ॥ १४ ॥**
**कार्यस्त्रिरभिषेकश्च काले काले च नित्यशः ।**
**उपहारश्च कर्तव्यः कुसुमैः स्वयमाहृतैः ॥ १५ ॥**

( रा. अयोध्या. २८ )

' देव, पितर व अतिथी यांचें विधिपूर्वक पूजन दररोज केलें पाहिजे व त्रिकाल स्नानही केलें पाहिजे. ' अर्थात् वनवासांतही देवपूजा, पितृपूजा व अतिथिपूजा करणें आवश्यक होतें. स्वतः आपल्या हातांनी आणलेल्या फुलांनी ही **( उपहारः )** पूजा करावयाची असते, हें यांत विशेष आहे.

## नगर-रक्षक देवता.

कोसलदेशाच्या बाहेर जेव्हा राम पडला, तेव्हा तो अयोध्येच्या संरक्षक देवतांची प्रार्थना करतो. ती प्रार्थना देवपूजेच्या दृष्टीने पाहण्यासारखी आहे—

**अयोध्यामुन्मुखो धीमान्प्राञ्जलिर्वाक्यमब्रवीत् ॥ १ ॥**
**आपृच्छे त्वां पुरिश्रेष्ठे काकुत्स्थपरिपालिते ।**
**दैवतानि च यानि त्वां पालयन्त्यावसन्ति च ॥ २ ॥**
**निवृत्तवनवासस्त्वामनृणो जगतीपतेः ।**
**पुनर्द्रक्ष्यामि मात्रा च पित्रा च सह संगतः ॥ ३ ॥**

( रा. अयोध्या. ५० )

' अयोध्येकडे तोंड करून हात जोडून बुद्धिमान् राम म्हणाला– हे श्रेष्ठ अयोध्ये ! तुझा मी आता निरोप घेत आहें. ज्या देवता तुझें पालन करीत आहेत व ज्या तुझ्यांत रहात आहेत, त्यांनाही मी विचारीत आहें. वनवास पूर्ण करून पित्याच्या ऋणांतून मुक्त होऊन मी पुनः येथे येईन, तेव्हा मातापित्याचें दर्शन घेईन व तुमचेंही दर्शन घेईन. '

यामध्ये नगराची अधिष्ठात्री देवता असल्याचा उल्लेख आहे. प्रत्येक गाव व नगर यांची एक एक देवता रक्षक म्हणून मानली जात असावी, असें येथे दिसतें. सध्याही हिंदुस्थानांतील दरएक गावाची एक ' **ग्रामदेवता** ' मानली जात आहे. आजही ग्रामदेवता व स्थानदेवता प्रत्येक गावांत आहेत.

## गंगेची प्रार्थना.

**राघवोऽपि महातेजा नावमारुह्य तां ततः ।**
**ब्रह्मवत् क्षत्रवच्चैव जजाप हितमात्मनः ॥ ७८ ॥**
**आचम्य च यथाशास्त्रं नदीं तां सह सीतया ।**
**प्रणमत् प्रतिसंतुष्टो लक्ष्मणश्च महारथः ॥ ७९ ॥**
**मध्यं तु समनुप्राप्य भागीरथ्यास्त्वनिंदिता ।**
**वैदेही प्राञ्जलिर्भूत्वा तां नदीमिदमब्रवीत् ॥ ८२ ॥**
**ततस्त्वां देवि सुभगे क्षेमेण पुनरागता ।**
**यक्ष्ये प्रमुदिता गंगे सर्वकामसमृद्धिनी ॥ ८५ ॥**
**गवां शतसहस्त्रं च वस्त्राण्यन्नं च पेशलम् ।**
**ब्राह्मणेभ्यः प्रदास्यामि तव प्रियचिकीर्षया ॥ ८८ ॥**
**सुराघटसहस्रेण मांसभूतौदनेन च ।**
**यक्ष्ये त्वां प्रीयतां देवि पुरीं पुनरुपागता ॥ ८९ ॥**
**यानि त्वत्तीरवासीनि दैवतानि च संति हि ।**
**तानि सर्वाणि यक्ष्यामि तीर्थान्यायतनानि च ॥ ९० ॥**

(रा. अयोध्या. ५२)

' महातेजस्वी राम नौकेवर चढला व नौका चालू लागली, तेव्हा रामाने ब्राह्मण-

क्षत्रियांनी जपण्यास योग्य असे मंत्र जपावयास प्रारंभ केला. आचमन करून यथाशास्त्र त्यांनी त्या नदीला नमन केलें. जेव्हा नौका गंगानदीच्या मध्यभागीं गेली, तेव्हा सीतेने हात जोडून त्या गंगा नदीची प्रार्थना केली. हे देवि ! जेव्हा आम्हां सुखरूप वनवासांतून पुनः परत येऊं, त्या वेळीं हजार गाई, अनेक वस्त्रें व उत्तम अन्न तुला संतुष्ट करण्यासाठीं ब्राह्मणांना देईन. सुराघटसहस्र व मांसौदन यांनीं तुझें यजन करीन. तुझ्या तीरावर जीं दैवतें, तीर्थे व देवालयें आहेत, त्या सर्वांचें यजनपूजन मी करीन. '

ही प्रार्थना गंगेची सीतेने केली आहे. रामाने गंगेला नमन केलें आहे व देवतांची पूजा करण्याचा संकल्प केला आहे. यावरून देवपूजेसंबंधाच्या चालीरीतीं-वर पुष्कळच प्रकाश पडतो.

ग्रामदेवता, स्थानदेवता, गृहदेवता, वास्तुदेवता अशा या अनेक देवता उपास्य-स्वरूपाने येथे दिसत आहेत. अनेक वैदिक देवतांचीहि उपासना, निदान प्रार्थना तरी येथे स्पष्ट आहे. नारायण, जनार्दन यांच्या मूर्ति असल्याचाही उल्लेख आहे व बहुतेक सध्याप्रमाणेच गंध, माल्य, अक्षता, धूप आदि उपचारांप्रमाणेचं या प्राचीन कालींहि पूजा होत होती, असें दिसतें.

आता वरील श्लोकांतील ८९ व्या श्लोकांसंबंधाने थोडासा विशेष विचार करणें आवश्यक आहे. याचा उघड अर्थ दिसतो, तो असा आहे— ' हजार मद्याच्या घागरी, मांसमिश्रित भात, यांनी गंगेची पूजा करीत, ' असें सीतेने म्हटलें असावें, असें दिसतें. या शब्दांचा असा अर्थ दिसतो. कित्येक टीकाकारांनी असाच मानला-ही आहे; पण **रामायणशिरोमणि**- टीकाकार याचा असा अर्थ करितात—

> गङ्गापूजनसामग्रीं बोधयन्ती आह । **सुरेति** । पुरीं पुनः उपगता प्राप्ता अहं **सुराघटसहस्रेण** सुरेषु देवेषु न घटन्ते न सन्तीत्यर्थः तेषां सहस्रं तेन सहस्रसंख्याकसुरदुर्लभपदार्थैनेत्यर्थः । **मांसभूतौदनेन** मा नास्ति अंसो राजभागो यस्यां सा एव भूः पृथ्वी च उतं वस्त्रं च ओदनं च एतेषां समाहारः तेन त्वां यक्ष्ये ॥८९॥

' ( सुर ) देवांमध्ये ( अघट ) न मिळणाऱ्या अशा अप्रतीम सहस्रो पदार्थांनी व ( मा-अंस-भू ) ज्या भूमीवर राजाचा कर नाहीं, अशी भूमि, [ उतं ]

वस्त्र व [ ओदनः ] भात यांनी मिळून तुझी पूजा करीन, म्हणजे या वस्तूचें तुझ्या साठी समर्पण करीन. ' हा अर्थ व्याकरणशुद्ध असला तरी ओढाताणीचा दिसतो. कदाचित् हा श्लोक ' कूटश्लोक ' मानला, तरच असा अर्थ करतां येईल. रामायणांत असे कूट श्लोक आहेत कीं काय, तेंहि पाहिलें पाहिजे. कित्येक या श्लोकास प्रक्षिप्त समजतील. हा श्लोक मध्ये नसला, तरी मागच्या पुढच्या श्लोकांची संगति उत्तम लागते.

या अर्थासंबंधी जरी कांही मतभेद असले, तरी त्यांचा संबंध आपल्या प्रस्तुत विषयाशीं नाही. प्रस्तुत विषय देवपूजा हा आहे व तो या वचनांवरून सिद्ध होत आहे. देवपूजेचीं साधनें कांहीहि असोत, तो प्रश्न स्वतंत्र आहे; पण मूर्तिपूजा या ठिकाणीं वर्णिली आहे, हें सत्य आहे.

दशरथ वारल्यानंतर भरत अयोध्येंत येत असतांना त्याला अयोध्येच्या देवळांची जी उदास स्थिति दिसली, ती त्याने अशी वर्णिली आहे —

**देवतागाराणि शून्यानि न भान्तीह यथा पुरा ।**
**देवतार्चाः प्रविद्धाश्च यज्ञगोष्ठास्तथैव च ॥ ४० ॥**
**माल्यापणेषु राजन्ते नाद्य पण्यानि वा तथा ।**
**देवतायतनचैत्येषु दीनाः पक्षिमृगास्तथा ॥ ४२ ॥**

( रा. अयोध्या. ७१ )

भरत म्हणतो-- ' देवालयें अगदी शून्य दिसत आहेत, पूर्वीप्रमाणे गजबजलेलीं दिसत नाहीत. देवतांच्या पूजांमध्ये विघ्न झाल्याचें दिसत आहे. फुलांचे बाजार पूर्वीप्रमाणे भरलेले दिसत नाहीत. देवालयें व चैत्यस्थानें यांत पक्षी व पशु हिंडत आहेत व सर्वत्र दीनता व उदासीनता दिसत आहे. ' भरताला दशरथ राजा वारल्याचें वृत्त माहीत नव्हतें. राजाचें शव अन्त्य संस्कारा-शिवाय राजवाड्यांत होतें, म्हणून नेहमीप्रमाणे गजबजलेल्या पूजा देवळांत होत नव्हत्या, पूजेअर्चेसंबंधाची ही पद्धतिहि येथे या वर्णनावरून ध्यानांत येते.

भरत रामाला आणण्यासाठी चित्रकूटावर गेला, त्या वेळीं राम भरताला राज्य-कारभारासंबंधीं प्रश्न विचारतांना देवालयांची स्थिति कशी आहे, तें विचारण्यास

विसरत नाही. ( देवस्थानैः उपशोभितः कच्चित्। अयोध्या. १००।४२ )

**कच्चिद् गुरूंश्च वृद्धांश्च तापसान् देवतातिथीन्।**
**चैत्यांश्च सर्वान् सिद्धार्थान् ब्राह्मणांश्च नमस्यसि ॥ ६१ ॥**

( रा. अयोध्या.१०० )

' गुरु, वृद्ध, तापसी, देवता, अतिथी, चैत्य, सिद्धार्थ, ब्राह्मण यांना नमस्कार करतोस ना ? '

असा प्रश्न विचारून, ' राजाने देवतांना नमन करावें, ' असें सुचविलें आहे. यावरून देवपूजा महत्त्वाची मानली जात होती, यांत संशय नाहीं. पुढे राम सीतेसह अगस्त्य ऋषीच्या आश्रमांत गेला, तेव्हा त्या आश्रमांत रामानें अनेक देवतांचीं स्थानें पाहिलीं. तीं आता पहा—

## अगस्ति आश्रमांतील देवस्थानें.

**स तत्र ब्रह्मणः स्थानं, अग्नेः स्थानं तथैव च।**
**विष्णोः स्थानं, महेन्द्रस्य स्थानं, चैव विवस्वतः ॥१७॥**
**सोमस्थानं, भगस्थानं, स्थानं कौबेरमेव च।**
**धातुर्विधातुः स्थाने च वायोः स्थानं तथैव च ॥१८॥**
**नागराजस्य च स्थानं, अनन्तस्य महात्मनः।**
**स्थानं तथैव गायत्र्या, वसूनां स्थानमेव च ॥१९॥**
**स्थानं च पाशहस्तस्य वरुणस्य महात्मनः।**
**कार्तिकेयस्य च स्थानं, धर्मस्थानं च पश्यति ॥२०॥**

( रा. अरण्य. १२ )

' राम, लक्ष्मण व सीता यांनी त्या अगस्त्याच्या आश्रमामध्ये पुढील देवतांचीं निरनिराळीं स्थानें पाहिलीं— ब्रह्मा, अग्नि, विष्णु, महेन्द्र, विवस्वान्, सोम, भग, कुबेर, धाता, विधाता, वायु, नागराज, अनन्त, गायत्री, वसु, पाशहस्त, वरुण, कार्तिकेय व यमधर्म यांचीं निरनिराळीं स्थानें त्यांनी पाहिलीं. '

यांच्या मूर्ति असोत व अन्य कांही चिन्हें असोत; पण इतक्या देवतांचीं चिन्हें येथे निरनिराळीं होतीं, हें मात्र निर्विवाद आहे. तसेंच हीं सर्व उपासनेसाठीच

होतीं, यांतही शंका नाही.

ऋषींच्या आश्रमांत कोणत्या देवतांची उपासना होत असे, हें या वचनांवरून स्पष्ट होत आहे. यांपैकीं **अग्नीचें** हवनकुण्ड असेल व '**गायत्री**' चें काय चिन्ह असेल, तें कांहीं सांगतां येत नाही. या बहुतेक वैदिक देवता आहेत; पण यांत नाग, अनंत हे सर्पही आहेत. जे लोक सर्पजातीला अनार्य मानतात, त्यांनी या वचनाचा विचार विशेष करावा. हा नाग या ऋषींचा उपास्य म्हणून येथे दिसत आहे. ही सर्पपूजा ऋषींच्या आश्रमांतही आहे, हें पाहण्यासारखें आहे.

## रावणाची शिवलिंगपूजा.

रावण मोठा शिवभक्त होता व तो पार्थिव लिंगाची पूजा नित्य करीत असे, याविषयी उत्तरकाण्डांत पुढील मजकूर आहे--

**पुष्पोपहारं शनकैः करिष्यामि कपर्दिनः ।**
**रावणेनैवमुक्तास्तु प्रहस्तशुकसारणाः ॥३४॥**
**समहोदरधूम्राक्षा नर्मदां विजगाहिरे ॥३५॥**
**उत्तीर्य पुष्पाण्याजन्हुर्बल्यर्थं रावणस्य तु ।**
**राक्षसैस्तु मुहूर्तेन कृतः पुष्पमयो गिरिः ॥**
**पुष्पेषूपहृतेष्वेवं रावणो राक्षसेश्वरः ॥३८॥**
**अवतीर्णो नदीं स्नातुं गंगामिव महागजः ।**
**तत्र स्नात्वा च विधिवज्जप्त्वा जप्यमनुत्तमम् ॥३९॥**
**वालुकावेदिमध्ये तु तल्लिंगं स्थाप्य रावणः ।**
**अर्चयामास गन्धैश्च पुष्पैश्चामृतगन्धिभिः ॥४३॥**
**समर्चयित्वा स निशाचरो जगौ**
**प्रसार्य हस्तान् प्रणनर्त चाग्रतः ॥४४॥**

( रा. उत्तर. ३१ )

' आता शंकराची पूजा करतों, असें रावण बोलला. नंतर प्रहस्त, शुक, सारण महोदर, धूम्राक्ष हे राक्षस नर्मदेमध्ये स्नान करण्यासाठी उतरले. त्यांनी स्नान केलें, फुलें आणलीं व त्यांची मोठी रास केली, नंतर रावण नदींत उतरला. स्नान करून

धौत वस्त्र नेसून त्याने उत्तम मंत्राचा जप केला. वाळूमध्ये शिवलिंगाची स्थापना करून त्याने त्याची गंध, पुष्पांनी पूजा केली. नंतर ( **जगौ** ) सामगान केलें व हातवारे करून त्या देवापुढे नृत्यही केलें.'

गायन व नृत्य हीं देवपूजेमध्ये पूजेचीं अंगें म्हणून केलीं जात, असें या वचनांवरून दिसतें. असो. श्रीरामचन्द्राने आपलें उपास्य दैवत बिभीषणाला दिल्याचा उल्लेख आहे. पहा--

**किंचान्यद्वक्तुमिच्छामि राक्षसेन्द्र महाबल।**
**आराधय जगन्नाथं इक्ष्वाकुकुलदैवतम्** ॥२७॥
**तथेति प्रतिजग्राह रामवाक्यं बिभीषणः।**

( रा. उत्तर. १०८ )

याविषयीं पद्मपुराणांत असें वचन आहे---

**इत्युक्त्वा प्रददौ तस्मै स्वविश्लेषासहिष्णवे।**
**श्रीरंगशायिनं स्वार्चां इक्ष्वाकुकुलदैवतम्।**
**रङ्गं विमानमादाय लङ्कां प्रायाद्बिभीषणः॥**

(.पद्मपुराण )

राम बिभीषणाला म्हणाला कीं, 'हे बलवान् राक्षस राजा! इक्ष्वाकुकुलाचें दैवत जगन्नाथ आहे. त्याची तूं आराधना कर.' हें ऐकून त्याने 'बरें आहे' असें म्हणून ती उपासना त्याने स्वीकारली. पद्मपुराणांत '**शेषशायी श्रीरंग**' या देवतेची उपासना दिली, असें म्हटलें आहे. यांत राक्षसांना आर्य हे आपल्या उपासना देत व आपणाजवळ आणीत असत, असें दिसतें; पण उत्तरकाण्डांतील हा दीड श्लोक प्रक्षिप्त असल्याचें टीकाकार म्हणत आहेत पहा---

( तिलकटीका--- ) इदं सार्धश्लोकद्वयं प्रक्षिप्तमित्यन्ये। २७-२८ ॥

'हे अडीच श्लोक प्रक्षिप्त आहेत, असें कांहींचें म्हणणें आहे.' तिलकटीकेमध्ये हें दुसऱ्याचें मत म्हणून दिलें आहे. हे श्लोक सर्व टीकाकारांना प्रक्षिप्त वाटत नाहींत व स्वतः तिलक-टीकाकारहि यांस प्रक्षिप्त मानीत नाही. दुसरे कोणी प्रक्षिप्त मानतात, असें तो म्हणत आहे.

पूर्वी कौसल्या व राम ज्या देवांची उपासना करीत असल्याचें अयोध्याकाण्ड ( स. ४ । ३१-३४ व ६ । १-७ ) मध्ये वर्णन आहे. ती हीच उपासना होय. राक्षस हे शंकराची उपासना, किंवा लिंगाची उपासना करीत असत. रामाच्या घराण्यांत नारायण, जनार्दन, मधुसूदन, जगन्नाथ यांची म्हणजे विष्णूची उपासना चालू होती. शंकरोपासक बिभीषणाला रामाने आपली विष्णूची उपासना करावयास लावलें, हा येथे भाव आहे. हे श्लोक प्राक्षिप्त ठरले, तर हा मजकूर अमाननीय ठरेल; तथापि पूर्वी दिलेले इतके उल्लेख आहेत की, त्यांवरून मूर्तिपूजा रामायण लिहिलें त्या काळीं मान्य होती, हें निर्विवाद ठरतें. रामायणामध्ये वैदिक देवतांचा पुष्कळच उल्लेख आहे व त्याबरोबरच जनार्दन आदि अनेक देवतांचाहि आहे. वैदिक उपासनेनंतरचा हा काल असावा, असें यावरून दिसत आहे. असो. याप्रमाणे मूर्तिपूजेसंबंधी रामायणामध्ये उल्लेख आहेत. त्यावरून या कालीं मूर्तिपूजा होती, हें उघड होतें.

राम, लक्ष्मण, सीता, कौसल्या आदि भारतीय आर्य मूर्तिपूजा करीत असत, त्याचप्रमाणे लंकेंतील राक्षसही मूर्तिपूजा करीत, यासंबंधींचीं प्रमाणें या पूर्वीच्या लेखांत आलीं आहेत; पण वानर मूर्तिपूजा करीत असत कीं काय, यासंबंधी प्रमाण अजून सापडलेलें नाहीं. तें कोणास सापडलें असेल, तर तें त्यांनी पुढे आणावें.

याप्रमाणे रामायणांतील मूर्तिपूजेसंबंधी मिळत असलेल्या प्रमाणांचा विचार झाला. आता प्रदक्षिणेच्यासंबंधीचा विचार करूं. उपास्याला, पूज्याला प्रदक्षिणा करण्याचा परिपाठ पूर्वापार आहे, असें दिसतें. देवपूजेमध्ये '**प्रदक्षिणा**' हा एक उपचार आहे, त्यासंबंधी रामायणांत काय सांपडतें तें पाहूं या-

## प्रदक्षिणा.

आई, बाप, वडील माणसें, गुरु, अतिथि अथवा ज्यांचा सत्कार करावयाचा असेल, त्यांना प्रदक्षिणा केली जात असे. पवित्र वृक्ष, देवालयें, देवांच्या मूर्ति व पूजासाहित्य यांस प्रदक्षिणा करून जाण्याचा परिपाठ होता. पहा-

**चतुष्पथान् देवपथान् चैत्यान् चायतनानि च ।**

**प्रदक्षिणं परिहरञ्जगाम नृपतेः सुतः ॥ १७ ॥**

( रा. अयोध्या. १७ )

'चवाठे, देवालयाकडे जाण्याचे मार्ग, चैत्य व देवालयें यांना प्रदक्षिणा करून राजपुत्र चालला.' येथे यांना प्रदक्षिणा करण्याचा उल्लेख आहे.

ज्या वेळीं वनांत जावयाचें ठरलें, तेव्हा रामाने कैकेयीस प्रदक्षिणा केल्याचा उल्लेख आहे—

**वन्दित्वा चरणौ राज्ञो विसंज्ञस्य पितुस्तदा ।**
**कैकेय्याश्चाप्यनार्याया निष्पपात महाद्युतिः ॥ २८ ॥**
**स रामः पितरं कृत्वा कैकेयीं च प्रदक्षिणम् ॥ २९ ॥**

( रा. अयोध्या. १९ )

'वनांत जावयाचें ठरतांच रामाने राजा दशरथाच्या चरणांला वन्दन केलें, अनार्य कैकेयीच्या चरणावरहि मस्तक ठेवलें व वडिलांस व कैकेयीस प्रदक्षिणा घातली' व तेथून निघाला. या वेळीं आपल्या अभिषेकासाठीं जमवलेल्या साहित्यालासुद्धा त्याने प्रदक्षिणा घातली आहे—

**अभिषेचनिकं भाण्डं कृत्वा रामः प्रदक्षिणम् ।**
**शनैर्जगाम सापेक्षो दृष्टिं तत्राविचालयन् ॥ ३१ ॥**

( रा. अयोध्या. १९ )

'अभिषेकासाठीं जुळविलेल्या सर्व सामग्रीलाही त्याने प्रदक्षिणा केली.' यावरून सर्वांविषयी किती पूज्य भाव यांच्या अन्तःकरणांत वसत असे, याची जाणीव होते. पुढे राम आपल्या आईच्या महालांत गेला, तिला सर्व वृत्तांत त्याने सांगितला व तिचा निरोप घेतला, त्या वेळींहि रामाने कौसल्येस प्रदक्षिणा केलेली आहे—

**चकार तां हृदि जननीं प्रदक्षिणम् ॥ ६४ ॥**

(रा. अयोध्या. २१)

'मातेला प्रदक्षिणा करून रामाने वनांत जाण्याचा निश्चय केला.' कौसल्येने रामाचें स्वस्त्ययन केलें, होमहवन व देवपूजन करून रामाचें अभीष्टचिंतन केलें,

व शेवटीं त्यास निरोप देण्याच्या पूर्वी त्याची प्रदक्षिणाही केली, पहा—

**प्रदक्षिणं चापि चकार राघवं ।**
**तया हि देव्या च कृतप्रदक्षिणः ॥**

(रा. अयोध्या. २५ । ४४–४५)

कौसल्येने रामाला प्रदक्षिणा केली. याप्रमाणें तिने प्रदक्षिणा केल्यानंतर रामाने तिचे चरण धरले व आज्ञा घेतली.

आईने मुलाला प्रदक्षिणा घातल्याचा येथे उल्लेख आहे. थोरांनी लहानास प्रदक्षिणा घातल्याचा हा उल्लेख महत्त्वाचा आहे. बहुधा लहानांनी मोठ्यांना प्रदक्षिणा घालण्याचा प्रघात आहे. प्रेमातिशयामुळे या वेळीं कौसल्येने रामाला प्रदक्षिणा घातलेली असावी. नेहमीचा हा प्रघात दिसत नाही. अस्वाभाविक बिकट प्रसंगींचा हा प्रघात असेल. रामाविषयी जो आदर कौसल्येच्या मनांत होता, तो येथे या रीतीने व्यक्त झाला आहे.

प्रदक्षिणा करणें हा एक पूजेचा उपचार आहे व तो सध्या पूजेमध्ये केला जातो. तो रामायणकालीं होता, हें यावरून दिसतें.

'**प्रदक्षिणा**' ही एक शिस्त आहे. सन्मान्याला उजव्या हाताला ठेवून आपण डाव्या बाजूने जाणें, ही सन्मान करण्याची एक पद्धति आहे. (Keep **to the left**) डाव्या बाजूने जा हा रस्त्यावरून चालण्याचा नियम व प्रदक्षिणेने जाणें याचा अर्थ अगदी एक आहे. प्रदक्षिणा ही पूर्णपणें चारही बाजूंनी फिरूनच केली पाहिजे, असें नाही. आपण डावीकडून गेलें व दुसऱ्यास उजवीकडून जाण्यास मार्ग दिला, म्हणजे प्रदक्षिणा झाली. रस्त्यावर पवित्र वृक्ष, पवित्र स्थानें व देवळें आलीं असतां शक्य असेल तेथे त्यांना उजवीकडे ठेवून आपण डावीकडून जाणें, हा त्यांचा सन्मान होय. कित्येक वेळीं असें करणें शक्य नसतें, तो निरुपाय आहे. श्रीरामचंद्र जेव्हा राज्याभिषेकाच्या पूर्वी राजवाड्यांत गेला, तेव्हा अशा पवित्र स्थानांस उजवीकडे ठेऊन गेला, प्रदक्षिणा करून गेला, असा उल्लेख वर आलेला आहे. त्याचा हा अर्थ आहे.

पूजेचा विचार करतांना प्रदक्षिणेचा जेवढा आवश्यक विचार करणें योग्य

तेवढा येथे केला आहे. यावरून ही प्रदक्षिणेची चाल रामायणकालीं होती, असें सिद्ध होत आहे.

वर पूजेचा विचार करतांना पूज्य वस्तूंमध्ये गंगा आदि नद्या, अश्वत्थ आदि वृक्ष, पर्वत आदींचा अन्तर्भाव झालेला दिसत आहे. सध्या नद्या वृक्ष, पर्वत, यांना जड समजण्यांत येत असल्यामुळे त्यांच्यांत पूज्यभाव कांहीं नाहीं, असें प्रतिपादन करण्याकडे शिक्षितांचा कल दिसत आहे. यासाठीं यासंबंधीं थोडेंसें येथे विवरण करणें उचित आहे, असें वाटतें.

रामायणकालीं ज्या उपासना आपण पाहिल्या, त्यांत वैदिक देवतांची बहुसंख्या आहे, अर्थात् यावरून या रामायणकालीं सध्याप्रमाणे वैदिक धर्माचा लोप झालेला नव्हता, हें उघड होतें. वेदामध्ये या संबंधाने कांहीं निर्णायक मन्त्र आहेत, तेहि येथे वाचकांनी पहावे—

**१ इन्द्रो मायाभिः पुरुरूप ईयते ॥** ( ऋ. ६।४७।१८ )

**२ पुरुष एव इदं सर्वं यद्भूतं यच्च भव्यम् ।** ( ऋ. १०।९०।२ )
(वा. य. ३१।२)

**३ तदेवाग्निस्तदादित्यस्तद्वायुस्तदु चन्द्रमाः ।**
**तदेव शुक्रं तद्ब्रह्म ता आपः स प्रजापतिः ।**
( वा. य. ३२ )

[ १ ] ( इन्द्रः ) ईश्वर आपल्या ( मायाभिः ) शक्तींनी अनेक रूपें धारण करून गति करतो. [ २ ] ( पुरुषः ) ईश्वरच हें सर्व आहे, जें ( भूतं ) पूर्वी झालें व ( भव्यं ) जें पुढे होणार आहे व जें या वेळीं समोर आहे. [ ३ ] तें ( तत् ) ब्रह्म च अग्नि, सूर्य, वायु, चन्द्रमा, शुक्र, ब्रह्म, ( आपः ) जल व तोच प्रजापति आहे.

याप्रमाणे सर्व विश्व हें ईश्वराचें ' विश्वरूप ' आहे, ही कल्पना वेदाची मूळची होय. तीच भगवद्गीतेने आपल्या अकराव्या अध्यायामध्ये विस्तारली. ईश्वर विश्वरूप आहे, हें एकदा ठरलें म्हणजे ( **वृक्षवनस्पतयो लोमानि** ) वृक्ष व वनस्पति हे ईश्वराच्या शरिरावरील केश, [ **नद्यः धमनयः** ] सर्व नद्या या ईश्वराच्या शरीरांतील शिरा, नाड्या व धमन्या होत, [ **अन्तरिक्षं**

**उदरं** ] अन्तरिक्ष हें त्याचें पोट असून, इतर विश्वांतर्गत पदार्थ हे त्याचे इतर अवयव आहेत, हें स्पष्ट होतें.

ही वैदिक दृष्टि ज्यांना असते, त्यांना वृक्ष, नद्या, पर्वत यांकडे पाहून हीं ईश्वराचीं रूपें आहेत, असेंच त्यांस वाटणें स्वाभाविक आहे. यासंबंधी विकल्पाची दृष्टि त्यांच्यांत उद्भवणेंच शक्य नाही. गंगानदी पाहिल्यानंतर राम व सीता यांनी जे उद्गार काढले आहेत, त्यांवरून त्यांच्या मनांत ही " **ईश्वराची विभूति** ' आहे, याबद्दल कांहीएक शंका नव्हती, हें स्पष्ट आहे. गंगा नदी ही ईश्वराची विभूति मानली तरच वरील उद्गार, जे सीतेच्या व रामाच्या तोंडीं आहेत ते, अन्वर्थक होऊं शकतात. वर दिलेल्या सर्व उपास्यांकडे पाहण्याची हीच पवित्र दृष्टि रामायणकालीं होती व तीच मूर्तिपूजेच्या मुळाशी आहे, एवढेंच येथे सांगणें आवश्यक आहे. या मूलभूत सिद्धान्ताला मनांत धरून आपण या रामायणांतील उपासनेचें मनन केलें पाहिजे; म्हणजे बऱ्याच गोष्टी उलगडतील.

## संध्या.

रामायण वाचीत असतां एक गोष्ट प्रमुख्याने दृष्टीस पडते ती ही की, राम कसाही प्रसंग आला असतां संध्या करण्याचें टाळीत नाही. चालण्याचे श्रम कितीहि झालेले असोत, जेवण मिळो कीं न मिळो, इतर सोयी असोत वा नसोत, वेळेवर संध्या ही केलीच पाहिजे, असा रामाचा दिनचर्याक्रम दिसतो. देवपूजेला मूर्ति असली पाहिजे, गंधफूल पाहिजे, अशा साधनाने देवपूजा होत असते, पण संध्येचें तसें नाही. हातपाय धुवावयास पाणी असलें व आचमन करण्यासाठीं तें मिळालें की, संध्या होऊं शकते.

**ऋषयो नित्यसंध्यत्वाद्दीर्घमायुरवाप्नुयुः ।**

( मनु )

' ऋषि प्रतिदिवशीं संध्या करीत, म्हणून त्यांस दीर्घ आयुष्य प्राप्त करून घेतां आलें. ' संध्या करण्याने हा लाभ आहे, म्हणून प्राचीन काळचे द्विज संध्या चुकवीत नसत. आदर्श पुरुष, मर्यादापुरुषोत्तम रामही नित्य संध्या करणारा आहे, हें मुद्दाम येथे वाचकांनी पहावें.

रामाच्या यौवराज्याभिषेकाच्या दिवशीं सकाळीं रामाने स्नान केलें व—

**पूर्वां संध्यां उपासीनो जजाप सुसमाहितः ।** (अयोध्या. ६।६)

'(पूर्व दिशेच्या बाजूला तोंड करून करावयाची) प्रातःसंध्या रामाने केली व स्वस्थ अन्तःकरणाने मन्त्राचा जपहि केला.' अर्थात् हा जप गायत्री मंत्राचाच असला पाहिजे, हें उघड आहे. संध्या झाल्यानंतर 'मधुसूदना' चें पूजन त्याने केलें आहे.

यावरून संध्येनंतर पूजा हा क्रम दिसतो. यापुढे राम वनामध्ये जातो. वनांत त्यांची पहिली रात्र सुरू होते. चालण्याने थकून भागून अगदी [ **बुभुक्षितौ ।** अयो. ५३ । १-२ ] भुकेलेल्या स्थितींत एका वृक्षाच्याजवळ जाऊन हे राहतात, अशा वेळींहि राम संध्या करण्यास चुकत नाही. पहा—

**स तं वृक्षं समासाद्य संध्यां अन्वास्य पश्चिमाम् ॥१॥**
**अद्येयं प्रथमा रात्रिः याता जनपदाद्बहिः ॥२॥**

( अयोध्या. ५३ )

'राम आश्रयासाठी एका मोठ्या वृक्षाजवळ गेला, तेथे त्यान पश्चिमेकडे तोंड करून करावयाची सायंसंध्या केली व तो म्हणाला की, राज्य सोडल्यावरची ही आमची पहिली रात्र आली आहे.' बुभुक्षित, श्रांत, चिन्ताक्रांत अशा स्थितींतहि रामचन्द्र संध्या करण्याचें टाळीत नाही, हें येथे पाहण्यासारखें आहे. प्रातःसंध्या व सायंसंध्या हीं क्रमाने पूर्वेकडे व पश्चिमेकडे म्हणजे सूर्याकडे दृष्टि ठेवून करावयाचें, जें स्मृतिकारांनी विधान केलें आहे, त्याप्रमाणे राम संध्यावंदन करीत आहे.

राम अयोध्येंतून निघाला, तो रथांत बसून निघाला; आपलें राज्य संपेपर्यंतचा म्हणजे वन लागेपर्यंतचा त्याचा प्रवास रथानेच झाला. या प्रवासापैकी पहिल्या व दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं व सकाळीं रामाने संध्या केली आहे.

**अद्भिरेव हि सौमित्रे वत्स्याम्यद्य निशामिमाम् ॥१०॥**
**उपास्य तु शिवां संध्यां दृष्ट्वा रात्रिमुपागताम् ॥१३॥**

( अयोध्या. ४६ )

**तथैव गच्छतस्तस्य व्यपायाद्रजनी शिवा ।**
**उपास्य तु शिवां संध्यां विषयानत्यगाहत ॥ २ ॥**

( अयोध्या. ४९ )

' पहिल्या रात्रीला नुसतें पाणी पिऊनच निजावें, असा त्यानें निश्चय केला. तेथें त्यानें सायंसंध्या केली ' व निजण्याची तयारी केली. पुढे दुसऱ्या दिवशीं रात्र संपल्यानंतर स्नान करून प्रातःसंध्या केली व पुढील मार्गाला लागला. याप्रमाणें खडतर प्रवासांत त्यास अत्यंत त्रास पडले, असले तरीहि, राम संध्या करण्याचें टाळीत नाही. हें त्याच्या धर्मनिष्ठेचें द्योतक आहे व यांतच त्याचें बलही आहे. बालकाण्डामध्ये यांच्या संध्येसंबंधानें हे उल्लेख आहेत—

**स्नात्वा कृतोदकौ वीरौ जेपतुः परमं जपम् ॥** (बा. स. २३ । ३)
**ततः प्रभाते विमले कृताह्निकमरिंदमौ ॥** (बा. स. २४ । १)
**प्रभातायां तु शर्वर्यां कृतपौर्वाह्णिकक्रियौ ॥** (बा. ३१ । १)
**कृतपूर्वाह्णिकक्रियः ।** ( बा. ३५ । ३ )
**ततः प्रभाते विमले कृतकर्मा महर्षिभिः ॥** (बा. ७० । १ )

यांत राम, लक्ष्मण, विश्वामित्र यांच्या संध्या करण्याचा उल्लेख आहे. बालकाण्डांतील राम लहान आहे, या बाल्यांत ऋषींच्या भयानें त्यानें संध्या केली असेल, असें कोणी म्हणतील; यासाठीं अयोध्याकांडांतील आधार विशेष महत्त्वाचे समजले पाहिजेत; कारण या वेळीं राम २८ वर्षांचा झाला होता; पण या वेळीही हा संध्या करण्याचें टाळीत नाही—

**ततश्चीरोत्तरासंगः संध्यां अन्वास्य पश्चिमाम् ।**
**जलमेवाददे भोज्यं लक्ष्मणेनाहृतं स्वयम् ।**

( अयोध्या. ५० । ४९ )

' नंतर वल्कलांचें उपरणें पांघरून, सायंसंध्या करून स्वतः लक्ष्मणानें आणलेलें नुसतें पाणीच तो प्याला. ' पुढे राम वनामध्ये सुतीक्ष्णाच्या आश्रमामध्ये पोचला, तेव्हा—

**तमेवमुक्त्वा वरदं रामः संध्यामुपागमत् ॥ २१ ॥**

**अन्वास्य पश्चिमां संध्यां तत्र वासमकल्पयत् ।**
**सुतीक्ष्णस्याश्रमे रम्ये सीतया लक्ष्मणेन च ॥ २२ ॥**
**ततः शुभं तापसभोज्यमन्नं स्वयं सुतीक्ष्णः पुरुषर्षभाभ्याम् ।**
**ताभ्यां सुसत्कृत्य ददौ महात्मा संध्यानिवृत्तौ रजनीमवेक्ष्य ॥२३॥**
( अरण्य. ७ )

**उत्थाय तु यथाकालं राघवः सह सीतया ।**
**उपास्पृशत् सुशीतेन जलेनोत्पलगन्धिना ॥ २ ॥**
**अथ तेऽग्निं सुरांश्चैव वैदेही रामलक्ष्मणौ ।**
**काल्यं विधिवदभ्यर्च्य तपस्विशरणे वने ॥ ३ ॥** (अरण्य. ८)

' राम त्या सुतीक्ष्णाच्या आश्रमांत गेला व तेथे त्याने सायंसंध्या केली व तेथेच मुक्काम केला. सुतीक्ष्णानें तापसी लोकांचें भोजन, त्या राम–लक्ष्मणांची संध्या झाली, असें पाहून, त्यांना सत्कारपूर्वक दिलें. दुसऱ्या दिवशीं राम वेळेवर उठला. थंड पाण्याने चूळ भरली (स्नानसंध्या केली व) अग्नीची व इतर देवतांची राम–लक्ष्मण व सीता यांनी विधीप्रमाणे पूजा केली ' व नंतर ऋषीचा निरोप घेतला.

या ठिकाणीं राम व लक्ष्मण यांच्या संध्या करण्याचा उल्लेख आहे, यांनी संध्या केली व जेव्हा ते देवपूजेस लागले, तेव्हा देवपूजेंत सीता सामील झाल्याचें येथे लिहिलें आहे. पुढे जेव्हा शूर्पणखा रामाच्या आश्रमांत आली, त्या दिवसाचा वृत्तांत असा आहे—

**कृताभिषेको रामस्तु सीता सौमित्रिरेव च ।**
**तस्माद्गोदावरीतीरात्ततो जग्मुः स्वमाश्रमम् ॥ १ ॥**
**आश्रमं तमुपागम्य राघवः सहलक्ष्मणः ।**
**कृत्वा पौर्वाह्णिकं कर्म पर्णशालामुपागमत् ॥ २ ॥**
( अरण्य. १७ )

" राम, लक्ष्मण व सीता यांनी त्या गोदावरीनदीमध्ये स्नान केलें व तेथून ते आपल्या आश्रमाजवळ गेले. आपल्या पर्णशालेकडे जाऊन त्यांनी पूर्वाण्हसमयीं करावयाचें कृत्य, म्हणजे संध्या वगैरे केलें. "

येथपर्यंत आलेल्या वर्णनामध्ये स्त्रियांनी संध्या केल्याचा उल्लेख नाही. रामलक्ष्मण संध्या करीत होते, असे उल्लेख अनेक आहेत; पण सीता संध्या करीत होती, असा उल्लेख आलेला नाही. कौसल्येने ध्यान केलें, पूजन केलें, हवन केलें असे उल्लेख आहेत; पण तिने संध्या केल्याचा उल्लेख नाही. हवन कौसल्येने केलें, असा जो उल्लेख आहे, त्याचा अर्थ टीकाकारांनी ' ब्राह्मणांकडून ती हवन करवीत होती, ' असा केला असल्याने व तेथे लागोपाठ १।२ श्लोकांत कर्तरि व प्रयोजक प्रयोग असल्याने त्यावरून निश्चयाने कौसल्या स्वतःच समंत्रक हवन करीत होती कीं काय, यासंबंधी शंका रहाते व दोनही प्रकारचे प्रयोग असल्याने तत्काल निर्णय होत नाही; पण सुंदरकाण्डांत सीता संध्या करीत असेल, अशी शंका मारुतीस आल्याचा उल्लेख आहे व या दृष्टीने तो फार महत्त्वाचा आहे. हनुमान लंकेंत गेला, त्याने सीतेचा पुष्कळ शोध केला; पण ती सापडली नाही. तेव्हा या पाण्याच्या ठिकाणीं संध्याकाळीं सीता संध्या करण्यास येईल, असें म्हणून तो तेथे तिची वाट पहात बसला—

**संध्याकालमनाः श्यामा ध्रुवमेष्यति जानकी ।**
**नदीं चेमां शुभजलां संध्यार्थे वरवर्णिनी ॥४९॥**
**यदि जीवति सा देवी ताराधिपतिभानना ।**
**आगमिष्यति सावश्यं इमां शीतजलां नदीम् ॥५१॥**

( सुंदर. १४ )

' हा संध्याकाळचा समय आहे. या वेळीं सीता निश्चयाने या नदीवर संध्या करण्यासाठी येईल. जर ती जिवंत असेल तर ती या नदीवर या वेळीं येईलच.' असें मारुती म्हणत आहे. मारुती हा स्वतः वेदशास्त्रसंपन्न विद्वान् होता. तत्कालीन स्त्रिया संध्या करतात कीं नाहीत, हें त्यास पक्कें माहीत होतें. सीता संध्येसाठीं येथे असली, तर येईलच, असें ज्याअर्थी तो म्हणत आहे, त्याअर्थी आर्यस्त्रिया संध्या करीत, हें त्यांस माहीत असावें. सीतेला त्याने एकदा रावण पळवून नेत असतांना काय तें पाहिलें होतें; ती संध्या करते कीं नाही, हें त्यांस माहीत नव्हतें: पण क्षत्रिय स्त्रिया संध्या करतात, हें त्यास माहीत असल्याने सीता संध्याकाळच्या वेळीं संध्या करावयास नदीवर येईल, असें त्यास वाटलें. या वाटण्यांत त्या वेळचा

सर्वसाधारण पद्धति काय होती, तें समजण्यासारखें आहे. शिवाय वाल्मीकी कवील आर्यस्त्रियांची रीति माहीत होती. तो येथे हें वर्णन देत आहे, तेव्हा (ब्राह्मणांच्या व) क्षत्रियांच्या स्त्रिया संध्या करीत असत, असें म्हणावें लागतें व जर या वेळची ही पद्धति निश्चित ठरली तर कौसल्या जप कसला करीत होती व स्वतः हवन करीत होती कीं नाही, हेंही यावरूनच आपोआपच ठरणें शक्य आहे.

## वानरही संध्या करीत.

वाली संध्या करीत असे, असें वर्णन उत्तरकाण्डांत आलेलें आहे, तें पहा—

**रावणो वालिनं दृष्ट्वा संध्योपासनतत्परम् ॥१२॥**
**इत्येवं मतिमास्थाय वाली मौनमुपास्थितः ।**
**जपन् वै नैगमान्* मंत्रांस्तस्थौ पर्वतराडिव ॥१८॥**
**वाल्यादयो हि स्वयं प्रातिभात-सकलवेदाः ।**
**जपंस्तदर्थं ध्यायन् ॥१८॥**
**पश्चिमं सागरं वाली आजगाम सरावणः ॥२८॥**
**तस्मिन्संध्यामुपासित्वा स्नात्वा जप्त्वा च वानरः ॥२९॥**
**उत्तरे सागरे संध्यामुपासित्वा दशाननम् ।**
**वहमानोऽगमद्वाली पूर्वं वै स महोदधिम् ॥३१॥**
**तत्रापि संध्यां अन्वास्य वासविः स हरीश्वरः ।**
**किष्किंधामभितो गृह्य रावणं पुनरागमत् ॥३२॥**
**चतुर्ष्वपि समुद्रेषु संध्यामन्वास्य वानरः ॥३३॥**

(उत्तर. ३४)

" रावणाच्या मनांत वालीवर स्वारी करून त्यास जिंकावा, असें आलें. तेव्हा वालीवर चढाई केली. या वेळीं वाली संध्या करीत बसला होता. वालीने मौन धारण केलें होतें व वैदिक मन्त्रांच्या अर्थाचें ध्यान करीत तो हिमालयाप्रमाणे स्थिर राहिला होता. [ वाली हा वेदवेदांगपारग होता, यामुळे तो वैदिक मन्त्रांच्या अर्थाचें ध्यान करण्यास समर्थ होता. ] रावणाने हल्ला केला, तेव्हा लढाई जुंपली

---

* तिलकटीका= नैगमान् वैदिकान् ।

व त्यांत वालीने रावणाचा पराभव केला व त्यास बांधला. अशा रीतीने त्याला पकडून वाली हा पश्चिम समुद्रतीरावर गेला व तेथे त्याने स्नान करून संध्या व मन्त्राचा जप वगैरे अनुष्ठान केलें. तेथून उत्तर-सागरतीरावर जाऊन येथेहि त्याने संध्या केली. त्यानंतर वाली पूर्वसमुद्रावर गेला व तेथे त्याने संध्या केली व रावणाला बरोबर घेऊन तेथून तो किष्किंधेला आला." रावणाची अजून सुटका झालेली नव्हती. महिनाभर तो वालीच्या घरीं राहिला व त्याच्या कृपेने पुढे त्याची सुटका झाली. तेव्हा परस्परांच्या मैत्रीचा तह करून रावण लंकेंत निघून गेला.

वालीच्या संध्या करण्याचा उल्लेख असा उत्तरकाण्डामध्ये आहे. वाली वेद-वेदांगपारंगत होता, ध्यान लावून चित्त एकाग्र करून, मौन धारण करून, तो संध्या करीत असे, असें तेथे दिसत आहे. संध्येच्या वेळीं मौन धारण करण्याची अशी आवश्यकता आहे व संध्येच्या वेळीं वैदिक मन्त्रांच्या अर्थाचें एकाग्रतेने मनन करावयाचें असतें, हें येथे आपणांस कळून आलें. संध्या कशी करावी, हें यावरून सर्वांस समजणें शक्य आहे.

वाली मौन धारण करून संध्या करीत होता, तरी तो आपल्या क्षत्रियपणाच्या कर्तव्याविषयी उदासीन नव्हता. शत्रूचा हल्ला होतांच त्याचा पराभव करून त्याने आपल्या शत्रूस कैदही केलें व तशा स्थितींतच चारही समुद्रांपर्यंत यात्रा करून तो आपल्या राजधानींत आला. प्रत्येक ठिकाणीं संध्या, ध्यान व जप योग्य वेळीं करीतच होता. अनुष्ठानांत कसूर न करतां आपल्या क्षत्रियाच्या कर्तव्यांत न्यून पडू न देतां, पकडलेल्या शत्रूस आपल्याबरोबर वागवून तो घरीं आला व नंतर त्याच्याशीं बरोबरीचा तह करून तो त्याने मरेपर्यंत पाळला. असो.

याप्रमाणे वानरांच्या संध्या करण्याचा उल्लेख आहे. वाली जसा वेदाध्ययनपारंगत होता, तसाच मारुतीही होता. याचप्रमाणे इतर वानरही असतील व ते संध्याही करीत असतील; पण वालीच्या संध्येचा उल्लेख आहे, तसा तो इतरांच्या संबंधाने नाही.

वानर देवपूजा करीत असल्याचाही उल्लेख सापडत नाही. असो. याप्रमाणे रामचन्द्र, लक्ष्मण, सीता, रावण व वाली यांच्या संध्या करण्यासंबंधी उल्लेख

आहेत, त्यांचा विचार येथपर्यंत झाला. सीता संध्या करीत असलेलें वर्णन नाहीं; पण मारुतीला तसें वाटल्याचा उल्लेख आहे. यावरून रामायणकालीं संध्या करण्याला किती महत्त्व होतें व प्रमुख वीर ती वेळेवर नियमाने करीत, हें सिद्ध होतें आहे.

## डोक्यावरून स्नान.

रामायणामध्ये स्नान करण्याचा उल्लेख पुष्कळदा आहे; पण अयोध्येंतील लोकांचें वर्णन करीत असतानां—

**शिरःस्नात-जनैः युतां ।** ( अयोध्या. ७।३ )

' डोक्यावरून स्नान केलेल्या लोकांनी युक्त अयोध्यानगरी होती, ' असें वर्णन केलें आहे. अयोध्येंत डोक्यावरून स्नान करणारे लोक होते, असें मुद्दाम सांगण्याचें कारण काय बरें असावें ? त्या वेळीं डोक्यावरचे सर्व केस ठेवण्याची पद्धति होती. सध्या जसे शिख लोक आपल्या डोक्यावरचे सर्व केस राखतात त्याप्रमाणे या काळचे लोक डोक्यावरचे सर्व केस राखीत असतील व डोक्यावरील सर्व केस असले, म्हणजे डोक्यावरून रोजचें स्नान होणें कठीण असतें. जसें स्त्रिया या डोक्यावरून दररोज स्नान करीत नसतात, चार किंवा आठ दिवसांनी शिकेकाई, रिठे किंवा तेल व साबण लाऊन स्नान करतात. शिखांचें डोक्यावरचें स्नान असेंच चारआठ दिवसांनी होतें व त्यास वेळही घराच लागतो.

खेडेगावचे लोक जर डोक्यावर केस ठेवणारे असतील, तर ते असेच चार-आठ दिवसांनी डोक्यावरून स्नान करणारेच असणें स्वाभाविक आहे. शहरांतील लोक मात्र दररोज डोक्यावरून स्नान करणें शक्य आहे. शहरांतील लोकांची राहणी अधिक स्वच्छ असते व स्वच्छतेच्या कल्पना त्यांच्या विशेष प्रगल्भ झालेल्या असतात. म्हणूनच असें वर्णन येथे केलेलें सयुक्तिक वाटतें की, अयोध्येंतील लोक दररोज ' डोक्यावरून स्नान करीत होते. '

वनवासांतील तापसी लोक त्रिकाळ स्नान करीत, असा उल्लेख आहे. (**कार्यः त्रिः अभिषेकश्च ।** अयोध्या. २८।१५ ) तीन वेळ स्नान करावें लागले, यासाठी हे सीते ! तूं वनांत येऊं नको, असें राम सीतेला सांगत आहे; पण हें त्रिकाळ-

स्नान जरी असलें, तरी तें डोक्यावरून असेलच असें वाटत नाही. गळ्याखालून स्नान होणें शक्य आहे. राम व लक्ष्मण यांचे सर्व केस होते, म्हणून वनांत जातांच गुहाकडून चीक आणवून त्यांनी आपल्या जटा बनवल्या व तापसांप्रमाणे ते शोभूं लागले, असें वर्णन आहे.

या दृष्टीने ' अयोध्येंतील लोक डोक्यावरून स्नान केलेले होते, ' या वर्णनाचा अर्थ समजून घेणें इष्ट आहे.

## उत्तर–क्रिया.

मनुष्य मेल्यानंतर त्याची उत्तर–क्रिया, उदकक्रिया अथवा प्रेतक्रिया म्हणून कांही धर्मविधि करण्याचा वैदिक संप्रदाय रामायणकालीं होता असें स्पष्ट दिसत आहे. जेव्हा कैकेयीने ' भरताला राज्य व रामाला वनवास ' असें दोन वर मागितले, तेव्हा कैकेयीचें कुटिल अन्तःकरण दशरथाला कळून आलें व त्यामुळे क्रोधाने तो तिला म्हणत आहे—

**प्रियं चेद्भरतस्यैतद्रामप्रव्राजनं भवेत्।**
**मा स्म मे भरतः कार्षीत् प्रेतकृत्यं गतायुषः ॥९२॥**

( अयोध्या. १२ )

' हे कैकेयी ! जर भरताला रामाचें वनवासाला जाणें प्रिय असेल व पसंत असेल, तर मी मेल्यानंतर माझें प्रेतकृत्य भरताने करूं नये. ' कैकेयीप्रमाणेच भरताचेंहि जर मत असेल, तर भरताने माझा पुत्र म्हणून करावयाची माझी उत्तर क्रिया करूं नये; कारण असें मानणारा पुत्र मला नको आहे. पुत्राने उत्तरक्रिया केली असतां त्याने दिलेलें उदक परलोकांत मला मिळेल; पण असल्या अधर्माचें उदक मला घ्यावयाचें नाही, म्हणून माझी उत्तरक्रियाच त्याने करूं नये, असें दशरथ रागाने म्हणत आहे. कैकेयी व कैकेयीपासून झालेली संतति यांचा संबंधच नको, हा या वेळच्या बोलण्यांतील याचा हेतु आहे..

घरीं वडील मुलगा राम नसल्याने दशरथ मेल्यानंतर भरताला बोलावून आणला जाईल व तोच आपली उत्तरक्रिया करील, म्हणून दशरथ असें या वेळीं बोलत आहे.

**यस्ते मन्त्रकृतः पाणिरग्नौ पापे मया धृतः ।**
**संत्यजामि स्वजं चैव तव पुत्रं सह त्वया ॥ १४ ॥**
**रामः कारयितव्यो मे मृतस्य सलिलक्रियाम् ॥ १६ ॥**
**सपुत्रया त्वया नैव कर्तव्या सलिलक्रिया ॥**
**व्याहन्तास्यशुभाचारे यदि रामाभिषेचनम् ॥ १७ ॥**

( अयोध्या. १४ )

‘ हे कैकेयी ! जर तूं अशा रीतीने रामाच्या यौवराज्याभिषेकामध्ये विघ्न करणार असशील, तर हे दुराचारिणी स्त्रिये ! जें मी तुझें पाणिग्रहण अग्निसंनिध मन्त्रोच्चारपूर्वक केलें, तें तुझ्या मुलासह मी सोडून देत आहें. असेंच तूं करणार असशील तर, तूं किंवा तुझ्या मुलाने माझी उत्तर-क्रिया करूंच नये. मी मेलों म्हणजे जी ही राज्याभिषेकाची सामग्री येथे जुळवली आहे, त्याच सामग्रीने रामानेच येथे माझी उत्तरक्रिया करावी. ’

येथे दशरथ ‘ **सोडचिठी** ’ ची भाषा बोलत आहे. हें भाषण संतापातिशयामुळे दशरथाच्या तोंडून निघालेलें आहे; कारण वैदिक-धर्मांत विवाहित द्विजस्त्रीची सोडचिठी होत नाहीं, हें सर्वांस माहीत आहे. येथेहि भरताने आपली उत्तर-क्रिया करूं नये, तर ती रामाने करावी, असें दशरथाचें म्हणणें आहे. कैकेयी व तिची संतति यासंबंधाने पूर्ण नापसंति दर्शविण्यासाठी संतापलेला दशरथ असें म्हणत आहे.

वनवासांत असतांना ( **पितॄणां विधिपूर्वकं प्रतिपूजनं नित्यशः कर्तव्यम्** । ( अयो. २८ । १४-१५ ) पितरांची पूजा विधिपूर्वक केली पाहिजे असें राम सीतेला म्हणत आहे. देव, पितर व अतिथि या तिघांचा येथे उल्लेख असल्याने येथील पितृपूजा ही, जीवित पितरांची नसून, मृत पितरांचीच असणें शक्य आहे.

मुलांनी केलेलें श्राद्ध व श्राद्धामध्ये किंवा उत्तरक्रियेमध्ये दिलेलें जें काय अन्नपाणी असेल तें परलोकांत मिळतें, अशी कल्पना येथे स्पष्ट दिसते. ही कल्पना मनांत धरूनच दशरथ बोलत आहे—

कैकेयि मामकाङ्गानि मा स्प्राक्षीः पापनिश्चये ।
नहि त्वां द्रष्टुमिच्छामि, न भार्या, न च बान्धवी ॥ ६ ॥
ये च त्वामनुजीवन्ति, नाहं तेषां, न ते मम ।
केवलार्थपरां हि त्वां व्यक्तधर्मां त्यजाम्यहम् ॥ ७ ॥
अगृह्णां यच्च ते पाणिं अग्निं पर्यणयं च यत् ।
अनुजानामि तत्सर्वं अस्मिंल्लोके परत्र च ॥ ८ ॥
भरतश्चेत् प्रतीतः स्याद्राज्यं प्राप्यैतदव्ययम् ।
यन्मे स दद्यात्पित्रर्थं, मा मां तद्दत्तं आगमत् ॥ ९ ॥
( अयोध्या. ४२ )

' हे पापिणी कैकेयी ! मला स्पर्श करूं नकोस, तूं माझी बायको नव्हेस व नातलग सुद्धा नव्हेस. तुझें तोंडसुद्धा मी पाहूं इच्छीत नाहीं. तुझ्यावर ज्यांची उपजीविका चालते, ते माझे कोणी नव्हेत व मी त्यांचा कोणी नव्हे. तूं धर्म सोडला आहेस, म्हणून मी तुला टाकीत आहें. तुझ्यासह अग्नीला प्रदक्षिणा घालून जें तुझें पाणिग्रहण केलें, त्यासंबंधानें या व परपरलोकामध्ये जें काय प्राप्त होणार असेल, तें सर्व मी सोडीत आहें. भरताला हें पसंत असेल व राज्यप्राप्त झाल्यानंतर जर त्याला आनंद वाटेल, तर बापाच्या उद्देशानें जें काय तो मला श्राद्धामध्यें देईल, तें मला परलोकामध्यें प्राप्त न होवो. '

तेथेहि दशरथ सोडचिठीची भाषा बोलत आहे, ती सर्व अत्यंत वैताग आल्यामुळेच आहे. भरतानें केलेल्या उत्तर–क्रियेंतील जल, अन्न आदि वस्तु परलोकांत मला न मिळोत, असें जें तो म्हणत आहे, तें उत्तरक्रियेचा विचार करतांना पुष्कळच विचार करण्यासारखें आहे. पितरांच्या उद्देशानें येथें श्राद्धांत जें दिलें जातें, तें परलोकांत पितरांना प्राप्त होतें, ही कल्पना येथें स्पष्ट आहे.

## राम दशरथाची उत्तरक्रिया करतो.

चित्रकूटावर राम असतांना भरत त्याला नेण्यासाठीं आला, तेव्हां दशरथ वारल्याचें रामास समजलें, त्या वेळीं रामानें त्याची उत्तरक्रिया केली. तिचें वर्णन असें आहे—

यो मृतो मम शोकेन स मया न च संस्कृतः ॥ ९ ॥
अहो भरत सिद्धार्थो येन राजा त्वयानघ ।
शत्रुघ्नेन च सर्वेषु प्रेतकृत्येषु सत्कृतः ॥ १० ॥
सीते मृतस्ते श्वशुरः, पितृहीनोऽसि लक्ष्मण ।
अब्रुवन् जगतीभर्तुः क्रियतां उदकं पितुः ॥ १७ ॥
आनयेङ्गुदिपिण्याकं चीरमाहर चोत्तरम् ।
जलक्रियार्थं तातस्य गमिष्यामि महात्मनः ॥ २० ॥
सीता पुरस्ताद्व्रजतु त्वमेनामभितो व्रज ।
अहं पश्चाद्गमिष्यामि* गतिर्ह्येषा सुदारुणा ॥२१॥
ते सुतीर्थां ततः कृच्छ्रादुपगम्य यशस्विनः ।
नदीं मन्दाकिनीं रम्यां सदा पुष्पितकाननाम् ॥२४॥
सिषिचुस्तूदकं राज्ञे तत२ एतद्भवत्विति ॥२५॥
प्रगृह्य नु महीपालो जलापूरितमञ्जलिम् ।
दिशं याम्यामभिमुखो रुदन् वचनं अब्रवीत् ॥२६॥
एतत् ते राजशार्दूल विमलं तोयं अक्षयम् ।
पितृलोकागतस्याद्य मद्दत्तमुपातिष्ठतु । ॥२७॥
ततो मन्दाकिनीतीरं प्रत्युत्तीर्य स राघवः ।
पितुश्चकार तेजस्वी निर्वापं भ्रातृभिः सह ॥२८॥
ऐंगुदं बदरैर्मिश्रं पिण्याकं दर्भसंस्तरे ।
न्यस्य रामः सुदुःखार्तो रुदन् वचनमब्रवीत् ॥२९॥
इदं भुक्ष्व महाराज प्रीतो यदशना वयम् ।
यदन्नः पुरुषो भवति तदन्नास्तस्य देवताः ॥३०॥
( अयोध्या. १०३ )

' जो माझ्या शोकाने मेला, त्याचा अन्त्यसंस्कार मी करूं शकलों नाहीं, ही केवढी दुःखाची गोष्ट आहे बरें ! भरत व शत्रुघ्न हे कृतकृत्य होत; कारण त्यांनी

* सूत्रं– सर्वे कनिष्ठप्रथमा अनुपूर्व इतरे स्त्रियोऽग्रे इति ।

वडिलांचा प्रेतसंस्कार केला. सीते ! तुझे मामाजी मेले बरें ! लक्ष्मणा ! तूं आता पितृविहीन झालास. आता आम्हांस वडिलांची उदकक्रिया केली पाहिजे. आण बरें इकडे तें इंगुदीचें पीठ व तें वल्कलांचें उपरणेंहि इकडे कर. सीतेने पुढे चालावें, लक्ष्मणाने तिच्या मागे चालावें व सर्वांत मागून मी चालेन; ( कारण उत्तरक्रियेसाठी स्त्रियांनी सर्वात पुढे असावें व कनिष्ठांनी पुढे चालावें व त्यामागून वयस्कांनी जावें, असें सांगितलें आहे. ) ते मन्दाकिनी नदीवर गेले व तेथे त्यांनी दशरथाला उदक दिलें ! '**तत ! एतत् उदकं अक्षय्यं भवतु**' असें म्हणून त्यांनी दशरथाला उदकाच्या अञ्जलि अर्पण केल्या. रडत रडत दक्षिण दिशेला तोंड करून ( **हे राजशार्दूल ! एतत् ते विमलं अक्षयं तोयं मद्दत्तं उपतिष्ठतु** ) हें तुला पवित्र व अक्षय उदक देत आहों, तें तुला पितृलोकामध्ये प्राप्त होवो, असें ते म्हणाले. याप्रमाणे उदक दिल्यानंतर नदीच्या बाहेर येऊन दर्भ पसरून त्यांवर इंगुदी, सावे व बोरें यांचे पिंड करून ते आपल्या भावांसह वडिलांच्या उद्देशाने दिले व रडत रडत तो म्हणाला की, हे महाराज ! हें अन्न तुम्ही खा बरें ! जें आम्ही खात आहों, तेंच पितृदेवतेच्या उद्देशाने द्यावयाचें आहे ! '

याप्रमाणे रामाने दशरथाची उत्तरक्रिया केलेली आहे. या ठिकाणीं रामाला दशरथाच्या मृत्यूची वार्ता समजतांच त्याने स्वतःच सपिण्डीकरणापर्यंत सर्व उत्तरक्रिया त्याच दिवशीं करून टाकली. समजल्यापासून अशौचास प्रारंभ होतो, तेव्हा हें रामाने कसें केलें, या संबंधीचा शास्त्रार्थ टीकाकारांनी बराच दिलेला आहे व जें रामाने केलें, तें योग्य होतें, असें त्यांनी ठरवलें आहे. येथे उदकाच्या अंजलि देणें व पिण्ड देणें या क्रिया आहेत. रामाने त्या सर्व क्रिया आपण स्वतः केलेल्या आहे. या वेळीं वसिष्ठ किंवा दुसरे कोणीहि पुरोहित तेथे नव्हते. ते नंतर तेथे पोचले. यावरून रामाच्या विद्याभ्यासामध्येच षोडश संस्कार कसे करावे, तें त्यास शिकवलें होतें, हें उघड होत आहे.

भरताबरोबर त्याचे कुलगुरु सैन्याबरोबर होते. त्यांस न बोलावतां सीता, लक्ष्मण व राम हे नदीवर जातात व उत्तरक्रिया करतात. जशी संध्या करण्यास दुसरा कोणी लागत नसतो, त्याचप्रमाणे उत्तरक्रियेसही दुसरा कोणी लागलेला

नाहीं. पुरोहिताच्या मदतीशिवाय रामाने स्वतःच हें सर्व केलें आहे. यावरून रामायणकालच्या राजपुत्रांच्या शिक्षणांत हें शिक्षण अन्तर्भूत झालेलें होतें, असें दिसतें.

स्त्रियांनी सर्वांत पुढे जावें व त्यांच्या मागून लहान वयाच्या पुरुषांनी व सर्वांत मागे मोठ्यांनी जावें, हा सर्व सूत्रोक्त विधि रामाने न चुकतां केला आहे. जलामध्ये उतरून जलाने पितृतर्पण करणें व त्यानंतर दर्भावर यथाक्रम पिण्डप्रदान करणें, हें जसें करावयाचें तसेंच रामाने स्वतः केलें आहे.

मरणाचा वृत्तांत समजतांच सुतकास आरंभ होतो. या वेळीं उत्तरक्रिया करावयाची कीं न करावयाची, या संबंधाचा शास्त्रनिर्णय ठरवून रामाने तत्काल उत्तरक्रिया करतां येते, असें ठरवून, ती केली. यावरून धर्मक्रियाकलापाचें ज्ञान रामास किती होतें, तें समजणें शक्य आहे. जनकासारखी क्षत्रिय मण्डळी या वेळीं अशीच धर्मशास्त्रांत प्रवीण होती.

आता अयोध्येंत भरताने दशरथाची जी उत्तरक्रिया वसिष्ठ ऋषींच्या समक्ष केली, तिचा वृत्तांत पहा—

**वसिष्ठस्य वचः श्रुत्वा भरतो धरणीं गतः ।**
**प्रेतकृत्यानि सर्वाणि कारयामास धर्मवित् ॥३॥**
**उद्धृत्य तैलसंसेकात् स तु भूमौ निवेशितम् ॥४॥**
**संवेश्य शयने चाग्र्ये नानारत्नपरिष्कृते ॥५॥**
**प्रेतकार्याणि यान्यस्य कर्तव्यानि विशांपते**
**तान्यव्यग्रं महाबाहो क्रियतामविचारितम् ॥११॥**
**शिबिकायामथारोप्य राजानं गतचेसतम् ॥१४॥**
**हिरण्यं च सुवर्णं च वासांसि विविधानि च ।**
**प्रकिरन्तो जना मार्गे नृपतेरग्रतो ययुः ॥१५॥**
**चन्दनागुरुनिर्यासान् सरलं पद्मकं तथा ।**
**देवदारूणि चाहृत्य क्षेपयन्ति तथापरे ॥१६॥**
**गन्धानुच्चावचांश्चान्यान् तत्र गत्वाथ भूमिपम् ।**
**तत्र संवेशयामासुः चितामध्ये तं ऋत्विजः ॥१७॥**

तदा हुताशनं हुत्वा जेपुस्तस्य तदृत्विजः ।
जगुश्च ते यथाशास्त्रं तत्र सामानि सामगाः ॥१८॥
प्रसव्यं चापि तं चक्रुर्ऋत्विजोऽग्निचितं नृपम् ।
स्त्रियश्च शोकसंतप्ताः कौसल्याप्रमुखास्तदा ॥२०॥
कृत्वोदकं ते भरतेन सार्धं नृपाङ्गना मन्त्रिपुरोहिताश्च ।
पुरं प्रविश्याश्रुपरीतनेत्रा भूमौ दशाहं व्यनयन्त दुःखम् ॥

( अयोध्या. ७६ )

ततो दशाहेऽतिगते+ कृतशौचो नृपात्मजः ।
द्वादशेऽहनि संप्राप्ते श्राद्धकर्माण्यकारयत् ॥१॥
ब्राह्मणेभ्यो धनं रत्नं ददावन्नं च पुष्कलम् ।
बास्तिकं बहु शुक्लं च गाश्चापि बहुशस्तदा ॥२॥
दासीर्दासांश्च यानानि वेश्मानि सुमहान्ति च ।
ब्राह्मणेभ्यो ददौ पुत्रो राज्ञस्तस्यौर्ध्वदैहिकम् ॥३॥
ततः प्रभातसमये दिवसे च त्रयोदशे ॥४॥
सावशेषास्थिनिचये किमिह त्वं विलम्बसे ॥२२॥
अमात्यास्त्वरयन्ति स्म तनयौ चापराः क्रियाः ॥२६॥

( अयोध्या. ७७ )

" वसिष्ठ ऋषींनी सांगितल्याप्रमाणे भरताने दशरथाची प्रेतक्रिया करण्यास प्रारंभ केला. प्रथम प्रेत तेलाच्या डोणींतून बाहेर काढलें. चांगल्या सजविलेल्या पालखींत तें ठेवलें व ते उचलून नेऊं लागले. त्याच्यापुढे सुवर्ण, वस्त्रें वगैरे उधळीत कांही लोक जात होते. चन्दन, अगुरु, गुग्गुळ, पद्मक, देवदारू, निरनिराळे सुगंध, यांच्या चितेवर दशरथाचें शरीर ठेवलें व ऋत्विजांनी मन्त्र म्हणून भरताकडून अग्नि देवविला. सामगायकांनी सामें म्हटलीं. स्त्रियांनी व इतरांनी महा यज्ञ करणाऱ्या त्या दशरथाला अपसव्य प्रदक्षिणा केल्या. उदकक्रिया करून ते सर्व पुनः अयोध्येमध्ये आले. अकराव्या दिवशीं भरत शुद्ध झाला. बाराव्या दिवशीं त्याने श्राद्ध केलें व ब्राह्मणांला धन, रत्न, अन्न, गाई आदिकांचें

+ ११ व्या दिवशीं.

दान पुष्कळच केलें. दास दासी, यानें व घरें यांचेंहि दान पुष्कळच केलें. याप्रमाणे राजाचें और्ध्वदेहिक भरताने केलें. तेराव्या दिवशीं अस्थिसंचय केला व शिल्लक राहिलेलें कृत्य आटोपून घेतलें. याप्रमाणे अयोध्येमध्ये दशरथाचा प्रेतसंस्कार केला. आता रावणाच्या अन्त्यसंस्काराचें वर्णन पहा—

## रावणाचा प्रेतसंस्कार.

मरणान्तानि वैराणि निर्वृत्तं नः प्रयोजनम् ॥ १०० ॥
क्रियतामस्य संस्कारो ममाप्येष तथा तव ।
त्वत्सकाशान्महाबाहो संस्कारं विधिपूर्वकम् ॥ १०१ ॥
क्षिप्रमर्हति धर्मेण त्वं यशोभाग्भविष्यसि ।
संस्कारयितुमारेभे भ्रातरं रावणं हतम् ॥ १०३ ॥
रावणस्याग्निहोत्रं तु निर्यापयति सत्वरम् ।
शकटान् दारुरूपाणि अग्नीन् वै याजकांस्तथा ॥ १०४ ॥
तथा चन्दनकाष्ठानि काष्ठानि विविधानि च ।
अगरूणि सुगंधीनि गंधाश्च सुरभींस्तथा ॥ १०५ ॥
मणिमुक्ताप्रवालानि निर्वापयति राक्षसः ॥ १०६ ॥
ततो माल्यवता सार्धं क्रियामेव चकार सः ।
सौवर्णीं शिबिकां दिव्यां आरोप्य क्षौमवाससम् ॥ १०७ ॥
रावणं राक्षसाधीशं अश्रुपूर्णमुखा द्विजाः ॥ १०८ ॥
दक्षिणाभिमुखाः सर्वे गृह्य काष्ठानि भेजिरे ।
अग्नयो दीप्यमानास्ते तदाध्वर्युसमीरिताः ॥ ११० ॥
अन्तःपुराणि सर्वाणि रुदमानानि सत्वरम् ॥ १११ ॥
पृष्ठतोऽन्वयुस्तानि प्लवमानानि सर्वशः ।
रावणं प्रयते देशे स्थाप्य ते भृशदुःखिताः ॥ ११२ ॥
चितां चन्दनकाष्ठैश्च पद्मकोशीरचन्दनैः ।
ब्राह्म्या संवर्तयामासुः राङ्कवास्तरणायुताम् ॥ ११३ ॥
प्रचक्रू राक्षसेन्द्रस्य पितृमेधमनुत्तमम् ।

वेदिं च दाक्षिणाप्राचीं यथास्थानं च पावकम् ॥ ११४ ॥
पृषदाज्येन संपूर्णं स्रुवं स्कंधे प्रचिक्षिपुः ।
पादयोः शकटं प्रापुः ऊर्वोश्चोलूखलं तदा ॥ ११५ ॥
दारुपात्राणि सर्वाणि अरणिं चोत्तरारणिम् ।
दत्त्वा तु मुसलं चान्यं यथास्थानं विचक्रमुः ॥ ११६ ॥
शास्त्रदृष्टेन विधिना महर्षिविहितेन च ॥ ११७ ॥
गंधैर्माल्यैरलंकृत्य रावणं दीनमानसाः ॥ ११८ ॥
बिभीषणसहायास्ते वस्त्रैश्च विविधैरपि ।
लाजैरवकिरन्ति स्म बाष्पपूर्णमुखास्तथा ॥ ११९ ॥
स ददौ पावकं तस्य विधियुक्तं बिभीषणः ।
स्नात्वा चैवार्द्रवस्त्रेण तिलान् दर्भविमिश्रितान् ॥ १२० ॥
उदकेन च संमिश्रान् प्रदाय विधिपूर्वकम् ।

( युद्ध. सर्ग १११ )

जेव्हा रावण मेला, तेव्हा बिभीषण म्हणाला की, ‘ असल्या दुसऱ्याची बायको पळवणाऱ्या भावाचा संस्कार करणें योग्य नाही. ’ हें ऐकतांच राम त्यास म्हणाला की, ‘ हे बिभीषणा ! असें करणें तुला योग्य नाही. रावण शूर होता, चांगला लढवय्या होता. वैर हें मरणापर्यंतच असतें. त्यापुढे तें जाऊं देऊं नये. यासाठी रावणाचा अन्त्यसंस्कार यथाविधि करणेंच तुला योग्य आहे. ’ हें ऐकून बिभीषणाने रावणाचा प्रेतसंस्कार केला. रावणाचें अग्निहोत्र होतें, तें अग्निहोत्राचें सर्व सामान त्याने आणवलें. शकट, लाकडाचीं उपकरणें, चंदन, विविध काष्टें, अगरु, नाना प्रकारचे सुगंध हे सर्व आणले. मणि, मोत्यें, पोवळीं व रत्नें हीं वांटलीं. माल्यवानासह त्याने उत्तरक्रिया केली. सुवर्णाच्या पालखीवर रेशमी वस्त्रें घालून, त्यांत रावणाचें शव ठेवलें. द्विजांनी तें उचलून दक्षिणादिशेला नेलें. लाकडेंहि तिकडे नेलींच होतीं. अध्वर्यूंनी प्रेरणा केल्याप्रमाणे अग्नि-प्रदीप्त केले. अन्तःपुरांतील स्त्रिया तेथे जमून रडूं लागल्या. शुद्ध जागीं रावणाचें प्रेत ठेवलें. चन्दन, अगरु आदि सुगंधित लाकडांच्या चितेवर तें ठेवलें व ब्राह्म-विधीप्रमाणे पितृमेधाचें सर्व कृत्य केलें. पृषदाज्यपूर्ण स्रुवा खांद्यावर ठेवली.

शकट पायाच्या ठिकाणीं ठेवला. जांघेच्या ठिकाणीं उखळ ठेवलें. दारुपात्रें व अरणी, मुसलवगैरे सर्व जेथें ठेवावयाचें तेथें ठेवलें. महर्षींनी ठरविलेल्या शास्त्र-विधीप्रमाणे गंधमाल्यांनी रावणाचें शरीर अलंकृत करून, वस्त्रें, लाह्या वगैरे चहूकडे उधळून विधीप्रमाणे त्या चितेस त्यांनी अग्नि दिला. नंतर स्नान करून बिभीषणाने ओल्यांनीच दर्भ, तिळ यांनी मिश्रित उदक विधिपूर्वक त्याला अर्पण केलें.

याप्रमाणे अग्निहोत्री ब्राह्मणांचा ज्या रीतीने प्रेतसंस्कार करण्याचा शास्त्र-विधि आहे, त्या रीतीने रावणाचा संस्कार केला. रावणाचा संस्कार यथाशास्त्र झालाच पाहिजे, हें रामानेच बिभीषणाला सांगितलें व त्याप्रमाणे त्याने तें सर्व केलें. यावरून और्ध्वदेहिक कृत्यें करण्यासंबंधाने रामाचें किती लक्ष्य होतें, तें समजून येणार आहे. या ठिकाणीं तीन उत्तरक्रियांचीं वर्णनें आहेत व त्यांत रावणाची उत्तरक्रिया अग्निहोत्र्याच्या उत्तरक्रियेसारखी केली होती; कारण तो स्वतः अग्निहोत्री होता, हें वाचकांनी लक्ष्यपूर्वक पहावें.

## वालीचें उत्तरकार्य.

वालीवधानंतर रामाच्या आज्ञेने सुग्रीवाने वालीचें और्ध्वदेहिक केलें, त्याचा वृत्तांत असा आहे—

**आरोप्य शिबिकां चैव वालिनं गतजीवितम् ।**
**अलंकारैश्च विविधैर्माल्यैर्वस्त्रैश्च भूषितम् ॥ २९ ॥**
**और्ध्वदेहिकमार्यस्य क्रियतामनुकूलतः ॥ ३० ॥**
**विश्राणयन्तो रत्नानि विविधानि बहूनि च ।**
**अग्रतः प्लवगा यान्तु शिबिका तदनन्तरम् ॥ ३१ ॥**
**तादृशं वालिनं क्षिप्तं प्राकुर्वन्नौर्ध्वदेहिकम् ॥ ३३ ॥**
**चक्रुशुर्वीरवीरेति भूयः क्रोशन्ति ताः प्रियम् ।**
**ताराप्रभृतयः सर्वा वानर्यो हतबांधवाः ॥ ३५ ॥**
**पुलिने गिरिनद्यास्तु विविक्ते जलसंवृते ॥ ३७ ॥**
**चितां चक्रुः सुबहवो वानरा वनचारिणः ॥ ३८ ॥**

सुग्रीवेण ततः सार्धं सोऽङ्गदः पितरं रुदन् ।
चितामारोपयामास शोकेनाभिप्लुतेन्द्रियः ॥ ४९ ॥
ततोऽग्निं विधिवद्दत्वा सोऽपसव्यं चकार ह ॥ ५० ॥
संस्कृत्य वालिनं तं तु विधिवत्प्लवगर्षभाः ।
आजग्मुरुदकं कर्तुं नदीं शुभजलां शिवाम् ॥ ५१ ॥
ततस्ते सहितास्तत्र अंगदं स्थाप्य चाप्यग्रतः ।
सुग्रीवतारासहिताः सिषिचुर्वानरा जलम् ॥ ५२ ॥
समानशोकः काकुत्स्थः प्रेतकार्याण्यकारयत् ॥ ५३ ॥
(किष्किंधा. सर्ग २५)

'वालीला पालखींत ठेवला. नाना अलंकार, फुलें व वस्त्रें यांनी त्यास शोभा आणली व त्याचें और्ध्वदेहिक करण्यास प्रारंभ केला. विविध रत्नें उधळत कांहीं वानर पुढे चालले. वालीची पालखी त्यांच्या मागून जाऊं लागली. त्या पालखीच्या मागून त्याच्या स्त्रिया रडत व आक्रोश करीत चालल्या. नदीच्या वाळवंटांत पोंचल्यावर तेथे वालीसाठी चिता रचली. सुग्रीव व अंगद यांनी रडत वालीचें प्रेत त्या चितेवर ठेवलें. विधीप्रमाणे अग्नि दिला व अपसव्य प्रदक्षिणा केली. वालीचा असा प्रेतसंस्कार करून वानर उदकक्रिया करण्यासाठी नदीजवळ गेले. अंगद पुढे झाला, तारा व सुग्रीव या सर्वांनी वालीसाठी जलाचें अर्पण केलें.'

याप्रमाणे वालीच्या उत्तरक्रियेचा वृत्तांत आहे. या सर्व वर्णनांवरून उत्तरक्रिया कशी करीत असत, याची चांगली कल्पना होते. येथे वालीला '**आर्य**' म्हटलें आहे, हें पाहण्यासारखें आहे. रावणाची उत्तरक्रिया अग्निहोत्री ब्राह्मणाची करावी तशी समंत्रक केली आहे. दशरथाची क्षत्रियाला– विशेषतः अश्वमेधादि यज्ञ करणाऱ्या राजन्यला–साजेशी समंत्रक झालेली आहे, व वालीची उत्तरक्रिया साधारण तशीच, (**विधिवत्**) झाली असावी, असें वाटत आहे.

याप्रमाणे उत्तरक्रियेसंबंधाने रामायणांतील विधानें आहेत. कांहीं राक्षसांचीं शरिरें पुरल्याचाही उल्लेख आहे; पण त्यांचा विचार ते उल्लेख येतील, त्या वेळीं करूं.

येथें स्त्रिया स्मशानांत गेल्याचा उल्लेख आहे. अग्निहोत्र्याची स्त्री किंवा स्त्रिया स्मशानांत जाव्याच लागतात. त्या अनुरोधाने रावण व दशरथ यांच्या स्त्रिया गेल्या आहेत. वाली अग्निहोत्री होता कीं काय तें समजत नाही, पण त्याचीहि क्रिया यथाविधि झालेली आहे. तसेंच येथे अस्थिसंचय तेराव्या दिवशीं केल्याचा उल्लेख आहे. सध्या तिसऱ्या दिवशीं करतात. एवढा फरक सोडला, तर बाकी विधि आजच्यासारखाच दिसत आहे.

## स्वर्गलोक.

रामायणकालीं स्वर्गलोकाची कल्पना दृढमूल झालेली होती, व त्या वेळच्या लोकांचा या लोकांतील कार्यक्रम या स्वर्गाच्या कल्पनेने विलक्षण सुव्यवस्थित बनलेला दिसून येतो. 'या कृत्याचा परिणाम मला स्वर्गांत कसा भोगावा लागेल,' याचा विचार करून जो तो धार्मिक मनुष्य वागत असलेला या वेळीं दिसत आहे. जेव्हा कैकेयीने आपले दोन वर मागितले, तेव्हा दशरथ अगदी थक्क झाला व तिच्या म्हणण्याप्रमाणे केलें असतां स्वर्गांत माझी स्थिति कशी होईल, तें त्याच्या प्रथमतः डोळ्यांसमोर येऊं लागलें. तो म्हणतो—

**स्वर्गेऽपि खलु रामस्य कुशलं दैवतैरहम् ।**
**प्रत्यादेशादभिहितं धारयिष्ये कथं बत ॥ ६ ॥**
**कैकेय्याः प्रियकामेन रामः प्रव्राजितो वनम् ।**
**यदि सत्यं ब्रवीम्येतत् तदसत्यं भविष्यति ॥ ७ ॥**

( अयोध्या० सर्ग १३ )

" हे कैकेयी ! मी मेल्यानंतर जेव्हा स्वर्गात जाईन, तेव्हा ' राम कुशल आहे ना? ' असें देवतांनी विचारलें तर मी त्यांस काय बरें उत्तर देऊं. ' मी त्याला कैकेयीच्या म्हणण्याप्रमाणे वनांत पाठवलें, ' असें जर मी त्या देवतांस सांगितलें, तर तें खरें असतांनासुद्धा तेथे कोणास खरें वाटणार नाही; कारण अशा गुण-संपन्न रामास कोण बरें वनांत पाठवील ? "

दशरथ येथे प्रथमतः आपण रामाला वनांत धाडलें, तर " स्वर्गातील देवतांना काय उत्तर द्यावें, " याचा विचार करीत आहे ! दशरथ अश्वमेधादि यज्ञ करणारा होता, तेव्हा यज्ञाने स्वर्ग मिळत असल्याने त्यास स्वर्ग मिळणार होता,

याविषयीं त्याची खात्रीच होती. स्वर्गांत गेल्यानंतर तेथील देवतांशीं बरोबरीच्या नात्याने गप्पागोष्टी या होणारच. तशा त्या गोष्टी चालल्या असतां रामासंबंधी त्यांनी प्रश्न विचारला असतां, मी काय बरें त्यांस उत्तर द्यावें, हें संकट दशरथास या वेळीं भासत आहे.

या वेळीं स्वर्गासंबंधी कशी काय कल्पना लोकांच्या मनांत होती, तें यावरून समजणें शक्य आहे. वनवासांत जाण्याचें ठरतांच रामही म्हणत आहे की, सर्वांत प्रथम मला वडिलांना परलोकाच्या भयापासून मुक्त केलें पाहिजे—

**सत्यः सत्याभिसंधश्च नित्यं सत्यपराक्रमः ।**
**परलोकभयाद्भीतो निर्भयोऽस्तु पिता मम ॥ ९ ॥**

( रा. अयोध्या. २२ )

'सत्यप्रतिज्ञ, सत्यवादी, पराक्रमी माझा पिता राजा दशरथ परलोकाच्या भयाने भयभीत झाला आहे. त्याचें तें भय दूर करणें हें माझें पहिलें कर्तव्य आहे.' रामही वनवासांत जावयास जो तयार झाला, तो यासाठीच होय. आपल्या वनवासांत जाण्याने पिता सत्यप्रतिज्ञ होईल व त्याची प्रतिज्ञा खरी झाली, म्हणजे त्याला स्वर्गामध्ये कोणत्याही प्रकारचें भय होणार नाही. म्हणून वडील मुलाने वडिलांचा शब्द खाली पडूं देतां नये, हें रामाच्या म्हणण्याचें तात्पर्य होय.

दशरथ राजाही माझें वचन खोटें झालें, तर मला स्वर्गप्राप्ति होण्यांत बाधा उत्पन्न होईल, म्हणून अत्यंत अप्रिय असतांही वचन पालन करण्यांत कसूर होऊं नये, म्हणून जपत असलेला दिसत आहे. दशरथाने कैकेयीस पूर्वी दोन वर दिले होते. ते वर आताच दिले पाहिजेत, असें तिने त्याच्याजवळ मागणें मागितलें, तेव्हा दशरथ कामान्ध स्थितींत असतांना मागचापुढचा विचार न करतां म्हणाला की, 'तूं हवे ते वर माग; मी ते देतों.' कैकेयीने राजाकडून त्रिवार वदवून घेतलें व राजाही 'देतों, देतों, देतों' असें म्हणाला. याप्रमाणे कैकेयीने दशरथाला वचनांत उत्तम प्रकारें पकडलें व मग वरील वर मागितले. अर्थात् हे वर देणें हें दशरथाला मुळीच इष्ट नव्हतें; पण 'देतों' असें म्हटल्यावर 'नाही देत' असें म्हटलें, तर स्वर्गांत माझी स्थिति कशी होईल, ही भीति दशरथ राजाला

सारखी टोंचत होती. या स्वर्गाच्या भयामुळेच काय वाटेल तें झालें, तरी तोंडांतून गेलेलें वचन पाळलें गेलेंच पाहिजे, असें त्यास वाटत होतें व वडिलांचें स्वर्गाचें भय दूर करण्यासाठी वडील पुत्र या नात्याने रामालाहि त्या वचनाप्रमाणे आपण वनांत गेलेंच पाहिजे, असें वाटत होतें. स्वर्गाच्या कल्पनेचा या वेळीं केवढा पगडा लोकांच्या मनावर होता, तें यावरून दिसेल.

सध्या स्टँप कागदावर लिहिलेला व सरकारांत नोंदवलेला कागदही मान्य न करणारे पक्षकार आपणांस दिसतात; पण या प्राचीन काळीं स्वप्नांत दिलेलें वचन पाळण्याचा अट्टाहास करणारा हरिश्चंद्र राजा व गैरसावध स्थितींत दिलेलें वचन पालन करण्यासाठी रामासारख्या प्रिय पुत्रालाही वनवासांत ढकलून देण्यास तयार होणारा दशरथ हे राजे आपणांस दिसत आहेत !

या प्रश्नाची दुसरीहि एक व्यावहारिकबाजू आहे, ती ही की, जर राजांचींच वचनें न टिकणारीं आहेत असें जनतेस वाटलें, तर राज्याची घडीच नीट बसणार नाही व सर्व लोकांचे व्यवहार बिघडून जातील. यासाठी काय वाटेल ती आपत्ति ओढवली, तरी राजे आपली प्रतिज्ञा ढळूं देत नसत व हीं उदाहरणें दृष्टीसमोर असल्यामुळे जनतेचे व्यवहारही सुरळीत चालत; पण जर राजेच आपलीं वचनें पाळीत नाहीत, असें जनतेस दिसलें, तर सर्व राज्यांत जी अव्यवस्था माजेल, तिचें वर्णन होणें शक्य नाही. सध्या तीच अव्यवस्था चहूंकडे चाललेली आहे. असा समाजरचनेंत बिघाड होऊं नये, यासाठीच हे आर्य राजे फार जपत असत, आपलें वचन पाळीत व तें पालन करीत असतां जे कष्ट येत, ते आनंदाने सहन करीत. वचनपालनाचा प्रत्यक्ष राज्यव्यवहाराशीं असा हा निकटचा संबंध आहे. स्वर्गाशीं असलेला संबंध पूर्वीं दिला आहेच.

आम्ही वचन पाळलें नाहीं, तर जनतेचे व्यवहार बिघडतील, असें हे राजे म्हणत नाहीत. या प्रत्यक्ष दिसणाऱ्या सुव्यवस्थित समाजरचनेसाठी आम्ही वचनें पाळलीं पाहिजेत, असेंही हे म्हणत नसून, ' स्वर्गाच्या संबंधाने भय उत्पन्न होऊं नये, ' म्हणून वचन पाळलें पाहिजे, असें हे सर्व लोक म्हणत आहेत. यावरून या वेळीं स्वर्गाची कल्पना जनतेस सरळ मार्गावर ठेवण्यास कशी कारणीभूत होत होती, हें समजून येईल.

राम वनांत गेला व पहिल्या दिवशींच तो आपल्याच मनाशीं व लक्ष्मणाशीं जे आपले विचार प्रकट करीत आहे, त्यांतही परलोकाचें भयच त्याला वाटत होतें, असें तो म्हणत आहे—

**एको ह्यहमयोध्यां च पृथिवीं चापि लक्ष्मण ।**
**तरेयमिषुभिः क्रुद्धो ननु वीर्यमकारणम् ॥ २५ ॥**
**अधर्मभयभीतश्च परलोकस्य चानघ ।**
**तेन लक्ष्मण नाद्याहमात्मानमभिषेचये ॥ २६ ॥**

( अयोध्या. ५३ )

राम म्हणतो— ' मी एकटासुद्धा अयोध्येशीं अथवा सर्व पृथ्वीशीं लढेन व माझ्याबरोबर धनुष्यबाण घेऊन लढण्यास कोणीहि समर्थ नाही, म्हणजे माझा जय होईल व सर्व राज्य मला आपल्या आधीन करून तें भोगतांही येईल, हें जरी खरें असलें, तरी ' **अधर्म होईल** ' व **परलोकाचें मोठें भय** उत्पन्न होईल. या दोन भयांमुळे मी आपणांस राज्यावर अभिषेक करून घेण्यास समर्थ असतांही करून घेत नाहीं. '

लक्ष्मणही रामास राज्यावर बसवण्यास तयार होता. राम व लक्ष्मण हे दोघेही मोठे समर्थ योद्धे होते. त्यांच्या विरुद्ध त्या वेळीं कोणाचाहि टिकाव लागणें शक्य नव्हतें. धनुष्य सज्ज करून जर हे दोघे उभे राहिले असते, तर कैकेयी अथवा दुसरा कोणीहि त्यांस प्रतिबंध करूं शकला नसता. दशरथही असेंच म्हणत होता. त्याने तर असेंहि सांगितलें होतें की, "मला कैदेंत टाक व तूं राज्य कर." म्हणजे दशरथ हा रामाला पूर्णपणें अनुकूल होता, सर्व प्रजा व सर्व मांडलिक राजे यांनी ' तर रामालाच अनुकूल कौल दिला होता. ' अशा स्थितींत राम जर राज्यावर बसणार, असें म्हणून उभा राहिला असता, तर त्यास कोणीहि प्रतिबंधसुद्धा केला नसता व कोणी उलट उभे राहिले असते, तर त्यांचा नाशच झाला असता व रामालाच खात्रीने गादी मिळाली असती. इतकी अनुकूलता असतांही राम ' **अधर्म होईल व स्वर्गामध्ये विघ्न होईल.** ' या दोन भीतींमुळे खात्रीने मिळणारें राज्यही घेत नाही व वनवास स्वीकारतो ! यावरून

स्वर्गाची कल्पना या वेळच्या जीवनामध्ये किती प्रमुखपणाने कार्य करीत असे, समजून येईल.

स्वर्ग मानीव आहे कीं खरा आहे, याचा विचार करण्याचें येथे कारण नाही. तो कसाही असला, तरी ज्यांचा त्यावर अढळ विश्वास आहे, ते त्यासाठी येथील व्यवहार अगदी शास्त्रपूत जसे केले पाहिजेत तसेच करतील, यांत शंका नाही. कोणीहि दुसरा नियामक नसतां, या स्वर्गाच्या कल्पनेने ज्याचा तो, स्वतःच स्वतःचा नियामक बनतो व यामुळे त्यांचे सर्व व्यवहार चोख होतात, आणि अशा नागरिकांचे आपसांतील व्यवहारही उत्तम चोख होतात. धर्माची एक कल्पना नीटपणाने मानली असतां, तीमुळे जनतेचें कसें रक्षण होतें, हें यावरून समजेल. 'धर्माचें रक्षण केलें असतां धर्म आपलें रक्षण करतो.' (**धर्मो रक्षति रक्षितः**) यांतील मूल तत्त्व यावरून स्पष्टपणाने समजून येतें, तें वाचकांनी येथे पहावें.

## शपथ.

या रामायणामध्ये वारंवार शपथा घेऊन बोलण्याची पद्धति दिसत आहे. आपण बोलत आहों, तें अगदी मनापासून खरें आहे, यांत फेरबदल होणार नाही अशी प्रतिपक्षाची खात्री पटविण्यासाठी अशा शपथा घेतल्या जातात. दशरथ अशा तऱ्हेने शपथ घेऊन जीव तोडतोडून कैकेयीस सांगत आहे की, तूं मागत आहेस, तें मी तुला देईन—

### दशरथ शपथा घेतो.

**करिष्यामि तव प्रीतिं सुकृतेनापि ते शपे।**

(अयोध्या. १०।३६; ११।१०)

'हे कैकेयि ! पुण्याईची शपथ घेऊन सांगतों की, मी तुला संतुष्ट करीन' (व तूं मागत असलेले वर तुला देईन) तसेंच—

**शपे ते जीवनार्हेण ब्रूहि यन्मनसेप्सितम् ॥ ६ ॥**
**यं मुहूर्तमपश्यंस्तु न जीवेयं अहं ध्रुवम् ।**
**तेन रामेण कैकेयि शपे ते वचनक्रियाम् ॥ ७ ॥**

**आत्मना चात्मजैश्चान्यैर्वृणे यं मनुजर्षभम् ।**
**तेन रामेण कैकेयि शपे ते वचनक्रियाम् ॥ ८ ॥**

(अयोध्या० ११)

"रामाची शपथ घेऊन सांगतों की, तुझ्या म्हणण्याप्रमाणे करीन. बोल तुझ्या मनांत काय मागावयाचें आहे, तें सांग."

असें दशरथ कैकेयीला सांगत आहे व कैकेयी त्याच्यावर विश्वास ठेवण्यास तयार होत नाही. तीनतीनदा आणाभाका घेतल्यानंतरच ती आपल्या मनांतील हेतु त्याला सांगावयास तयार होते. दशरथाचें वर्तन पाहिलें असतां आणाभाका घेतल्या तरी विश्वास बसूं नये, अशा प्रकारचें कैकेयीशीं तरी असावें, असेंच वाटतें; कारण त्यानें —

(१) भरतशत्रुघ्नांना १२ वर्षें पूर्वी जें मावळ्याकडे पाठवलें होतें, तें घरीं आणलें नव्हतें;

(२) भरताच्या मामाला व आजोळच्या माणसांना राज्यारोहणासाठीं निमंत्रणही पाठवलें नव्हतें, कीं तिकडच्या कोणास बोलावलेंही नव्हतें;

(३) सर्व नगरांत समजलें तरी कैकेयीसही या राज्यारोहणाचें वृत्त राजधानींतल्या राजधानींतही कळविलें नव्हतें;

(४) रामाशीं बोलतांना दशरथच म्हणाला होता कीं, भरत येण्यापूर्वीच तुझा राज्याभिषेक झालेला बरा; (अयो. ४।२५)

(५) कैकेयीच्या मुलाला राज्य देईन, अशी प्रतिज्ञा करून, तसें तें त्याला न देण्याच्या या खटपटी दशरथ करीत होता.

याप्रमाणे कैकेयीशीं आचरण करणारा दशरथ या वेळीं 'रामाची व आपल्या पुण्याईची शपथ घेत आहे,' हें पाहण्यासारखें आहे! दशरथाला 'कैकेयीच्या मुलाला राज्य देईन,' हें वचन पाळणेंही कठीण होतें व मोडणेंही कठीण होतें! तसेंच रामाकडे तर त्याचें मन ओढ घेत होतेंच. अशा द्विधा स्थितींत तो आणाभाका व शपथा घेत आहे. शेवटीं कैकेयी रागावली व ती जीव द्यावयासही तयार झाली व तेव्हा ती भरताची शपथ घेऊन असें बोलली—

# कैकेयी शपथ घेते

**अहं हि विषमद्यैव पीत्वा बहु तवाग्रतः ।**
**पश्यतस्ते मरिष्यामि रामो यद्यभिषिच्यते ॥ ४७ ॥**
**भरतेनात्मना चाहं शपे ते मनुजर्षभ ॥ ४९ ॥**

( अयोध्या० १२ )

"हे राजा ! मी भरताची शपथ घेऊन व माझ्या जिवाची शपथ घेऊन सांगतें की, जर रामाला राज्याभिषेक झाला, तर आजच्या आज तूं पहात असतांना पुष्कळसें विष पिऊन मी तुझ्यासमोर मरून जाईन.'

असा जेव्हा कैकेयी त्रागा करण्यास तयार झाली, तेव्हा रामाची शपथ घेऊन दिलेलें वचन पालन करण्यास दशरथ तयार झाला. मग रामाची शपथ तरी दशरथाने कां घ्यावी ? जेव्हा दशरथ रामाच्या राज्याभिषेकाची सर्व तयारी केल्यानंतर कैकेयीच्या महालांत गेला, त्या वेळीं तो कामविकाराने मोहित झालेला होता. त्या विकारी स्थितींत असतांना तिचे गोड शब्द त्यास हवे होते; पण त्याऐवजी तिची मनःस्थिति विलक्षण पालटलेली होती ! अशा स्थितींत तिचें मन आकर्षून घेण्यासाठी तो तिला आणाशपथा घेऊन 'तुला प्रिय असलेलें हवें तें करीन' असें म्हणत आहे; पण हा वेळपर्यंत कैकेयीस कळूं न देतां दशरथाने भरतास राज्य मिळूं नये, अशासाठीं जे काय करतां येणें शक्य होतें, तें सर्व करून टाकलें होतें !!!

जेव्हा राम वनांत जावयास निघाला, त्या वेळीं दशरथ रामाला सत्याची शपथ घेऊन सांगत आहे की, 'हें मला मुळीच प्रिय नाहीं'—

**दुष्करं क्रियते कर्म सर्वथा राघव प्रिय ।**
**त्वया हि मत्प्रियार्थं तु वनमेवं उपाश्रितम् ।**
**न चैतन्मे प्रियं पुत्र शपे सत्येन राघव ॥ ३६ ॥**

( अयोध्या० ३४ )

'हे प्रिय रामा ! फार मोठें दुष्कर असें कर्म तूं करीत आहेस व माझ्याच-

साठी तूं हा असा वनांत जात आहेस. हे पुत्रा! मी तुला सत्याची शपथ घेऊन सांगतों की, हें मला मुळींच पसंत नाहीं.'

## राम शपथ घेतो.

ज्या वेळीं राम वनांत जावयास निघतो, त्या वेळीं तो पुढे दिल्याप्रमाणे शपथ घेत आहे—

**त्वामहं सत्यमिच्छामि नानृतं पुरुषर्षभ।**
**प्रत्यक्षं तव सत्येन सुकृतेन च ते शपे ॥ ४८ ॥**

( अयोध्या० ३४ )

'हे राजन्! तुमची प्रतिज्ञा सत्य व्हावी व ती खोटी ठरूं नये, म्हणून मी वनांत जात आहें, हें सत्याची व सुकृताची शपथ घेऊन मी प्रत्यक्ष व समक्ष सांगत आहें.'

कैकेयीबद्दल लोकांस अतिशय संताप आला होता व राम वनांत गेल्यानंतर ते कैकेयीच्या राज्यांत राहण्यासही तयार नव्हते, याविषयीं लोक आपल्या मुलांची शपथ घेऊन म्हणत आहेत—

**कैकेय्या हि वयं राज्ये भृतका हि वसेमहि।**
**जीवन्त्या जातु जीवन्त्यः पुत्रैरपि शपामहे ॥ २३ ॥**

( अयोध्या. ४८ )

'कैकेयी राज्य करूं लागल्यानंतर, तिनें आमचें पालनपोषण केलें, तरी जिवांत जीव असेपर्यंत सुद्धा आम्ही तिच्या राज्यांत, आमच्या मुलांची शपथ, राहणार नाहीं,' असें म्हणत आहेत. लोकांना तिचा इतका संताप आला होता व तिटकाराही आलेला होता.

याप्रमाणे शपथा घेऊन बोलण्याची चाल होती, हें यावरून दिसत आहे. दशरथ, कैकेयी, राम व अयोध्येंतील जनता यांच्या शपथा वर दिलेल्या आहेत. अशाच शपथा दुसऱ्यांनी घेतलेल्याही मिळूं शकतील. शपथ घेण्यासंबंधी मनुस्मृतींत असें म्हटलेलें आढळतें—

## मनुस्मृतींतील शपथ.

**महर्षिभिश्च देवैश्च कार्यार्थं शपथाः कृताः ।**
**वसिष्ठश्चापि शपथं शेपे वै यवने नृपे ॥११०॥**
**न वृथा शपथं कुर्यात् स्वल्पेऽप्यर्थे नरो बुधः ।**
**वृथा हि शपथं कुर्वन् प्रेत्ये चेह च नश्यति ॥१११॥**
**कामिनीषु विवाहेषु गवां भक्ष्ये तथेन्धने ।**
**ब्राह्मणाभ्युपपत्तौ च शपथे नास्ति पातकम् ॥११२॥**

( मनु. ८ )

‘ महर्षि व देव यांनी पूर्वी विशेष कार्यासाठी शपथा घेतलेल्या आहेत. वसिष्ठानेही पूर्वी शपथ घेतली होती. व्यर्थ शपथ घेऊं नये. व्यर्थ शपथ घेतल्याने या लोकीं व परलोकीं नाश होतो. स्त्रियांच्या बाबतींत, विवाहामध्ये, गाईला चारा देण्यामध्ये, अग्निहोत्र्याला इन्धन देण्यासंबंधी, ब्राह्मणावरील आपत्ति टाळण्यासाठी शपथ घेतली असतां पाप लागत नाही. ’

दशरथाने ज्या शपथा घेतल्या आहेत, त्या ( कामिनी ) स्त्रीसंबंधामध्ये, कैकेयीचें मन आकर्षून घेण्यासाठी घेतल्या असल्यामुळे या नियमाने तें पाप होणें शक्य दिसत नाही, असें कांहींना म्हणतां येणें शक्य आहे. याचा विचार वाचकांनी करावा.

## मद्यपान.

जेव्हा कैकेयीने आपले दोनही वर दशरथाला सांगितले व ‘ रामाला वनवास व भरताला राज्य ’ द्या असें म्हटलें, तेव्हा कैकेयीच्या मनाची चांगलीच ओळख राजास झाली व त्या वेळीं तो म्हणतो—

**सतीं त्वां अहं अत्यन्तं व्यवस्याम्यसतीं सतीम् ।**
**रूपिणीं विषसंयुक्तां पीत्वेव मदिरां नरः ॥ ७६ ॥**

( अयोध्या० १२ )

‘ दृष्टीला सुंदर दिसणारें मद्य प्याल्यावर मग डोकें फिरावयास लागलें असतां,

त्यांत भयंकर विष मिसळलेलें होतें, असे जसें वाटतें, त्याचप्रमाणे कैकेयी ही अ–सती असतां तिच्या मनोहर रूपाला भुलून मी तिला (सती) साध्वी, पतिव्रता असें आतापर्यंत समजत आलों. पण आता खात्री झाली की, ती तशी नाही.'

या ठिकाणीं मद्य व विषारी मद्य यांची उपमा दिली आहे. यावरून या कालीं मद्य होतें व मद्य प्यालें असतां काय होतें, तेंही लोकांस माहीत होतें, हें उघड होत आहे. याच्याचपुढे सुरापान करणाऱ्या ब्राह्मणाची उपमा दिलेली आहे.

**अनार्य इति मामार्याः पुत्रविक्रयकारकम् ।**
**विकरिष्यन्ति रथ्यासु सुरापं ब्राह्मणं यथा ॥ ७८ ॥**

(अयोध्या० १२)

' पुत्राचा विक्रय करून स्त्रीसुखाचा भोग घेणारा हा दशरथ अनार्यासारखा दुष्ट आहे, असें मला लोक म्हणतील व सुरापान करणाऱ्या ब्राह्मणाची जशी रस्त्यांतून निंदा होते, तशी माझी निंदा सर्व लोक करतील. '

या ठिकाणीं सुरापान करणाऱ्या ब्राह्मणाची निंदा रस्त्यांत होते, असें म्हटलेलें आहे. खालच्या खालच्या जातीच्या लोकांची सुरापानाने तशी निंदा होत नव्हती कीं काय ? अशी शंका या उपमेने येते.

**सुराघटसहस्रेण** (यक्ष्ये) । (अयोध्या० ५२–८९)

**सुराघटशतेन च ।** (अयोध्या. ५५–२०)

सीता गंगानदीची व कालिंदी नदीची प्रार्थना करीत असतां हजार सुराघट अर्पण करीन, असें म्हणत आहे. हाच उल्लेख दोन ठिकाणीं आलेला आहे. याचा उत्तान अर्थ ' दारूच्या १००० घागरी ' असा होतो. पण फक्त एका टीकाकाराने ( **सुर–अ–घट–सहस्र** ) देवांला हि दुर्मिळ सहस्र वस्तु असा याचा अर्थ केलेला आहे. दोनही ठिकाणीं हे श्लोक प्रक्षिप्त आहेत कीं काय, हें समजत नाही. कोणत्याही टीकाकारांनी यांस प्रक्षिप्त म्हटलेलें नाही.

जर हे श्लोक व ही नद्यांची पूजा प्रक्षिप्त न ठरली, तर देवपूजेमध्ये सुरेचें अर्पण करण्याची पद्धति या कालीं होती कीं काय, हें ठरवावें लागेल; पण अशी पद्धति कोठे असल्याचें दिसत नाही. म्हणून हीं दोनही वचनें प्रक्षिप्त असावीं

असें वाटतें. ' **सुराघटसहस्र** ' हे शब्द असलेले श्लोक तेथे न वाचले, तरी मागच्यापुढच्या संदर्भांत कांहीं बिघाड होत नाहीं; म्हणून शाक्तपंथी उपासकांनी हे श्लोक येथे घातले असावे, असें वाटतें. राम, लक्ष्मण अथवा सीता यांपैकी कोणीहि सुरेला स्पर्श करणारे नव्हते, इतकेंच काय पण यांनी इतक्या ठिकाणीं देवपूजा केलेल्या आहेत, पण त्यांत एकाही पूजेंत सुरा आलेली नाही. ती एकदम येथेच येते व ' हजारो घागरी ' अशा मोठ्या प्रमाणांत ती येते, म्हणून हें वर्णन संदर्भहीन आहे व यासाठीं हें प्रक्षिप्त आहे, असें वाटतें.

हें प्रक्षिप्त मानलें तरी दशरथाच्या बोलण्यांतील दोनही मद्यांच्या उपमा स्पष्ट आहेत व त्यांवरून त्या कालीं मदिरापान, अल्पस्वल्प का होईना, होतें असें म्हणावें लागतें.

## मन्त्र व पिशाच.

पिशाचबाधा व मन्त्रसामर्थ्य यांवर या कालच्या लोकांचा विश्वास असावा, असें वाटतें. मन्त्राने सर्पाला मण्डलामध्ये थांबवतां येतें, असें पुढील वचनांत म्हटलें आहे—

**मण्डले पन्नगो रुद्धो मन्त्रैरिव महाविषः ॥ ५ ॥**

( अयोध्या० १२ )

' महाविषारी सर्प मन्त्रांनी जखडून रेषेच्या मण्डलामध्ये थांबवावा ' म्हणजे त्याची स्वैर गति नष्ट व्हावी, तशी दशरथाची स्थिति कैकेयीच्या वर मागण्याने झाली, असें येथे वर्णन आहे.

एक रेषेची मर्यादा करतात व त्यांत सापाला मन्त्रांनी कोंडतात. अशी सध्याही समजूत आहे. हीच समजूत रामायणकालीहि अशीच होती. असें यावरून दिसतें.

पिशाचबाधेसंबंधाचे तीन उल्लेख याच प्रकरणांत आलेले आहेत. पिशाचबाधा झाल्याप्रमाणे कैकेयी आज बोलूं लागली आहे, असें दशरथ म्हणत आहे.

**भूतोपहतचित्तेव ।**

( अयोध्या १० । ३० )

**अनुभूतोपसर्गो वा ।**

( अयोध्या. १२ । २ )

**आविष्टासि गृहे शून्ये सा त्वं परवशं गता ॥**

( अयोध्या. १२ । १८ )

( भूत-उपसर्ग ) भूतबाधा झाल्याप्रमाणे अथवा शून्य घरामध्ये एखादा माणूस गेला, म्हणजे जसें त्यामध्ये भुताचा ( आविष्ट ) संचार व्हावा त्याप्रमाणे कैकेयी बोलत आहे.

ज्या घरांत कोणी रहात नाही, जीं पडकीं व ओसाड घरें असतात, त्यांत भुतें, पिशाचें असतात, अशी समजूत आजही आहे. हीच समजूत रामायणांत दिसत आहे. अशा ओसाड घरांत कोणी गेलें असतां पिशाचाचा संचार होतो. कैकेयी आजपर्यंत अशी कधींहि बोलली नाही, ती आज पिशाचबाधा झाल्यामुळे बोलत असावी, असें दशरथाला वाटलें.

दशरथाला पिशाचाची बाधा झाली असावी, असें लोक म्हणूं लागले—

**अद्य नूनं दशरथः सत्त्वमाविश्य भाषते ।**
**न हि राजा प्रियं पुत्रं विवासयितुमर्हति ॥ १० ॥**

( अयोध्या. ३३ )

'रामासारख्या प्रिय पुत्राला वनवासाला पाठवणं दशरथाला योग्य नाही. ज्या अर्थी तो असें बोलत आहे व तो रामाला वनांत पाठवीत आहे, त्या अर्थी त्यास पिशाचानें झपाटलें असावें.'

भूतबाधा माणसाला होते व माणसें त्या आवेशामध्ये हवें तें असंबद्ध बोलूं व करूं लागतात, ही समजूत येथें दिसते.

# दशरथाला भरतासंबंधाने शंका कां बरें यावी ?

रामचन्द्राचा राज्याभिषेक करण्याचा विचार राजा दशरथाने केला, त्या वेळीं दशरथाच्या मनामध्ये भरताकडून अथवा भरतपक्षीयांकडून कांहीतरी विघ्न उत्पन्न होईल, असें वाटत होतें, असें दिसतें. पहा—

**श्वस्त्वामहं अभिषेक्ष्यामि यौवराज्ये परंतप ॥ २२ ॥**
**तस्मात्त्वयाद्यप्रभृति निशेयं नियतात्मना ।**
**सह वध्वोपवस्तव्या दर्भप्रस्तरशायिना ॥ २३ ॥**
**सुहृदश्चाप्रमत्तास्त्वां रक्षन्त्वद्य समन्ततः ।**
**भवन्ति बहुविघ्नानि कार्याण्येवंविधानि हि ॥ २४ ॥**
**" विप्रोषितश्च भरतो यावदेव पुरादितः । "**
**तावदेवाभिषेकस्ते प्राप्तकालो मतो मम ॥ २५ ॥**
**कामं खलु सतां वृत्ते भ्राता ते भरतः स्थितः ।**
**ज्येष्ठानुवर्ती धर्मात्मा सानुक्रोशो जितेन्द्रियः ॥ २६ ॥**
**किं नु चित्तं मनुष्याणां अनित्यमिति मे मतम् ।**
**सतां च धर्मनित्यानां कृतशोभि च राघव ॥ २७ ॥**

( वा० रा० अयोध्या० ४ )

" हे रामा ! उद्या पुष्य नक्षत्र आहे. म्हणून मी तुला उद्याच राज्याभिषेक करणार आहें, यासाठी तूं आपल्या धर्मपत्नीसह आज दर्भास्तरणावर निजावें व जितेंद्रिय रहावें. ( २ ) **आज तुझे मित्रच तुझें रक्षण करोत; कारण अशा कार्यामध्ये पुष्कळ विघ्नें उत्पन्न होत असतात. ( ३ ) या अयोध्यानगरांतून भरत यापूर्वींच आपल्या आजोळीं गेला आहे, हें फारच उत्तम झालें आहे. तो येण्यापूर्वींच राज्याभिषेक झालेला बरा,** असें मला वाटतें. ( ४ ) जरी भरत धर्माप्रमाणे वागणारा आहे, तथापि चांगल्या

चांगल्या धार्मिकांचीं मनेंहि प्रसंगाविशेषीं चंचल होत असतात, हें आपण पाहतों." . . . . . .

असें रामाला दशरथ म्हणत आहे. दशरथाचे राम व भरत हे दोघेही मुलगे. दोघेही उत्तम शिकून तयार झालेले. दोघांवरहि दशरथाची प्रीति. हें सर्व खरें; पण भरताविषयी अथवा भरताच्या पक्षाच्या लोकांसंबंधाने दशथारच्या मनांत फारच संशय होता, असें यावरून दिसतें.

राजाकडे गुप्त हेरांकडून गुप्त बातम्या येत असतात. त्यामुळे प्रजाजनांमध्ये काय चळवळी चालत आहेत, हें राजांस समजत असतें; पण कांही गोष्टी समजल्या, तरी त्या उघड बोलतां येत नाहीत व ज्या बोलतां येतात, त्याही संभाळूनच बोलणें भाग असतें ! असाच वरील प्रसंग आहे.

सर्व मांडलिक राजे, सरदारदरकदार, प्रजेचे नेते व महाजन या सर्वांची सभा बोलावून, त्या सभेमध्ये रामालाच राज्याभिषेक करावा, असें दशरथाने सर्वानुमतें ठरवून घेतलें. हें झालें तरी तें रामाचें आसन सुदृढ करण्यासाठीच होय; कारण **त्या वेळीं यौवराज्याभिषेकाला प्रजेची अनुमति प्रत्येक वेळीं लागतच होती, असें दिसत नाही**; पण दुसरा भरताचा पक्ष आहे, तो प्रबळ होऊं नये, ही इच्छा या प्रकारची सभा बोलावण्यांत राजा दशरथाच्या मनांत असावी, असें दिसतें.

अशी सभा बोलावून त्या सभेंत रामाला उद्याच राज्याभिषेक करून टाकावा, असें दशरथाने ऐकमत्याने ठरवून घेतलें. ही सभा विसर्जन केली व पुनः रामाला एकान्तांत बोलावून आणलें व त्याच्याशीं एकान्तांतच जें भाषण झालें, त्यांतील कांही भाग वर दिला आहे. एकान्तांत केवळ रामालाच समजावा, अशा महत्त्वाचा हा भाग आहे—

(१) उद्याच राज्याभिषेक करणार ( म्हणजे मध्ये दिवसगत लावावयाची नाही. )

(२) रामाचे जे प्रिय मित्र असतील, त्यांनचि आजच्या रात्रीं राम व सीता यांचें रक्षण करावें. ( नुसत्या नेहमीच्या पहारेकऱ्यांवर विसंबून आजचें

काम भागणार नाही. कदाचित् रातोरात रामाला मारेकरीहि घातले जातील. कदाचित् नेहमीचे पहारेकरी फितूरही झाले असतील, अशा अनेक आपत्ति अशा वेळीं उत्पन्न होणें शक्य आहे. यासाठी रामाच्या जिवलग मित्रांनीच आज रामाचें रक्षण करावें. )

(३) भरत मावळयाकडे जाऊन १२ वर्षें झालीं. तो येण्यापूर्वीच रामाचा राज्याभिषेक व्हावा, हें उत्तम होय. ( कारण तो आला तर काय होईल, कोणी सांगावें ? )

(४) भरत जरी धार्मिक असला, तरी वेळप्रसंगीं धार्मिक माणसांचींहि मनें बिघडलेलीं दिसतात. ( म्हणून सावध रहावें, हें उत्तम व याचसाठी तो येण्यापूर्वी रामाचा राज्याभिषेक करावा, हें योग्य होय. )

दशरथाच्या मनांत भरतासंबंधाने असे विचार येत होते. भरताच्या आचरणांत अशा प्रकारचा संशय घेतला जा ा, असें कांहीच घडलेलें नव्हतें. पण कैकेयीबरोबर कैकेयीच्या बाजूची जी कांही मंडळी येऊन अयोध्येंत बसली होती, त्यांच्यांत अशीं कांहीतरी खलबतें चाललेलीं असणें, अगदी स्वाभाविक आहे. मुख्य नेत्याच्या नकळतच त्याचे अनुयायी हवीं तीं खलबतें करतात, असा पुष्कळदा अनुभव येतो. तसाच प्रकार येथे होत असावा; पण दशरथाला भरतामुळे किंवा भरतपक्षीयांकडून कांहीतरी विघ्नें होतील, अशी दाट शंका वाटत होती, यांत मात्र तिळमात्र शंका नाही.

भरतपक्षीयांकडून अशा प्रकारच्या खटपटी होऊं नयेत, म्हणून लग्न होतांच भरत व शत्रुघ्न यांना आजोळीं मामाकडे दशरथाने पाठवून दिलें, तें १२ वर्षेपर्यंत पुनः बोलावलेंहि नाही ! भरत गेला, त्या वेळीं कदाचित् दशरथाच्या मनांत कांही संशय नसेलही; पण आपल्या भरताला १२ वर्षें झालीं, तरी राजा त्याला अयोध्येंत बोलावून आणीत नाही, हें कांही विनाकारण घडलेलें नाही. दशरथ कांही भोळा नव्हता किंवा विसराळूही नव्हता. भरताचा पक्ष बळावला जाऊं नये, हा हेतु भरताला १२ वर्षें न बोलावण्यांत व मामाकडेच राहूं देण्यांत असावा, असें वाटतें. प्रथमचीं ४-५ वर्षें ही गोष्ट सहज घडली असेल; पण

पुढे भरताला आणण्याची गोष्टसुद्धां जी दशरथाने काढली नाही, त्यांत हे राजकारण निःसंदेह होतें, असें वाटतें.

रामाला राज्याभिषेक करावा, ही गोष्ट दशरथाच्या मनांत बरींच वर्षे घोळत असावी. राज्याभिषेकाच्या वेळीं रामाचें वय २८ वर्षांचें झालेलें होतें. भरत व इतर बंधूहि याच वयाचे होते. २० किंवा २२ हें वय यौवराज्याचें समजलें जातें; पण राम २८ वर्षांचा झाला, तरी दशरथाला या समारंभाची आठवणच झाली नाहीं, असें म्हणणें सयुक्तिक होणार नाही. राजा दशरथाचे यासंबंधींचे विचार मनांतल्या मनांत चाललेले असावे व हेरांकडून जनतेंतील पक्षोपपक्षांचे विचारहि त्याला समजले असावे. या हेरांनी आणलेल्या माहितींत कैकेयीपक्षीय लोक भरताला गादीवर बसवावें, अशा विचारांत आहेत, ही गोष्ट दशरथास कळली असावी व याचसाठीं भरत बाहेर राहील तितका बाहेरच रहावा, असें त्याने मनांत ठरविलें असावें. नाहीतर बारा वर्षे मावळ्याकडे राहूं देण्याचें दुसरें कांहीहि योग्य कारण संभवत नाही.

दशरथाची राज्यपरिषद् पुनर्वसु नक्षत्र असलेल्या दिवशीं भरली व दुसऱ्याच दिवशीं राज्याभिषेक उरकून घेण्याची घाई दशरथाने चालविली ! ही घाईहि सहेतुकच असली पाहिजे. दुपारी राजपरिषद् भरली व लगेच संध्याकाळीं राज्याभिषेकाची घोषणा झाली, तत्काळ शहरही शृंगारलें व दुसऱ्याच दिवशीं राज्याभिषेकाची घाई दशरथाने चालवली. याचें कारण असें दिसतें कीं, दुसऱ्या पक्षाची, म्हणजे भरतपक्षाच्या लोकांची अशीच तयारी या कार्यांत विघ्न करण्याची होती. निदान दशरथ राजाला तरी तसें वाटत असावें, असें वाटतें.

दशरथ राजा रामाला सांगत आहे कीं, **आजच्या रात्रीचे पहारेकरी तुझे जे सहृद्, अगदी जीवश्च कंठश्च मित्र असतील, तेच असावे.** कदाचित् या रात्रीं तुझ्या जिवाला भीतीहि उत्पन्न होईल. नेहमीचे पहारेकरी फितुर होण्याचा संभवही असेल. म्हणून रामाच्या जिवलग मित्रांनाच रामाच्या खोलीवर रात्रभर पहारा करण्याचा प्रसंग आला ! राजनीति ही अशी भयंकर आहे. वेळप्रसंगीं सरदार राजाचें रक्षण करतात व सरदारपुत्र राजपुत्राचें रक्षण करतात, तसाच हा प्रसंग आहे.

भरत १२ वर्षे बाहेर गेला, हें बरें झालें, असें दशरथ म्हणजे भरताचा बापच स्वतः म्हणत आहे ! १२ वर्षे बाहेर भरत असल्यामुळे भरताचा पक्ष म्हणून फार मोठा पक्ष अयोध्येंत नसेलहि कदाचित्; पण कैकेयीबरोबर आलेल्या कडव्या सरहद्दप्रांतांतील लोकांचा कैकेयीच्या ज्ञातिबांधवांचा मोठा जमाव अयोध्येंत स्थायी झालेला असावा. यांपैकी एखादा उठेल व तो भरताचा कैवार घेऊन रामावर घाला घालील, म्हणून जिवाला जीव देणारे रामाचे मित्रच आजच्या रात्रीं रामाचें रक्षण करूं देत, असा आशय दशरथराजाच्या बोलण्याचा येथे स्पष्ट दिसत आहे.

## रामाला शत्रु होते काय ?

जेव्हा दशरथाने वर लिहिल्याप्रमाणे रामाला " फार सावधगिरीने आजची रात्र काढ, **भरत येथे नाहीं, हें बरेंच आहे, तो बाहेर असेपर्यंतच तुझा राज्याभिषेक झालेला बरा,** " असें सांगून त्यास जावयास सांगितलें, तेव्हा भरताविषयी राम एकही अक्षर बरें किंवा वाईट, कांहीएक बोललेला नाही. जर रामाचा विश्वास भरतावर पूर्णपणें असता, तर याच वेळीं दशरथाला त्याने असें सांगणें योग्य होतें की, ' बाबा ! भरताविषयी असा संशय घेणें कधींहि योग्य होणार नाही.' पण राम तें दशरथाचें भाषण ऐकून घेतो व अगदी गप्प राहतो. यावरून उघड दिसतें की, कैकेयीच्या पक्षाच्या हालचालीबद्दल रामही थोडा साशंकच होता.

राजाचें भाषण ऐकून राजमंदिरांतून जो राम निघाला, तो कौसल्येच्या मंदिरांत आला. तेथे कौसल्या रेशमी सोवळें वस्त्र नेसून देवपूजा करीत बसली होती. डोळे मिटून ईश्वराचें ध्यान करण्यांत मग्न होती; पण तेथे सुमित्रा, लक्ष्मण व सीता हीं तिघेंही आधीच येऊन बसलीं होतीं. म्हणजे श्रीराम कौसल्येच्या मंदिरांत पोचण्यापूर्वीच तेथे सुमित्रा, लक्ष्मण व सीता हीं पोचलीं होतीं. कौसल्येने रामराज्याभिषेकाचें वृत्त ऐकतांच त्यांस आपणांजवळ बोलाविलें होतें.

कौसल्येने जर सुमित्रेस बोलाविलें, तर **कैकेयीस कां बरें बोलावूं नये?** हा महत्त्वाचा प्रश्न येथे उत्पन्न होतो व कौसल्येने सुमित्रेस बोलाविलें व कैकेयीस

बोलाविलें नाही, यामध्ये कांही तरी मतभेद असावा, असें स्पष्ट दिसतें. कौसल्या, सुमित्रा व कैकेयी यांचे महाल निरानिराळे होते. प्रत्येक महालाच्या बाहेर मोठें उद्यानही होतें. सुमित्रा जी आली ती थोड्या अंतरावर असलेल्या आपल्या महालांतूनच आली असली पाहिजे. जर कौसल्येने कैकेयीस असेंच बोलाविलें असतें, तर कदाचित् तीहि आली असती; पण कौसल्या व सुमित्रा यांची जशी मैत्री होती, तशी ती यांची कैकेयीशीं नसावी, असें तिला वगळलें, त्यावरून वाटतें.

## कैकेयीचा दरारा.

म्हाताऱ्या दशरथाला कैकेयीने अगदी आपल्या मुठींत ठेवलें होतें. यामुळे दशरथाला कैकेयीचें भय सर्वांत अधिक वाटत होतें. ही गोष्ट मन्थरेच्या भाषणांत व्यक्त होत आहे. पहा—

**दयिता त्वं सदा भर्तुः अत्र मे नास्ति संशयः ।**
**त्वत्कृते च महाराजो विशेदपि हुताशनम् ॥ २४ ॥**
**न त्वां क्रोधयितुं शक्तो न क्रुद्धां प्रत्युदीक्षितुम् ।**
**तव प्रियार्थं राजापि प्राणानपि परित्यजेत् ॥ २५ ॥**
**न ह्यतिक्रमितुं शक्तः तव वाक्यं महीपतिः ।**
**मन्दस्वभावे बुध्यस्व सौभाग्यबलं आत्मनः ॥२६॥**

( वा० रा० अयो० ९ )

" तुझ्यावर ( हे कैकेयी ! ) पतीचें फार प्रेम आहे, यांत मला संशय नाही. इतकेंच नव्हे, तर तूं रागावलीस, तर तो तुझ्याकडे पाहूंहि शकणार नाही. तुला प्रिय असलेली गोष्ट करण्यांत राजा आपल्या प्राणांचीहि पर्वा करणार नाही. तुझा शब्द खाली पाडण्यास तो राजा समर्थ नाही. हे मूर्खे ! पतीच्या प्रेमाचें केवढें हें बळ तुला अनुकूल आहे, हें तूं लक्ष्यांत घे. "

कैकेयीचें एवढें वजन राजावर होतें व याचमुळे कैकेयी इतर राण्यांस तुच्छ समजत असे व आपल्याच घमेंडींत असे. हिची ही घमेंड कौसल्येस व सुमित्रेस त्या तिच्यापेक्षा वडील असल्याने असह्य होई; पण दशरथामुळे त्यांचें कांही

चालत नसे. कौसल्या व कैकेयी यांचें एकमत नसे, हें समजण्यास एवढें प्रमाण पुरें आहे. कैकेयी यामुळेच इतर राण्यांचा अपमान कसा करी, तें पहा—

कुब्जा मन्थरा कैकेयीस म्हणते-

**दर्पान्निराकृता पूर्वं त्वया सौभाग्यवत्तया ।**
**राममाता सपत्नी ते कथं वैरं न यापयेत् ॥ ३७ ॥**

(वा० रा० अयोध्या० ८)

" हे कैकेयी ! तूं आपल्या सौंदर्याच्या घमेंडीनें कौसल्येला पूर्वी झिडकारलें होतेस, हें वैर ती कसें बरें विसरून जाईल ? "

या कुब्जेच्या बोलण्यावरून कैकेयी ही आपल्या सौदर्यानें उन्मत्त झालेली पोरगी होती व त्यामुळे ती इतर कौसल्या व सुमित्रा यांशीं फटकून वागे, असें दिसतें. कैकेयी ही केकय देशांतील तरुण मुलगी होती. तो देश सौंदर्यासाठी प्रसिद्ध आहे. हिच्या सुंदरपणास भुलूनच म्हातारपणीं दशरथानें हिच्याशीं लग्न केलें होतें. कौसल्या व सुमित्रा ह्या मध्यभारतांतील स्त्रिया असल्यामुळे साधरणपणें निमगोऱ्या असाव्या व कैकेयी ही सरहद्द-प्रांतांतील असल्यामुळे अधिक गोरी-गोमटी, नटेल व चढेल असावी.

कैकेयीचा बाप या दशरथास, बहुधा वयातीतपणामुळेच मुलगी देत नसावा; पण नंतर बरीच रदबदली झाल्यावर हिच्या मुलास राज्य देण्याच्या करारामुळे कैकेयी ही दशरथास मिळाली होती. असें वचन दशरथानें केकय राजास दिलें असल्याचें, रामच भरताला चित्रकूटावर सांगत आहे—

**पुरा भ्रातः पिता नः स मातरं ते समुद्वहन् ।**
**मातामहे समाश्रौषीत् राज्यशुल्कं अनुत्तमम् ॥**

(वा० रा० अयो० १०७।३)

" हे भरता ! आमच्या वडिलांनी तुझ्या आईशीं—कैकेयीशीं—विवाह करण्याच्या प्रसंगीं तुझ्या आजोबांना असें वचन दिलें होतें कीं, कैकेयीच्या मुलाला राज्य देईन. "

हें वचन दिल्यामुळेच म्हाताऱ्या दशरथाची या राज्याभिषेकाच्या वेळीं

तिरपिट उडालेली दिसत आहे. हें वचन त्याच्या अंतःकरणांत जाचत असल्याचें येथे स्पष्ट दिसत आहे. याच कारणानें दशरथानें भरताला मामाकडे पाठवला व तेथून त्याला १२ वर्षे परत आणला नाही. भरताचे लोक कट करीत असतील, राज्याभिषेकाच्या रात्रीं रामाच्या जिवावरही आघात होईल, या भीतीनें या वेळीं जो दशरथ गांगरलेला दिसत आहे, त्याच्या मुळांत हें त्याचेंच वचन होतें, असें वाटतें.

जेव्हा राम कौसल्येच्या मंदिरांत पोंचला, त्या वेळीं तेथें सुमित्रा होती; पण कैकेयीला बोलावलें नव्हतें व बोलावलें असतें, तरी ती कदाचित् आलीहि नसती, असें वरील वागणुकीवरून दिसतें. ती फटकून वागत होती व तिला अधिक ताठा होण्याचें कारणही असें होतें की, राजकारणाचें कामकाज आटोपल्यानंतर दशरथ राजा कैकयीच्याच महालांत नेहमी पडलेला असे. याचें कारण तिच्या असाधारण सौंदर्यामुळें तो म्हातारा तिच्यावर फारच आकर्षित झालेला होता व याच कारणामुळे कौसल्या व सुमित्रा यांचा एक पक्ष व आवडत्या कैकेयीचा दुसरा पक्ष बनलेला होता. म्हणून रामराज्याभिषेकाचें वृत्त समजतांच कौसल्येनें सुमित्रेस आपल्या महालांत बोलावून घेतलें; पण याची वार्ताहि कैकेयीस तिनें कळविली नव्हती. सर्व नगर शृंगारलें गेलें, तरी या मंगल उत्सवाची वार्ताही कैकेयीच्या कानीं अथवा तिच्या दासीच्या कानीं कोणीहि पोंचविलेली नव्हती ! यावरून दोन पक्ष अयोध्येंत होते व त्यांत ऐकमत्य नव्हतें, हें उघड होतें. याची उत्तम छाया कौसल्येच्या भाषणांत दिसत आहे—

**वत्स राम, चिरं जीव, हतास्ते परिपंथिनः ।**
**ज्ञातीन् मे त्वं श्रिया युक्तः सुमित्रायाश्च नन्दय ॥**

(वा० रा० अयो० ४।३९)

जेव्हा राजा दशरथाचा निरोप घेऊन राम कौसल्येकडे आला व त्यानें आपल्या आईस ही आपल्या राज्याभिषेकाची मंगल वार्ता सांगितली, तेव्हा कौसल्या म्हणत आहे की–" हे बाळा रामा ! चिरंजीव हो ! **तुझे शत्रु नाहीसे झाले !** आता राज्यश्रीनें युक्त होऊन माझ्या व सुमित्रेच्या **जातिबांधवांना आनंद दे.**"

यावरून स्पष्ट होत आहे की, रामाला कांहीतरी शत्रु होते व ज्या अर्थी कौसल्या म्हणत आहे की, **माझ्या व सुमित्रेच्या ज्ञातिबांधवांना आनंदित-कर;** ज्या अर्थी ती कैकेयीच्या ज्ञातिबांधवांना आनंदित कर, असें मुळीच म्हणत नाही व कैकेयीचें किंवा भरताचें नांवसुद्धा आपल्या भाषणांत काढीत नाही, त्या अर्थी रामपक्षीयांचे ( **परिपंथिनः** ) शत्रु हे कैकेयीपक्षीय असले पाहिजेत, हें उघड होतें. या कौसल्येच्या बोलण्यांत **'आपले व सुमित्रेचे ज्ञातिबांधव'** आलेले आहेत. तसेंच मंथरेच्या बोलण्यात कैकेयीचे ज्ञातिबांधत आलेले आहेत पहा—

**रामस्तु भरते पापं कुर्यादेव न संशयः ॥ ३२ ॥**
**तस्माद्राजगृहादेव वनं गच्छतु राघवः ॥**
**एतद्धि रोचते मह्यं भृशं चापि हितं तव ॥ ३३ ॥**
**एवं ते ज्ञातिपक्षस्य श्रेयश्चैव भविष्यति ।**
**यदि चेद्भरतो धर्मात् पित्र्यं राज्यमवाप्स्यति ॥ ३४ ॥**
**स ते सुखोचितो बालो रामस्य सहजो रिपुः ।**

( वा० रा० अयो० ८ )

"राम राज्यावर आला, तर भरताचा नाश करील, यांत मुळीच संशय नाही; म्हणून राम राजवाड्यांतून आजच वनांत जाऊं दे. मला हेंच बरें वाटतें व यांतच तुझें हितहि आहे. असें झालें, तरच (**ते ज्ञातिपक्षस्य श्रेयः**) तुझ्या ज्ञातिबांधवांचें कल्याण होईल. भरताला जर वडिलांचें राज्य मिळेल, तर तें योग्य होईल. रामाचा ( **सहजो रिपुः भरतः** ) सहज शत्रु भरत आहे." अर्थात् भरताचाही सहज शत्रु राम हाच आहे.

हें कुब्जा मंथरेचें भाषण आहे. **कैकेयीच्या ज्ञातिबांधवांमध्ये कोणते विचार चालत होते,** तें या मंथरेच्या बोलण्यांत स्पष्ट दिसत आहे. येथे कैकेयीचे ज्ञातिबांधव अयोध्येंत होते, असें स्पष्ट म्हटलें आहे व ते रामाला आपला सहज शत्रु समजत होते, हेंहि स्पष्टच आहे.

पूर्वी कौसल्येच्या भाषणांत ( १ ) कौसल्येचे ज्ञातिबांधव व ( २ ) सुमित्रेचे ज्ञातिबांधव आलेले आहेत व रामाला राज्याभिषेक होतांच ( ३ ) रामाचे

शत्रु नष्ट होतील, असेंहि म्हटलेलें आहे. या भाषणांत मंथरेने ( १ ) कैकेयीचे ज्ञातिबांधव येथे आहेत, असें सांगितलें असून, ( २ ) भरत गादीवर येण्यानेच त्यांना आनन्द होईल, असें म्हटलें आहे. ( ३ ) भरत व राम हे सहज शत्रु आहेत, असेंहि म्हटलें आहे.

कौसल्येचें व मंथरेचें म्हणणें अगदी एकसारखेंच, पण परस्परविरोधी आहे. तेव्हा रामपक्ष व भरतपक्ष असे दोन पक्ष अयोध्येंत होते, असें म्हणणें अगदीच अयोग्य होईल, असें वाटत नाही; पण हा पक्षभाव प्रत्यक्ष राम व भरत यांत कदाचित् नसेलहि; पण तत्पक्षीयांत तो प्रबल स्वरूपांत होता, हें उघड होत आहे.

( १ ) दशरथाला रामाच्या जिवाबद्दल भीति वाटते, ( २ ) तो राज्याभिषेकाच्या पूर्वरात्रीला रामाचें रक्षण करण्यासाठी विशेष विश्वासू लोकांची नेमणूक करतो, ( ३ ) दशरथ भरताविषयी संशय घेतो, ( ४ ) हें ऐकून राम गप्प बसतो, ( ५ ) रामराज्याभिषेकाची वार्ता ऐकून कौसल्येस रामाचे शत्रु शमले, असें वाटून बरें वाटतें व ( ६ ) आपल्या व सुमित्रेच्या ज्ञातिबांधवांस यापुढे बरे दिवस येतील, असेंहि वाटतें, ( ७ ) तसेंच कैकेयीपक्षाच्या लोकांसही भरत गादीवर आला, तर आपले ज्ञातिबांधव सुखांत राहतील, असें वाटतें व ( ८ ) राम व भरत हे स्वाभाविक शत्रूच आहेत, असें वाटतें. ( ९ ) कौसल्येशीं बोलत असतांनासुद्धा राम कैकेयीबद्दल अथवा भरताबद्दल एकसुद्धा बरा शब्द बोलत नाही, हे मुद्दे येथपर्यंत स्पष्टपणें प्रतिपादिले.

या मुद्द्यांचा राजकीय दृष्टीने विचार केला असतां, असें स्पष्ट दिसतें कीं, या वेळीं अयोध्येंत ( १ ) रामपक्ष, किंवा कौसल्यापक्ष, ( २ ) सुमित्रापक्ष , ( ३ ) भरतपक्ष अथवा कैकेयीपक्ष, असे पक्ष होते व त्या पक्षांत बरेच ज्ञातिबांधव सामीलहि होते. कौसल्या व सुमित्रा यांच्या पक्षांत एकजूट होती व कैकेयीपक्ष मात्र अगदी निराळा होता. या पक्षांच्या मुख्यांमध्ये फार वैमनस्य नसलें, तरी त्यांच्या अनुयायांत फार चुरस होती व ती चुरस राजा दशरथ, महाराणी कौसल्या व युवराज रामचन्द्र यांच्या कानावर जाईल, इतकी तीव्र स्वरूपाची होती, हें वर दिलेल्या माहितीवरून वाचकांच्या ध्यानीं येईल.

या पक्षांमध्ये ही चुरस असण्याचीं कारणेंहि तशींच महत्त्वाचीं होतीं. तीं अशीं आहेत- ( १ ) कौसल्या पट्टराणी असल्यामुळे तिच्या मुलाला राज्य मिळालेंच पाहिजे, हा चालू वहिवाटीचा हक्कच आहे, हें या पक्षाचें सरळ म्हणणें होतें. ( २ ) दशरथालाहि हा हक्क मोडून कैकेयीस दिलें तसें वचन देण्याचा अधिकारच नाही, असें या पक्षाचें म्हणणें होतें. ( ३ ) राम गुणांनीहि लोकप्रिय होता, तेव्हा तुलनेनेहि रामाकडे लोकमताची अनुकूलता अधिक होती. ( ४ ) सुमित्रेच्या ज्ञातिबांधवांचा पक्ष स्वतंत्र उभा राहूं शकत नसल्यामुळे तो रामपक्षालाच अनुकूल होणें क्रमप्राप्तच होतें. या पक्षाने रामाची बाजू अधिक बळकट केली होती. ( ५ ) दशरथाने भरताला १२ वर्षे दूरदेशीं त्याच्या मामाकडे पाठवून रामपक्षाला मदत व भरतपक्षाची हानि करण्याची खटपट जाणूनबुजून केली होती. भरत अयोध्येंत असता, तर त्याच्या पक्षाला जेवढा जोर येणें शक्य होते, तेवढा जोर भरत येथे नसल्याने येणें शक्य नव्हतें, हें दशरथ जाणून होता. ( ६ ) कैकेयीच्या पक्षाचें म्हणणें असें होतें की, लग्नाच्या वेळीं दशरथाने कैकेयीच्या पुत्राला राज्य देण्याचें वचन स्पष्ट शब्दांत दिलेलें आहे. हें वचन मिळालें नसतें, तर हें लग्नच झालें नसतें. यामुळे हें वचन पाळणें हेंच राजाचें आद्य कर्तव्य आहे. ( ७ ) या वचनापप्राणे नेहमी राजा कैकेयीकडेच पडलेला असतो, तेव्हा तो तिच्या मुठींत गेलेला आहे. म्हणून भरतच राज्यावर आला पाहिजे, असें भरतपक्षीयांस वाटे.

असें हें या पक्षांतील लोकांचें म्हणणें दशरथ, कौसल्या व राम यांना चांगलें माहीत होतें. दशरथाचें वचन गेलें होतें, हें दशरथ विसरला नव्हता. म्हणूनच त्याने भरताला १२ वर्षे मामाकडे पाठवलें व त्याला अयोध्येंत आणलेंच नाही, यामुळे कैकेयीच्या पक्षाची त्याने शक्ति पुष्कळच कमी केलेली होती. इतकेंच नव्हे तर राजपरिषदेस अनेक राजांना बोलाविलें; पण केकय राजा अथवा युधाजित् ( भरताचा मामा ) यांस बोलावलेंसुद्धा नाही—

**नानानगरवास्तव्यान् पृथग्जानपदानपि ।**
**समानिनाय मेदिन्यां प्रधानान् पृथिवीपतिः ॥ ४६ ॥**
**तान् वेश्म नानाभरणैर्यथार्हं प्रतिपूजितान् ।**

दर्शालंकृतो राजा प्रजापतिरिव प्रजाः ॥ ४७ ॥
न तु केकयराजानं जनकं वा नराधिपम्।
त्वरया चानयामास पश्चात् तौ श्रोष्यतः प्रियम् ॥ ४८ ॥
(वा० रा० अयो० १)

अथ तत्र सहासीनाः तदा दशरथं नृपम्।
प्राच्योदीच्याः प्रतीच्याश्च दाक्षिणात्याश्च भूमिपाः ॥२५॥
म्लेच्छाश्चार्याश्च ये चान्ये वनशैलान्तवासिनः।
उपासांचक्रिरे सर्वे तं देवा वासवं यथा ॥२६॥
(वा० रा० अयो० ३)

"दशरथानें पूर्व, पश्चिम, उत्तर व दक्षिण दिशांतील देशांचे सर्व मांडलिक राजे, म्लेंच्छ व आर्यराजे, पर्वत व वनें यांतील राजे, जे बोलावण्याजोगे होते, त्या सर्वांस बोलाविलें होतें. ते आल्यानंतर त्यांचा यथायोग्य सत्कार करून त्यांना योग्य आसनांवर बसविलें होतें. दशरथाची ही अशी राजपरिषद् भरली; पण यांत फक्त **कैकयराजा व जनकराजा** या दोघांसच बोलाविलें नव्हतें; कारण त्यांना ही मंगल वार्ता आपोआप मागाहून कळेल व आनंद होईल, असें त्यास वाटलें!"

दशरथाच्या अंतःकरणांत कशी कालवाकालव चाललेली होती, तें यावरून समजून येतें. दूरदूरचे राजे बोलावले व या दोनच राजांस कां बरें वगळलें? अयोध्येपासून चार दिवसांच्या रस्त्यावर पूर्वेस जनक होता व पश्चिमेस ७ दिवसांच्या मार्गावर केकय राजा होता. या दोघांलाच तेवढे वगळण्यांत दशरथाचा फार मोठा राजकीय हेतु होता व यांस त्यानें मुद्दामच वगळलें होतें.

समजा, केकय राजाला बोलावलें असतें, तर तो कैकेयीच्या लग्नाच्या वेळीं दिलेलें वचन पुढे करून भरताला गादी मिळाली पाहिजे, असें म्हणालाच असता. हे सरहद्द-प्रांतांतले राजे नेहमीच युद्धास तयार असत व ते नेहमीच युद्धासाठीं सज्ज असत. तेव्हा दशरथानें मुकाट्यानें भरताला राज्य तरी द्यावें, किंवा राम व भरतामध्ये अर्धें राज्य विभागून तडजोड तरी करावी, अथवा युद्धास तरी उभें रहावें; याशिवाय त्यास गत्यंतर नव्हतें. तसेंच केकय राजास आमंत्रण

दिलें असतें, तर जनकालाहि बोलावणें भाग होतें. जनक आला असता, तर त्याने रामाचाच पक्ष घेतला असता. अशा रीतीने या दोघांना बोलावण्यांत राज्यारोहण तर घडलेंच नसतें; पण आपसांत यादवी माजली असती, रक्तपात झाला असता व शेवटीं काय घडतें, हें सांगणें कठीण झालें असतें. म्हणून दशरथाने केकयराजा व जनक यांपैकीं कोणासच बोलावलें नाहीं व आपल्या मताने करतां येईल, तें करून रामाचा राज्याभिषेक निर्विघ्न व्हावा, असें केलें.

दशरथाने या दोनच राजांस वगळण्यांत वर लिहिल्याप्रमाणे फार मोठा शहाणपणा व दूरदर्शीपणा केला होता, हें खरें आहे; पण अयोध्येंत हें दुपक्षी राजकारण शिजत होतें व चांगलें ऊनास आलें होतें, हेंहि यावरूनच उघड होत आहे व यामुळेच रामाने जेव्हा दशरथाच्या तोंडून भरताविषयींचा संशय ऐकला, तेव्हा जी मुग्धता स्वीकारली, ती दशरथाच्या बोलण्यास अनुमोदन देणारीच होती, यांत शंका रहात नाहीं.

# रामालाहि शंका होतीच.

श्रीरामचन्द्राला दशरथाने कैकेयीच्या वडिलांस दिलेलें वचन माहीत होतें. या वचनामुळे आपल्या राज्याभिषेकास अडथळा येणार, याची जाणीव रामास होती, दशरथासहि होती व कौसल्येसहि होती. या वचनामुळेच कैकेयी ही कौसल्येस मुळींच जुमानीत नव्हती. सुमित्रा तर बिचारी मधली असल्यामुळे तिला कांहीं अधिकार नव्हताच. दशरथाच्या भाषणांत व कौसल्येच्या भाषणांत या अडथळ्याची स्पष्ट जाणीव आहे. उद्याच राज्याभिषेक होणार, हें समजतांच ( **हतास्ते परिपंथिनः** ) तुझ्या शत्रूंचा नायनाट झाला, असें सद्गदून कौसल्या म्हणत आहे, तें यामुळेच होय. दशरथाचें भाषण व कौसल्येचें भाषण ऐकून राम गप्प राहतो, ती त्याची मुग्धता संमतिदर्शकच होती, असें वाटतें; कारण थोर राजकारणी लोक फार बडबडे नसतात.

राजसभेमध्ये रामाला राज्याभिषेक करण्याचें ठरलें व सभा समाप्त होतांच राम आपल्या मंदिरांत पोचला. इतक्यांत दशरथ राजाने त्यास पुनः बोलावलें. राजसभेच्या मंडपापासून रामाचें मंदिर पाव कोसापेक्षा फार दूर नव्हतें. इतक्या

तातडीने राजाचें बोलावणें आल्यामुळे रामाला कांहीतरी बिघडलें असल्याची शंका आली, ती या शिजत असलेल्या राजकारणामुळेच होय.

**रामस्य भवनं शीघ्रं राममानयितुं पुनः ॥ ४ ॥**
**द्वाःस्थैरावेदितं तस्य रामायागमनं पुनः ।**
**श्रुत्वैव चापि रामस्तं प्राप्तं शङ्कान्वितोऽभवत् ॥ ५ ॥**
**प्रवेश्य चैनं त्वरितो रामो वचनमब्रवीत् ।**
**यदागमनकृत्यं ते भूयस्तद् ब्रूह्यशेषतः ॥ ६ ॥**

( वा. रा. अयोध्या. ४ )

दशरथाच्या सभेंतून राम आपल्या वाड्यांत पोचत आहे, इतक्यांत पुनः राजाकडून बोलावणें आलें, हें पाहून राम ( **शङ्कान्वितोऽभवत्** ) संशयग्रस्त झाला व बोलवावयास आलेल्या दूतास म्हणाला की—'कां बरें पुनः बोलावलें आहे, तें सविस्तर सांग पाहूं ?' प्रश्न विचारण्याचा उद्देश असा दिसतो की, इतक्या अवधींत आणखी कोणीतरी विघ्नकर्ते राजाकडे गेले कीं काय, राजाच्या मनांत कांही निराळाच विचार आला कीं काय, तें आपणांस समजवें. असा कांहीतरी घोटाळा होईल, अशी शंका रामाला वाटत असावी, असें येथे स्पष्ट दिसत आहे.

दशरथही आपलें मन कदाचित् बदलेल, तें बदललें नाही तोंपर्यंत, म्हणजे उद्याच्या उद्याच रामाला राज्याभिषेक व्हावा, असें तोच म्हणत आहे. यावरून दशरथावरहि अनेक ठिकाणांहून दडपणें येत असलीं पाहिजेत, अथवा तसें होण्याचा संभव तरी असावा, असें वाटतें—

**प्रायेण च निमित्तानामीदृशानां समुद्भवे ।**
**राजा हि मृत्युमाप्नोति घोरां चापदमृच्छति ॥ २ ॥**
**तद्यावदेव मे चेतो न विमुह्यति राघव ।**
**तावदेवाभिषिञ्चस्व चला हि प्राणिनां मतिः ॥ ३ ॥**

( वा. रा. अयोध्या. ४ )

'अशीं निमित्तें झालीं, म्हणजे राजा तरी मरतो अथवा त्याला घोर आपत्ति

तरी सोसावी लागते. यासाठी जोंपर्यंत माझें **मन बदललें नाही**, तोंपर्यंतच तुझा राज्याभिषेक होऊं दे; कारण मनुष्याची मति फार चञ्चल आहे ! '

दशरथ स्वतःच आपणांविषयी असे उद्गार काढीत आहे ! त्याचें मन बदललें जाईल, अशी परिस्थिति त्या ठिकाणीं होती, असें यावरून स्पष्ट दिसतें. दशरथाचें मन बदलणार म्हणजे तें आज रामाला अनुकूल आहे, तें कांही वेळाने भरताला अनुकूल होणार, एवढाच फरक होणें शक्य होतें. जर भरतासाठी भीड घालणारे लोक तेथे नसते व त्यांची भीड मोडणें दशरथास शक्य असतें, तर असे शब्द दशरथ कधींहि न बोलता. दशरथाची या वेळची परिस्थिति अगदी केविलवाणी दिसत आहे.

दशरथाचें मन रामाकडे नऊ आणे व भरताकडे सात आणे होत होतें. असें यावरून दिसतें. कदाचित् तें दडपणाने भरताकडेही अधिक वळण्याचा संभव होता. भरतास आजोळीं १२ वर्षें ठेवल्यावरहि भरताकडे इतकें मन वळलें जाणें शक्य होतें, हें येथे पाहण्यासारखें आहे. कौसल्या ज्या ( **परिपंथिनः** ) शत्रूंचा उल्लेख करीत आहे, ते हेच शत्रु होत. रामालाहि ही परिस्थिति माहीत असावी; कारण तो तर अयोध्येंतच रहात होता.

दशरथ व कौसल्या यांच्या बोलण्यानंतर राम गप्प राहतो, भरताच्या अनुकूल एकही शब्द रामाच्या तोंडांतून निघत नाही, यावरून रामालाहि आपला राज्याभिषेक निर्विघ्न पार पडेल, अशी खात्री नसावी, असें दिसतें. जेव्हा कौसल्येच्या महालांत असतांनाच उद्याच्या राज्याभिषेकाची तयारी करण्या संबंधाचें कांही बोलणें झालें, तेव्हा राम लक्ष्मणास म्हणत आहे—

**इत्येवमुक्तो मात्रा तु रामो भ्रातरमब्रवीत् ।**
**प्राञ्जलिं प्रह्वमासीनं अभिवीक्ष्य स्मयन्निव ॥ ४२ ॥**
**लक्ष्मणेमां मया सार्धं प्रशाधि त्वं वसुंधराम् ।**
**द्वितीयं मेऽन्तरात्मानं त्वामियं श्रीरुपस्थिता ॥ ४३ ॥**
**सौमित्रे भुंक्ष्व भोगांस्त्वं इष्टान् राज्यफलानि च ।**
**जीवितं चापि राज्यं च त्वदर्थमभिकांक्षये ॥ ४३ ॥**

( वा. रा. अयोध्या. ४ ).

' आईचें भाषण ऐकून राम लक्ष्मणाला म्हणाला की, हे लक्ष्मणा ! माझ्यासह तूंही या राज्याचें शासन कर. तूं खरोखरच माझा दुसरा अन्तरात्माच आहेस व तुलाच हें राज्यवैभव प्राप्त झालें आहे, असें समज. तुला जे भोग प्रिय असतील, ते तूं यथेष्ट भोग. माझें जीवित व हें राज्य हें सर्व तुझ्यासाठीच आहे. '

लक्ष्मणाला राम येथे असें म्हणत आहे; पण तेथेही भरताचें नांवसुद्धा राम घेत नाही. भरतासह आपण आता राज्यसुख भोगूं, असें तो म्हणत नाही. कैकेयीकडे जाऊन तिला ही राज्याभिषेकाची वार्ता सांगत नाही. या गोष्टी नजरचुकीने किंवा घाईमुळे झाल्या असतील, असें मानतां येणें अगदी अशक्य आहे. दशरथ, कौसल्या या दोघांच्या उद्गारांत स्पष्टता फार आहे. दशरथ राजकारणी असल्यामुळे फारच संभाळून बोलली आहे व कौसल्या स्त्रीस्वभावाप्रमाणे ' तुझ्या शत्रूंचें वाटोळें झालें,' असें स्पष्ट बोलली आहे; पण दोघांच्याहि हृदयांत एकाच प्रकारचें शल्य जाचत होतें, हें उघड आहे. रामाने आपला गंभीरपणा सोडला नाही; पण तीनही प्रसंगीं तो भरतासंबंधी अगदी मुग्ध रहात आहे. दोन वेळची ही मुग्धता " मी ऐकत आहें, तें खरें आहे, " असें म्हणण्यासाठीच असावी, असें वाटतें.

भरतासंबंधी म्हणावयाचें तर असें म्हणतां येईल की, शंका घेतां येईल असा एकहि शब्द केव्हाहि भरताने उच्चारलेला नाही. खरें म्हटलें तर रामाच्या तोंडचाहि एकसुद्धा शब्द असा नाही की, जो भरताच्या विरुद्ध होता, असें खात्रीने म्हणतां येईल. दशरथाने भरताविषयी शंका घेतली, तेव्हा राम गप्प राहिला व कौसल्येच्या बोलण्यानंतरहि राम भरताच्या अनुकूल बोलला नाही, किंवा राज्याभिषेकासारख्या प्रसंगीं भरतशत्रुघ्न असते, तर बरें झालें असतें, असेंहि म्हणाला नाही. एवढेंच काय तें यासंबंधी म्हणतां येतें.

कोणी बोलला नाही, हा कांही भरपूर पुरावा होऊं शकत नाही; पण दशरथ, कौसल्या व राम जें काय बोलले, तें जमेस धरलें, तर त्यावरून राम व भरत यांना राज्याभिषेक करावा, असें म्हणणारे दोन प्रबल पक्ष अयोध्येंत होते, हें स्पष्ट दिसत आहे. दशरथाला व कौसल्येला शत्रुत्व वाटावें, एवढा प्रबल भरताचा पक्ष होता, हेंहि त्यावरूनच दिसत आहे.

येथे आम्ही **रामाचा पक्ष** व **भरताचा पक्ष** असे शब्दप्रयोग केलेले आहेत. हे शब्दप्रयोग केवळ सूचक आहेत; ते खरे नाहीत, हें येथे वाचकांनी ध्यानांत ठेवावें; कारण रामाला राज्यावर बसवावें, असें म्हणणारा एक पक्ष होता व दशरथच या पक्षांत होता; तरी रामानेच स्वतः या पक्षाची उभारणी केली असेल, असें म्हणतां येत नाही. तसेंच भरताला राज्यावर बसवावें, असें म्हणणारा कैकेयीच्या ज्ञातिबांधवांचा एक पक्ष होता; पण त्या पक्षाची उभारणी भरतानेहि केलेली नव्हती; कारण भरत १२ वर्षे अयोध्येंत नव्हता. हें लक्षांत घेऊन, हे पक्ष असले, तरी त्यांच्या कृत्यांबद्दल रामाला किंवा भरताला उत्तरदायी म्हणतां येणार नाहीं, हें वाचकांनीं विसरतां नये.

रामाने उभा केलेला नसला, तरी रामालाच गादी मिळावी, असें म्हणणारा तो '**रामाचा पक्ष**' व भरताने प्रत्यक्ष उभा केला नसला, तरी भरताला गादी मिळावी, असें म्हणणारा तो '**भरताचा पक्ष**' असें येथे समजलें पाहिजे. यापेक्षा यांत या दोनही राजपुत्रांचा अधिक संबंध नाही, असें आम्हास वाटतें. हे दोघेहि स्वतः आदर्श बंधु असूनहि ज्ञातिबांधवांमुळे हे पक्ष बनले होते, हें येथे विशेष लक्ष्यांत ठेवणें इष्ट आहे.

दशरथ राजा राज्य करीत असल्यामुळे त्याच्या म्हणण्यास रुकार देणारे लोक पुष्कळच असणें स्वाभाविक आहे. राजांचीं जेव्हा लग्नें होतात, तेव्हा मुलीबरोबर माहेराकडून बराच मोठा लवाजमा येत असतो. हजारो दासदासी व इतर लोक बरोबर येतात. या इतर लोकांत बरीच मानमान्यतेची मंडळी असतात. कौसल्या ज्यांस '**स्वज्ञाति**' असें म्हणत आहे व सुमित्रेच्या ज्ञातींचा उल्लेख करीत आहे व कैकेयीच्या ज्ञातींचा उल्लेखहि कुब्जेने केला आहे, त्या त्या '**स्वज्ञाति**' या होत व या स्वज्ञातींमधील लोक वरील पक्षांची उभारणी करण्यांत गुंतलेले होते. यावरून लक्ष्यांत येईल की, राम व भरत यांचीं मनें परस्परांविषयीं सांशंक नसलीं, तरी असे पक्ष उभे होणें शक्य आहे. राम राजधानींतच असल्याने व दशरथाची अनुकूलता त्यास असल्याने रामपक्ष जोरावला व भरत अयोध्येंतच नसल्याने व त्यास दशरथाची प्रतिकूलता असल्याने भरताचा पक्ष हीनबल झाला, हें निराळें; पण यानंतर भरताच्या पक्षाचा

जोर कैकेयीनेच स्वतः उचल केल्यामुळे व राजाला वचनांत पकडल्यामुळे वाढला व रामालाच वनांत जावें लागलें. हें पुढे ओघाने व्हावयाचें तसेंच झालें; कारण राजकारणांत पक्ष असले, म्हणजे कोणत्या पक्षाचें केव्हा काय होईल व काय नाही, हें कांहीं सांगतां येणार नाही. दशरथसुद्धा म्हणतच आहे की, ' माझें मन कदाचित् बदलेल. ' हें म्हणण्याचें कारण खरें होतें, हें रामाच्या वनवासाने ठरलें. असो.

आता आपण कैकेयीकडे वळूं. कैकेयी आनंदाने नेहमीप्रमाणेच आपल्या महालांत स्वस्थ होती. तिची दासी मंथराही तिच्याच महालांत होती. सर्व अयोध्येंत गुढ्या-तोरणें उभारण्याची धावपळ चालली होती. सर्व नगर शृंगारलें होतें. सर्व लोक दुसरा दिवस उगवण्याची वाट पाहूं लागले होते, तरी रामाच्या राज्याभिषेकाची वार्ता कैकेयीपर्यंत पोचली नव्हती. नगर कां शृंगारताहेत, असा प्रश्न मंथरेने रामाच्या दाईस विचारला, तेव्हा तिच्याकडून मंथरेस समजलें की, उद्या सकाळीं रामाला राज्याभिषेक होणार आहे, म्हणून सर्व नगर शृंगारलें जात आहे व लोक आनंदानें उचंबळत आहेत. हें ऐकतांच मंथरेच्या पायाची कळ मस्तकापर्यंत पोचली व ती तेथून तत्काल निघून कैकेयीकडे गेली.

प्रथम मंथरेने रामराज्याभिषेकाची वार्ता कैकेयीस सांगितली. ती ऐकून कैकेयीस आनंद झाला. ( वा० रा० अयोध्या ७।३३-३६ ) पण पुढे जेव्हा मंथरेने खूपच विष तिच्या मनांत भरविलें, तेव्हा ती रागावली व ती मंथरेच्या म्हणण्याप्रमाणे या उत्सवांत विघ्न करण्यास तयार झाली.

## मंथरेचें भाषण

" हे मूर्ख कैकेयी ! भयंकर दुःख प्राप्त झालें असतां, तूं आनंदित होत आहेस, या तुला म्हणावें तरी काय ? तुझ्या सवतीचा पोर उद्या गादीवर बसणार, मग तुला येथे कोण बरें विचारील ? हें राज्य जसें रामाला मिळावें, असें ठरवलें आहे, तसाच या राज्यावर भरताचाहि अधिकार आहे. यामुळे भरतापासून रामाला व रामापासून भरताला भय होणें स्वाभाविक आहे. रामाच्या पक्षाच्या लोकांनी उचल खाल्ली, यामुळे उद्याच रामाला राज्याभिषेक होणार आहे. मग तुझ्या

मुलाला कोण बरें विचारील? त्यासाठी मला फारच दुःख होत आहे."

"उद्या एकदा राम राज्यावर बसला, म्हणजे तुला कौसल्येची दासी होऊन येथे वागावें लागेल. तुझा मुलगा भरत तर रामाचा दासच होईल. रामाच्या पक्षाचीं माणसें आनंदित होतील व तुझ्या पक्षाच्या माणसांचें दुःख वाढत जाईल. अशा रीतीने हा उद्या भरताचा नाशच होणार आहे." ( वा० रा० अयो० स० ८।१-१२ )

हें मंथरेचें भाषण ऐकून कैकेयी तिला म्हणाली की, "अगे मंथरे! राम व भरत यांत मला कांहींसुद्धा फरक वाटत नाही. रामाला राज्य मिळालें, तरी तो कांहीं आम्हांला वाईट रीतीने वागवणार नाही." असें कैकेयीचें भाषण ऐकून मंथरा फारच दुःखित होऊन म्हणाली—

"अगे मूर्ख कैकेयी! तुला राजकारण मुळीच कळत नाही. उद्या राम राज्यावर बसला, म्हणजे भरताच्या सर्व वंशाचे राज्यावरील सर्व अधिकार गेले म्हणून समज. राम राज्यावर आला, म्हणजे प्रथमतः तो भरताला देशोधडीस लावील. भरताला राजाने बारा वर्षे मावळयाकडे पाठवला आहे, त्यांतील कपट तुझ्या ध्यानीं आलेलें दिसत नाही. **भरत येथे असता, तर त्याचे मित्र वाढले असते. ते वाढूं नयेत, भरताचा पक्ष वाढूं नये. म्हणून त्याला अयोध्येच्या बाहेर काढलें!** राम राज्यावर आल्यावर तो भरताचें कांहीतरी वाईट केल्यावाचून कधीहि राहणार नाही. म्हणून आजच येथून रामाने वनांत जावें, हें मला बरें वाटतें. असें झालें तरच तुझ्या **ज्ञातिबांधवांचें कल्याण** होईल. (**ज्ञातिपक्षस्य श्रेयः भविष्यति।** वा० रा० अयो० ८।३४)

"राम व भरत या दोघांचाहि राज्यावर हक्क असल्याने ते दोघेहि परस्परांचे शत्रूच आहेत. अशा स्थितींत जर राम गादीवर आला, तर भरताला रामाचें दास्य स्वीकारावेंच लागेल. मग तो जिवंत तरी कसा राहील बरें? पूर्वी तूं कौसल्येचा अपमान केला होतास ना? आता ती याचा वचपा चांगलाच काढील." ( वा० रा० अयो० ८।३७ )

अशा प्रकारें मंथरेने कैकेयीच्या मनांत विष भरवून दिलें व त्याप्रमाणे कैकेयी-

हि तेंच खरें मानून (१) **भरताला राज्य** व (२) **रामाला वनवास** आजच्या आज करावयास लावीन, तरच अन्नग्रहण करीन, असें म्हणून रुसून बसली. दशरथाने पूर्वी तिला दोन वर दिले होते, त्या वचनांत त्यास पकडून कैकेयीने भरताला राज्य मिळावें व राम वनांत जावा, असें दशरथाकडून वदवून घेतलें.

येथे कैकेयीच्या मनांत नसलेली गोष्ट मंथरेने तिच्या मनांत भरवली, असें म्हटलें आहे. त्यावरूनच स्पष्ट होतें की, कैकेयीच्या ज्ञातिबांधवांत धुमसत असलेले विचार योग्य वेळप्रसंग पाहून कैकेयीच्या मनांत घुसविले व तिच्याकडून रामाला वनवास घडेल, असें या पक्षाच्या लोकांनी करविलें. येथे केवळ मंथरेनेच हें केलें, असें समजण्यापेक्षा कैकेयीच्या ज्ञातिबांधवांच्या मनांत शिजत असलेलें विष मंथरेने कैकेयीच्या मनांत ओतलें, असें म्हणणें अधिक खरें ठरेल.

या ठिकाणीं कांही टीकाकारांनी "देवतांनी रावणाचा वध व्हावा, याकरिता रामाला वनवासांत पाठवावें, म्हणून मंथरेकडून कैकेयीच्या मनांत असे विचार भरवले," असें लिहिलें आहे—

**रावणवधकांक्षिभिः देवैः आविष्टमन्थरावाक्यात्**
**रामाभिषेकविघ्नः प्रतिपाद्यते ॥**

(गोविंदराजटीका, वा. रा. अयो. स. ७।१)

"रावणाचा वध व्हावा, असें इच्छिणाऱ्या देवांनी मंथरेला फितविली व तिच्याकडून हे विचार कैकेयीच्या मनांत भरवले," असें म्हटलें आहे. ऋषि, देव व आर्य यांच्या मनांतून रावणाचें साम्राज्य उलथून पाडावें, असें होतें. तसा त्यांनी ठरावहि अयोध्येच्या दशरथाच्या अश्वमेधाच्या सभेत पसार केला होता. या ठरावास अनुसरून देवांनी, ऋषींनी अथवा दुसऱ्या कोणी मंथरेस फितवून कैकेयीच्या मनांत वरील विचार भरविलेहि असतील. हें मानलें तरी रामराज्याभिषेकाच्या विरुद्ध अयोध्येंत कट झाला होता, हेंच त्यावरून सिद्ध होतें. या कटांत देव, ऋषि व आर्यांपैकी कांही रावणवधाचा बेत सिद्धीस जावा, म्हणून सामील झाले असतील व कैकेयीचे ज्ञातिबांधव भरत आपला आहे, म्हणून त्यास

गादीवर बसवावा, यासाठी सामील झाले असतील. कोणताहि पक्ष जो बनतो, त्यांत अनेक उपपक्ष अनेक हेतूंनी शिरतात व आपआपलें ध्येय गाठण्याची खटपट करीत असतात. " राम राज्यावर बसवला जाऊं नये, " एवढी एक गोष्ट सर्वांची सारखी असली, म्हणजे भरताचा पक्ष बनला. मग देव रावणवधासाठी रामाला गादी मिळूं नये म्हणत असले व कैकेयीचे ज्ञातिबांधव भरतालाच राज्य मिळावें, यासाठी रामाला तें मिळूं नये, असें म्हणत असले, तरी ते दोघेहि एका पक्षांत राहूं शकतील. यासाठी देवांनी मंथरेस पुढे केली, हें खरें होतें, असें मानलें, तरीहि त्यावरून रामाला राज्य मिळूं नये, असा म्हणणारा एक पक्ष अयोध्येंत होता, एवढें खरें असून या पक्षाचें म्हणणें मंथरेचें जें भाषण वर दिलें आहे, त्यावरून उघड दिसून येतें. पद्मपुराणांत असा हा वृत्तांत आलेला आहे-

**मन्थरा नाम कार्यार्थं अप्सरा प्रेषिता सुरैः ।**
**दासी काचन कैकेय्यै दत्ता केकयभूभृता ॥** ( पद्मपुराण )

' मन्थरा नांवाची एक अप्सरा देवांनी मुद्दाम याच उद्देशाने केकय राजाकडे पाठविली होती. ती त्याने कैकेयीबरोबर दिली होती. ' देवांनी गुप्तपणाने एक अप्सरा कैकेयीच्या लहानपणापासून तिच्याजवळ राहण्यासाठी म्हणून पाठविली होती. तिने तिच्याजवळ रहावें व देवांच्या सांगण्याप्रमाणे वेळप्रसंगीं करावें, यासाठी तिची योजना होती. ही भेदनीति आहे. आधीपासून नाना रूपांनीं आपले लोक ठिकठिकाणीं ठेवावे व त्यांच्या द्वारें इष्ट वाटेल तेथे, इष्ट वाटेल तसला भेद करावा, हा ' पंचमस्तंभीय ' ( Fifth column ) राजनीतीचा नेहमीचा परिपाठ आहेच. ' चतुरंग बल ' असतें, तें रणावर लढतें व हें ' पञ्चम अंग ' घरोघर राहून राज्य पोखरीत असतें. सध्या याला ' पंचम स्तंभ ' म्हणतात. पूर्वी यालाच ' भेद ' असें नांव होतें. रावणाचें राज्य उलथून पाडण्यासाठी देवांनी जो कट केला होता, त्यांतील एक पात्र ' मंथरा ' असलें, तर तें कांही अविश्वसनीय म्हणतां येणार नाही. मंथरेने अयोध्येंत राहून कैकेयीचा विश्वास संपादन करून, कैकेयीच्या ज्ञातिबांधवांशीं सलगीने वागून, देवांच्या पक्षाला सहाय्य केलें असेल. या म्हणण्याने "रामाला राज्य मिळूं नये व तें भरतालाच मिळावें." असें म्हणणारा पक्ष अयोध्येंत होता, हेंच ठरत आहे. या पक्षांत अनेक प्रकारचे व

अनेक मतांचे लोकहि मिळालेले असतील.'रामाला राज्य मिळूं नये,' एवढें सर्वांचें एक सामान्य ध्येय असल्यामुळे त्या सर्वांचा मिळून हा एक पक्ष झालेला होता.

असो. ऐन वेळीं कैकेयीच्या सहाय्याने दशरथाला वचनाचें पालन करावयास भाग पाडून, रामाला वनास जावयास भाग पाडलें. त्याबरोबर सीता व लक्ष्मण हीं दोघेंहि वनवासाला निघून गेलीं. आदल्या दिवशीं सर्व नागरिकांस उद्या रामाला राज्याभिषेक होणार, म्हणून अतोनात आनंद झाला होता. हौसेने सर्व नगरवासी जन जवळ जवळ जागतच होते व दुसरा दिवस उजाडण्याची वाट पहात होते. आसमंतात् उपनगरें व समीपस्थ नगरें यांतील जनतेची रांगहि अयोध्येंत लागली होती. उद्या रामाला राज्याभिषेक होणार व हा सोहळा पाहून आम्ही कृतार्थ होणार, हा ध्यास सर्व जनतेस लागलेला होता. जो तो आपल्याकडून होईल, तें करून या अभूतपूर्व समारंभाची शोभा वाढवीत होता, दुसऱ्या दिवशीं प्रातः-काळींच सर्व तयारीसह व सर्व विप्रवृंदांसह वसिष्ट ऋषि राजमंदिरांत आले व आता पुण्याहवाचनाची तयारी करणार, इतक्यांत समजलें की, राजाचें मन अस्वस्थ आहे. नंतर राम वनांत जाणार, हें ठरलेलें अशुभ वृत्त सर्वतोमुखीं झालें. हें ऐकून जनतेस किती दुःख झालें असेल बरें? पूर्व दिवसापासून सर्व जनता जी आनंदाच्या शिखरावर चढण्याचा अनुभव घेत होती, ती आता एकदम दुःखाच्या खोल गर्तेत पडल्याचा अनुभव करूं लागली. जो हा धक्का जनतेला या वेळीं बसला, तो सहन होणें अशक्य होतें.

## लोकमत.

हें वृत्त समजतांच सर्व जनता दशरथ राजाची व कैकेयीची ' न भूतो न भवि-ष्यति ' निंदा करूं लागली व या वेळीं निष्पाप भरताचीहि निंदा जनतेने केली असली, तर जनतेला कोणीहि दोष देऊं शकणार नाही. अशा वेळीं जनता कांही तराजू घेऊन कोणाचा अपराध किती, हें ठरवीत बसत नाही. संशय आला की, मत देऊन टाकणें, हा जनतेचा स्वभावच असतो. भरताविषयी ज्या अयो-ध्येंत दशरथ व कौसल्या यांसही संशय वाटला, त्या अयोध्येंत त्या वेळीं जन-तेंतील कांही माणसें भरताची निंदा करणारीं निघालीं, तर कांहीएक आश्चर्य करण्याचें कारण नाही.

यापुढे लवकरच दशरथ स्वर्गाला गेला, यामुळे तर कैकेयी व भरताविरुद्ध जनक्षोभ फारच वाढला. वसिष्ठादिक नेत्यांनी भरताला आजोळाहून बोलावून आणलें. तोंपर्यंत दशरथाचा प्रेतसंस्कार होऊं शकला नाही. राजाचा प्रेतसंस्कार न झाल्यामुळे अयोध्येंतील जनतेला जेवण सुखाने मिळणेंहि शक्य झालें नाही. यामुळे जनतेचा क्रोध कैकेयी व भरत यांसंबंधाने वाढतच जाणें शक्य आहे. अयोध्येभर यांच्या निंदेशिवाय या वेळीं दुसरी महत्त्वाची गोष्टच घडली नसेल.

पुढे भरत केकय देशांतून आला. अयोध्येंत भरताचा रथ जेव्हा प्रविष्ट झाला, तेव्हा लोक आपल्याकडे तिरस्काराने पहात आहेत, असें पाहून भरताला फारच आश्चर्य वाटलें ! सर्वत्र उदास वातावरण पाहून अयोध्येंत असें दुःखप्रद काय घडलें, तें भरताच्या लक्षांत येईना. भरताला या उलाढालींची यत्किंचितही कल्पना नसल्यामुळे त्याचें प्रेमळ मन भांबावून गेलें असल्यास मुळीच नवल नाही.

याच्या उलट जनतेच्या मनाची स्थिति होती. जनता समजत होती की, भरत हा याच दुष्ट कैकेयीचा मुलगा आहे. या दोघांमुळे राम, लक्ष्मण व सीता वनांत गेलीं व दशरथ मरून गेला. आता हे राजेश्री राज्यावर बसावयास येत आहेत !

भरताला आईने काय केलें, तेंही माहीत नव्हतें. आईच्या बाजूच्या लोकांनी काय केलें, तेंही त्यास कळलें नव्हतें. दशरथाच्या मनांतील विचार त्यास समजणें शक्य नव्हतें. तो जसा निष्कपट प्रेमाने मामाकडे गेला, तसाच वडिलांनी बोलाविलें म्हणून परत आला. मधली राज्यारोहणासंबंधाने उत्पन्न झालेली भानगड त्यास यत्किंचित् माहीत नव्हती. जनतेचा राग त्याला समजणें शक्य नव्हतें व भरताचें निष्पाप मन जनतेस समजणें शक्य नव्हतें. अशा स्थितींत भरत अयोध्यानगरांत प्रविष्ट होऊन राजवाड्यांत पोचला.

तेथील उदासीनता पाहून आपल्या आईकडे जाऊन ' बाबा कोठे आहेत ? ' हा पहिला प्रश्न त्या प्रेमळ भरताने आपल्या आईस विचारला. कैकेयीने आपलें सर्व कर्तृत्व सांगितलें. तेव्हा त्यास रामाचा वनवास व वडिलांचा स्वर्गवास समजला व सर्व अयोध्येंतील वातारणाचा त्यास उलगडा झाला. त्याने आईची निर्भर्त्सना केली व कौसल्येकडे जाऊन तिचें सांत्वन करण्याचा तो यत्न करूं

लागला; पण सांत्वना व्हावी, असें तेथे वायुमण्डलच नव्हतें, त्यास तो तरी काय करणार ? पण भरताने आपल्या निष्कपटपणास साजेसें जें काय करणें शक्य होतें, तें सर्व केलें.

पुढे वसिष्ठादि पुढाऱ्यांनी राज्यारोहण करावयास त्यास आग्रह केला; पण हें राज्य रामाचें आहे व रामच आम्हां सर्वांचा राजा आहे, असें सर्वांस सांगून रामाला आणावा, असा तो यत्न करूं लागला; पण राम इतक्या लवकर येण्या-साठी वनांत गेलाच नव्हता व तो येणें शक्यही नव्हतें; पण भरताने आदर्श, निष्कपट व प्रेमळ बन्धु जें काय करूं शकेल, तें केलें व सद्बन्धूचा कित्ता जनतेस घालून दिला.

वसिष्ठापासून तो पौल्कसापर्यंत सर्वांच्या अन्तःकरणांत तिरस्काराचें इतकें प्रक्षुब्ध वातावरण असतां कोण बरें शहाणा तरुण राज्यावर बसण्यास धजेल ? आईबापांस व बांधवांस मारून राज्य भोगावें, असे क्रूरात्मे इतिहासांत नाहीत, असें नाही; पण भरताच्या चरित्रांत असा एकही क्षण दिसत नाही की, ज्या क्षणीं त्याच्या शुद्ध मनांत रामाविषयी पाप होतें, असें म्हणण्यास जागा होईल. म्हणून भरताला ' **आदर्श बन्धु** ' असें म्हणतात, तेंच खरें.

ऐतिहासिक कालांत **श्रीछत्रपती राजाराम महाराजही** असेच भरता-सारखे महाराष्ट्राच्या इतिहासांत विराजत आहेत. ' **मा भ्राता भ्रातरं द्विक्षत्** ' ( अथर्व० ३ । ३० । ३ ) हा वैदिक आदर्श होय. ' **सह वीर्यं करवावहै** ' हाहि वैदिक आदर्शच. याचें उदाहरण राम व भरत यांचें जें वाल्मीकि रामायणांत आहे. त्यास इतिहासांत तोड नाही. हें उदाहरण भारतीय काय पण सर्व जगांतील जनतेपुढे रहावें, इतक्या महत्त्वाचें आहे. याचा वाचकांनी अधिक विचार करावा.

## कौसल्येची आर्थिक स्थिति.

भरत गादीवर आला असतां कौसल्येस फार त्रास होईल, यासाठी लक्ष्मणाने अयोध्येंतच रहावें व कौसल्येस सहाय्य करावें, असें रामाने सुचविलें, तेव्हा लक्ष्मणाने पुढें दिल्याप्रमाणे उत्तर दिलें आहे. त्यांत कौसल्येची आर्थिक स्थिति

कशी होती, त्याचें वर्णन आलेलें आहे. तें पहा—

**कौसल्या बिभृयादार्या सहस्रं मद्विधानपि।**
**यस्याः सहस्रं ग्रामाणां संप्राप्तमुपजीविनाम् ॥ २२ ॥**
**तदात्मभरणे चैव मम मातुस्तथैव च।**
**पर्याप्ता मद्विधानां च भरणाय मनस्विनी ॥ २३ ॥**

(अयो० ३२)

" आर्या कौसल्या माझ्यासारख्या हजार लोकांचें पोषण करील; कारण तिला हजार गावांचें उत्पन्न आहे. यासाठीं स्वतःचें व माझ्या आईचें व माझ्यासारख्या अनेकांचें पोषण करण्यास ती बुद्धिवान् कौसल्या समर्थ आहे. "

कौसल्येला हजार गावांचें उत्पन्न होतें. या गावांतील राज्यव्यवस्थेचे अधिकार तिला असोत वा नसोत, पण या इतक्या हजार गावांचें उत्पन्न तिला मिळत होतें, हें निर्विवाद होय. सध्या सरासरी प्रत्येक गावाचें उत्पन्न तीनचार हजार रुपये तरी येत असतें. आपण तें बाकीचा खर्चवेच जाऊन फक्त एक हजार रु. एका गावाचें उत्पन्न येतें, असें म्हटलें तरी १००० गावांचें उत्पन्न कौसल्येस निदान १०,००,००० रु. ( दहा लक्ष रुपये ) येत होतें, असें मानण्यास हरकत नाहीं. म्हणूनच लक्ष्मण म्हणत आहे कीं, माझ्यासारख्या हजारो माणसांचें उत्तम पालनपोषण एकटी कौसल्या करूं शकेल. वरील उत्पन्नानें लक्ष्मणासारख्या हजारो माणसांचें उत्तम पोषण होऊं शकेल, यांत शंका नाहीं.

लक्ष्मणही राजपुत्र होता. यासाठीं त्याचा खर्चही कांहीं कमी होता, असें मानण्याचें कारण नाहीं. रामाच्या संपत्तीचें वर्णन अयोध्याकाण्डांत ( सर्ग ३२ मध्ये आलेलें आहे. तितकें जरी लक्ष्मणाचें ऐश्वर्य नसलें, तरी तें राजपुत्रास साजेसें असलें पाहिजे, यांत शंका नाहीं.

तसेंच कौसल्येइतकें अन्य राण्यांचें वार्षिक उत्पन्न नसलें, तरी तें असेंच मोठें असणें अगदी स्वाभाविक आहे. सध्या दहावीस लाख रु० उत्पन्न असणाऱ्या जमीनदाराची जशी श्रीमंती असूं शकते, तशी ती कौसल्येची होती व ही तिची खासगी मिळकत होती. याहून किंचित् कमी इतर राण्यांची प्राप्ति असावी.

अशी सांपत्तिक सुस्थिति असणाऱ्या या पट्टराणीला गृहसौख्य कशा तऱ्हेचें होतें, तें तिच्याच शब्दात पहा—

## कौसल्येचें दुःख.

कौसल्या पट्टराणी होती खरी; पण म्हातारा दशरथ कैकेयीच्या सुन्दर रूपाला मोहून व तिच्यावर अति आसक्त होऊन, तिच्याच मंदिरांत नेहमी पडलेला असे. यामुळे कैकेयी फारच उन्मत्त झालेली होती. या तिच्या उन्मत्तपणामुळे कौसल्येस कसा त्रास होत होता, तें तिच्याच शब्दांत पहा—

यदि पुत्र न जायेथा मम शोकाय राघव ।
न स्म दुःखमतो भूयः पश्येयमहमप्रजाः ॥ ३६ ॥
एक एव हि वन्ध्यायाः शोको भवति मानसः ।
अप्रजास्मीति सन्तापो न ह्यन्यः पुत्र विद्यते ॥ ३७ ॥
न दृष्टपूर्वं कल्याणं सुखं वा अतिपौरुषे ।
अपि पुत्र विपश्येयं इति रामास्थितं मया ॥ ३८ ॥
सा बहून्यमनोज्ञानि वाक्यानि हृदयच्छिदाम् ।
अहं श्रोष्ये सपत्नीनां अवराणां परा सती ॥ ३९ ॥
अतो दुःखतरं किंनु प्रमदानां भविष्यति ।
मम शोको विनाशश्च यादृशोऽयमनन्तकः ॥ ४० ॥
त्वयि सन्निहितेऽप्येवमहमासं निराकृता ।
किं पुनः प्रोषिते तात ध्रुवं मरणमेव हि ॥ ४१ ॥
अत्यन्तं निगृहीतास्मि भर्तुर्नित्यमसंमता ।
परिवारेण कैकेय्याः समा वाप्यथवाऽवरा ॥ ४२ ॥
यो हि मां सेवते कश्चिदपि वाप्यनुवर्तते ।
कैकेय्या पुत्रमन्वीक्ष्य स जनो नाभिभाषते ॥ ४३ ॥
नित्यक्रोधतया तस्याः कथं नु खरवादिनम् ।
कैकेय्या वदनं द्रष्टुं पुत्र शक्ष्यामि दुर्गता ॥ ४४ ॥
सप्त दश च वर्षाणि जातस्य तव राघव ।
अतीतानि प्रकाङ्क्षन्त्या मया दुःखपरिक्षयम् ॥ ४५ ॥

**तदक्षयं महद् दुःखं नोत्सहे सहितुं चिरात् ।**
**विप्रकारं सपत्नीनां एवं जीर्णापि राघव ॥ ४६ ॥**

( वा. रा. अयोध्या. २० )

कौसल्या म्हणते, " हे रामा ! तूं जर मला झालाच नसतास, तर मला यापेक्षा अधिक दुःख खात्रीने झालें नसतें. वन्ध्येला पुत्र नाही, एवढाच शोक होतो; पण पुत्र झाल्यानंतर जो शोक होतो, तो फारच असह्य असतो. तुझे वडील पुष्कळ शूर आहेत; पण त्यांच्याकडून मला सुख किंवा कल्याण कांहींसुद्धा लाभलेलें नाही. यामुळे तुझ्याकडून तरी सुख मिळेल, या आशेने मी जीव धरून राहिलें होतें; ( पण आता तर तूं वनांत चललां आहेस, तेव्हा आता मी कोणाकडे पाहून जिवंत रहावें बरें ? ) मी ( **परा** ) वडील पट्टराणी असतांही ( **अवराणां** ) धाकट्या सवतींची मर्मच्छेदक व हृदयभेदक कठोर भाषणें ऐकून घेत आहें ! माझी अशी अवस्था आहे, ही मी कोणाला सांगावी बरें ? बायकांना सवतीच्या त्रासापेक्षा अधिक दुःख तें आणखी कोणतें असणें शक्य आहे बरें ? मला वाटतें की, हा माझा शोकमय विनाशच येऊन ठेपला आहे. हे रामा ! तूं येथे असतां तुझ्या समक्षच मी जवळ जवळ ( **निराकृता** ) तिरस्कृत, तुच्छ व बहिष्कृत अशी समजली जात आहें, मग तूं वनांत गेल्यावर मला कोण बरें विचारील ? मी पतीला अगदी ( **असंमता** ) अप्रिय असल्यामुळे मी अत्यंत पराधीन व दुःखी झालेली आहें. मला येथे कैकेयीच्या बरोबरीचेंहि स्थान नाही; पण ( **अवरा** ) मला अगदी तिच्या खालचें म्हणजे निकृष्ट स्थान देण्यांत येत आहे. जे माझी सेवा करतात किंवा मला अनुकूल वागतात, तेहि कैकेयीला अथवा तिच्या मुलाला पाहून माझ्याशीं नीट बोलतसुद्धा नाहीत ! कैकेयी उन्मत्तपणाने व चढेलपणाने नेहमीच कठोर भाषण करीत असते. कधी चुकूनसुद्धा एकही गोड शब्द बोलत नाही, अशी माझी सध्याची स्थिति आहे. तेव्हा तूं गेल्यानंतर तिचें तें कठोर भाषण करणारें तोंड मी कसें बरें पाहूं शकेन ? ( तुझें उपनयन होऊन, म्हणजे तूं गुरुगृहीं जाऊन ) आज सतरा वर्षे झालीं. या काळांत या दुःखाचा आज अन्त होईल, उद्या अन्त होईल, अशी आशा धरून मी जिवंत राहिलें आहें. आता हें अक्षय्य मोठें दुःख मजवर येणार आहे, तें मला सहन होणें

शक्य नाहीं; विशेषतः सवतींचा जाच सहन करणें मला आता अगदीच अशक्य आहे."

यावरून या पट्टराणी कौसल्येची स्थिति दशरथाच्या राजवाड्यांत किती केविलवाणी झालेली होती, तें सहज समजण्यासारखें आहे. कौसल्या पट्टराणी असतांहि दशरथाचें मन कैकेयीच्या सौंदर्यावर व नटवेपणावर मोहित झालेलें होतें व त्यामुळे कैकेयी अत्यंत उन्मत्त व चढेल वृत्तीची बनलेली होती. हें नीट समजण्यासाठी कौसल्या म्हणत आहे, त्यांतील कांहीं वाक्यें येथे पुनः पाहण्यासारखीं आहेत—

(१) [ **कल्याणं सुखं वा न दृष्टपूर्वं** ] रामाला २८ वर्षे होत आलीं, तरीं कौसल्येला दशरथाकडून कल्याण किंवा सुख होईल, अशी आशा नव्हती.

(२) [ **परा सती अवराणां अमनोज्ञानि श्रोष्ये** ] कौसल्या पट्टराणी असतांहि धाकट्या कैकेयीचीं मर्मभेदक व मानहानिकारक भाषणें ऐकून तिला गप्प रहावें लागे ( कारण दशरथाची कैकेयीवर प्रीति होती तशी कौसल्येवर नव्हती. )

(३) [ **रामे संनिहितेऽपि** ] रामा जवळ असतांहि कैकेयीमुळे कौसल्येची अशी निकृष्ट स्थिति झालेली होती, मग राम वनांत गेल्यावर तिला कोण विचारील बरें ?

(४) [ **निगृहीता, भर्तुः असंमता** ] पतीला अप्रिय असल्यामुळे राजवाड्यांत असतांही कौसल्या अत्यंत पराधीन, दुःखी व दीन बनलेली होती.

(५) [ **समा वा अवरा** ] कौसल्या पट्टराणी असतांही तिला केव्हातरी फार तर कैकेयीच्या बरोबरीचा मान मिळे; पण बहुतेक निकृष्ट असल्याप्रमाणेच राहणें भाग पडत असे.

(६) [ **यः सेवते सोऽपि नाभिभाषते** ] जे सेवक म्हणून आहेत, तेही कैकेयीच्या भीतीने कौसल्येशीं गोड शब्द बोलत नाहीत, तुसडेपणाने वागतात.

(७) [ **नित्यक्रोधतया कैकेय्याः खरवादिनं मुखं** ] कैकेयी ही नेहमी रागीट व तिरसट असल्यामुळे नेहमीच कठोर भाषण करीत असते.

(८) [ **सपत्नीनां विप्रकारं सहितुं नोत्सहे** ] सवतींचा हा जाच आता कौसल्येस सहन होत नसे.

(९) कौसल्या या वेळीं [ **जीर्णा** ] म्हातारी झालेली होती. या वेळीं दशरथ ८८ वर्षांचा झाला होता व कौसल्या निदान ६०।६५ वर्षांची तरी असावी.

कौसल्येची ही अशी हीन व दीन स्थिति दशरथाच्या समक्ष राजवाड्यांतल्या राजवाड्यांतच झालेली होती. दशरथाला कौसल्येशीं असें वागणें मुळीच भूषणावह नव्हतें. दशरथ म्हातारपणामुळे बाईलवेडा होऊन कैकेयीच्या महालांत पडलेला असे. तो कौसल्येकडे जातही नसे व कधी काळीं गेलाच, तर तिच्याबरोबर तो तुसडेपणाने वागत असे ! कैकेयीशीं लग्न होईपर्यंत कौसल्येचे काय सुखाचे दिवस गेले असतील, तेवढे तिचे सुखाचे दिवस गेले; पण कैकेयीशीं लग्न झाल्यानंतर दशरथानें कौसल्येकडे प्रेमळ दृष्टीने कधीही पाहिलें नाही. कौसल्येचें वय या वेळीं ६५ वर्षांचें असेल, सुमित्रेचें ५५ वर्षांचें असेल व कैकेयी ५० वर्षांची असेल. रामाच्या जन्मकाळीं कैकेयी २२ वर्षांची, सुमित्रा २७ वर्षांची व कौसल्या ३७ वर्षांची असेल अथवा ५।७ वर्षांनी हें वय कमी–अधिकही कदाचित् असेल. या वेळीं हे मुलगे २८ वर्षांचे झालेले होते, हें लक्ष्यांत ठेऊन यांचें वय मोजलें पाहिजे.

## दशरथाची कबुली.

कौसल्येची स्थिति अशी केविलवाणी झालेली होती, अशी राजा दशरथानेहि कबुली दिलेली आहे, ती आता पहा—

**किं मां वक्ष्यति कौसल्या राघवे वनमास्थिते ॥६७ ॥**
**किं चैनां प्रतिवक्ष्यामि कृत्वा विप्रियमीदृशम् ।**
**यदा यदा च कौसल्या दासीव च सखीव च ॥ ६८ ॥**
**भार्यावद् भगिनीवच्च मातृवच्चोपतिष्ठति ।**
**सततं प्रियकामा मे प्रियपुत्रा प्रियंवदा ॥ ६९ ॥**

**न मया सत्कृता देवी सत्कारार्हा कृते तव।**
**इदानीं तत् तपति मां यन्मया सुकृतं त्वयि ॥ ७० ॥**

( वा. रा. अयोध्या. सर्ग १२ )

दशरथ कैकेयीस म्हणतो— " अगे कैकेयी ! तुझ्या म्हणण्याप्रमाणे रामाला वनांत पाठवलें असतां, कौसल्येस मी काय बरें सांगू ? जेव्हा जेव्हा कौसल्या माझ्याशीं दासीप्रमाणे अज्ञाधारणपणाने, सखीप्रमाणे सलगीने, भार्येसारखें जिवलगाप्रमाणे, बहिणीसारखें प्रेमळपणाने व मातेसारखें निष्कपट प्रेमाने वागत असे, तेव्हा तेव्हा ( **प्रियकामा** ) मला जें आवडतें तेंच करण्यास ती उद्युक्त होई, ( **प्रियंवदा** ) माझ्याबरोबर ती नेहमी प्रिय भाषण करी. त्या वेळीं (**सत्कारार्हा**) ती खरोखरच सत्कार करण्यास योग्य असतांना, हे कैकेयी ! केवळ तुझ्यासाठीं मी ( **मया सा न सत्कृता** ) तिचा मुळींच सत्कार केला नाहीं; हें माझें कौसल्येशीं झालेलें आचरण आता माझें हृदय जाळीत आहे. "

या दशरथाच्या म्हणण्यावरून वर जें कौसल्या म्हणत आहे, तें अगदी खरें होतें, असें ठरतें. दशरथाचें मन आपल्याकडे वळवून घ्यावें, यासाठी सती कौसल्येने नाना प्रकारचे यत्न करून पाहिले; पण दशरथाने तिच्याकडे ढुंकूनहि पाहिलें नाही. नेहमी कैकेयीकडे तो पडून रहात असे, कैकेयीच्या तंत्राने वागत असे व कौसल्येकडे दुर्लक्ष करीत असे. इतकेंच नव्हे तर कैकेयी कौसल्येशीं उर्मटपणाने व तुसडेपणाने वागत असे, याचा कांहींसुद्धा बंदोबस्त त्याने केला नाहीं व पट्टराणीस त्रास न व्हावा, इतकासुद्धा बंदोबस्त त्याने केलेला नव्हता. कैकेयीसाठी दशरथ किती वेडा झाला होता, तें त्याच्याच शब्दांत येथे पहा—

**कस्य वापि प्रियं कार्यं केन वा विप्रियं कृतम् ॥ ३१ ॥**
**कः प्रियं लभतामद्य को वा सुमहदप्रियम् ।**
**अवध्यो वध्यतां को वा वध्यः को वा विमुच्यताम् ।**
**दरिद्रः को भवेदाढ्यो द्रव्यवान् वाप्यकिञ्चनः ॥ ३३ ॥**
**अहं च हि मदीयाश्च सर्वे तव वशानुगाः ।**
**न ते कञ्चिदभिप्रायं व्याहन्तुमहमुत्सहे ॥ ३४ ॥**

**आत्मनो जीवितेनापि ब्रूहि यन्मनसि स्थितम् ।**
**करिष्यामि तव प्रीतिं सुकृतेनापि ते शपे ॥३५॥**

( वा. रा अयोध्या. स.१० )

दशरथ म्हणतो की, ' हे कैकेयी ! तुझ्यासाठी कोणाचें कोणतें प्रिय मी करावें ? कोणी तुझें वाईट केलें आहे ? कोणाचें आज मी तुझ्यासाठी हित करूं ? कीं कोणाचें अप्रिय करूं ? अवध्य असलेल्या कोणास मी तुझ्यासाठी ठार मारूं व वध्य असलेल्या कोणास मी सोडून देऊं ? कोणत्या दरिद्री माणसाला धन देऊन आजच मी तुझ्यासाठी श्रीमंत बनवूं अथवा कोणा श्रीमंताला दरिद्री बनवून टाकूं ? मी व ( **मदीयाः** ) माझ्या ज्ञातीचे सर्व लोक ( **तव वशानुगाः** ) तुझ्या आज्ञेंत वागणारे आहेत. तुला जें हवें असेल, तें करण्यास आम्ही तयार आहोंत. तुझ्या मनांत जें असेल, त्याच्या उलट वागण्यास आम्ही कोणीहि तयार नाहीं. माझें जीवित संकटांत घालून हि तुझ्या मनाप्रमाणे आम्ही वागूं व तुला संतुष्ट करूं. माझ्या सर्व पुण्याईचा शपथ घेऊन मी हें तुला सांगत आहें. '

हें दशरथाचें म्हणणें आहे. या वेळीं दशरथ [ **कामबलसंयुक्तो रत्यर्थी।** वा. रा. अयो. १०।१७; **कामी ।** १०।२७;११।४; **तं मन्मथशरैर्विद्धं कामवेगवशानुगम् ।** ११।१ ] कामातुर झालेला होता. यासाठीं या वेळच्या याच्या बोलण्यांत कांहीं बाद करावें लागेल. तथापि, **श्रीमंताचा दरिद्री बनवणें व अवध्याचा वध करणें**, या गोष्टी वरील भाषणात आहेत. त्या '**अनियंत्रित देशपती**' चें स्वरूप दाखवीत आहेत व त्या दशरथाच्या बोलण्यांत मुळींच शोभा देत नव्हते. कौसल्येसारख्या सात्त्विक पट्टराणीकडे ढुंकूनही न पाहतां, तिला दुःखांत ढकलून देणें व उन्मत्त व चढेल कैकेयीसाठीं हवें तें करावयास तयार होणें, हें आचरण कोणाचाहि घात केल्याशिवाय राहणारच नाहीं. त्याप्रमाणेच तो रामाचा घात या दशरथाच्या आचरणानेच झाला. दशरथाने एकापेक्षा अधिक बायका केल्या, हा दोष न मानला, तरी बायका-बायकांत असलें धरसोडीचें व पक्षपाताचें आचरण दशरथाला क्षम्य होतें, असें कधींहि म्हणतां येणार नाहीं. या बाबतींत दशरथाने जी चूक केली, तीच त्याला शेवटीं भोवली.

## राज्यावर सूर्य मावळत नाही.

दशरथ राजा आपल्या राज्यावर सूर्य मावळत नाही, एवढें माझें साम्राज्य आहे, असें म्हणत आहे.

**यावदावर्तते चक्रं तावती मे वसुंधरा ॥ ३६ ॥**
**ततो वृणीष्व कैकेयि यद्यत्त्वं मनसेच्छसि ॥ ३८ ॥**
( वा. रा. अयोध्या. १० )

' जेथपर्यंत सूर्यमण्डल प्रकाशत आहे, तेथपर्यंत माझें साम्राज्य आहे. यांपैकी जें पाहिजे, तें माग व संतुष्ट हो, ' असें कैकेयीस दशरथ म्हणत आहे. जो राजा अशा रीतीनें राणीच्या तंत्रानें राज्यांतील व्यवस्थेंत ढवळाढवळ करूं इच्छित असतो, त्याच्याचकडून त्या राणीच्या कारणानें राज्यावर केवढे अनर्थ गुदरूं शकतात, तें रामाच्या वनवासाच्या उदाहरणावरून वाचकांच्या लक्षांत येण्यासारखें आहे. अशी स्थिति असणें, हें सुरळीत राज्य चालविण्याच्या दृष्टीनें अगदीं घातक आहे, यांत मुळीच शंका नाहीं.

## युवराजाचें मत.

युवराज रामचन्द्र या वेळीं २८ वर्षांचा होता. लक्ष्मणहि तेवढाच होता. श्रीराम तर राज्यकारभार पहातहि होता. तेव्हा त्यास दशरथाचें कौसल्येशीं होत असलेलें अनिष्ट वर्तन समजलें नसेल, हें संभवनीय दिसत नाहीं. राजकुमार केवढाही मोठा झाला, तरी तो राज्यशासक राजापुढे मेहमी कुमारच असणार, हें उघड आहे ! .

अठ्ठावीस वर्षांचा युवराज झाला, तरी तो आपल्या मातेचें कौसल्येचें दुःख दूर करण्यास असमर्थ होता, ही स्थिति येथें वाचकांनी पाहण्यासारखी आहे. बापाच्या एका बायकोशीं अधिक प्रेम करण्यानें, आपल्या सात्त्विक आईस मरणप्राय दुःख भोगावें लागत आहे, या दुःखामुळे ती झुरणीसही लागली आहे, हें पहात असूनहि २८ वर्षांचा तरुण राम आपल्या ८८ वर्षांच्या अतिवृद्ध राजाला कांहीएक समजाऊन सांगूं शकत नव्हता व त्यानें समजावण्याचा यत्न केला

असता, तरी राज्य करीत असलेल्या बापानें युवराजाचें म्हणणें ऐकलेंच असतें, असेंहि म्हणतां येत नाही. दशरथाच्या घरची स्थिति कशी होती, तें ठरवण्यासाठीं या अनियंत्रित सत्तेचा विचार होणें आवश्यक आहे.

राजाचा अधिकार असा अनियंत्रित होता, हेंच यावरून अनुमान निघूं शकतें व अशा स्थितींत रामासारखा राजपुत्र वनवासांत पाठवला गेला, याचें आश्चर्य करण्याचें कांहींसुद्धा कारण उरत नाहीं. जेथें '**अवध्याचा वध करूं कीं काय ?**' असें स्वतः दशरथ म्हणत आहे, तेथें '**वनवासाला अयोग्य असणारास वनांत पाठवूं कीं काय ?**' असेंहि तो म्हणाला असता ! दशरथानें नुसतें म्हटलें असतें, असें नसून त्याच्याकडून तसें घडलेंहि आहे !!!

## लोकमताची छाप.

या वेळीं लोकमताची छाप राजावर किती असे, याचा विचार करावयाचा असतां, रामाला राज्यावर बसवण्यासाठीं दशरथानें लोकसभा बोलावली होती व तिच्यामार्फत रामराज्याभिषेकाला लोकमताची अनुकूलता संपादन केली, असें कांहीं लोक समजतात; पण यापूर्वी कोणत्याही राजकुमाराला युवराज्याभिषेक करावयाचा असतां अशी सभा बोलावल्याचा वृत्तांत फारसा कोठें आढळत नाहीं. यावरून अशी लोकसमिति बोलावणें ही कांही त्या वेळची परिपाठी होती, असें म्हणतां येत नाही. तथापि दशरथ म्हणत आहे कीं, (**सर्वं कुपितं जगत्स्यात्।** अयोध्या० १२।१०२ ) सर्व लोक खवळतील; तेव्हां कांहीतरी लोकमताची धास्ती होतीहि असेल.

दशरथानें भरतपक्षाचें बळ कमी करण्यासाठीं ही एक युक्ति योजली होती, यापेक्षा या लोकसभेची जास्त किंमत असेल, असें वाटत नाहीं. शिवाय लोकसभेनें जें ठरवलें, तें कैकेयीसारख्या एका चडेल राणीच्या लहरीनें बदललेंही गेलें, हें पाहिलें म्हणजे लोकमताची किंमत या वेळीं फारशी नव्हती, असेंच दिसतें.

दशरथानें लोकांस बोलावलें, लोकांनी आपलें मत दिलें, दशरथानें लोकांस गौरविलें व लोकांनी दशरथाचा गौरव केला; पण ज्याला लोकमताची

राजावर छाप म्हणतां येईल, असें येथे कांहींही नाही. इतकेंच काय, पण कैकेयी म्हणे तेंच होत होतें की काय, असाही येथे संशय येतो.

कैकेयीला वचन दिलें हें खरें आहे; पण कैकेयीला दिलेलें वचन लोकमताला लाथाडण्यास पुरेंसें झालें, हेंही तितकेंच खरें आहे.

आजच्या लोकमताची कल्पना दशरथाच्या वेळच्या लोकांस होती, असें म्हणण्याचें कांहीएक कारण नाही; पण जे लोक तसें प्रतिपादन करतात, त्यांनी वरील लोकमताचें स्वरूप पहावें, एवढेंच येथे सुचवणें आहे.

आज युरोपांत जें लोकमत म्हणून आहे, तेंसुद्धा बहुतेक कांही भांडवलवाल्यांचेंच मत आहे. हें पाहिलें म्हणजे सध्याही खऱ्या लोकमताची पर्वा कोणी करीत नाही, असेंच म्हणावें लागतें. ‘ **लोकांनी चालविलेलें लोकांसाठी राज्य** ’ हा एक नुसता शब्दसमूह आहे. अजूनहि हा व्यवहारात आलेला सिद्धांत नाही. तेव्हा तो दशरथाच्या वेळीं व्यवहारांत आला नव्हता, असें ठरलें, तर तें कांही फारसें अयोग्य होतें, असें कोणासहि म्हणतां येणार नाही.

## लक्ष्मणाचें म्हणणें.

दशरथ, कौसल्या, राम, कैकेयी, सुमित्रा या सर्वांमध्ये लक्ष्मण हा उघड्या अन्तःकरणाचा तडकाफडकी निकाल लाऊन टाकणारा होता. तो रामाला वनवासांत धाडण्याच्या उलाढाली पहात होता. जेव्हा रामाला वनवासांत जाण्याची आज्ञा कैकेयीने केली, तेव्हा दशरथ तिचा प्रतिकार न करतां नुसताच रडत बसला व जेव्हा कौसल्येला हें समजलें, तेव्हा ती मूर्च्छित झाली व पूर्वीचें आपलें सर्व दुःख आठवून रडूं लागली, त्या वेळीं लक्ष्मणाच्याने गप्प राहवलें नाही. तो उसळून एकदम म्हणाला—

**विपरीतश्च वृद्धश्च विषयैश्च प्रधर्षितः ।**
**नृपः किमिव न ब्रूयाच्चोद्यमानः समन्मथः ॥ ३ ॥**
**नास्यापराधं पश्यामि नापि दोषं तथाविधम् ।**
**येन निर्वास्यते राष्ट्रात् वनवासाय राघवः ॥ ४ ॥**
**तदिदं वचनं राज्ञः पुनर्बाल्यमुपेयुषः ।**

**पुत्रः को हृदये कुर्यात् राजवृत्तमनुस्मरन् ॥ ७ ॥**
**भरतस्याथ पक्ष्यो वा यो वास्य हितमिच्छति ।**
**सर्वांस्तांश्च वधिष्यामि मृदुर्हि परिभूयते ॥ ११ ॥**
**प्रोत्साहितोऽयं कैकेय्या संतुष्टो यदि नः पिता ।**
**अमित्रभूतो निःसंगं बध्यतां वध्यतामपि ॥ १२ ॥**

( वा. रा. अयोध्या. स. २१ )

" आमचे वडील बायकोच्या नादाला लागले असून, फारच कामान्ध झालेले आहेत ! अशा स्थितींत ते काय बरें करणार नाहींत ? त्यांच्यामध्ये आता विचारशक्ति तर मुळीच राहिलेली नाही. आतापर्यंत वनांत पाठवण्याजोगा एकही दोष रामाने केलेला नाही. अशा स्थितींत राजधर्माचा विचार करणारा कोणता मुलगा बापाची असली आज्ञा मानील बरें ? रामाचा मी पाठीराखा आहें. मी धनुष्य घेऊन उभा राहिल्यावर भरत असो अथवा त्याच्या पक्षाचा कोणीहि का असेना, त्या सर्वांचा वध करावयास मला उशीर लागणार नाही. मऊ दिसलें की, त्याचा लोक असाच पराभव करतात. दुष्ट कैकेयीने प्रोत्साहन दिल्यामुळे आमचे प्रत्यक्ष वडील असले म्हणून काय झालें, एकदा ते शत्रु झाले, म्हणजे मग त्यांना बंधनांत घालावयास अथवा ठार मारावयास तरी काय हरकत आहे ? "

असें लक्ष्मण तडातड बोलूं लागला. राज्यलोभाने वडिलांना व भावांना ठार मारणारे वा बंधनांत टाकणारे बादशहा कांहीं या जगांत कमी नाहीत. लक्ष्मणाचा स्वभाव कांहींसा जरी अशासारखा दिसत आहे, तरी पण तो जो बापाचा वध करण्यास अथवा त्यास बंधनांत घालण्यास तयार झाला, तो राज्यलोभाने नसून अन्यायाची चीड आल्यामुळे होय, हें येथे लक्षांत ठेवणें इष्ट आहे. लक्ष्मणाला राज्यलोभ नव्हताच; पण त्याला रामावर होणारा हा एवढा अन्याय सहन होणें शक्य नव्हतें. राज्यलोभाने पितृवध करावयास प्रवृत्त होणें व अन्यायाची चीड येऊन पितृवध करावयास तयार होणें, यांत अन्तर आहे. लक्ष्मण जो येथे पितृवधास प्रवृत्त झालेला दिसत आहे, तो राज्यलोभाने नसून केवळ अन्यायाची चीड आल्यानेच होय. लक्ष्मणाच्या सर्व जीवनचरित्रावरून त्याच्यामध्ये स्वार्थाचा लेशही नव्हता, हें अगदी उघड आहे.

या वेळच्या लक्ष्मणाच्या बोलण्यांत भरताच्या ( **भरतस्य पक्ष्यः** ) पक्षाचें अस्तित्व अयोध्येंत होतें, असें दिसत आहे. लक्ष्मणाच्या कानावर या सर्व गोष्टी आलेल्या होत्या, यामुळेच त्याला या सर्व कारस्थानाची व यांत सामील झालेल्यांची व त्यामुळेच आपल्या वडिलांची— दशरथ राजाची– चीड आलेली होती. राज्यारोहणाच्या दिवशीं एकमेकांचा वध करण्यापर्यंत वितुष्टें वाढलेलीं होतीं व याच कारणासाठीं भरताच्या मामाला व कैकेयीच्या बापाला दशरथानें या समारंभाला बोलावलें नव्हतें. हे आले असते, तर रक्तपात होण्यास उशीर लागला नसता व कदाचित् अशा वेळीं लक्ष्मणाला आपलें धनुष्यही सज्ज करावें लागलें असतें. या दृष्टीनें लक्ष्मणाचें हें भाषण फार महत्त्वाचें आहे.

वरील लक्ष्मणाचें भाषण कौसल्येस आवडतें. ती म्हणते—

**भ्रातुस्ते वदतः पुत्र लक्ष्मणस्य श्रुतं त्वया ।**
**यदत्रानन्तरं तत्त्वं कुरुष्व यदि रोचते ॥**

( वा. रा. अयो. स. २१ । २१ )

' बाळा रामा ! लक्ष्मण काय बोलला तें तूं ऐकलेंस ना ? हें त्याचें म्हणणें तुला मान्य असलें, तर तसें करावयाचें असेल तर कर. '

लक्ष्मणाच्या भाषणांत दशरथाला--वडिलांना—कैद करावें किंवा वधावें व आपण राज्याचा ताबा घ्यावा, असें होतें. हें कौसल्येस आवडलें. आपल्या पती-चा वध तिला इष्ट होता, असा याचा अर्थ नसून घरांतील अन्तःस्थ सवतीच्या, विशेषतः, कैकेयीकडून होणाऱ्या जाचाला ती इतकी कंटाळली होती कीं, तिला या वेळीं लक्ष्मण म्हणत आहे, तें तसें केलें तरी चालेल, असें वाटलें. म्हणूनच तिनें लक्ष्मणाचा निषेध तर केला नाहींच, पण उलट त्याला पुष्टि दिली व तसें करण्यास रामालाच अनुमोदन दिलें.

दशरथाच्या घरांत सवतीमत्सर हा या इतक्या विकोपास पोचलेला होता. कौसल्या बिचारी जन्मभर घरात असतांही वनवासांत असल्याप्रमाणें दुःखी होती, म्हणूनच तिच्या तोंडून हे शब्द निघाले आहेत.

# दशरथाचे बांधव.

अयोध्येंत दशरथ राज्यच करीत होता, तेव्हा त्याचा पक्ष प्रबल असणें स्वाभाविक आहे व त्याचे तेथे बांधव असणेंहि शक्य आहे. स्वत: दशरथच आपल्या बांधवांचा वध होईल, असें म्हणत आहे—

**निहत्य बांधवान् मम ।** ( अयो. १२ । १०६ )

' माझ्या बांधवांना ठार मारून मग कैकेयी अयोध्येचें राज्य करूं दे ! ' असें त्रासाने म्हणत आहे. कैकेयीच्या हाती राज्यकारभार गेल्यावर कौसल्या, सुमित्रा, दशरथ यांना आपले बांधव सुरक्षित राहणार नाहीत, असें वाटत होतें. यावरून तेथील पक्षोपपक्षांमध्ये कशीं वितुष्टें होतीं, तें उघड होत आहे.

दशरथ, कौसल्या, सुमित्रा व कैकेयी यांचे ज्ञाति बांधव निरनिराळे होते व त्यांत चुरसही होती, असें दिसतें. पहा—

## ( १ ) दशरथाचे जातिबांधव.

दशरथच कैकेयीस म्हणत आहे की—

**पुरं च राष्ट्रं च निहत्य बांधवान् ममाहितां च भवाभिभाषिणी॥**

( अयोध्या. १२।१०६ )

' हें नगर, हें राष्ट्र व माझे बांधव यांना ठार मार व हे कैकेयी ! तूं माझ्या शत्रूंशीं गोड बोलणारी हो. ' यामध्ये दशरथ आपल्या बांधवांचा उल्लेख करीत आहे. व कैकेयी या आपल्या बांधवांस ठार मारील व आपल्या शत्रूंस मदत करील, असेंहि त्यास वाटत आहे ! पक्षोपपक्ष असले म्हणजे असें होणें शक्य असतें.

## ( २ ) कौसल्येचे व ( ३ ) सुमित्रेचे जातिबांधव

कौसल्या रामास म्हणत आहे की हे रामा !—

**ज्ञातीन् मे, सुमित्रायाश्च नन्दय ॥** ( अयो० ४।३९ )

' तूं आता उद्या राज्यावर येणार आहेस, तेव्हा तूं माझ्या ज्ञातिबांधवांना व

सुमित्रेच्या ज्ञातिबांधवांना आनन्दित कर.’ यावरून कौसल्येच्या मनांत काय आकांक्षा होत्या, तें समजून येणें शक्य आहे. रामानें राज्यावर येऊन आपल्या व सुमित्रेच्या ज्ञातिबांधवांस आनंदवावें, अशी कौसल्येची अपेक्षा होती, यांतहि कौसल्या व सुमित्रा एका बाजूस व फक्त कैकेयी दुसऱ्या बाजूस असलेली दिसत आहे. कैकेयीचें इतर दशरथ-पत्न्यांशीं फारसें सरळ नव्हतें, असें यावरून दिसत आहे. कुब्जा दासी कैकेयीला समजाऊन सांगत असतांहि ती हाच भाव वर्णन करीत आहे-

## ( ४ ) कैकेयीचे जातिबांधव.

**एवं ते ज्ञातिपक्षस्य श्रेयश्चैव भविष्यति।**

( अयोध्या. ८।३४ )

‘हे कैकेयी ! भरताला राज्य व रामाला वनवास झाला तरच तुझ्या जातिबांधवांचें कल्याण होईल.’ यावरून अयोध्येंत कैकेयीचे निराळे जातिबांधव होते व त्यांचें कल्याण होण्यासाठीं भरतालाच गादी मिळणें आवश्यक होतें, हें उघड दिसतें. पुढे जेव्हा लक्ष्मण रागावला, तेव्हा तो भरताच्या पक्षाच्या लोकांचा वध करण्यासहि तयार झाला, तें पहा—

**तमहं दुर्गतिं क्रूरं वधिष्यामि न संशयः।**
**तत्पक्षीयानपि सर्वान्०॥** ( अयोध्या. ३१।२१ )

‘त्या दुष्ट व क्रूर भरताचाच मी वध करीन व त्याच्या पक्षाचे जे लोक असतील, त्यांचाही मी वध करीन, यांत शंका नाही.’ असें लक्ष्मण म्हणत आहे. यामध्यें भरताला तो ‘**दुर्गति व क्रूर**’ अशीं विशेषणें लावीत आहे. ज्यांची चालचलणूक वाईट आहे, ते दुर्गति होत. भरत असा असेल काय? असा पुरावा सर्व रामायणांत नाही. येथें भरतपक्षीय लोकांच्या कुटिल कारवायांमुळे भरतावर हा प्रवाद आलेला दिसत आहे. पण यावरून कैकेयीचा व भरताचा असा पक्ष अयोध्येंत असावा, असें म्हणावें लागतें व त्याच्या नरडीचा घोंट घ्यावा, असें वाटण्याइतका द्वेषाग्नि लक्ष्मणाच्या अन्तःकरणांत पेटावा, येथपर्यंत या पक्षोपपक्षां-

-वील राजकारण या वेळीं चिघळलेलें होतें, हें निर्विवाद होय.

## रामाला संशय.

कैकेयी अत्यंत दुष्ट आहे, ती वेळप्रसंगीं आपली आई कौसल्या, हिला विष द्यावयासहि मागे पुढे पाहणार नाही, असें रामासहि वाटलें होतें, म्हणून तो म्हणत आहे—

**क्षुद्रकर्मा हि कैकेयी द्वेषादन्यायमाचरेत् ।**
**परिदद्याद् हि धर्मज्ञ गरं ते मम मातरम् ॥**

( अयोध्या. ५३-१८ )

' कैकेयी अगदी क्षुद्रकर्मे करणारी आहे. द्वेषामुळे ती अन्याय करण्यास चुकणार नाही. **( मम )** माझी कौसल्या व **( ते )** तुझी माता सुमित्रा यांना कदाचित् ती विष सुद्धा देईल. ' हें रामाचें भाषण आहे. यासाठी राम लक्ष्मणास म्हणत आहे की, लक्ष्मणाने अयोध्येतच रहावें. यामुळे कैकेयीवर वचक राहील व तिच्या अत्याचारांस आळा बसेल. रामाच्या मनांत हे विचार येत आहेत ते अगदी निष्कारण असतील, असें समजण्याचें कारण नाही. सवतीमत्सर व पक्षभेद हे काय करतील व काय करवतील, हें कोण सांगूं शकेल बरें ? याची साक्ष या दशरथाच्या घरच्या स्थितींत चांगली दिसून येते. तसेंच आणखी राम काय म्हणत आहे, तें पहा—

**सा हि राज्यमिदं प्राप्य नृपस्याश्वपतेः सुता ।**
**दुःखितानां सपत्नीनां न करिष्यति शोभनम् ॥ १३ ॥**
**न स्मरिष्यति कौसल्यां सुमित्रां च सुदुःखिताम् ।**
**भरतो राज्यमासाद्य कैकेय्यां पर्यवस्थितः ॥ १४ ॥**

( अयोध्या. ३१ )

' अश्वपति राजाची मुलगी कैकेयी ही भरताला राज्य प्राप्त झाल्यानंतर, [ अर्थात् ही राजमाता झाल्यानंतर ] आपल्या दुःखित सवतींचें कधीहि चांगलें करणार नाही. भरत तर कैकेयीच्याच तंत्राने वागूं लागेल व दुःखित कौसल्या व सुमित्रा यांचें स्मरण सुद्धा करणार नाही. ' रामाच्या मनांत हे विचार भरता-

संबंधाने व कैकेयी संबंधाने घोळत होते! यावरून दशरथाच्या घरांतील हा सव-तीचा मत्सर कोणत्या थरास पोचला होता, तें समजणें शक्य आहे. परस्परांचा विश्वास परस्परांवरून सपशेल उडून गेलेला होता, हें येथे स्पष्ट होत आहे. पहा भरताबद्दल राम आणखी काय म्हणत आहे—

सुखी बत सभार्यश्च भरतः कैकयी-सुतः।
मुदितान् कोसलान् एको यो भोक्ष्यत्यधिराजवत् ॥११॥
स हि राज्यस्य सर्वस्य सुखं एक भविष्यति ।
ताते तु वयसातीते मयि चारण्यमाश्रिते ॥ १२ ॥
अपीदानीं तु कैकेयी सौभाग्यमदमोहिता ।
कौसल्यां च सुमित्रां च सा प्रबाधेत मत्कृते ॥ १५ ॥
(अयोध्या. ५३)

‘ कैकेयीचा मुलगा भरत हा आपल्या बायकोसह आता सुखी होईल; कारण तोच एकटा आता या कोसल देशाचा स्वामी होऊन राहणार आहे. वडील तर म्हातारे झाले आहेत व मी अरण्यांत जात आहें. अशा स्थितींत या सर्व राज्याचा भोग तोच एकटा आता करणार, हें निर्विवाद होय. आता कैकेयी ही सौभाग्य-मदानें मोहित होऊन माझ्या कारणानें कौसल्येला व सुमित्रेला विशेषच दुःख देईल. ’

या रामाच्या बोलण्यांत पुष्कळच अर्थ आहे. अरण्यांत जाण्याने आपल्या घरची स्थिति कशी होईल, याविषयींचें रामाचें हें मत आहे. दशरथ म्हातारा असल्यामुळे भरताला तो प्रतिबंध करूं शकणार नाही. मी तर १४ वर्षे अरण्यांत राहणार आहें, तेव्हा भरत हा सर्व निष्कंटक राज्याचा उपभोग घेईल व सुखी होईल. आपणास मात्र दुःखांत दिवस काढावे लागणार, हें रामाचें म्हणणें आहे, रामाच्या मनांत कैकेयी व भरत यांविषयी कांही विकल्प मूळचा नसला तरी अरण्यांत जाण्याने तो उत्पन्न झाला असावा, असें येथे वाटतें.

कौसल्या व राम यांच्या मनामध्ये व लक्ष्मणाच्या मनामध्ये कैकेयी व भरत यांसंबंधाने असे विकल्पाचे भाव उत्पन्न झालेले होते. हे सकारण होते असें कैकेयीच्या वर्तनावरून उघड होत आहे. कुब्जेच्या भाषणांतही यासंबंधीचे

धागेदोरे दिसून येत आहेत. ते आता. पहा कुब्जा दासी कैकेयीस समजून सांगत आहे—

मंथरा म्हणते–

**भरतादेव रामस्य राज्यसाधारणात् भयम् ।** ( अयोध्या. ८।५ )

" राम व भरत यांचा राज्यावर सारखा अधिकार असल्यामुळे भरतापासून रामाला भय आहे. ' व त्याचप्रमाणे रामापासून भरतालाही भय होणें शक्य आहे. ' **राज्य-साधारण** ' म्हणजे राज्यावर सारखा अधिकार असणें. राम पट्टराणीचा मुलगा म्हणून त्याचा अधिकार राज्यावर आहे व भरताच्या आईच्या लग्नाच्या वेळीं दशरथाचें वचन मिळालेलें असल्यानें भरताचाही राज्यावर अधिकार उत्पन्न झाला. अशा रीतीनें राज्यावर दोघांचाहि अधिकार समान उत्पन्न झाल्यामुळे दोघांनाही एकमेकापासून भय उत्पन्न होणें स्वाभाविक आहे. रामाच्या वरच्या बोलण्यांतहि याचें अल्पसें दिग्दर्शन झालेलें आहे. मंथरा म्हणते की भरत हा रामाचा सहज शत्रु आहे—

**स ते सुखोचितो बालो रामस्य सहजो रिपुः ।**

( अयोध्या. ८।३५ )

' हे कैकेयी ! तुझा सुख भोगण्यास योग्य असलेला मुलगा भरत हा रामाचा जन्मजात वैरी आहे. ' हें जन्मजात ( **सहजः** ) वैर कां बरें उत्पन्न व्हावें ? याला एकच कारण होतें व तें हें की राज्यावर या दोघांचे हक्क सारखे उत्पन्न झाले होते. वडीलपणामुळे रामाचा राज्यावर हक्क होता व दशरथाचें वचन गेल्यामुळे भरताचा हक्क राज्यावर उत्पन्न झाला होता. जन्मतः वैर हें जन्मापूर्वी विद्यमान असणाऱ्या कारणांनी व या समान हक्कामुळे उत्पन्न होत असतें. रामाचा व भरताचा जन्म होण्यापूर्वीपासून हें वैराचें बीज रुजत घातलें गेलें होतें. कैकेयीच्या लग्नाच्या वेळीं कैकेयीच्या बापाला दशरथानें जें वचन दिलें होतें, तें जर दिलें गेलें नसतें तर हें सहज वैर उत्पन्न होण्याचें कारणच नव्हतें. पण दशरथानें तें वचन दिलें असल्यामुळे दोघांचे जन्मजात समान हक्क उत्पन्न झाले व जन्मजात हक्क झाल्यामुळे जन्मजात वैरही उत्पन्न झालें.

जर दशरथ ने केकय राजाला वचन दिलें नसतें, तर भरत हा रामाचा भाऊ म्हणून राज्यांत राहिला असता. तो एखाद्या हुद्द्याच्या जाग्यावर राहता. त्यास राज्यावर अधिकार सांगतां आला नसता. असा अधिकार नसता तर सहज शत्रुत्वही झालें नसतें. यावरून राम व भरत यांचें सहज शत्रुत्व व्हावें, अशी परिस्थिति दशरथाच्या या केकय राजास दिलेल्या वचनामुळे उत्पन्न झालेली होती.

भरत व लक्ष्मण यांतील भेदही याच कारणामुळे उत्पन्न झालेला होता व हा मंथरेच्या भाषणांतहि व्यक्त झालेला आहे पहा—

**तस्मात् न लक्ष्मणे रामः पापं किञ्चित् करिष्यति ।**
**रामस्तु भरते पापं कुर्यादेव न संशयः ॥**

(अयोध्या. ८-३२)

'याचसाठीं राम लक्ष्मणाचें अहित करणार नाही; पण राम भरताविषयीं मात्र कांहीतरी पाप करील, यांत संशय नाही.'

अर्थात् लक्ष्मणाला राज्यावर कांहीएक अधिकार नाही. यासाठीं रामाकडून लक्ष्मणाचा द्वेष व्हावा अशासाठीं कांहीएक कारण दिसत नाही. पण वरील कारणासाठीं मात्र भरताचा द्वेष राम करील; कारण एका राज्यावर हक्क सांगणारे हे दोघे उत्पन्न झालेले आहेत. याचसाठीं भरताचा नाश राम करील, याकरितां जपलें पाहिजे. असे मंथरा कैकेयीस सांगत आहे.

कैकयीच्या मनांत आपणाविषयीं भयंकर संशय आहे, हें राम जाणत होता. म्हणून तो सुमंत्राला परत अयोध्येंत जा, म्हणजे मी वनांत गेलों, याविषयीं कैकेयीस खात्री पटेल व ती दशरथास जाच करणार नाही, असें म्हणत आहे. पहा—

**नगरीं तां गतं दृष्ट्वा जननी मे यवीयसी ।**
**कैकेयी प्रत्ययं गच्छेत् इति रामो वनं गतः ॥ ६१ ॥**
**विपरीते तुष्टिहीना वनवासं गते मयि ।**
**राजानं नातिशंकेत मिथ्यावादीति धार्मिकम् ॥ ६१ ॥**

[अयोध्या. ५२]

'हे सुमंत्रा ! तूं अयोध्येस परत गेलास म्हणजे, माझी धाकटी आई कैकेयी राम वनांत गेला असें समजेल व निश्चित होईल. नाहीतर मी वनांत गेलों तरी तिचें समाधान होणार नाही व धार्मिक दशरथ राजाला तो खोटें बोलणारा आहे असें ती म्हणेल व छळत राहील.' रामाचे हें म्हणणे कैकेयीच्या स्वभावाचें व राजघराण्यांतील या स्त्रियांत कशा खळबळी चालू होत्या, त्याचें द्योतक आहे.

कैकेयी स्वतःला शत्रुरहित करून राहूं इच्छीत होती. म्हणून ती म्हणते कीं– **निःसपत्नां च मां कृत्वा ।** ( अयोध्या. १४ । २२ ) निःसपत्न होणें म्हणजे काय तें कांहीं आता वाचकांस सांगण्याचें कारण नाही. भरतासंबंधी इतकी अनुदार भाषा या मंडळीमध्ये बोलली जात होती. त्याला कैकेयीचें व तिच्या पक्षीयांचें आचरणच मुख्यतः कारण आहे. भरताचें स्वतःचें एकही वचन या सर्व अनुदार भाषणाला कारण होण्यासारखें असें दाखवतां येणार नाही व भरत येथे १२ वर्षे नव्हताही. वसिष्ठही भरताचा निर्वाला देत आहे, तो ही येथे विचारांत घेणें इष्ट आहे—

**भरतश्च सशत्रुघ्नः चीरवासा वनेचरः ।**
**वने वसन्तं काकुत्स्थं अनुवत्स्यति पूर्वजम् ॥**

( अयोध्या. ३७। २७ )

'हे कैकेयी ! तूं जरी असा हा अनर्थ केलास, तथापि शत्रुघ्नासह भरत वल्कलें नेसून वनांत जाईल व वनांत राहणाऱ्या रामाबरोबर वनांतच राहूं लागेल.' असें वसिष्ठ कैकेयीस बजावीत आहेत वसिष्ठांजवळच हीं सर्व मुलें शिकून तयार झालीं होतीं. तेव्हा त्यांस या सर्वांचा स्वभाव माहीत होता. म्हणून वसिष्ठ कैकेयीस सांगत आहे की तूं जरी भरताला राज्य दिलेस तरी तो त्याचा मुळींच स्वीकार करणार नाही व तो राम असेल तेथे वनांत जाईल व वल्कलें नेसून रामाप्रमाणेच वनवास भोगेल.

वसिष्ठाने जसा हा भरताचा निर्वाळा दिलेला आहे, तसा तो दुसऱ्या कोणीहि दिलेला नाही. प्रत्यक्ष दशरथालाही थोडी शंका होतीच. रामावर तर

वनवासाचा प्रसंगच आला होता. तेव्हां त्याच्या मनांत संशय येणें स्वाभाविक होतें. भरद्वाजासारख्या तिऱ्हाईत ऋषीलाही भरताबद्दल संशय वाटला होता. पण कुलगुरु वसिष्ठाने मात्र भरताचें अन्तःकरण पूर्णपणें ओळखलें होतें व जसें त्याने भरताविषयी म्हटलें तसेंच भरताने आल्यावर केलें; यावरून भरताचें अन्तःकरण शुद्ध असावें, असेंच म्हणणें प्राप्त होतें.

भरद्वाज ऋषि रामाला म्हणतात–

**चिरस्य खलु काकुत्स्थ पश्याम्यहमुपागतम् ।**
**श्रुतं तव मया चैव विवासनं अकारणम् ॥**

( अयोध्या. ५४।२१ )

' हे रामा ! निष्कारण तुला वनवासाला जावें लागलें, हें मी ऐकलें आहे व त्यानंतर बऱ्याच कालाने तुला येथे आलेला मी पहात आहें. ' असें भरद्वाज मुनि म्हणत आहेत, यावरून रामाच्या वनवासाचा वृत्तांत ऋषींच्या आश्रमांत चर्चिला जात होता, ही गोष्ट उघड होत आहे. अयोध्येंतून रामाला वनवासाला जावें लागलें हें वृत्त तत्काल या ऋषींच्या आश्रमांत पोचलें व तेथे त्यासंबंधाची चर्चा सुरू झाली. याला कांही दिवस लोटल्यानंतर राम भरद्वाजाच्या आश्रमांत येऊन पोचलेला आहे. ऋषींनी भवति न भवति करून 'रामाला निष्कारण वनवासाला पाठविलें ' असें निश्चित मत ठरवलें होतें, हें भरद्वाजांच्या बोलण्यावरून व्यक्त होत आहे. यामुळे हे सर्व ऋषि रामाशीं पूर्ण सहानुभूति ठेवूं लागले होते, ही गोष्ट भरद्वाज रामाला दुसऱ्या दिवशीं बरेच दूरवरपर्यंत पोचवावयास गेले होते, यावरून उघड होते. भरद्वाजांनी राम लक्ष्मण सीता यांना आपल्याच आश्रमांत रहावयास सांगितलें होतें, तेंही याच सहानुभूतीमुळे होय. दशरथाच्या घरांतील हीं भांडणें व हे पक्षोपपक्ष याप्रमाणे ऋषींच्या आश्रमांत चर्चिले जाण्याइतके सार्वजनिक झालेले होते, हें यावरून उघड दिसतें.

या सर्व वर्णनावरून रामाचा राज्याभिषेक ही सहज होणारी बाब होती, असें म्हणतां येणें शक्य नव्हतें, हेंच खरें. या सर्व गोष्टी विचारांत घेतल्या असतां दशरथाने जी तयारी केली होती, ती फार दूरदर्शीपणाची होती, हें उघड होतें. ती शेवटी साधली नाही, हें निराळें.

# पातिव्रत्याचा धर्म.

रामायणामध्ये " **सीता** " हा पातिव्रत्याचा आदर्श म्हणून दाखवलेला आहे व तो सर्व स्त्रियांच्या पुढे सतत आदर्श म्हणूनच राहण्यासारखा आहे. जेव्हां रामाने वनवासांत जावें असें ठरलें, त्यावेळीं कौसल्या बिचारी दुःखीकष्टी होऊन रामाला म्हणाली की, ' मीहि तुझ्या बरोबर वनांत येतें; कारण तूं गेल्यावर या सवतीचा जाच मला येथे सहन होणें शक्य नाही. ' हें कौसल्येचें भाषण ऐकून रामाने आपल्या आईस जो उपदेश केला आहे, तो प्रत्येक स्त्रीने मनन करण्यासारखा आहे पहा—

**भर्तुः पुनः परित्यागो नृशंसः केवलं स्त्रिया ।**
**स भवत्या न कर्तव्यो मनसापि विगर्हितः ॥ १२ ॥**
**यावज्जीवति काकुत्स्थः पिता मे जगतीपतिः ।**
**शुश्रूषा क्रियतां तावत् स हि धर्मः सनातनः ॥ १३ ॥**
**मया चैव भवत्या च कर्तव्यं वचनं पितुः ॥ १६ ॥**
**जीवन्त्या हि स्त्रिया भर्ता दैवतं प्रभुरेव च ।**
**भवत्या मम चैवाद्य राजा प्रभवति प्रभुः ॥ २१ ॥**
**व्रतोपवासनिरता या नारी परमोत्तमा ।**
**भर्तारं नानुवर्तेत सा च पापगतिर्भवेत् ॥ २६ ॥**
**भर्तुः शुश्रूषया नारी लभते स्वर्गमुत्तमम् ।**
**अपि या निर्नमस्कारा निवृत्ता देवपूजनात् ॥ २७ ॥**
**शुश्रूषामेव कुर्वीत भर्तुः प्रियहिते रता ।**
**एष धर्मः स्त्रियो नित्यो वेदे लोके श्रुतः स्मृतः ॥ २८ ॥**

( अयोध्या. २४ )

' हे आई ! पतीचा त्याग करणें हें स्त्रियांना केव्हांहि चांगलें नाही. मनाने नवऱ्याचा त्याग करण्याचा विचार करणेंहि अत्यंत निंद्य आहे. यासाठीं तसा तो कधींहि करूं नये. जोंपर्यंत राजा जिवंत आहे, तोंपर्यंत त्याची शुश्रूषा तूं करावीस, हाच तुझा सनातन धर्म आहे. मी व तूं त्याच्या वचनाप्रमाणे चालावें, हेंच उत्तम

आहे. जिवांत जीव असेपर्यंत स्त्रीला पति हेंच दैवत आहे व तोच त्यांचा प्रभु आहे. जी स्त्री आपल्या पतीची सेवा-शुश्रूषा न करतां व्रतें, उपवास वगैरे करीत राहते, ती अधोगतीला जाते. तसेंच जी स्त्री देवपूजा करीत नाही, देवला नमनही करीत नाही, पण एकचित्ताने पतीची शुश्रूषा करते, तिला उत्तम स्वर्ग मिळतो. म्हणून स्त्रीने पतीची शुश्रूषा करावी व पतीचें हित करण्यांत दक्ष असावें, हाच स्त्रियांचा नित्य धर्म आहे, असें वेदामध्ये सांगितलें आहे व लोकांमध्येहि प्रसिद्ध आहे. म्हणून—

**नियता नियताहारा भर्तृशुश्रूषणे रता ।**
**प्राप्स्यसे परमं कामं मयि पर्यागते सति** ॥ ३० ॥
( अयो० २४ )

' आहाराचा संयम कर, नियमाप्रमाणें वाग व पतीची शुश्रूषा कर, म्हणजे परम श्रेष्ठ सिद्धि प्राप्त होईल. '

असें रामाने सांगतांच सती कौसल्या गप्प राहिली व पतीची सेवा करून सवतीचा कितीहि जाच झाला तरी तो सहन करून, तेथेच रहावयास तयार झाली. इतकें पातिव्रत्याचें माहात्म्य आर्यस्त्रियांच्या अन्तःकरणांत वसत असतें.

## कौसल्येचा उपदेश.

पातिव्रत्यासंबंधाने स्वतः कौसल्येने आपल्या हृदयांतील भाव प्रकट केले आहेत तेही येथे पहा. कौसल्या सीतेस उपदेश करते—

सीतेला आलिंगन देऊन, मस्तकाचें अवघ्राण करून कौसल्या प्रेमाने सीतेला म्हणते— " हे सीते ! नेहमी सुखांत वाढलेल्या व प्रिय भोग्य पदार्थ सतत प्राप्त होत असल्यामुळे संतुष्ट आहेत असें दिसणाऱ्या [ **असत्यः** ] वाईट स्त्रिया [ **विनिपातगतं भर्तारं नानुमन्यन्ते** ॥२०॥ ] संकटांत सापडलेल्या आपल्या पतीच्या प्रतिकूल आचरण करतात, त्यांना साध्वी स्त्री असें कोणी समजत नाही. पूर्वी सुखाचा अनुभव घेतल्यानंतर थोडीशी विपत्ति सोसण्याचा प्रसंग आला असतां, या स्त्रिया पतीला दूषण देतात अथवा त्याचा त्यागहि करतात.

[ **एष स्वभावो नारीणां ॥२१॥** ] असा कांही दुष्ट स्त्रियांचा स्वभाव दिसून येत असतो—

**असत्यशीला विकृता दुर्गा अहृदयाः सदा।**
**असत्यः पापसंकल्पाः क्षणमात्रविरागिणः ॥२२॥**
**न कुलं न कृतं विद्या न दत्तं नापि संग्रहः।**
**स्त्रीणां गृह्णाति हृदयं अनित्यहृदया हि ताः ॥२३॥**

( अयो० ३९ )

'असत्य बोलणाऱ्या, वाईट मार्गाने जाणाऱ्या, दुष्ट कृत्यांतच त्यांचें मन जातें, हृदयामध्ये शुभ भावना नसतेच, अशा जारिणी किंवा असाध्वी स्त्रिया, पापाचरण करणाऱ्या व क्षणमात्र प्रेम करणाऱ्या स्त्रिया, नेहमी बिघडलेल्याच असतात. कुल, सुकृत, विद्या, दान किंवा संग्रह यांपैकीं कशानेही या स्त्रियांचें मन पापापासून निवृत्त करतां येत नाही. कारण त्यांचें हृदय चंचल असतें.' तसेंच—

**साध्वीनां तु स्थितानां तु शीले सत्ये श्रुते स्थिते।**
**स्त्रीणां पवित्रं परमं पतिरेको विशिष्यते ॥ २४ ॥**

( अयोध्या. ३९ )

'शील, सत्य, उपदेश, सदाचार आणि धर्ममर्यादा यांना अनुसरून वागणाऱ्या ज्या पतिव्रता स्त्रिया असतात, त्यांना पति हें एकच परम श्रेष्ठ असें पुण्यसाधन आहे. यासाठी हे सीते! राम वनांत जात आहे असें म्हणून ( **स त्वया नावमन्तव्यः ॥ २५ ॥** ) तूं त्याचा अपमान कधीहि करूं नकोस. हा सधन असो अथवा निर्धन असो तो ( **तव देवसमः** ) तुला देवासारखा पूज्य आहे, हें विसरूं नकोस' (वा. रा. अयोध्या. स. ३९ )

## सीतेचें उत्तर.

कौसल्येचें वरील भाषण ऐकून, आपल्या सासूचा आशय समजून, सीतेने तिला पुढे लिहिल्याप्रमाणे समयोचित उत्तर दिलेलें आहे, तें आता पहा—

'सासुबाई ज्याप्रमाणे वागावें असें मला सांगत आहेत, त्याप्रमाणे मी योग्य आचरण ठेवीन. पतीसंबंधीं स्त्रीने कसें आचरण ठेवावें, तें मी ऐकलें आहे व

त्याविषयी मला सर्व कांही माहीत आहे. माझ्यासंबंधी सासूबाईनी मुळीच संशय येऊं नये. माझें पाऊल धर्म–मार्गावरून भ्रष्ट होणार नाही. ( **धर्माद्विचलितुं नाहं अलं । २८** ) तारेशिवाय वीणा नसतो, चाकाशिवाय रथ नसतो, त्याचप्रमाणे स्त्रीला शंभर पुत्र असले तरी पतीशिवाय कधीहि सुख नसतें ( **न अपतिः सुखं ऐधेत । २९.** ) पहा—

**मितं ददाति हि पिता मितं भ्राता मितं सुतः ।**
**अमितस्य तु दातारं भर्तारं का न पूजयेत्** ॥ ३० ॥

( अयो० ३९ )

‘ पिता भ्राता किंवा मुलगा हे थोडेंसें सुख देऊं शकतात. पतीपासूनच स्त्रीला अपरिमित सुख मिळत असतें, म्हणून अशा अपरिमित सुख देणाऱ्या पतीची पूजा कोणती बरें स्त्री करणार नाही ? मला माहित आहे की ( **स्त्रिया भर्ता दैवतं । ३१ ।** ) पति हेंच स्त्रीचें दैवत आहे. यासाठी ( **श्रुतधर्मपरायणा** ) धर्मामध्ये पारंगत असलेली मी पतीचा अपमान करीन असें कां बरें सासूबाईना वाटत आहे ? ’

कौसल्येचें भाषण व सीतेचें उत्तर हीं दोनहीं फारच बहारीचीं आहेत. त्यांचा वाचकांनी या ठिकाणीं अवश्य विचार करावा. दशरथ राजा हा नेहमी कैकेयीच्या महालांत पडलेला असे व त्यामुळे कौसल्या आदि स्त्रियांना फारच दुःख भोगावें लागे, तथापि जेव्हा जेव्हा दशरथाची भेट होत असे, तेव्हा तेव्हा कौसल्या दशरथाशीं कशी वागत असे, तें सतीधर्माचा विचार करताना पाहणें योग्य आहे. दशरथ म्हणतो–

**यदा यदा च कौसल्या दासीव च सखीव च** ॥ ६८ ॥
**भार्यावद्भगिनीवच्च मातृवच्चोपतिष्ठति ।**
**सततं प्रियकामा मे प्रियपुत्रा प्रियंवदा** ॥ ६९ ॥

( अयोध्या. १२ )

‘ वेळोवेळीं कौसल्या ही दासी, सखी, भार्या, बहिण, व माता याप्रमाणे वागून माझी शुश्रूषा करते, ती सतत मला प्रिय होईल असेंच आचरण करते, माझ्या

बरोबर नेहमी प्रिय बोलते व तिचा मुलगाही मला प्रिय आहे.' सती किती रीतींनी पतीची सेवा करते, तें येथे पहावें.

राम वनांत जाऊं लागला असतां त्याने सीतेला सांगितलें की, तूं अयोध्येंतच रहा व अमूक तऱ्हेने वाग. राम आपणास वनांत आपल्याबरोबर नेत नाही, असें पाहून सीता रागावली व क्रोधानेच रामाला म्हणाली—

'हे वीर ! हें जें आपण भाषण केलें, तें मी ऐकावें असें नाही. पिता, माता, भाऊ, पुत्र व सून हीं सर्व आपल्या सुकृताचाच उपभोग घेत असतात. ( **भर्तुः भाग्यं तु नारी एका प्राप्नोति ।। २७।५** ) पण पत्नीलाच नवऱ्याचें भाग्य भोगतां येतें. यासाठी आपणांस वनांत जावें, अशी जी आज्ञा झालेली आहे, ती मलाही झालेली आहेच. पिता, पुत्र, आत्मा, माता व सखी यापैकीं कोणीहि पत्नीला सहायक होत नाहीत; पण (**नारीणां इह प्रेत्य च पतिरेको गतिः। ६** ) स्त्रियांना पति हाच आश्रय आहे. हे वीर ! जर तुम्ही वनांत निघाला आहां तर काटे एका बाजूला करीत मी तुमच्या पुढे जाईन. यासाठी मला बरोबर घेऊन जा. माझ्यामध्ये मुळीच पाप नाही. राजवाड्यांत, विमानांत किंवा आकाशसंचारांत ( **भर्तुः पादच्छाया विशिष्यते । ९** ) पतीच्या पायांच्या छायेंत राहणें हेंच पत्नीला सुखदायक होत असतें. आईबापांनी मला संसारांतील सर्व अवस्थांमध्ये कसें वागावें, तें सर्व नीटपणाने समजाऊन सांगितलें आहे. मी माहेरीं राहिल्याप्रमाणे आनंदाने वनांत राहीन. त्रैलोक्याच्या ऐश्वर्यालाही तुच्छ मानीन व पातिव्रत्याने आनंदांत राहीन. शुचिर्भूत ब्रह्मचारिणी राहून (**ते नित्यं शुश्रूषमाणा**) तुमची नित्य शुश्रूषा करीत राहीन, ( **अग्रतस्ते गमिष्यामि** ) मी तुमच्या पुढे जाईन, ( **भोक्ष्ये भुक्तवति त्वयि । १७** ) आपलें भोजन झाल्यावर जें काय उरेल तें मी खाईन. तुमच्याशिवाय मला स्वर्गांतहि सुख वाटणार नाही. ( **पादौ उपगृह्य संमता । २३** ) तुमच्या पायांची सेवा करीत तुमच्या मनाप्रमाणे वागेन. तसेंच—

**अनन्यभावां अनुरक्तचेतसं**
**त्वया वियुक्तां मरणाय निश्चिताम् ॥२३॥**

"माझ्या मनांत दुसरी कसलीहि भावना नाही, माझें मन आपल्याच ठिकाणीं

अनुरक्त झालेलें आहे व जर आपला वियोग झाला तर मरण्य च च मी निश्चय केलेला आहे."

हें सीतेचें भाषण प्रतिव्रता स्त्रीचे मनोभाव उत्कृष्ट तऱ्हेने दाखवणारें भाषण आहे. यामध्ये पतिव्रता स्त्रीने पतीशीं कसें वर्तन करावें, तें उत्तम प्रकारें सांगितलें आहे. सीता रामाला आणखी म्हणते—

**पतिहीना तु या नारी न सा शक्ष्यति जीवितुम् ॥७॥**
**भर्तारमनुगच्छन्ती भर्ता हि परदैवतम् ॥ १६ ॥**
**इहलोके च पितृभिर्या स्त्री यस्य महाबल।**
**अद्भिर्दत्ता स्वधर्मेण प्रेत्यभावेऽपि तस्य सा ॥ १८ ॥**
**एवमस्मात् स्वकां नारीं सुवृत्तां हि पतिव्रताम्।**
**भक्तां पातिव्रतां दीनां मां समां सुखदुःखयोः ॥ १९ ॥**

(अयो० स० २९)

'स्त्रीला पति नसेल तर ती जिवंत राहूं शकत नाही. पत्नीने पतीच्या अनुकूल आचरण करावें; कारण पति हेंच तिचें श्रेष्ठ दैवत आहे. या लोकीं पाणी सोडून जी स्त्री ज्याला दिली जाते, ती मेल्यानंतरही त्याचीच असते. पतिव्रता स्त्री उत्तम आचरण करणारी, पतीची सेवा करणारी व भक्ति करणारी आणि सुखदुःखांत पतीशीं समभावाने वागणारी असते.' असें म्हणून ती पुढे रामाला म्हणते—

**पत्रं मूलं फलं यत्तु अल्पं वा यदि वा बहु।**
**दास्यसे स्वयमाहृत्य तन्मन्येऽमृतोपमम् ॥ १५ ॥**
**न मातुर्न पितुस्तत्र स्मरिष्यामि न वेश्मनः।**
**आर्तवान्युपभुञ्जाना पुष्पाणि च फलानि च ॥ १६ ॥**
**मत्कृतेन च ते शोको न भविष्यामि दुर्भरा।**
**यस्त्वया सह स स्वर्गो निरयो यस्त्वया विना ॥१७॥**

(अयोध्या. ३०)

'जें काय पत्र, पुष्प, फल अथवा मूळ, थोडें किंवा अधिक तुम्ही आणून द्याल, तें मी अमृतासारखें मानून घेईन. वनांत असतांना आईबाप किंवा घर

यांचें मी स्मरणसुद्धा करणार नाही. ऋतूप्रमाणे उत्पन्न होणारीं फळें किंवा फुलें जें काय मिळेल तेवढें खाईन. माझ्यासाठी तुम्ही शोक करण्याचें कारण नाही. माझ्या पोषणाचा भार तुम्हांस सहन करण्यास अशक्य आहे, असें वाटणार नाही. तुमच्यासह जें स्थान असेल, तोच स्वर्ग व तुमच्या विरहाने नरक होतो, असें मला वाटत आहे.'

साध्वी सीतेचें आचरण याचप्रमाणे झालेलें आहे. रावणाने सीता चोरून नेली, त्यावेळीं राम वनवासी निर्धन असा होता व रावण सम्राट् व धनसंपत्तीने संपन्न होता; पण रावणाचा स्वीकार तिने केला नाही व रामावरच निष्ठा ठेऊन ती राहिली. रामाने येऊन रावणाचा निःपात करावा, आपलें व आपल्या कुळाचें सुयश वाढवावें व मला सोडवून न्यावें, ही तिची अपेक्षा होती. रामाचें सुयश वाढावें, हा हेतु यांत स्पष्ट दिसतो. साध्वी स्त्रीला ऐहिक भोग कसे तुच्छ असतात व पतीचें यशच कसें प्रिय असतें, हें या सीतेच्या चरित्रावरून व्यक्त होतें. हाच साध्वीपणाचा आदर्श रामायणाने सर्व स्त्रियांपुढे ठेवला आहे.

जेव्हा कैकेयी राजा दशरथापुढे आपला हट्ट धरून बसली व त्यामुळे राजाला ती छळूं लागली, तेव्हा तें तिचें वर्तन पाहून रामास फारच आश्चर्य वाटलें व तो म्हणाला —

**कथं प्रकृतिसंपन्ना राजपुत्री तथागुणा ।**
**ब्रूयात् सा प्राकृतेव स्त्री मत्पीडयं भर्तृसंनिधौ ॥ १९ ॥**

( अयोध्या. २२ )

' कैकेयी राजपुत्री अशी गुणसंपन्न असतांही आपल्या पतीच्या समोर हलकट स्त्रीप्रमाणे मला पीडा देणारें भाषण कसें बरें करूं शकते?' हें खरोखर आश्चर्य आहे. सद्गुणी स्त्रिया असें कधीहि करणार नाहीत, असा रामाच्या म्हणण्याचा आशय आहे. प्राकृत स्त्रिया व सुसंस्कृत स्त्रिया असे स्त्रियांचे दोन भेद येथे रामाच्या बोलण्यांत आले आहेत. सभ्य व संस्कृतिसंपन्न जातीच्या स्त्रिया सुसंस्कृत असतात व असभ्य जातीच्या स्त्रिया प्राकृत असतात. कैकेयी या ठिकाणीं सभ्य घराण्यांतील स्त्री असतां ती प्राकृत स्त्रीप्रमाणे आचरण करीत आहे, म्हणून ती (**प्रकृति-संपन्ना** ) आपल्या नेहमीच्या स्वभावामध्ये नाही, कोणाच्या तरी कह्यांत गेलेली

आहे असें रामाचें म्हणणें आहे. साध्वी स्त्री असें कधीहि करणार नाही.

जेव्हा कैकेयी कोणाचेंच ऐकत नाही असें दिसलें, तेव्हा सुमन्त्र नामक दशरथाचा एक मंत्री तिच्यावर रागाऊन दात ओठ खात व बोटें मोडीत तिला म्हणाला—

**यस्यास्तव पतिस्त्यक्तो राजा दशरथः स्वयम् ॥ ५ ॥**
**न ह्यकार्यतमं किंचित् तव देवीह विद्यते ।**
**पतिघ्नीं त्वामहं मन्ये कुलघ्नीमपि चान्ततः ॥ ६ ॥**

( अयोध्या. ३५ )

' हे दुष्ट कैकेयी ! राजा दशरथासारख्या पतीचा तूं त्याग केला आहेस, म्हणून तूं पतिघातकी व कुलघातकी आहेस व तुला न करण्यासारखें दुष्कार्य कोणतें ही या जगांत राहिलेलें नाही. ' तसेंच—

**मावमंस्था दशरथं भर्तारं वरदं पतिम् ।**
**भर्तुरिच्छा हि नारीणां पुत्रकोट्या विशिष्यते ॥ ८ ॥**

( अयोध्या. ३५ )

' राजादशरथाचा असा तूं अपमान करूं नकोस. कारण कोट्यवधि पुत्रांपेक्षा पतिची इच्छा हीच स्त्रीला अधिक वाटली पाहिजे. '

**आभिजात्यं हि ते मन्ये यथा मातुस्तथैव च ।**
**न हि निंबात् स्रवेत् क्षौद्रं लोके निगदितं वचः ॥ १७ ॥**

( अयोध्या. ३५ )

' तुझ्या आईचे दुर्गुण तुझ्यामध्ये आले आहेत, असें मला वाटतें; कारण लिंबाच्या झाडांतून कधीहि मध गळूं शकत नाही ' असें म्हणून कैकेयीच्या आईचा इतिहास सांगण्यास सुमंत्राने प्रारंभ केला आहे. तो म्हणाला—

## कैकेयीची पतिघातकी आई.

' तुझ्या वडिलांना एका ऋषीने असा वर दिला होता कीं त्याला सर्व प्राण्यांच्या भाषांचा अर्थ समजावा. या वराने तुझ्या वडिलांस सर्व प्राण्यांची भाषा समजूं

लागली. पुढे एकदा तुझा पिता केकयराजा निजला असतां एका पक्ष्याने जें काय म्हटलें, तें त्यास समजलें व त्यामुळे तो निजल्यानिजल्याच फार मोठमोठ्याने हसूं लागला. राजा फार हंसत आहे असें पाहून त्याची पत्नी- कैकेयीची आई- राजास म्हणाली की 'तुम्ही कां हसत आहां, तें मला सांगा.' तेव्हा तो तिला म्हणाला की, 'मी कां हसलों हें जर मी तुला सांगितलें, तर तत्काळ मी मरेन; यासाठीं तें मी तुला सांगणार नाही.' तेव्हा ती राजास म्हणाली कीं- 'तूं जग अथवा मर, मला त्याची पर्वा नाही, पण हसण्याचें कारण मला समजलेंच पाहिजे.' राजानें हें सर्व त्या ऋषीला निवेदन केलें. तेव्हा ऋषीने राजास सांगितलें कीं 'ही तुझी बायको राहो वा निघून जावो, तूं तें कारण तिला सांगूं नकोस.' या ऋषिवचनावरून हे कैकेयी ! तुझ्या वडिलाने तुझ्या आईचा त्याग केला व त्यामुळे तो सुखाने राहूं लागला.'

कैकेयीची आई अशी असाध्वी कैदाशीण होती. हे कैकेयि ! तूंहि तसेंच आचरण करीत आहेस.

> **तथा त्वमपि राजानं दुर्जनाचरिते पथि ।**
> **असद्ग्राहमिमं मोहात् कुरुषे पापदर्शिनी ॥ २७ ॥**
> **सत्यश्चात्र प्रवादोऽयं लौकिकः प्रतिभाति मे ।**
> **पितॄन् समनुजायन्ते नरा मातरमङ्गनाः ॥ २८ ॥**
>
> ( अयोध्या ३५ )

'हे पापिणी कैकेयि ! तूं असें हें दुर्जनांनी आचरण्यास योग्य अशा असन्मार्गाचें आचरण केलें आहेस. म्हणून मला असें वाटतें कीं मुलगे बापाच्या वळणावर जातात व **मुली आईच्या वळणावर जातात**, असें जें सर्व लोक मानतात तेंच खरें आहे.'

कैकेयीचें व कैकेयीच्या आईचें वर्तन साध्वी स्त्रियांस साजेंसे नाही, हें येथे दाखवलें आहे. तसेंच लग्न करतेवेळीं कुल व शील पहावें, आईबाप कसे आहेत, इतर बहिणी कशा आहेत हें पहावें व मग सुशील मुलगी पसंत करावी, हें येथे सुचविलें आहे. कैकेयीचें लग्न झाल्यानंतर जेव्हा दशरथ तिच्या सौंदर्यावर लुब्ध होऊन तिच्याच महालांत पडून राहूं लागला, तेव्हा इतर राण्यांस जाच

होऊं लागला. त्यावेळीं कैकेयीच्या माहेरच्यांच्या वागणुकीची चर्चा होऊं लागली व त्या चर्चेमधून हा वृत्तांत अयोध्येमध्ये पसरला असला पाहिजे. नाहीतर सुमंत्राला हा वृत्तांत समजण्याचें कांहीच कारण दिसत नाही.

कैकेयी ही अशा खाष्ट आईची पोरगी होती. दशरथाला जर कैकेयीच्या आईचा वृत्तांत माहीत असता, किंवा माहीत झाल्यानतरहि त्याने रूपापेक्षा कुलाला अधिक प्राधान्य दिलें असतें, तर त्यावर अशी ही आपत्ति आलीच नसता. इतके कष्ट सोसून कौसल्या व सुमित्रा या कशा सुशील राहिल्या व सीता कशी आदर्श सती-धर्माने वागली, तशी कैकेयी वागली नाही, तर ती आपल्या आईच्या वळणावर गेली! अर्थात् येथे कैकेयीचें उदाहरण हें उच्छृंखल स्त्रियांच्या वागणुकीचा नमुना म्हणून दिलें असून, कौसल्या, सुमित्रा व सीता हे आदर्श साध्वींच्या चारित्र्याचे नमुने म्हणून वाल्मिकीने वर्णिले आहेत. सर्व वाचकांनी व विशेषतः स्त्री-वाचकांनी हे आदर्श पहावे व आपल्या जीवनामध्ये सतीधर्माचें उत्तम आचरण उतरवून स्त्रियांनी सीतेचें अनुकरण करावें.

सध्याच्या समतेच्या व स्वातंत्र्याच्या युगांतील अल्प शिक्षितांस कदाचित् या सतीधर्माची किंवा पतीची सेवा करण्याची कल्पना पसंत पडणार नाही. असें झाल्यास हें त्यांचें दुर्दैवच आहे, असें समजावें लागेल. यांनी सीतेचें सर्व चरित्र विचारांत घ्यावें, त्यांतील आदर्श आपल्या दृष्टिपुढे ठेवावा व अशा तेजस्वी स्त्रिया ज्या समाजांत असतील तो समाज किती उच्च मानला पाहिजे, याची खूणगाठ आपल्या मनांत बांधावी व अशा स्त्रिया आपल्या समाजांत होतील असें करावें. पतीपुढे श्रीरामाचा व स्त्रियांपुढे सीतेचा आदर्श नेहमी रहावा.

## अन्तःपुरांतील दक्षता.

अन्तःपुरांत वृद्धांचा पहारा असे. त्यानंतर स्त्रियांचा व विश्वासू वयोवृद्धांचा पहारा असे. याशिवाय दासी विरूप ठेवीत असत—

**कुब्जा-वामनिका-युतम् ।**

(अयोध्या १० । १२)

'कुबज्या कुरूप स्त्रिया व खुजा बेडौल अशा स्त्रियाच' दासी म्हणून नेमलेल्या

असत. कुबड्या, खुजा, पोंग आलेल्या, वाकडे तिकडे अवयव असलेल्या, तिरळ्या, कुरूप व विरूप अशा स्त्रिया निवडून त्यांना दासी म्हणून नेमलें जात असे. सुंदर स्त्रिया दासीपणाला योग्य समजल्या जात नसत. यांतील हेतु सहज ध्यानीं येण्यास रखा आहे. यजमानीणबाईच्या पतीची दृष्टी दासीवर जाऊं नये, त्या कितीहि नटल्या मुरडल्या तरी मोह घालण्याजोग्या त्या कोणत्याही रीतीनें होऊं नयेत, हा हेतु येथे स्पष्टपणें दिसत आहे.

पुरुषाची दृष्टि दासीवर जाऊं नये, यासाठीं हा उपाय योजलेला येथे दिसत आहे.

## राजनीति.

रामाला राज्यावर बसवण्याचें ठरतांच दशरथानें रामाला थोडासा राजनीतीचा उपदेश केला आहे, तो पहा—

> त्वया यतः प्रजाश्चेमाः स्वगुणैरनुरञ्जिताः ॥ ४१ ॥
> कामतस्त्वं प्रकृत्यैव विनीतो गुणवानसि ।
> भूयो विनयमास्थाय भव नित्यं जितेन्द्रियः ॥ ४२ ॥
> कामक्रोधसमुत्थानि त्यजस्व व्यसनानि च ।
> परोक्षया वर्तमानो वृत्या प्रत्यक्षया तथा ॥ ४३ ॥
> अमात्यप्रभृतीः सर्वाः प्रजाश्चैवानुरञ्जय ।
> कोष्ठागारायुधागारैः कृत्वा संनिचयान् बहून् ॥ ४४ ॥
> इष्टानुरक्तप्रकृतिर्यः पालयति मेदिनीम् ।
> तस्य नन्दान्ति मित्राणि लब्धामृतमिवामराः ॥ ४५ ॥
> तस्मात् पुत्र त्वमात्मानं नियम्यैवं समाचार ॥ ४६ ॥
>
> ( अयोध्या. ३ )

‘ हे रामा ! तूं या प्रजाजनांचा आपल्या गुणांनीं संतोष केला आहेस. तूं स्वभावतः अत्यंत गुणवान् आहेस व विनयशील आहेस, हें खरें आहे; तथापि अजूनही तूं अधिक विनय धारण कर व जितेन्द्रिय हो. काम व क्रोध यांपासून उत्पन्न होणारीं व्यसनें सोडून दे. हेरांच्या द्वारें आपल्या राष्ट्रांतील व परराष्ट्रांतील

सर्व वृत्तांत समजून घ्यावा, त्याचा योग्य निर्णय स्वतः करावा व राजसभेमध्ये त्याचा विचार होऊं द्यावा. सर्वांना योग्य न्याय मिळेल, अशी व्यवस्था ठेवावी. धान्याचीं कोठारें, खजिने व शस्त्रायुधागारें यांची उत्तम वाढ करावी. रत्नभाण्डारें वाढवून सर्व अमात्यांना व प्रजाजनांना संतुष्ट ठेवावें. जो आपल्या प्रजेवर प्रेम करतो त्यावर प्रजा प्रेम करते. अशा प्रजारञ्जन करणाऱ्या राजाचे मित्र आनंदित होत असतात. यासाठीं हे रामा ! तूं आत्मसंयम करून आपला राज्य-कारभार चालव. '

राजा दशरथानें रामाला हा आपल्या अनुभवाचा सारभूत उपदेश दिलेला आहे. आत्मसंयम करावा, प्रधानांचा संतोष करावा, अधिकारी आपलें काम नीट करीत आहेत कीं नाहीं तें पहावें, खजिना भरलेला ठेवावा, रत्नादिकांचा संग्रह वाढवावा, धान्याचीं कोठारें भरलेलीं असावीं. दुष्काळ आदि प्रसंग व युद्धाच्या आपत्ति यावेळीं यांचा उपयोग होतो. राजानें व्यसनें करूं नयेत. राजा व्यसनाधीन झाला असतां जवळचे लोक त्याचा फायदा घेतात, आपला फायदाही करून घेतात व अशा रीतीनें त्या राजाचा नाश होतो. सर्व प्रजांचें कल्याण व प्रजांचा संतोष हें साधावें. संक्षेपानें ही राजनीति येथें दशरथानें श्रीरामचंद्राला राज्याभिषेकाच्या पूर्वदिवशीं सांगितली आहे.

पुढें राम वनांत गेल्यानंतर जेव्हां गुहाला भेटला, तेव्हां गुहानें रामाचें पुष्कळ आदरातिथ्य केलें; पण तें रामानें घेतलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं गुहाचा निरोप घेण्याच्या वेळीं रामानें गुहाला अगदीं थोडक्यांत राजनीतीचा सिद्धान्त जातां जातां सांगितला आहे. पहा—

**अप्रमत्तो बले कोशे दुर्गे जनपदे तथा ।**
**भवेथा गुह राज्यं हि दुरारक्षतमं मतम् ॥ ७२ ॥**

( अयोध्या. ५२ )

' सैन्य, खजिना, किल्ले, राज्यव्यवस्था यांसंबंधीच्या व्यवहारामध्यें चुका न करतां राज्याचें पालन करावें. असें केलें नाहीं तर राज्याचें रक्षण होणें कठीण असतें.' वरील चार प्रकारांपैकीं एखाद्या प्रकारामध्यें जरी प्रमाद घडला, दुर्लक्ष्य झालें, तरी तें राज्यनाशाला कारण होत असतें. संक्षेपानें हें राजनीतीचें तत्त्व

आहे. राष्ट्रामध्ये कोणाही निरपराध्यास दण्ड होऊं नये, याविषयीं सिद्धार्थ प्रधान म्हणत आहे—

**अदुष्टस्य हि संत्यागः सत्पथे निरतस्य च ।**
**निर्दहेदपि शक्रस्य द्युतिं धर्मविरोधवान् ॥ २९ ॥**

(अयोध्या. ३६)

'जो मनुष्य दुष्ट नसेल व जो सन्मार्गाने चालत असेल, त्याला जर वनवासासारखे दण्ड होऊं लागले तर ते इन्द्राच्या तेजाचाहि नाश करतील. कारण यामध्ये अन्याय किंवा अधर्म होत असतो व तो अधर्म करणाराला जाळून टाकतो.' रामासारख्या सदाचरणी माणसाला जर वनवासाचा दण्ड होऊं लागला, तर तो अधर्म या राज्याचा नाश करील, म्हणून असा अन्याय राज्यव्यवस्थेमध्ये व न्यायदानामध्ये होऊं देतां कामा नये. याप्रमाणे राजनीती संबंधाने विधानें या विभागामध्ये आहेत. कैकेयीला संतुष्ट करण्यासाठी दशरथ कांही बोलत आहे, तें राज्यव्यवस्थेसंबंधी अगदी अयोग्य असें वर्तन आहे; पण तेंहि येथे पहा. दशरथ म्हणत आहे—

(अयोध्या. १०।३१-३५) "हे प्रिये, हे कैकेयी ! तुझ्यासाठी कोणाचें बरें प्रिय करूं ? अथवा कोणाचें अप्रिय (वाटोळें) करूं ? कोणत्या अवध्याचा वध करावा, अशी तुझी इच्छा आहे बरें ? कोणत्या वध्याला सोडावा, असें तुला वाटत आहे ? कोणत्या दरिद्र्याला श्रीमंत करावा व कोणत्या धनाढ्याला भिकेला लावावा असें तुला वाटत आहे ? मी व माझे सर्व नोकर तुझ्या आज्ञेंत आहोंत. काय तुझी इच्छा असेल तें सांग, तें आम्ही तुझ्या प्रीतीसाठी करूं."

दशरथ येथे जें बोलत आहे, तें अगदी अयोग्य असें बोलत आहे. कामातुर स्थितींतील हीं त्याचीं वाक्यें विचारांत घेण्याजोगीं नाहीत. स्वतः त्याने रामाला जो उपदेश केला, त्याच्याविरुद्ध येथे तो बोलत आहे. एखादा झोटिंग राजा असावा, त्याप्रमाणे सूर्यवंशी राजे नव्हते. यासाठी कामवश स्थितींतील हें दशरथाचें बोलणें, नुसतें अल्लड पोरीची समजूत घालण्यासाठी होतें. पण असल्या बोलण्यांनी तीच पोर उन्मत्त झाली व त्याच्याकडून करूं नये तें करवून घेण्यास उद्युक्त झाली, हें वाचकांनी पहावें व राज्य करणारांनी अशीं वचनें देताना व बोलताना

फार सावधगिरी बाळगावी, एवढेंच येथें सुचविणें आहे.

## दशरथाची विषयी प्रवृत्ति.

राम लक्ष्मण व सीता यांनी वनवासाचा मार्ग धरला. यावेळीं वनांत पोचल्यानंतर रामाने दशरथासंबंधाने पुढे दिल्याप्रमाणे उद्गार काढलेले दिसत आहेत—

**कृतकामा तु कैकेयी तुष्टा भवितुमर्हति ॥६॥**
**सा हि देवी महाराजं कैकेयी राज्यकारणात्।**
**अपि न च्यावयेत् प्राणान् दृष्ट्वा भरतमागतम् ॥७॥**
**अनाथश्च हि वृद्धश्च मया चैव विना कृतः।**
**किं करिष्यति कामात्मा कैकेय्या वशमागतः ॥८॥**
**इदं व्यसनमालोक्य राज्ञश्च मतिविभ्रमम्।**
**काम एवार्थधर्माभ्यां गरीयानिति मे मतिः ॥९॥**
**को ह्यविद्वानपि पुमान् प्रमदायाः कृते त्यजेत्।**
**छन्दानुवर्तिनं पुत्रं तातो मामिव लक्ष्मण ॥१०॥**
**अर्थधर्मौ परित्यज्य यः काममनुवर्तते।**
**एवमापद्यते क्षिप्रं राजा दशरथो यथा ॥१३॥**
**मन्ये दशरथान्ताय मम प्रव्राजनाय च।**
**कैकेयी सौम्य संप्राप्ता राज्याय भरतस्य च ॥१४॥**

(अयोध्या. ५३)

लोकवस्तीपासून दूर महा अरण्यांत पोचल्यावर रामाला जो शोक झाला, त्यावेळीं ( **करुणं विलप्य विजने बहु। अश्रुपूर्णमुखो दीनो।** अयो. ५३। २७ ) ढळढळा रडत असतांना तो जें काय बोलला, त्यांतील हे शब्द आहेत. यावेळीं रामाच्या आसपास लक्ष्मण व सीता याशिवाय कोणीहि नव्हतें. रानांतील ती भयंकर रात्र होती. यावेळपर्यंत अयोध्या सोडून रामाला ४।५ दिवस झालेले होते. आता सर्व लोक निघून गेल्यामुळे त्याचा आवरून धरलेला शोक यावेळीं हृदय फोडून बाहेर निघालेला आहे. राम हा आदर्श मर्यादापुरुषोत्तम

असल्यामुळे समाजांत कसें वागावें, कसाही बिकट प्रसंग आला असतां मनोधैर्य कसें स्थिर ठेववें, हें त्यास उत्तमपणे माहीत होतें. यामुळे राजवाड्यांत, अयोध्येंत व प्रजाजनांच्या व मित्रांच्या समोर जसें धीरोदात्तपणें व गंभीरपणें वागणें योग्य होतें, तसेंच राम वागलेला आहे व इतक्या भयंकर कसोटीच्या वेळींसुद्धा त्यानें आपला तोल सोडलेला नाहीं; पण आता महा अरण्यांत हा एकटा व बरोबर सीता व लक्ष्मण एवढेच असल्यानें त्याचें अन्तःकरण उघडें झालें व आंत दाबून ठेवलेले विचार यावेळीं बाहेर पडले; म्हणूनच हे उद्गार फार महत्त्वाचे आहेत. यांत राम दशरथासंबंधीं म्हणत आहे, तें असें—

(१) कैकेयीचे मनोरथ आता सफल झाले आहेत, तरी ती कैकेयी भरत येतांच राज्यासाठीं ( दशरथ ) महाराजांना प्राणत्याग करावयासुद्धा लावील असें वाटतें. ( ६-८ )

(२) अनाथ, वृद्ध, माझ्या वियोगाने दुःखी झालेल्या ( **कामात्मा** ) **काम-विकाराच्या आधीन झाल्यामुळे कैकेयीच्या कह्यांत सर्वस्वी गेलेल्या राजानें** काय बरें करावें ? (८)

(३) हें आलेलें संकट पाहिलें व **राजाचा** ( **मतिविभ्रमं** ) **बुद्धिभ्रंश** झालेला आहे हें पाहिलें म्हणजे धर्म व अर्थ यांपेक्षा **कामच श्रेष्ठ** आहे, असें म्हणावें लागतें. (९)

(४) कोणता अडाणी पुरुष पिता-सुद्धा आपल्या स्त्रीला संतुष्ट करण्यासाठीं माझ्यासारख्या ( **छन्दानुवर्तिनं** ) वडिलांच्या आज्ञेंत राहणाऱ्या पुत्राचा त्याग करूं शकेल बरें ? (१०)

(५) जो धर्म व अर्थ सोडून देतो व कामोपभोगाचेंच अनुसरण करतो, त्याला या दशरथ राजाप्रमाणेच विपत्ति प्राप्त होते. (१२)

(६) मला असें वाटतें कीं, कैकेयीचा जन्मच दशरथाचा अन्त करण्यासाठीं, माझ्या वनवासासाठीं व भरताला राज्य मिळावें यासाठीं झालेला आहे.

या ठिकाणीं दशरथाला रामाने ( **कामात्मा** ) कामातुर, ( **कैकेय्या वशं आगतः**) बायकोच्या तंत्रानें वेडा झालेला, बाईलवेडा, बायकोच्या मुठींत गेलेला

**(राज्ञः मतिविभ्रमः)** दशरथाचा बुद्धिभ्रंश झाला, त्याला म्हातारचळ लागलें, **( धर्मार्थौ परित्यज्य कामं अनुवर्तते )** दशरथाने धर्म व अर्थ सोडले असून एका कामाचाच अवलंब केलेला आहे. जो असें वागेल तोही **(एवं आपद्यते )** असाच आपत्तींत पडेल, असें म्हटलें आहे.

रामाच्या परिस्थितींत पोंचलेल्या कोणत्याही पुत्राने आपल्या बापाविषयी याहीपेक्षा अधिक कठोर व अधिक अनुदार उद्गार काढले असते. परिस्थितीच्या व शोकातिरेकाच्या मानाने पाहतां यावेळींहि रामाने आपलें आत्मसंयमनच केलें आहे, असें म्हणावें लागतें. पण अशा आत्मसंयमन करणाऱ्या रामासारख्या आदर्श पुरुषानेहि दशरथाला ' **कामातुर, मतिभ्रंश झालेला, बाईलवेडा** ' असें म्हटलें आहे. यावरून दशरथाच्या या स्वभावाबद्दल हा ग्रह त्यावेळीं सर्वांचाच झालेला होता, असें दिसतें. रामाने आपल्या वडिलांविषयी असे उद्गार यापूर्वी केव्हाही काढलेले नव्हते. याचें कारण असें की, आपल्या लोकांशीं वागतांना जी मर्यादा बोलण्यांत पाळली पाहिजे, ती मर्यादा तो पालन करीत होता. या कारणाने त्याच्या तोंडून असे शब्द निघालेले नाहीत; पण जेव्हा त्यास अगदी एकान्त सापडला, तेव्हा त्याच्या हृदयांतून हे उद्गार निघाले व तसें होणें अगदी स्वाभाविकही आहे. राजा दशरथाबद्दल सर्वच लोक असें म्हणत, पहा—

**राजानं धिग् दशरथं कामस्य वशं आस्थितम् ।**

( अयोध्या. ४९ । ४ )

' कामातुर दशरथाला धिक्कार असो ! ' असें देशांतील सर्वच लोक बोलत होते. रामानेही ही लोकांनी केलेली टीका अनेकदा ऐकलेली होती. पण त्याने आपली धीरगंभीर वृत्ति सोडली नव्हती.

## लक्ष्मण काय म्हणतो ?

दशरथासंबंधी बोलताना जरा राम जपून बोलत होता, तसा लक्ष्मण नव्हता. लक्ष्मण तडकाफडकी बोलणारा होता. जेव्हा कौसल्येच्या महालांत असताना रामाने सांगितलें की, मला वनामध्ये जावें लागणार, तेव्हा चवताळून लक्ष्मण जें बोलला, त्यांतहि दशरथाबद्दल असेच अनुदार शब्द प्रयुक्त झालेले आहेत—

० स्त्रिया वाक्यवशं गतः ॥ १ ॥
विपरीतश्च वृद्धश्च विषयैश्च प्रधर्षितः ।
नृपः किमिव न ब्रूयात् चोद्यमानः समन्मथः ॥ ३ ॥
तदिदं वचनं राज्ञः पुनर्बाल्यमुपेयुषः ॥ ७ ॥
प्रोत्साहितोऽयं कैकेय्या सन्तुष्टो यदि नः पिता ।
अमित्रभूतो निःसंगं बध्यतां वध्यतामपि ॥ १२ ॥
गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः ।
उत्पथं प्रतिपन्नस्य कार्यं भवति शासनम् ॥ १३ ॥
हनिष्ये पितरं वृद्धं कैकेय्यासक्तमानसम् ।
कृपणं च स्थितं बाल्ये वृद्धभावेन गर्हितम् ॥ १९ ॥
( अयोध्या. २१ )

लक्ष्मण म्हणतो— " ( **स्त्रिया वशं गतः** ) बायकोच्या स्वाधीन झालेला, ( **विषयैः प्रधर्षितः** ) विषयांनी पछाडलेला म्हातारा, ( **समन्मथः** ) कामातुर असल्यामुळे (**विपरीतः**) करूं नये तें करावयास प्रवृत्त झालेला म्हणजे मतिभ्रंश झाल्याप्रमाणे वागणारा, बायकोने प्रेरणा केल्यानंतर काय बरें बोलणार नाही ? हा दशरथ ( **बाल्यं उपेयुषः** ) पोरकट बनत आहे. ( **बाल्ये स्थितं** ) पोरकट बनणारा, ( **कृपणं** ) अनुदार, ( **वृद्ध भावेन गर्हितं** ) म्हातारचळ लागल्याने शोचनीय बनलेला असा हा आमचा पिता दशरथ आहे. हा कैकेयीवर मन आसक्त झाल्यामुळे असें बोलत आहे, म्हणून याचा मी वध करीन. हीन मार्गाने जाणाऱ्या, कर्तव्य व अकर्तव्य न समजणाऱ्या गुरूलाही शासन करणें योग्य आहे. कैकेयीच्या संतोषासाठी जर तो असें करील, तर त्याला ठार तरी मारावा किंवा बंधनांत तरी टाकावा, हेंच उत्तम होय. "

लक्ष्मण हें असें म्हणत आहे. लक्ष्मण अगदी सरळ स्वभावाचा धोपटमार्गी होता. त्याला आंत बाहेर कांही नव्हतें. जें जसें मनांत येईल तसें तो बाहेर बोलून टाकीत असे. तसेंच या वेळचें याचें हें भाषण आहे. याने बापाला— दशरथाला— ' कामी, विषयान्ध, बाईलवेडा, म्हातारचळ लागलेला, आडमार्गास लागलेला, कैद करण्यास अथवा ठार मारण्यास योग्य ' असें म्हटलें आहे. रामाच्या

भाषणांत जरी हाच भावार्थ असला तरी शब्द बरेच सौम्य आहेत, मर्यादा आहे व वडिलांचें बंधन किंवा त्यांचा वध हे शब्द नाहींत. लक्ष्मणाच्या व रामाच्या भाषणांतील हा भेद लक्ष्यांत येण्य सारखा आहे. शिवाय लक्ष्मण हा अयोध्येंत प्रत्यक्ष राजवाड्यात बोलत आहे व राम हा वनांतील एकान्तांत बोलत आहे, हाही भेद या ठिकाणीं लक्षात आणणें योग्य आहे.

दशरथासंबंधाने लक्ष्मणाचें हें भाषण फारच कठोर आहे यांत संशय नाही. त्यांत त्याला बांधावा किंवा ठार करावा, असें म्हणण्यापर्यंत पाळी गेलेली आहे. लक्ष्मणाने तसा प्रसंगच पडता तर इतक्या थरास ही गोष्ट नेली नसती कदाचित्. पण त्याने असे उद्गार काढले आहेत हें खरें.

लक्ष्मणाचे हे उद्गार तत्क्षणींच भावनावश होऊन निघालेले होते कीं कैकेयीशीं दशरथाचें होत असलेलें कामातुरतेचें वर्तन या सर्वांना इतकें असह्य झालेलें होतें, याचा शोध करावयासाठी फार लांब जाण्याचें कारण नाही. लक्ष्मणाचें हे भाषण होतांच कौसल्या– प्रत्यक्ष दशरथाची पट्टराणी– हीच लक्ष्मणाच्या या भाषणाचें अनुमोदन करीत आहे. पहा—

**एतत्तु वचनं श्रुत्वा लक्ष्मणस्य महात्मनः ।**
**उवाच रामं कौसल्या रुदती शोकलालसा ॥ २० ॥**
**भ्रातुस्ते वदतः पुत्र लक्ष्मणस्य श्रुतं त्वया ।**
**यदत्रानन्तरं तत् त्वं कुरुष्व यदि रोचते ॥ २१ ॥**

( अयोध्या. २१ )

कौसल्या रामास म्हणते— ‘ हे रामा ! हें लक्ष्मणाचें भाषण ऐकलेंस ना ? तें ऐकून काय करावयाचें तें कर ’ असें जरी कौसल्या बोलली असली, तरी दशरथाबद्दल जें जें लक्ष्मण बोलला होता, तें तें सर्व कौसल्येस प्रिय वाटणें शक्यच नव्हतें. पण राम–लक्ष्मण या दोघांनी मिळून आपल्या पराक्रमाने दशरथाला एका बाजूस सारून रामाने राज्यावर बसावें, एवढें मात्र तिला वाटत होतें. दशरथानेहि रामाला असेंच सुचविलें होतें ( अयोध्या. ३४।२६ ). पण तसें करणें रामाला केव्हाही पसंत पडणें शक्य नव्हतें.

कौसल्येला, कैकेयीच्या तंत्राने राजा वागत आहे, हें मुळीच पसंत नव्हते, पण तिच्या किंवा सुमित्रेच्या तोंडून यासंबंधी कांही उद्गार निघालेले नाहीत. यावरून आर्य स्त्रिया किती मर्यादशील असतात, हें समजून येणें शक्य आहे.

रामाने आणखी एक दोन ठिकाणीं दशरथाच्या कामातुरपणासंबंधी म्हटलें आहे. तें पहा—

**स कामपाशपर्यस्तो महातेजा महीपतिः।**

( अयोध्या. ३१।१२ )

**शोकोपहतचेताश्च वृद्धश्च जगतीपतिः।**
**कामभारावसन्नश्च तस्मादेतद्ब्रवीमि वः ॥ २३ ॥**

( अयोध्या. ५२ )

' महातेजस्वी राजा दशरथ कामपाशांनी बांधला गेला आहे. तो राजा वृद्ध असून शोकाने व्याप्त झाला आहे व कामभाराने दबला गेला आहे.'

या दुसऱ्या (५२ । २३) श्लोकामधल्या " **कामभारावसन्न** " या पदाचा अर्थ कांही टीकाकारांनी निराळा केला आहे; पण कांही टीकाकार कामातुर असाच याचा अर्थ करतात. स्वतः राजाच आपणा स्वतःविषयी जें म्हणत आहे, तेंहि येथे विचारांत घेणें योग्य आहे—

**बालिशो बत कामात्मा राजा दशरथो भृशम्।**
**स्त्रीकृते यः प्रियं पुत्रं वनं प्रस्थापयिष्यति ॥**

( अयोध्या. १२ । ८३ )

राजा दशरथ असें म्हणत आहे की हे कैकेयी! जर मी तुझ्या म्हणण्याप्रमाणे रामाला वनांत पाठवलें, तर लोक माझी अशी निंदा करतील व ते असें म्हणतील की— " हा दशरथ मूर्ख व कामातुर झाला आहे. याने आपल्या स्त्रीसाठी प्रियपुत्राला वनांत पाठवून देण्यासहि मागेपुढे पाहिलें नाही. " राजा दशरथाला आपली अशी निंदा होईल, अशी पक्की खात्री होती व त्याचप्रमाणें घडलेंहि.

वाल्मीकी कवीही दशरथ राजाला असेंच म्हणत आहेत—

**( १ ) कामी कमलपत्राक्षीं उवाच वनितां इदम् ॥ २७ ॥**

( अयोध्या. १० )

**( २ ) तं मन्मथशरैर्विद्धं कामवेगवशानुगम् ।**
**उवाच पृथिवीपालं कैकेयी दारुणं वचः ॥ १ ॥**
**( ३ ) कामी हस्तेन संगृह्य मूर्धजेषु भुवि स्थिताम् ॥ ४ ॥**
( अयोध्या. २१ )

**( ४ ) ततः परं उवाचेदं वरदं काममोहितम् ॥ २३ ॥**
( अयोध्या. ११ )

कवि वाल्मीकी म्हणतात– ( १ ) कामी दशरथाने त्या कमलनेत्र स्त्रीला ( कैकेयीला ) असें म्हटलें. ( २ ) मदनाच्या बाणांनी वेधलेल्या व कामातुर झालेल्या त्या राजाला कैकेयी असें कठोर वचन बोलली. ( ३ ) त्या कामातुर दशरथाने जमिनीवर पडलेल्या त्या कैकेयीस उचललें. ( ४ ) नंतर त्या कामातुर दशरथाला तिने असें म्हटलें.

याप्रमाणे वाल्मीकी कवि, स्वतः दशरथ, रामचन्द्र, लक्ष्मण व सर्व लोक दशरथाबद्दल काय बोलत होते हें पाहिलें, म्हणजे दशरथामध्ये हा मोठा दोषच होता असें वाटतें. ज्याने त्याने या त्याच्या दोषाबद्दल त्याची निंदा केलेली आहे व याच दोषामुळे त्याने कैकेयीबरोबर म्हातारपणीं लग्न केलें व लग्न करण्याच्या वेळीं अविचाराने देऊं नये तें वचनहि दिलें आणि शेवटीं त्याचमुळे त्याच्यावर दुःखाचे डोंगर अशा रीतीने कोसळले. यासाठी या बाबतींत जितका धर्मानुकूल संयम करावा तितका तो लाभदायक होणें शक्य आहे. हें लक्ष्यांत आणूनच राम असे म्हणत आहे—

**द्वेष्यो भवत्यर्थपरो हि लोके ।**
**कामात्मता खल्वति न प्रशस्ता ॥** ( अयोध्या. २१।५८ )

“ जो पैशाचा लोभ करतो, त्याची जगांत निंदा होते व या जगांत अत्यंत कामातुरपणा प्रशंसनीय आहे, असें कोणीहि म्हणत नाही. ”

धर्मानुकूल काम–विषयाचें सेवन करणें योग्य आहे, असें जें स्मृतिकारांनी लिहिलें आहे, तेंच योग्य आहे व त्याचकडे सर्वांनी आपलें लक्ष वेधवणें योग्य आहे.

# धन, ऐश्वर्य व दान.

रामायणाच्या काळीं राजाजवळ व लोकांजवळ पुष्कळच धन व ऐश्वर्य असे. त्याचा ते दानधर्मही पुष्कळच करीत असत. पुष्कळ मिळववें व पुष्कळ दान द्यावें, अशी त्यांची परिपाठी असल्याचें दिसत आहे. राम ज्या वेळीं वनाला जावयास निघाला, तेव्हा त्याने आपल्या जवळचें जें ऐश्वर्य ब्राह्मणांना दान दिलें आहे, त्याची किंमत आज कोट्यवधि रुपये होईल. याचा तपशील मनोरंजक असल्यामुळे तो येथे दिला जात आहे, तो वाचकांनी पहावा—

( १ ) **सुयज्ञाला देणगी**— रामाने सर्वांत प्रथम वसिष्ठाचा मुलगा **सुयज्ञ** यास बोलावून आणलें. सुयज्ञ **मध्यान्ह संध्या** करून रामाच्या भेटीला आला. यास रामाने पुढील देणगी दिली आहे— ( १ ) सुवर्णाचीं बाहुभूषणें, कुंडलें, सोन्याच्या सरांत ओवलेल्या रत्नमाला, कडीं, आंगठ्या, इतर अनेक रत्नें, हीं रामाने त्याचा सत्कार करून त्यास दिलीं. नंतर सीतेच्या प्रेरणेने सुयज्ञाच्या बायकोसाठी म्हणून देणगी देण्यांत आली ती ही आहे— ( २ ) हार, सोन्याची गळेसरी, सीतेनें आपला कमरपट्टाही तिच्यासाठी दिला. बाहुभूषणें, कडीं व सुंदर आभूषणेंहि सीतेने दिलीं. ( ३ ) नाना रत्नांनी सजवलेला व उत्तम आच्छादनांनी आस्तरलेला पलंग सीतेने त्या सुयज्ञाला दिला. हजार निष्कांसह ( मोहोरांसह ) आपला हत्तीही रामाने त्याला दिला. ( अयो० ३२।४–१० )

इतकें दान मिळाल्यानंतर सुयज्ञाने राम, सीता व लक्ष्मण यांना आशीर्वाद दिले. त्यानंतर रामाने अगस्तीचे पुत्र व विश्वामित्राचे पुत्र यांना बोलावून आणलें व त्यांनाही पुष्कळच धन दिलें—

( २ ) प्रत्येकीं सहस्र गाई, सुवर्ण, रजत ( चांदी ) अर्थात् सोन्याचे अलंकार व चांदीचीं भांडीं वगैरे व अनेक रत्नें देऊन अगस्त्य व कौशिक यांना संतुष्ट केलें. ( अयोध्या. ३२।१३–१४ )

( ३ ) कौसल्येजवळ **तैत्तिरीय शाखेचा आचार्य** आहे, तो वेदवेत्ता असून फारच चांगला ज्ञानी आहे. त्याला वाहनें, दासी व रेशमी वस्त्रें जितकीं त्याला हवीं असतील तितकीं दे व हे लक्ष्मणा, त्याला संतुष्ट कर. ( अयो. ३२।१५–१६ )

( ४ ) हा आमचा **सारथी चित्ररथ** नांवाचा आहे. हा फारच वर्षां-पासून आमच्या घरीं राहिलेला आहे. हा फार सभ्य असून उत्तम सल्लामसलत देणारा आहे. यासाठी याला मौल्यवान् रत्नें, वस्त्रें, पुष्कळ संपत्ति, अनेक शेळ्या मेंढ्या व हजार गाई दे व संतुष्ट कर. ( अयो० ३२।१७–१८ )

( ५ ) हे **कठ व कलाप** शाखांचें अध्ययन करणारे दण्डधारी ब्राह्मण आहेत. हे नित्य वेदाध्ययन करीत असल्याने दुसरें कांही करूं शकत नाहीत. त्यांना रत्नांनीं भरलेलीं ऐशीं यानें, हजार बैलांनी वाहून नेलें जाईल इतकें भात व दोनशे बैल इतर धान्य व हजार गाई दे. ( अयो. ३२।१९–२१ )

( ६ ) कौसल्येजवळ हजार ब्रह्मचारी येऊन बसले आहेत. त्यापैकीं प्रत्येकाला हजार हजार मोहोरा दे.

( ७ ) आपल्या सर्व आश्रितांना उपजीविकेस पुरून उरेल इतकें द्रव्य रामाने दिलें व त्या सर्वांना सांगितलें कीं आपला व लक्ष्मणाचा वाडा आपण परत येई-पर्यंत रक्षण करीत रहा.

( ८ ) नंतर रामाने आपल्या धनाध्यक्षाला ( खजिनदाराला ) आपलें सर्व द्रव्य आणावयास सांगितलें. तेव्हा धनाध्यक्षाने त्या सर्व द्रव्याची मोठी रास तेथे केली. हें सर्व द्रव्य राम व लक्ष्मण यांनी द्विज, बाल, वृद्ध व दीन यांना वाटून टाकलें. ( अयो० ३२।२७–३० )

( ९ ) त्रिजट नामक विद्वान् ब्राह्मणाला कित्येक हजार गाई रामाने दिल्या व पुष्कळ धनही दिलें. ( अयो. ३२।३०–४४ )

(१०) रामाने आपल्या मित्रांना असंख्य धन दिलें. ( अयो. ३२।४६ )

रामचन्द्राने आपलें सर्व धन याप्रमाणे वाटून दिलें. येथे कांही नाहीं तरी दहावीस हजार गाई वाटल्या आहेत, हजारो मोहरा देऊन टाकल्या आहेत व लाखो रु. चें जवाहीर ऋषींना दिलेलें आहे. मोठमोठे अलंकार ऋषिपत्नींना मिळाले आहेत. कोट्यवधि रुपयांचा हा दानधर्म या वेळीं रामाने केलेला आहे.

या वेळीं तैत्तिरीय, कठ, कलाप या शाखा होत्या असें दिसतें. अयोध्येमध्ये तैत्तिरीय शाखा होती, असें येथे म्हटलें आहे. तैत्तिरीयांचा मोठा आचार्य कौसल्ये-

जवळ याजक होता. उत्तरेच्या बाजूला वाजसनेयी माध्यंदिन शाखेचें अध्ययन करणारे असत, असें म्हणतात व दक्षिणेच्या बाजूला तैत्तिरीय संहिता सध्याही प्रचलित आहे. पण या वेळीं तरी माध्यंदिनांचा उल्लेख येथे झालेला नाही व तैत्तिरीय, कठ व कलाप यांचा उल्लेख आलेला आहे.

वनांत राहणाऱ्या ऋषिमुनींना रत्नजडित हार, बाहूभूषणें व स्त्रियांनी घालावयाचीं आभूषणें दिलेलीं आहेत. रत्नजडित पलंग व रेशमी मूल्यवान् वस्त्रें दिलीं आहेत. ऋषींच्या आश्रमांमध्ये हे सर्व जिन्नस शोभण्यासारखे व सजण्यासारखेच असतील. हत्ती व हजारो गाई तसेंच दासदासीहि दिल्या आहेत. एवढें ऐश्वर्य ऋषींनी सहज घेतलेंहि आहे. सध्याच्या काळांतील गावांत राहणाऱ्या ब्राह्मणांनाही आपल्या घरीं असले दागदागिने ठेवतां येणें कठीण आहे. वसिष्ठ, अगस्त्य व विश्वामित्राच्या मुलांनी व इतर मुनींनी एवढें ऐश्वर्य घेऊन आपल्या आश्रमांत नेऊन ठेवलें आहे व तसें करतांना त्यांना चोर, डाकू, लुटारू यांची भीति वाटलेली नाही. इतकी सुरक्षितता या आश्रमामध्ये या वेळीं राज्यव्यवस्थेनें राखलेली होती, हें यावरून व्यक्त होत आहे.

वसिष्ठ व जमदग्नि यांच्या आश्रमांतील ऐश्वर्य पुराण-प्रसिद्ध आहे. क्षत्रियांनी ते आश्रम लुटून तेथील ऐश्वर्य लांबविलें, यावरून यांच्या ऐश्वर्याची कल्पना येणें शक्य आहे. येथे आपण पहात आहों कीं, रामाने दिलेलें लाखो रु० किंमतीचें जडजवाहीर ऋषि आपल्या आश्रमांत नेऊन ठेवीत आहेत व ऋषींच्या पत्न्या तें अंगावर वापरीत आहेत; कारण सीतेने आपले दागिने वसिष्ठाच्या सुनेने अंगावर घालून वापरावे, यास ठीच दिलेले होते. ऋषींचे आश्रम ऐश्वर्याने परिपूर्ण असतांही ते निर्भय असत, ही गोष्ट येथे व्यक्त होत आहे. त्या वेळच्या सुस्थितीची यावरून कल्पना वाचकांस येईल.

## ज्योतिषावर विश्वास.

राम जेव्हा सीतेला वनांत न्यावयास तयार होईना, तेव्हा सीतेने रामाला असें सांगितलें की, ' मला वनवास घडणार आहे, असें माझ्या लहानपणींच जोशीबुवांनी भविष्य वर्तवून आपल्या वडिलांस सांगितलेलें मी ऐकलें आहे. ' तसें घड-

ण्याचा हा सुअवसर आलेला आहे. तेव्हा मी वनांत येणार व आपण मला वनांत न्यावें—

अथापि च महाराज ब्राह्मणानां मया श्रुतम् ।
पुरा पितृगृहे सत्यं वस्तव्यं किल मे वने ॥ ८ ॥
लक्षणिभ्यो द्विजातिभ्यः श्रुत्वाहं वचनं गृहे ।
वनवासकृतोत्साहा नित्यमेव महाबल ॥ ९ ॥
कालश्चायं समुत्पन्नः सत्यवाग्भवतु द्विजः ॥११॥
कन्यया च पितुर्गेहे वनवासः श्रुतो मया ।
भिक्षिण्याः शमवृत्ताया मम मातुरिहाग्रतः ॥१३

( अयो. २९ )

यत्सृष्टासि मया सार्धं वनवासाय मैथिलि ।
न विहातुं मया शक्या प्रीतिरात्मवता यथा ॥२९॥

( अयो. ३० )

सीता म्हणते, 'हे रामचन्द्रा ! मी वाडिलांच्या घरीं असतांना अनेक ब्राह्मणांच्या तोंडून ऐकलें आहे की, मला वनवास घडणार आहे व तो टळणें शक्य नाही. ज्योतिष वर्तवणाऱ्या ब्राह्मणांनी हें सांगितलें आहे. आता तो काल या वेळीं प्राप्त झाला आहे. ते ब्राह्मण खरे बोलणारे ठरोत म्हणजे त्यांचीं वाणी खरी होवो. एकदा एक भिक्षुकीण माझ्या आईजवळ आली होती. तिनेही माझें भविष्य वर्तवून मला वनवास घडणार आहे, असेंच सांगितलेलें मला पक्कें स्मरत आहे.'

सीता असें म्हणून रामाला सांगत आहे की, जें जोशांनी वर्तविलें होतें, तेंच आज प्राप्त झालेलें आहे. हें ऐकून राम तिला म्हणाला की—

'हे सीते ! ज्या अर्थी वनवासासाठीच तूं उत्पन्न झाली आहेस, त्या अर्थी मी तुला प्रतिबंध करणें शक्य नाही.'

असें म्हणून रामाने सीतेला बरोबर नेण्याचा विचार ठरवला. या ठिकाणीं जें भविष्य वर्तविलें होतें तें खरें ठरलें असें म्हटलें आहे व यावरून त्या कालीं फलज्योतिष प्रचारांत होतें व त्यावर लोकांचा विश्वासही होता, असें दिसत आहे.

# श्रीरामचन्द्राचा वनवास.

श्रीरामचन्द्राचा वनवास हा अद्भुत कथाभाग आहे. रामाच्या राज्याभिषेकाला ( १ ) दशरथराजा, ( २ ) सर्व माण्डलिक राजे, ( ३ ) सर्व प्रजाजन, यांची पूर्ण संमति होती. दशरथाने सर्वांची संमति वेळेवर घेतलीहि होती. अशा रीतीने प्रजाजनांची संमति घेऊन रामाला राज्याभिषेक करावा असें ठरविण्यांत आलेलें होतें. प्रजाजनांच्या अनुमतीने रामाच्या राज्याभिषेकाचा निश्चय झालेला असल्यामुळे जर लोकमताची पर्वा करावयाची असेल, तर रामाला वनांत पाठवणें अथवा न पाठवणें, यालाहि प्रजेची संमति घेणें अत्यंत आवश्यक होतें. पण या वेळीं प्रजाजनांच्या अनुमतीचें एवढें महत्त्व नसावेंसें वाटतें. अथवा राज्यावर बसणारा राजा प्रजेवर शासक होणार असल्यामुळे त्यासाठीच प्रजेची अनुमति घेणें योग्य होतें. पण जर तो राज्यावर बसावयास तयार नसेल, तर त्याच्या राज्यत्यागासाठीं प्रजेचें मत पुनः घेणें आवश्यक आहे, असें म्हणतां येणार नाही. असें दुसऱ्या बाजूनें म्हणतां येईल.

रामाला राज्यावर बसावयासाठीं प्रजेची अनुमति घेतलेली होती, दशरथानेहि आपणास कैद कर व तूं राज्यावर बैस, असें रामाला म्हटलें होतें, सर्व स्त्रीपुरुष रामाला अनुकूल होते. स्वतः राम व लक्ष्मण हे एकेकटेहि इतरांची पर्वा न करतां राज्यावर बसूं शकले असते; मग ते दोघे मिळून उभे राहते, तर त्यांस कोणीहि प्रतिबंध करूं शकला नसता, लक्ष्मणाने तसें सुचविलेंहि होतें, सर्वांची अनुकूलता असल्यामुळे रक्तपात न होतांहि रामाला राज्यावर बसतां आलें असतें.

पण इतकी अनुकूलता असतांहि रामाने आपण स्वतःच वनवास पत्करला व **आपसांतील दुहीचा अग्नि वाढूं दिला नाही.** या दुहीच्या अग्नीचें स्वरूप येथे थोडेंसें विस्ताराने पाहणें अगत्याचें आहे.

अयोध्येमध्ये ( १ ) दशरथ–कौसल्या–राम–सुमित्रा व ( २ ) कैकेयी असे दोन पक्ष होते. सुमित्रेचा पक्ष रामाला अनुकूल होता असें मानलें म्हणजे दोनच पक्ष होते. असें ठरतें. कैकेयीच्या पक्षांत भरताचा भाग कांही नसावा; पण तिच्या

पक्षाच्या लोकांच्या बराच भाग त्यांत असवा, असें दिसतें.

दशरथाने भरताला मावळयाकडे १२ वर्षे पाठवून देऊन त्याचा पक्ष मोडून टाकण्याचा यत्न केला होता, हें दशरथाच्या बोलण्यानेंच सिद्ध होत आहे. जर दशरथाच्या इच्छेप्रमाणे राम गादीवर बसला असता, तर भरतास राज्य-मिळालें नसतें व ही गोष्ट केकयराजास समजतांच त्यास अतिशय राग आला असता. दशरथाच्या वचनाप्रमामाणे कैकेयीच्या मुलास कां राज्य दिलें नाही, याचा जबाब त्याने दशरथास विचारला असता व भरतासाठीं निदान अर्धे तरी राज्य मागितलें असतें. मुद्दाम भरतास आजोळीं पाठवणें इतर सर्व राजांस निमंत्रणें देऊन राज्याभिषेक-समारंभास बोलावणें व भरतास व केकय राजास न बोलावणें, किंवा कांहीं सूचनाही न देणें, भरताच्या आईस दिलेलें वचन मोडणें, इत्यादि अनेक अपराधांची मालिका दशरथाने जाणूनबुजून केली होती. या सर्व कारणांसाठी केकय राजा खवळेल, ही संभावना निःसंशय होती.

भरताने काय केलें असतें, हें रामाला समजण्यास कांहीएक मार्ग नव्हता. लक्ष्मण तर भरतपक्षीयांचा नाश करण्यासहि उद्युक्त झाला होता, इतकी उला-ढाल कैकेयीच्या पक्षाच्या लोकांनी केलेली होती. केकयराजा चिडेल व भरता-साठीं राज्य मागेल, हें अगदी उघड व त्याच्या दृष्टीने योग्यही होतें. रामाला आपल्या दृष्टीसमोर जें काय दिसूं लागलें होतें, तें हें होतें.

यामुळे सूज्ञ रामापुढे दोनच प्रश्न उत्पन्न झालेले होते ते हे कि- [ १ ] आपण राज्यावर बसावें व केकयराजाच्या वैरास कारण बनावें, [ २ ] किंवा आपण राज्यावरचा हक्क सोडावा व सर्व भांडणाचें मूळच नाहीसें करावें. रामाने दुसरा मार्ग स्वीकारला व फार मोठें कल्याणकारक त्यागाचें उदाहरण राज्यभार वाहणारांना घालून दिलें. हा रामाचा थोरपणा व मनाचा उदारपणा फारच प्रशंसनीय आहे.

राम राज्यावर बसता; तर केकयराजा चिडला असता. दशरथाच्या वचनामुळे हें भांडण विकोपासहि गेलें असतें, याचा परिणाम म्हणून युद्ध जुंपणेंहि अशक्य नव्हतें. युद्ध जुंपलें म्हणजे मग निरपराधी प्रजाजनांचे बळि जाणार, हें उघडच आहे. राम गादीवर आल्यानंतर केकयराजाची समजूत घालण्यासाठी दशरथाकडे

कांहींसुद्धा साधन नव्हतें. अर्धे राज्य भरतास देणें हा एकच मार्ग शिल्लक राहिलेला होता; पण तो केकयराजाने मानला पाहिजे, नाहीतर त्याचा कांहीसुद्धा उपयोग होण्यासारखा नव्हता. कारण दशरथाचें वचन 'कैकेयीच्या मुलास सर्व राज्य देईन,' असें होतें. जर केकयराजा युद्धासच प्रवृत्त झाला असता, तर त्याने अर्ध्या राज्यावर तरी कां संतुष्ट रहावें ? याला कांही एक कारण नाही. अशी आपसांत दुही वाढत गेली, तर तिचा शेवटीं काय परिणाम होईल, हें कोण बरें सांगू शकेल ?

कैकेयी आपल्या प्रत्यक्ष नवऱ्याच्या पुढे असें अकाण्डतांडव करूं शकली, मग तिचा बाप सैन्यासह चालून आला असता, तर युद्धाचा दावानल फारच भडकणें शक्य होतें. अयोध्येंतील पक्षोपपक्षांतील वितुष्टें पाहून रामाला ही परिस्थिति स्पष्ट दिसूं लागली होती. म्हणून कैकेयीकडून तिचें मनोगत समजतांच, त्याचीं पाळें-मुळें कोठपर्यंत पोचणें शक्य आहे, हें रामासारख्या राजकारणी पुरुषास तत्काळ समजलें व त्याने राज्यत्याग करण्याचा निश्चय करून दुहीचा अग्नि विझविला व '**त्यागाचें वातावरण उत्पन्न केलें.**' हें राजकारणाच्या दृष्टीने रामाने केवढें मोठें कार्य केलें, हें निराळें सांगण्याचें येथे कारण नाहीं.

राष्ट्रापुढे हा त्यागाचा आदर्श केवढा मोठा आहे, हें वाचकांनी येथे अवश्य पहावें. लक्ष्मणाने जेव्हा सर्व भरतपक्षीयांस ठार मारून, बापास कैद करून, रामास राज्य देतों, असें म्हटलें, तेव्हा राम काय म्हणत आहे, तेंहि लक्ष्यपूर्वक पाहणें इष्ट आहे.

राम म्हणतो — 'हे लक्ष्मणा ! तुझा पराक्रम मला माहीत आहे. तूं हें सर्व करशील, हें खरें आहे; पण सर्व जगामध्ये धर्म हा श्रेष्ठ आहे व धर्मावरच सत्य प्रतिष्ठित झालेलें आहे. यासाठी—

**तदेतां विसृज अनार्यां क्षत्रधर्माश्रितां मतिम् ।**

(अयो० २१।४४)

'क्षत्रधर्माचा आश्रय करणारी ही तुझी अनार्य संमति सोडून दे' व धर्माचें अवलंबन कर !

अशा वेळीं इतर क्षत्रियांनी लक्ष्मण म्हणत होता तसेंच केले असतें, हें राम जाणत होता; पण तसें करणें रामाला पसंत नव्हतें. त्याने द्वेषाग्नि भडकणार, हें तो जाणत होता. म्हणून दुसरे क्षत्रिय या वेळीं कसें वागतील, हें रामास माहीत असूनहि तसें वागण्यास राम तयार झाला नाही, हाच रामाचा मोठेपणा होय.

राम गादीवर बसल्यावर केकयराजाशीं युद्ध जुंपतें, तर राम-लक्ष्मणांच्या नेतृत्वामुळे रामाचा जय जरी झाला असता, तथापि प्रजेला जें अपरिमित दुःख भोगावें लागलें असतें, तें कांही टळलें नसतें. त्यापेक्षा आपणच राज्याचा त्याग करावा व आपण स्वतःच भरताला राज्य द्यावें, अशा रीतीने दुहीचें बीजच नाहीसें करावें व त्यागाचा आदर्श जनतेपुढे ठेवावा, हें जें रामाने ठरवलें, तेंच अनेक दृष्टींनी या वेळीं योग्य होतें, यांत शंका नाही.

लक्ष्मणाच्या म्हणण्याप्रमाणे रामाने आचरण केलें नाही, यांतच रामाचा थोरपणा आहे व हाच आदर्श वाल्मीकीने तरुणांपुढे ठेवला आहे. हा जर जनतेमध्ये ठसेल, तर कितीतरी भाऊबदकीचीं भांडणें जेथल्या तेथेच शमतील व भाऊबंदकी हा शब्द द्वेषाचा वाचक झालेला आहे, तो प्रेमाचा वाचक होईल. लक्ष्मणाच्या म्हणण्याप्रमाणे रामाने आचरण केलें असतें, तर दशरथाच्या घरांत कौरव-पांडवांप्रमाणे कलह उत्पन्न झाला असता व या आपसांतील युद्धांत राष्ट्राची तरुण पिढी कापली गेली असती. रामाने आपसांतील यादवी टाळली व आपली सर्व शक्ति विदेशी शत्रूचें साम्राज्य उलथून पाडण्याकडे खर्च केली, हें त्याचें थोरपण होय.

वनवासांत जाण्याच्या वेळीं रामाच्या दृष्टीसमोर राक्षस-वध किंवा रावण-वध हें कार्य नव्हतें व आपणांकडून असें कांही घडणार आहे, याचीहि कल्पना या वेळीं त्यास नव्हती. तथापि राक्षसांच्या उपद्रवाची जाणीव विश्वामित्राच्या आश्रमांत त्यास उत्तम प्रकारें आली होती व तेथील राक्षसांचा संबंध कोठपर्यंत पोचला आहे, हेंहि त्यास कळून चुकलें होतें. तथापि रावणाचा काटा काढून टाकण्याची कल्पना या वेळीं त्याच्या अन्तःकरणांत उत्पन्न झाली नव्हती, ती पुढे वनवासांत उत्पन्न झाली.

तथापि जर रामाची शक्ति आपसांत आपल्या भाऊबंदांतच लढण्यांत खर्च झाली असती, तर जें कार्य मोकळेपणाने त्यास करतां आलें, तें करतां आलें नसतें. भीष्म द्रोण अर्जुनासारखे अप्रतिम योद्धे आपसांत लढून मेले. हेच आपली शक्ति एकवटते, तर जगभर आर्यांचें राज्य झालें असतें. तशीच वेळ रामाच्या वेळीं उपस्थित झालेली होती; पण रामाच्या त्यागाच्या आदर्शानें आपसांतील यादवी टळली, सूर्यवंशाचें तेज वाढलें व त्यामुळे आपली शक्ति विदेशी शत्रूंच्या नाशासाठीं रामाला उपयोगांत आणतां आली. रामाच्या जीवनांतील मोठेपणा तो हा आहे.

या दृष्टीनें रामानें जें केलें, तेंच योग्य व सर्वांना आदर्शरूप आहे, यांत मुळींच शंका नाहीं.

लक्ष्मण व सीता यांनीं वनांत कां जावें, हा प्रश्न येथें उपस्थित होतो. सीतेला रामाची प्रतिनिधीण म्हणून गादीवर बसवावी, असें वसिष्ठांनीं सुचविलें होतें—

**आत्मा हि दाराः सर्वेषां दारसंग्रहवर्तिनाम् ।**
**आत्मेयमिति रामस्य पालयिष्यति मेदिनीम् ॥ २४ ॥**

(अयोध्या. ३७)

‘ स्त्री हा पुरुषाचा आत्मा आहे, यासाठीं राम वनांत गेला तर त्याची स्त्री सीता ही त्याचें राज्य चालवील.’ असें कुलगुरु वसिष्ठ यांनीं सुचविलें व रामाची अथवा सीतेची थोडीशी जरी अनुकूलता दिसली असती, तरी तसें घडलेंहि असतें. पण या करण्यानें वर लिहिलेली आपसांतील यादवी मात्र टळली नसती. सीतेनें किंवा रामानें या वसिष्ठांच्या सूचनेचा विचारहि केलेला नाहीं. जो आदर्श रामाच्या मनांत होता, तो त्यानें साधलाच नसता व रामाचें वनवासांत जाणेंहि असें करण्यानें व्यर्थ झालें असतें.

सीतेनें वनांत जाण्याचा जो आग्रह धरला, तो पातिव्रत्याच्या आदर्शामुळेंच होय व याच आदर्शामुळें सीतेचें चारित्र्य फारच बहारीचें व बोधप्रद झालें आहे. सीतेनें वसिष्ठांच्या म्हणण्याप्रमाणें रामाचें राज्य स्वीकारलें असतें, तर राज्यावर बसलल्या सीतेचा आदर्श आजच्या वनवासिनी सीतेसारखा कधीहि मानला गेला नसता.

सीतेला राज्य स्वीकारण्याचा विचार रुचला नाही व रुचणें शक्यही नव्हतें. राम ने अयोध्येंतच रहा असें सीतेला सांगतांना कसें वागावें, तेंहि त्याने सीतेला सांगितलें आहे, तें कोणाही स्वाभिमानी तेजस्वी पतिव्रता स्त्रीला रुचणें शक्य नव्हतें. रामाच्या आदेशांतील कांही मुद्दे जे सीतेच्या मनाला विंचवासारखे डसले, ते हे आहेत—

**वन्दितव्याश्च ते नित्यं याः शेषा मम मातरः ॥३३॥**
**विप्रियं न च कर्तव्यं भरतस्य कदाचन ।**
**स हि राजा च वैदेहि देशस्य च कुलस्य च ॥३४॥**
**आराधिता हि शीलेन प्रयत्नैश्चोपसेविताः ।**
**राजानः संप्रसीदन्ति प्रकुप्यन्ति विपर्यये ॥३५॥**
**सा त्वं वसेह कल्याणि राज्ञः समनुवर्तिनी ।**
**भरतस्य रता धर्मे सत्यव्रतपरायणा ॥३७॥**
**यथा व्यलीकं कुरुषे न कस्यचित्**
**तथा त्वया कार्यमिदं वचो मम ॥३८॥**

(अयो० २६)

राम म्हणतो— ' हे सीते ! सकाळीं उठावें. स्नान करून देवपूजा केल्यानंतर दशरथ व कौसल्या यांना नमन करावें व इतर माझ्या आयांना– **कैकेयीलाहि-नमन करावें. भरताच्या मर्जीविरुद्ध तूं कधींहि वागूं नयेस**; कारण तो आपल्या देशाचा राजा व कुलाचा स्वामी आहे. सुशीलपणाने **राजांच्या मर्जीप्रमाणे वागलें** असतांच ते संतुष्ट होतात, नाहीतर ते रागावतात. यासाठी हे सीते ! तूं धर्मावर निष्ठा ठेऊन येथे रहा व **भरताच्या अनुकूल वागत जा**. तुझ्या हातून काहीएक वाईट कृत्य होऊं नये, याविषयीं नेहमी दक्ष रहा. ”

रामाचें हें बोलणें सीतेला मुळींच रुचलें नाही. **भरताच्या मर्जीप्रमाणे वाग.** कैकेयीने मला वनांत पाठवलें तरी तिला रोज नमस्कार कर. यांनी कांही म्हटलें तरी त्यांच्या विरुद्ध एकहीं शब्द बोलूं नकोस. राजे लोकांची मनधरणी करणेंच योग्य आहे. इत्यादि बोलणें सीतेला रुचण्यासारखें नव्हतें व कोणत्याही

स्वाभिमानी पतिव्रता स्त्रीलाहि तें रुचणार नाही. म्हणूनच रामाच्या या बोलण्यावर सीतेने जें भाषण केलें आहे, तें निरुपायाने रामालाहि बोचण्यासारखें झालें आहे. सीता रामाला असें म्हणाली—

( अयो. २७ सर्ग ) ' हे पुरुषश्रेष्ठ ! आपण हें काय बोलत आहां ? मी काय अशी क्षुद्र आहे कीं काय ? आपण असलें भाषण केलें आहे कीं तें शस्त्रास्त्र जाणणाऱ्या वीर राजपुत्राला मुळीच शोभण्यासारखें नाही. ( स. २७ । १–३ ) पुरुषरूप धारण करणारा ( **स्त्रियं पुरुषविग्रहं** । ३ ) पण आंतून स्त्रीसारखा असणारा जावई मिळाला आहे, असें जर माझ्या पित्याला समजलें, तर त्यास काय बरें वाटेल ? राम तेजस्वी आहे असें जर कोणी म्हटलें तर तें खरें नाही असें मी यापुढे म्हणेन ! मला बरोबर नेण्यांत आपणास खिन्नता कां यावी व भय कां वाटावें ? मी इतके दिवस पातिव्रत्याने तुमच्याजवळ रहात असतां, आता आपण ( **शैलूष इव मां परेभ्यो दातु इच्छसि** । ८ ) स्त्रीवर उपजीविका करणाऱ्या हीन माणसाप्रमाणे मला दुसऱ्याच्या– भरताच्या– स्वाधीन करूं इच्छात आहां काय ? ज्या– भरताच्या– मर्जीप्रमाणे वागत जा, असें तुम्ही मला या वेळीं सांगत आहां, त्याच्याचसाठीं तुमचा हा राज्याभिषेक भरतपक्षीयांनी हाणून पाडला आहे; त्याच्या मर्जीप्रमाणे मी वागूं काय ? तुम्हीच त्याच्या मर्जीप्रमाणे हवें तर वागा व त्याच्या आज्ञेत इच्छा असल्यास रहा: तें मजकडून मुळीच होणार नाही. ( **मा वशं द्विषतां गमं** । १९ ) शत्रूंच्या आधीन होऊन येथे राहणें मजकडून कधीहि होणार नाही. असें पराधीन दुःखी जीवन प्राप्त होईल तर ( **दुःखेन मम नैवास्ति जीवितं** । २० ) मला जिवंत राहणेंहि शक्य नाही [स. ३०], हें तुम्ही ध्यानांत ठेवा व याचसाठीं मला बरोबर घेऊन वनांत जा. '

या सीतेच्या भाषणांत रामाला टोचतील असे शब्द आहेत. पण ते या परिस्थितींत क्षम्य आहेत. रामाने ' **भरताच्या मर्जीप्रमाणे वाग** ' असें सामान्य अर्थाने म्हटलें होतें, तें सीतेच्या लक्ष्यांत न येतां, तिने त्याचा अर्थ भलताच मानला व ती रामावर फार रागावली व अशा वेळीं सीतेच्या तोंडून ही कठोर भाषा बाहेर पडली आहे. यासाठीच ती क्षम्य आहे. रामानेहि याच दृष्टीने

या सीतेच्या भाषणाकडे पाहिलेलें आहे.

भरतासंबंधाने केवढा गैरसमज या वेळीं राजघराण्यांतील मंडळीमध्ये कैकेयीच्या वागण्यामुळे पसरला होता, हें या सीतेच्या भाषणाने व्यक्त होत आहे. राजघराण्यांतील परस्पर व्यवहारांची ज्यांना माहिती आहे, त्यांस हें तेव्हाच समजून येणें शक्य आहे की, '**भरत**' व '**राम**' यांचे दोन पक्ष आहेत. असें मानल्यानंतर व भरतपक्षीयांनी रामाला वनवासांत घालविल्यानंतर जे जे म्हणून रामपक्षीय असतील, त्यांस भरताच्या राजवटीमध्ये सुख लाभेल, असें कधींहि वाटणार नाही. रामाच्या वनवासाच्या वेळीं इतका अविश्वास भरतासंबंधी अयोध्येंत पसरलेला होता. दशरथानेहि म्हटलें आहे की 'भरताने माझें श्राद्ध करूं नये व त्याने दिलेलें उदकही मला स्वर्गांत मिळूं नये.'

भरत जेव्हा रामाला परत बोलावण्यासाठी ससैन्य चित्रकूटावर गेला, तेव्हा भरद्वाज ऋषींनासुद्धा व लक्ष्मणालाहि भरताबद्दल प्रथम संशय असा आला की, हा भरत रामाचा नाश करण्यासाठींच वनांत सैन्यासह आलेला आहे. ही अविश्वासाची परम सीमाच होय. निष्कपट भरताबद्दल हा इतका संशयकल्लोळ सर्वांच्या मनांत पक्कें स्थान करून राहिला होता !!

अशा संशयाच्या व अविश्वासाच्या वातावरणामध्ये रामाच्या मागे सीतेचें अयोध्येमध्ये राहणें व लक्ष्मणाचें राहणें ही गोष्ट घडणें अशक्यच होतें. भरताने सीतेची पूजाच केली असती, हें खरें आहे; पण ही गोष्ट या वेळीं अयोध्येंत बोलणार कोण व कोणी सांगितली तर तीवर विश्वास तरी ठेवणार कोण? वसिष्ठांनी भरताचा निर्वाळा दिलेला आहे. पण त्याकडे वरील अविश्वासाच्या वातावरणामुळे कोणीहि यत्किंचित् सुद्धा लक्ष्य दिलें नाही.

सीता व लक्ष्मण यांनी वनांत जाण्याचा जो हट्ट धरला, त्याला हें अविश्वासाचें वातावरणच मुख्यतः कारण आहे. राजघराण्यांमधील भावाभावांच्या संबंधाने असेच गैरसमज चहूंकडे पसरलेले असतात व एक भाऊ गादीवर बसतांच दुसरे भाऊ बाहेर जाऊन राहूं लागतात. जर एका भावासाठीं दुसऱ्यास वनवास भोगण्याची पाळी आली, तर दुसरा कितीहि निरपराधी असला, तरी त्यासंबंधी

गैरविश्वासच तेथे वाढत जातो व कोणाचें सरळ भाषणही तेथे कोणास समजे-नासें होतें. हें आपण आजही पाहतों. तीच इतिहासाची पुनरावृत्ति आपण येथे पहात आहों.

भरतासंबंधी गैरविश्वास दशरथ, राम, कौसल्या, सीता व लक्ष्मण यांच्या अन्तःकरणांत कमीअधिक प्रमाणाने वसत होता, हें आपण येथे पाहिलें आहे. रामाचें बोलणें फारच सावधपणाचें असल्याने त्याच्या भाषणांत तो सर्वात कमी व्यक्त झाला असून लक्ष्मणाच्या भाषणांत तो सर्वात अधिक व्यक्त झाला आहे. सीता व लक्ष्मण यानी वनवासांत जाण्याचा जो हट्ट धरला, त्याला असें हें परस्पर अविश्वासाचें मुख्य कारण आहे. भरताबद्दल गैरसमज यांपैकी कोणाच्याही मनांत नसता, तर यांनी कदाचित् वनांत जाण्याचा हट्ट धरलाहि नसता. तसेंच दशरथाने भरतास १२ वर्षे मावळ्याकडे पाठविला, तो तिकडे पाठविला नसता व भरत जर येथे अयोध्येंतच असता, तर त्याने वेळींच आपल्या आईस प्रतिबंध करून वनवासाचें रामावरचें संकट टाळलेंहि असतें.

दशरथाने भरताला आजोळीं पाठवण्याची जी दक्षता आपल्यापरी दाखवली, त्याच कारणाने भरत दूर राहिला व योग्य वेळीं तो आपल्या आईस आवरूं शकला नाही. त्याचमुळे भरतासंबंधी असे व इतके गैरसमज वाढले व ते या तिघांस वनवासांत जाण्यास शेवटीं कारण झाले. राजकारणी पुरुष एखादी गोष्ट फार शहाणपणाने म्हणून करतात, पण तीच त्यांच्याविरुद्ध जाते, तसें येथे झालें आहे. भरतामुळे रामाच्या राज्याभिषेकामध्ये विघ्न येऊं नये, म्हणून भरतास दशरथाने १२ वर्षे अयोध्येबाहेर ठेवलें, पण त्याचमुळे योग्य वेळीं कैकेयीस आवर-णारा कोणीहि अयोध्येंत राहिला नाही, तिघांस वनवासास जावें लागलें व शेवटीं दशरथास मृत्युच्या घरीं जावें लागलें! भरत अयोध्येंत असता, तर बहुधा ही सर्व आपत्ति त्याच्या सरळपणाने टळली असती.

कोणी असें म्हणतील की, भरतही कदाचित् कैकेयीस मिळाला असता व तिचा पक्ष अधिक बळावला असता. पण भरतासंबंधाने संशय यावा, असें एकही भरताचें वाक्य सर्व रामायणांत नाही; तेव्हा भरत कैकेयीचा पक्ष बळावण्यास कारण झाला असता, असें मानण्यास मुळीच आधार नाही.

## वनवास.

राम, पाण्डव व नल यांचे वनवास आपल्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत. ज्याला त्याला 'वनवास'च करावयास लावण्याने या दण्डांतील वैविध्य नाहीसें झालें आहे. नळाचा व दमयंतीचा वनवास हा अत्यंत कष्टदायक होता, तसाच तो रामाचा व सीतेचाही कष्टतर होता. धर्मराज आदि पांडवांचा वनवास मात्र त्यांच्या राजेपणामुळेच कष्टदायक मानला पाहिजे. कारण धर्मराजाच्या पंक्तीस हजार पांचशे पान प्रत्येक दिवशीं जेवत असे. ही संख्या केव्हा केव्हा पांच सहा हजारापर्यंत पोंचली होती. ज्यांच्या पंक्तीस रोजचे पांचशे पात्र जेवतें, एवढा ज्याच्या स्वयंपाक-घरांतील प्रबंध मोठा आहे, तो त्याचा वनवास म्हणजे राम व नल यांच्याशीं तुलना करतांना वनवासच नव्हे, असें वाटतें. धर्मराजाच्या वनवासांत हजार पांचशे ऋषि पंक्तीला असत, दुपारपर्यंत यज्ञाचीं अनुष्ठानें चालत व तिसऱ्या प्रहरीं कथा, कीर्तनें, प्रवचनें व नाना शास्त्रीय विषयांचे शास्त्रार्थहि होत असत. धर्मराजाचीं १२ वर्षे हि अशीं हजार पांचशे विद्वानांच्या सहवासांतच गेलीं! धर्मराज जर आपल्या राजवाड्यांत असता, तर त्यास असा व इतका ऋषींचा सहवास लाभला नसता. हा धर्मराजाचा वनवास होय! याला काय वनवास म्हणावयाचें?

राजवाडे, राजवैभव व राज्याची उलाढाल एवढेंच काय तें धर्मराजाला या वेळीं कमी होतें. बाकी १२ हि वर्षांच्या वनवासांतील धर्मराजाचा कार्यक्रम मोठ्या थाटांतच गेलेला आहे. वनवासाचें जें दुःख नल व राम यांनी भोगलें, तसलें दुःख धर्मराजाच्या वाट्यास आलेलें नाही. एक वर्ष अज्ञातवास हा मात्र त्यास कष्टाचा वाटला असेल; पण तोही राजाच्या पंक्तीला बसून गेला आहे. राजांना राज्य नसलें तर जे कष्ट होतात, ते कष्ट फारच जाचक वाटतात. पंक्तीस हजार ब्राह्मण जेवीत आहेत, यानें त्यांस समाधान मिळणें शक्य नसतें. यामुळे धर्मराज आदि पाण्डवांस कष्ट झाले असतील. पण जेव्हा आपण राम व नल यांच्या वनवासाची तुलना करतों, तेव्हा पांडवांचा वनवास हा 'अरण्यांतील सहली-' सारखा दिसतो.

हरिश्चन्द्रालाहि थोडासा वनवास झालेला आहे व तो थोडा असला तरी अत्यंत

त्रासाचा व विपत्तीचा झालेला आहे. नलाला कोणी मदत करील तर त्यास मोठा दण्ड केला जाईल असें त्याच्या भावाने सर्वत्र घोषित केलें होतें. यामुळे नलाला फा च त्रास झाले. रामाला सर्व लोक हवी ती मदत करावयास तयार होते व रामाला मदत करणारांस कोणीहि त्रास दिला नसता. पण रामच स्वतः नागरिक भोग कोणी दिले तरी ते घेत नसे, नगरांत रहात नसे व कोणी सुग्रास अन्न आदि पदार्थ दिले तरी तो त्यांचा स्वीकार करीत नसे. रामाने स्वतः जितकें कसोशीने व धर्म म्हणून वनवासाचें व्रत पालन केलें तितकें दुसऱ्या कोणीहि केलें नसेल.

दशरथाचें किंवा भरताचें राज्य संपल्यावर दुसऱ्यांच्या राज्याजवळ पोचल्यानंतरहि जें रामाने वनवास–व्रत कसोशीने पाळलें, त्याचें आश्चर्य वाटतें! गुहाच्या भेटीच्या वेळीं किंवा सुग्रीवाच्या राजधानीजवळ रहात असताना व रावणवधानंतर बिभीषणाच्या राज्याभिषेकाच्या वेळीं रामाने नगरांत प्रवेशही केला नाहीं, नागरिक भोगांना स्पर्शहि केलेला नाही, हा रामाचा आत्मसंयम फारच विलक्षण आहे.

किष्किंधेंत किंवा लंकेंत रामाने नगरांत प्रवेश केला कीं न केला, याची वार्ताही कैकेयीस अयोध्येंत समजली नसती. अशा वेळीं भोगावयाची शिक्षा किंवा केलेल्या प्रतिज्ञेचा भोग अगदी कसोशीने करणें, हें खरोखरच आश्चर्य करण्याजोगें आत्मनियमनाचें उदाहरण आहे.

सध्या जर एखाद्या राजाने अशी वनवासाची शिक्षा एखाद्यास दिली, तर तो शिक्षा भोगणारा कदाचित् त्या राजाच्या हद्दींत वनांत राहण्याचें सोंग करील; पण दुसऱ्या राजाच्या हद्दींत जातांच तेथे नगरांत जाऊन आनंदानें कालक्रमणा करण्याचा यत्न करील व सध्याचा राष्ट्रांतरीय कायदा असें करण्यास अनुकूलही आहे. हद्दपार केलेले लोक परराष्ट्रांत स्वतंत्र नागरिक म्हणून सध्या राहूं शकतात. राम हा हद्दपार केलेला इसम असल्यामुळे सध्याच्या काळांत त्यास दुसऱ्या राज्यांत सुखाने राहण्याचा हक्क आहे, तसा तो पूर्वी कां नसावा, हें समजत नाही. पण पूर्वीचे लोक केलेली प्रतिज्ञा स्वतःच कसोशीने पाळीत असत. या कारणामुळे त्यांच्यावर दुसऱ्याचें नियंत्रण असण्याची आवश्यकता नसे.

# स्वयंशासित समाज.

'**स्वाराज्य**' व्यवस्था ती हीच होय. या व्यवस्थेमध्ये प्रत्येक मनुष्य स्वतःच्या वचनाने बांधलेला असतो व परलोकाच्या भयाने त्याचें या लोकांतील वर्तन नियंत्रित होत असतें. यामुळे रामाला एकदा सांगितलें की, यापुढे नगरांत रहावयाचें नाही, नागरिक सुखें भोगावयाचीं नाहीत, वनांत रहावयाचें व वन्य आहारच घ्यावयाचे. हें ऐकल्यानंतर रामाने तसें मान्य करून तसें करीन असें वचन दिलें म्हणजे झालें. तसें घडणारच याविषयीं सर्वांची खात्री असणार. जनतेच्या इतर सर्व व्यवहारामध्येहि पूर्वी अशीच स्वयंनियंत्रणा असे '**स्वयं-शासन**' असें याला म्हणतां येतें. यालाच '**स्वाराज्य**' असें म्हणतात. या स्वाराज्यांतील प्रत्येक मनुष्य स्वयंशासित असतो. त्याचेंच नांव स्व-राज्य होय. व्यवहार चालण्यास दुसऱ्याच्या शासनाची आवश्यकताच येथे नसते. मनुष्यांतील पारस्परिक व्यवहार स्वयंशासनाने चालले म्हणजे तेथील राज्य-शासनाला फारसा खर्चहि येत नाही. ज्याचा तो योग्य रीतीने व आपल्या मर्यादेनेच वागणार. जेथे दुसऱ्याच्या नियंत्रणाची आवश्यकता असते, तें '**परराज्य**' व जेथे स्वतःचेंच नियंत्रण स्वतःवर असतें व या स्वयंनियंत्रणानेच सर्व व्यवहार चालतात, तें '**स्व-राज्य**' होय. रामाच्या वेळीं अशी स्वयंशासित सर्व प्रजा होती. हेंच सत्य-युग होय.

सत्य-युगामध्ये सर्व लोक स्वयंशासित होते. ज्याचें त्याचें आचरण स्वतःच्या धर्मबुद्धीनेच नियंत्रित होत असे. म्हणून त्या काळच्या जनतेस अधिक सुख मिळत होतें. हळूहळू आपणावर दुसऱ्याचें नियंत्रण असलें तरच नीट आचरण घडावें, अशी अवनतिकारक विचारसरणी वाढली, त्यामुळे सात कुलपांत व सात पाहऱ्यांत ठेवलेला कैदीहि आज फरारी होतो; पण राम अगदी मोकळा असतांहि स्वतःच्या वचनाने स्वयंशासित होत असल्याने तो आपलें वचन पालन करी व त्यावर देखरेख ठेवण्याचें दुसऱ्यास कारण पडत नसे. हा दोन कालांतील फरक पाहण्यासारखा आहे.

राम व लक्ष्मण यांनी मिळून नवीन राज्यही आपल्या शौर्याच्या जोरावर

स्थापन केलें असतें. पण वचनभंग होईल, यासाठी त्यांनी मोजून १४ वर्षे नगराबाहेर काढलीं! लक्ष्मणाला हद्दपारी झालेली नव्हती. तो स्वखुषीने वनवासांत गेला होता, म्हणून तो केव्हा केव्हा नगरामध्ये जात असे. या रीतीने तो किष्किंधा व लंका या नगरींत गेला होता. पण रामाने १४ वर्षपर्यंत कोणत्याही नगरांत पाय ठेवला नाही !!! केवढा हा संयम आहे तो पहा.

पांडवांचेंहि तसेंच आहे. पांचही पांडव आपल्या शौर्याने नवें राज्य स्थापूं शकले असते. पण १२ वर्षे वनवास पनकरला, तो तसा अक्षरशः त्यांनी पाळला. सध्या राजांच्या वचनांला व संधीच्या कागदांना कचऱ्यांतील कपट्यांचीहि किंमत राहिलेली नाही व आपलें वचन मानलेंच पाहिजे असें कोणीहि समजत नाही व यालाच प्रगति व सुधारणा असेंहि मानण्यांत येत आहे ! पण यामुळे मानवी जीवनांत किती दुःखाची भर पडली आहे तें पहावें, म्हणजे वचन पालन करणें व सर्व मानव स्वयंशासित होणें, धर्माचें शासन सर्व मानवांवर होणें, हें मानवांच्या सुखास कारण होणारें कसें आहे, तें समजून येईल.

कितीहि प्रयत्न केला तरी यच्चयावत् मानव या प्राचीन अर्थाने स्वयंशासित होतील असें नाही; कारण सत्त्व, रज व तम हे तीन गुण मानवांमध्ये राहणारच. यामुळे रज व तमाचें अंशतः व्यक्तीकरण रावणासारख्यामध्ये दिसणें स्वाभाविक आहे. पण सत्त्वबहुल-समाज बनवतां येणें शक्य आहे. सध्या रजोगुण वाढीस लागला आहे; तेथें सत्त्वगुण समाजांत वाढवतां आला, तर पुनः स्वयंशासित व धर्मशासित समाज बनतां येणें शक्य आहे. श्रीरामचन्द्राच्या वेळीं असा सत्त्वबहुल समाज असल्याचें दिसत आहे. यामुळेच दशरथ व राम आपलें वचन कसोशीने पालन करीत असलेले त्या वेळीं दिसत आहेत व वचनपालनामुळे येणारी सर्व आपत्ति ते सोशीत असलेले दिसत आहेत. थोरांचीं हीं उदाहरणें सर्वकालीं जनतेस मार्गदर्शक होणारीं आहेत.

## वनवासांतील सामान.

रामाने वनवासांत आपल्याबरोबर काय काय सामान घेतलें होतें; हेंहि येथें पाहिलें पाहिजे—

ये च राज्ञो ददौ दिव्ये महात्मा वरुणः स्वयम् ।
जनकस्य महायज्ञे धनुषी रौद्रदर्शने ॥ २९ ॥
अभेद्ये कवचे दिव्ये तूणी चाक्षय्यसायकौ ।
आदित्यविमलाभौ द्वौ खड्गौ हेमपरिष्कृतौ ॥ ३० ॥
सत्कृत्य निहितं सर्वमेतदाचार्यसद्मनि ।
सर्वमायुधमादाय क्षिप्रमाव्रज लक्ष्मण ॥ ३१ ॥

( अयोध्या. ३१ )

तथैवायुधजातानि भ्रातृभ्यां कवचानि च ।
रथोपस्थे प्रविन्यस्य सचर्म कठिनं च यत् ॥ १५ ॥

( अयोध्या. ४० )

" ( १ ) जनकाच्या महायज्ञामध्ये दिसण्यांत भयंकर अशीं प्रत्यक्ष वरुणाने दिलेलीं दोन धनुष्यें, ( २ ) दोनही दिव्य अभेद्य कवचें, ( ३ ) अक्षय बाणांनी भरलेले दोनही भाते व ( ४ ) सुवर्णाने मढवलेलीं खड्गें, हीं इतकीं आयुधें आचार्यांच्या घरीं सत्कारपूर्वक ठेवलीं आहेत, तीं सर्व आयुधें घेऊन लवकर ये. " असें रामाने लक्ष्मणास सांगितलें आहे व त्याप्रमाणे लक्ष्मणाने हीं सर्व आयुधें आणलीं आहेत व हीं त्यांनी आपल्याबरोबर वनांत नेलीं होतीं. तसेंच—

सर्वाण्येवानुजानामि चीराण्येवानयन्तु मे ।
खनित्रपिटके चोभे समानयत गच्छत ॥ ४ ॥

( अयोध्या. ३७ )

' मी फक्त वल्कलें बरोबर घेणार, आणखी कांही मला नको. तसेंच कुदळ व पेटारा हीं दोन मात्र मला आणून द्या.' कुदळ ही वन्य मुळें खोदण्यासाठी व तीं साठवून ठेवण्यासाठी पेटारा. अशा दोन वस्तु रामाने बरोबर नेण्यासाठी मागून घेतल्या. कुऱ्हाडही घेतली असली पाहिजे. कारण कुऱ्हाडीने झाडें तोडून, राहण्यासाठी उत्तम झोपडी लक्ष्मणाने बनवल्याचा उल्लेख आहे व चित्रकूटाला जाण्याच्या पूर्वी नदीपार करण्यासाठी लाकडे तोडून नदीवर ताफाही त्यांनी बनवला होता, असा उल्लेख आहे.

कैकेयीने जेव्हा वल्कलें निर्लज्जपणाने आणून दिलीं, त्या वेळीं तीं रामलक्ष्मण

नेसले, पण सीतेला वल्कलें नेसण्याचा अभ्यास नसल्यानें ती वल्कलें हातांत घेऊन उभी राहिली व म्हणाली 'हें कसें बरें नेसावें ?' ही सीतेची स्थिति पाहून वसिष्ठांस फार वाईट वाटलें व ते म्हणाले—

**अथोत्तमान्याभरणानि देवि देहि स्नुषायै व्यपनीय चीरम् ॥३४॥**
**एकस्य रामस्य वने निवासस्त्वया वृतः केकयराजपुत्रि ।**
**विभूषितेयं प्रतिकर्मनित्या वसत्वरण्ये सह राघवेण ॥३५॥**
**यानैश्च मुख्यैः परिचारकैश्च सुसंवृता गच्छतु राजपुत्री ।**
**वस्त्रैश्च सर्वैः सहितैर्विधानैर्नेयं वृता ते वरसंप्रदाने ॥३६॥**

(अयोध्या. ३७)

'हे कैकेयि ! तूं एका रामालाच वनवास मागून घेतला आहेस. सीता ही स्वखुषीनें वनांत चालली आहे, म्हणून जीं वस्त्रें व आभूषणें सीता नेहमी घालते, तीं परिधान करून सीता रामाबरोबर वनांत जाऊं दे. उत्तम वाहनें, सेवक, सर्व वस्त्रें व इतर आवश्यक सामानसुमान घेऊन चांगल्या बंदोबस्तानें सीता वनांत जाऊं दे.'

याप्रमाणें सीतेविषयीं वसिष्ठानें अशी रदबदली केली. दशरथानेंहि त्यास अनुमति दिली व म्हटलें—

**वासांसि च वरार्हाणि भूषणानि महान्ति च ।**
**वर्षाण्येतानि संख्याय वैदेह्याः क्षिप्रमानय ॥ १५ ॥**

(अयोध्या. ३९)

**आरुरोह वरारोहा कृत्वालंकारमात्मनः ॥ १३ ॥**
**वनवासं हि संख्याय वासांस्याभरणानि च ॥**
**भर्तारमनुगच्छन्त्यै सीतायै श्वशुरो ददौ ॥ १४ ॥**

[ अयोध्या. ४० ]

'उत्तम वस्त्रें, बहुमूल्य भूषणें १४ वर्षें वनांत रहावयाचें आहे, हें जाणून सीतेसाठीं आणून द्या,' असें दशरथानें म्हणतांच सेवकांनी तें सर्व आणून सीतेला दिलें व सीतेनें तीं आभूषणें आपल्या शरिरावर धारण केलीं, तेव्हा ती सूर्याप्रमाणें तेथें चमकूं लागली.

चवदा वर्षांपर्यंत पुरतील इतकीं लुगडीं सीतेला मोजून दिलीं, असें येथे मोघम म्हटलें आहे; किती दिलीं त्यांची संख्या येथे दिलेली नाही. स्त्रियांना वर्षाला दोन लुगडीं तरी लागतात. वनवासांत प्रवासाची धावपळ असल्यामुळे लुगडीं फाटण्याचा संभव अधिक, यामुळे कांही अधिक लुगडींहि घेतलीं असतील. निदान वीसपंचवीस तरी लुगडीं घेतलीं असावीं.

इतक्या लुगड्यांचें वजन ३०।४० शेर होणें स्वाभाविक आहे. कुदळ व पेटारा व आयुधें यांचेंहि कांही वजन होईलच. रामाची तलवार व धनुष्य स्वतः रामानें घेतलें, तर लक्ष्मणाचीं आयुधें व हा पेटारा, कुऱ्हाड कुदळ व हीं २०।२५ वस्त्रें इतकें वजन लक्ष्मणास उचलावें लागलें आहे. सीतेकडून आपल्या सर्व लुगड्यांचें गाठोडें उचललें जाण्याचा संभव नव्हता. यासाठी जेव्हा रथ परत फिरला, त्या ठिकाणापासून लक्ष्मणानेच हा मण दीड मणाचा भार वाहिलेला आहे, हें उघड आहे. राजपुत्राची कार्यक्षमता कशी होती, तें येथे दिसत आहे.

## वनांतील भोजन.

राम वनामध्ये असतांना कोणतें अन्न खात होता, हा एक बिकट प्रश्न आहे. त्याचा विचार येथे आता केला पाहिजे. कौसल्येच्या महालांत राम गेला, तेव्हा तो आपल्या आईस म्हणाला—

**गमिष्ये दण्डकारण्यं किमनेनासनेन मे ।**
**विष्टरासनयोग्यो हि कालोऽयं मामुपस्थितः ॥ २८ ॥**
**चतुर्दश हि वर्षाणि वत्स्यामि विजने वने ।**
**कन्दमूलफलैर्जीवन् हित्वा मुनिवदामिषम् ॥ २९ ॥**
**आसेवमानो वन्यानि फलमूलैश्च वर्तयन् ॥ ३१ ॥** (अयो. २०)

सीताही वनवासांतील जेवणासंबंधी म्हणत आहे, तें हें आहे—

**फलमूलाशना नित्यं भविष्यामि न संशयः ॥ १६ ॥**
(अयोध्या० २७)

राम वनवासाचें दुःख कसें असतें, तें सीतेला समजाऊन देत असतांना म्हणत आहे—

**सुप्यते पर्णशय्यासु स्वयंभग्नासु भूतले ॥ १६ ॥**
**फलैर्वृक्षावपतितैः सीते दुःखमतो वनम् ॥ १७ ॥**
( अयोध्या. २८ )

सीता पुनः हें ऐकून रामाला म्हणते—

**आर्तवान्युपभुञ्जाना पुष्पाणि च फलानि च ।**
**मत्कृते न च ते शोको न भविष्यामि दुर्भरा ॥ १२ ॥**
( अयोध्या. ३० )

गुहाजवळ राम पोचला, तेव्हा गुहाने रामाच्या आदरसत्कारासाठी पुष्कळ खाण्यापिण्याचे पदार्थ आणले, ते पाहून राम म्हणतो—

**यत्त्विदं भवता किंचित् प्रीत्या समुपकल्पितम् ।**
**सर्वं तदनुजानामि नहि वर्ते प्रतिग्रहे ॥४३॥**
**कुशचीराजिनधरं फलमूलाशिनं च माम् ।**
**विद्धि प्रणिहितं धर्मे तापसं वनगोचरम् ॥४५॥**
( अयोध्या. ५० )

राम भरद्वाज ऋषीला म्हणतो—

**पित्रा नियुक्ता भगवन् प्रवेक्ष्याम तपोवनम् ।**
**धर्ममेवाचरिष्यामः तत्र मूलफलाशनाः ॥१६॥**
**तस्य तद्वचनं श्रुत्वा राजपुत्रस्य धीमतः ।**
**उपानयत धर्मात्मा गां अर्घ्यं उदकं ततः ॥१७॥**
**नानाविधानन्नरसान् वन्यमूलफलाश्रयान् ।**
**तेभ्यो ददौ तप्ततपा वासं चैवाभ्यकल्पयत् ॥१८॥**
( अयो० ५४ )

असा सहा ठिकाणीं निरनिराळ्या वेळीं रामाला वनांत काय काय खावें लागेल, त्याचा उल्लेख आलेला आहे व या सर्व ठिकाणीं 'कन्द, मूल, फूल व फल खाऊन ( **मुनिवत् आमिषं हित्वा** ) मुनीप्रमाणे मांस सोडून राहण्याचा उल्लेख आलेला आहे. वल्कलें व कृष्णाजिनें पांघरणें व दर्भासनावर बसणें इतका आणखी उल्लेख आहे. या कारणासाठी गुहाने आणलेलें खाद्यपेय रामाने घेतलें नाहीं.

रामाने न घेतल्यामुळे लक्ष्मण व सीता यांनीहि घेतलें नाही. नाहीतर त्यांना तें घेण्यांत नियमाप्रमाणे कांही हरकत नव्हती. सीता तर वन्य वेषामध्ये नव्हतीच व तिला वनवासाची आज्ञा झाली नसल्याने तिला तें अन्न घेतां आलें असतें; पण पतीला जें सुख मिळत नाही, तें पत्नीने भोगणें योग्य नव्हे, म्हणून सीतेनेहि तें घेतलें नाही.

रामाच्या वनांत येण्याचा वृत्तांत ऐकल्यानंतर भरद्वाज मुनींनी रामाच्या स्वागतासाठी वनांतील मुळें व फळें यांच्या योगाने तयार केलेले नाना प्रकारचे अन्नरस राम, लक्ष्मण व सीता यांस दिले. गाई, अर्घ्य व उदकही दिलें. यावरून गाईचें दूध, दही, लोणी किंवा तूप खाण्यास वनवासांत प्रत्यवाय नव्हता, असें दिसतें.

या ठिकाणीं भरद्वाजांनी रामाला मधुपर्कासाठी गाय आणून दिली, असा उल्लेख आहे. रामाने आपण तपस्वी लोकांचा धर्म आचरणार व फक्त कंदमूलफलांचा आहार करणार, असें म्हटल्यानंतर भरद्वाजांनी गाय दिली आहे. यावरूनही मधुपर्कासाठी आणलेली गाय मारण्यासाठी नसून ती फक्त दुग्धपानासाठीच होती, असें दिसतें व केवळ धारोष्ण गोदुग्धाने मधुपर्क होणें शक्य आहे, असेंहि वाटतें. जे लोक मधुपर्क हा मांसाशिवाय होतच नाही, असें समजतात, त्यांनी हा प्रसंग अवश्य पहावा. येथे '**निरामिष भोजन करणार**' असें म्हटल्यानंतर भरद्वाजांनी गाय आणून उभी केली आहे व ती कापलेली नसून, ती तशीच जिवंत परत नेली आहे. यावरून मधुपर्कासाठी मांसाची आवश्यकता नाही, असें ठरतें व केवल दुग्धग्रहणानेहि मधुपर्क होऊं शकतो, हेंहि येथे ठरतें. तात्पर्य, राम असंदिग्ध रीतीने म्हणत आहे की, आपणांस मुनिजन ज्या धर्मपद्धतीने वानप्रस्थाश्रमांत धर्माचरण करतात, तसें वनांत रहावयाचें आहे. हें जर खरें मानलें, तर मग पुढील टीकाकारांच्या वचनांची अडचण येते—

वरील ( अयोध्या कांड ५४ । १७ मधील ) '**गां**' शब्दाचा अर्थ सर्व टीकाकार '**महोक्ष**' ( म्हणजे मोठा हृष्टपुष्ट बैल ) असा करतात. स्मृतीमध्येहि मधुपर्काला गायच लिहिलेली आहे—

**गोमधुपर्कार्हो वेदाध्यायी आचार्य ऋत्विक् स्नातको राजा वा धर्मयुक्तः ।**

'गाय आणून मधुपर्क करावयाचा, तो वेदाध्यायी, आचार्य, ऋत्विज, स्नातक व धार्मिक राजा यांसाठी करावयाचा असतो.' हें स्मृतिवचन देणारेच ' गां ' चा अर्थ ' बैल ' असा करीत आहेत ! तसेंच ( अयो. २० । २९ मधील ) ' **हित्वा मुनिवत् आमिषं** ' याचा अर्थ असा पुढे दिल्याप्रमाणे ते करीत आहेत—

**तिलकटीका**— मुनिवदामिषं सूदैर्विशिष्टसंस्कारसंस्कृतं मांसम् ।

**रामायणशिरोमणिटीका**— आमिषं राजभोग्यं वस्तु हित्वा त्यक्त्वा,

**गोविंदराजटीका**— आमिष शब्देन सूदैः संस्कृतं मांसमुच्यते केवलं मांसस्वीकारस्योत्तरत्र वक्ष्यमाणत्वात् । ( २० । २९ )

' आमिष ' म्हणजे स्वयंपाकी लोकांनी विशेष मसाले वगैरे घालून अनेक संस्कार करून तयार केलेलें, राजेलोकांनी भक्षण करण्यास योग्य मांस होय. कारण रामाने वनामध्ये मांस खाल्ल्याचे अनेक उल्लेख आहेत. तेव्हा ' **आमिषं हित्वा** ' चा अर्थ ' मांसाचा संपूर्ण त्याग करून ' असा अर्थ न करतां ' राजभोग्य सुसंस्कृत मांसाचा त्याग करून ' असा अर्थ करावा, असें टीकाकारांचे म्हणणें आहे. टीकाकारांना तरी असा अर्थ करण्याचें कारण असे आहे की, पुढे अनेक ठिकाणीं रामाने हरणांची शिकार करून मांस खाल्ल्याचे अनेक उल्लेख आलेले आहेत. तेव्हा त्या वचनांशीं या वचनाची संगति लावावयाची असतांना ' आमिष ' शब्दाचा असा अर्थ करणें टीकाकारांना भागच पडलें आहे.

## वानप्रस्थाचें व्रत.

हा टीकाकारांचा अर्थ खरा धरतां येतो कीं काय, हें पाहण्यासाठी वानप्रस्थाश्रमी तापसी कसला आहार करीत असत, तें पाहिलें पाहिजे. तें मनुस्मृतीप्रमाणे पहा. राम म्हणत आहे की, ( **मुनिवत् वत्स्यामि** ) मुनीप्रमाणे मी वनांत राहीन, वन्य कन्द-मूल, फल खाईन, आमिष मांस सोडीन, वृक्षावरून पडलेली फळें खाईन, ऋतूमध्ये जीं मुळें व फळें उत्पन्न होतील, तीं खाईन; तपोवनांतील धर्म आचरीन. या म्हणण्यांत अमूक तऱ्हेचें मांस खाईन, असा उल्लेख मुळीच नाही; पण तसा अर्थ करून रामाला मांस भक्षणास मोकळीक होती, असें टीका-

कारांचें म्हणणें आहे. यासाठीं वानप्रस्थधर्मासंबंधानें स्मृतिकारांचें काय म्हणणें आहे, तें आपण पाहूं—

मनुस्मृतीच्या आठव्या अध्यायांत वानप्रस्थाश्रमी मनुष्यानें कसें वागावें, तें दिलें आहे, तें पहा—

वानप्रस्थ-आश्रम स्वीकारल्यानंतर नगरांत राहून जें भोजन करण्यांत येतें, त्या भोजनाचा त्याग करावा. ( **संत्यज्य ग्राम्यं आहारं ।' ३** ), सर्व नागरिक उपभोगाच्या वस्तूंचा त्याग करावा, इच्छा असेल तर बायकोला बरोबर घ्यावी, इच्छा नसेल तर मुलाजवळच बायको ठेवावी. अरण्यांत जावें व तेथें इंद्रियसंयम करून रहावें. अरण्यांत उगवणाऱ्या नाना प्रकारच्या धान्यांनीं, मुनींना योग्य असणाऱ्या पवित्र फळें, फुलें व शाका यांनीं पंच-यज्ञ करावे. मृगचर्म, वल्कलें व जटा यांचें धारण करावें. तीन वेळा स्नान करावें व श्मश्रु, नखें व केस वाढूं द्यावे; स्वतः खाण्यासाठीं जें मिळालें असेल, त्यांतूनच कांहीं भाग दुसऱ्यांसाठीं अर्पण करावा. वेदाध्ययन व इंद्रियदमन करावें. सर्वांशीं मित्रभावानें वागून दान द्यावें. दान घेऊं नये. हृदयांत दया धरावी. ऋतुकालीं उत्पन्न होणाऱ्या मुनींनी स्वीकार करण्यास योग्य अशा अन्नानेच सर्व यज्ञ करावे. (**वर्जयेत् मधु मांसं च । १४** ) मधु व मांस यांचा त्याग करावा. अपवित्र शाकभाज्याही घेऊं नये. नीवार आदि धान्यें, पुष्कळ दिवस टिकणाऱ्या भाज्या, फुलें व फळें घ्यावीं, पण आश्विन महिन्यापर्यंतच तीं संपवावीं; शिल्लक राहिलीं, तर तीं टाकून नवीं घ्यावीं. वस्त्रेंही याच महिन्यांत नवीं घ्यावीं. शेतकऱ्यानें पिकविलेलीं धान्यें घेऊं नयेत. नांगरलेल्या जमिनींत तयार झालेलीं फुलें व फलें घेऊं नयेत. वनांत उत्पन्न झालेलीं धान्यें शिजवून घ्यावीं किंवा ऋतूमध्ये पिकलेलीं फळें घ्यावीं. दगडानें कुटून धान्य घ्यावें. झाडावर पिकून खालीं पडलेलीं फुलें, फळें व इतर मुळें सेवन करावीं. ( मनुस्मृति ८।१-३० )

या वानप्रस्थ वैखानस तापसी वृत्तीनें राहण्याचीच पुनरावृत्ति रामाच्या वरील भाषणांत आहे. मनूचें म्हणणें व रामाचें म्हणणें जवळ जवळ एक आहे. '**वर्जयेत् मधुमांसं**' असें मनूनें म्हटलेलें आहे व रामानें '**हित्वा मुनिवद् आमिषं**' असें म्हटलें आहे. मनूनें अमूक मांस खावें व अमूक खाऊं नये, असें

म्हटलेलें नाही. तसेंच तें रामानेहि म्हटलेलें नाही. मग आमिष शब्द विशेष सुसंस्कृत मांसाचा वाचक मानावा व त्यावरून रामाला मसाले न घातलेलें मांस म्हणजे नुसतें विस्तवावर भाजलेलें मांस खावयास मोकळीक होती, असा जो टीकाकारांनी अर्थ केला आहे, तो बरोबर दिसत नाही.

रामायणांत रामानें मांस खाल्याचे अनेक उल्लेख पुढे येणार आहेत. ते सर्व जर प्रक्षिप्त न मानलें तर टीकाकारांच्या म्हणण्याप्रमाणेच अर्थ करणें भाग आहे, हें खरें आहे; पण तसें मानलें तर रामाने (मुनिवत्) मुनिप्रमाणे (तापसं) वानप्रस्थ व्रत पाळलें नाही असें होतें. मुनीप्रमाणे वैखानसी तापसी वानप्रस्थी व्रताने राम राहिला असेल, तर त्याने मांस खाल्लें नाही, असें मानून मांसाशनाचे पुढचे सर्व उल्लेख प्रक्षिप्त मानावे अथवा मांस खाल्लें, असें मानून पहिली प्रतिज्ञा चुकीची मानावी अथवा कडक वानप्रस्थाश्रमाचें तरी पालन केलें नाही, असें मानावें. कांहीतरी व कोठेतरी चूक मानल्याशिवाय गत्यंतर नाही.

वनांत असतांना रामाने मांस खाल्लें, असें जर मानलें तर (अयोध्या. १०३) २९-३०) मध्ये त्याने दशरथाचें श्राद्ध केलें, असा उल्लेख आहे. येथे वडिलांच्या नांवाने त्याने इंगुदी, बोरें व सांवे यांचे पिंड दिले आहेत व रडत असें म्हटलें आहे की, ' जें अन्न मी खात आहें, तें मी तुम्हास अर्पण करीत आहें. हें प्रिय करून घ्या.' जर रामाच्या जेवणांत मांस येत असतें, तर असे दीनपणाचे उद्गार त्याने काढले नसते. तो मांस खात असता, तर मांसमिश्रित पिठाचे पिण्ड त्याने दिले असते. मांसाहारी लोक मांसान्नाने श्राद्ध करूं शकतात. आपण स्वतः मांस खाऊन तें पितरांस न देणारा राम नव्हता.

तात्पर्य हें की, रामाने जर मांस खाल्लें असेल, तर त्याने वैखानस वानप्रस्थ तापसी व्रताचें आचरण कडकपणाने केलें नसेल अथवा तें तसें केलें नसलें, तर प्रथम केलेली प्रतिज्ञा तरी टीकाकार म्हणतात तशी ढिल्या अर्थाची असेल, असें मानल्याशिवाय रामायणांतील पूर्वापर विधानांची नीट संगति लागत नाही.

रामायणामध्ये जे उल्लेख श्रीरामाच्या मृगवधाचे येतात, ते असे आहेत—

**तौ तत्र हत्वा चतुरो महामृगान् वराहं ऋश्यं पृषतं महारुरुम् ।**
**आदाय मेध्यं त्वरितं बुभुक्षितौ वासाय काले ययतुर्वनस्पतिम् ।**

(अयोध्या. ५२।१०२)

'क्षुधेने पीडिलेल्या रामलक्ष्मणांनी तेथे ऋश्य, पृषत व महारुरु अशीं तीन जातींचीं हरिणें मारलीं. एक डुकर मारला. त्यांच्या मांसाचा सत्वर स्वीकार केला आणि ते वास्तव्य करण्यासाठी एका वृक्षासमीप गेले.' तसेंच—

**क्रोशमात्रं ततो गत्वा भ्रातरौ रामलक्ष्मणौ।**
**बहून् मेध्यान् मृगान् हत्वा चेरतुर्यमुनावने ॥**

(अयोध्या. ५५-३२)

'एक कोस पुढे जाऊन, रामलक्ष्मणांनी पुष्कळ पवित्र मृगांना मारून, यमुनेच्या वनामध्ये त्यांनी उत्तम विहार केला.'

असे पुष्कळ उल्लेख आहेत. कित्येकांच्या मताने हे सर्व उल्लेख प्रक्षिप्त आहेत व ते असें म्हणतात की, रामाने वनवासामध्ये मांस भक्षण केलें नाहीं. दुसरे असे मानतात की, रामाचा वनवास हा आश्रमधर्माप्रमाणे त्यास प्राप्त झालेला नव्हता: कारण मुलाला मुलगा झाल्यानंतर वानप्रस्थाश्रम घ्यावा, अशी स्मृति आहे. तशी वेळ रामाला अजून आलेली नव्हती. हा रामाचा वनवास केवळ वडिलांच्या आज्ञेप्रमाणे स्वीकारणें त्यास भाग पडलें. हा वनवास अकालीं झाला असल्यामुळे वानप्रस्थाचे सर्व नियम पाळणें रामाला आवश्यक नव्हतें. मुलाला मुलगा झाल्यावर योग्य वेळीं वानप्रस्थाश्रम स्वीकारला असतां त्याने शरीरशोषणाचे सर्व नियम पालन करणें योग्य झालें असतें. तसा वानप्रस्थाश्रम स्वीकार करण्यास अजून रामाला २५।३० वर्षांचा अवधि होता. यासाठी स्मृतीप्रमाणे वानप्रस्थाचा हा काळच नाही, तेव्हा ते नियम कडकपणे पालन करणें या वेळीं रामाला बंधनकारक नव्हतें. म्हणूनच रामानें मांसभक्षणादि केलें, तें नियमाविरुद्ध होत नाही, असें कांहींचें म्हणणें आहे.

येथे वाचकांसमोर दोनही पक्ष ठेवले आहेत. रामायणांतील वचनें यथाप्रसंगीं पुढे वाचकांच्या समोर येतीलच. तीं पाहून वाचकांनी या संबंधीचा अधिक विचार करावा.

# श्रीरामाची वनवासांतील दिनचर्या.

## वनवासाच्या पूर्वदिवशीं.

श्रीरामचन्द्राचा वनवास पुष्य-नक्षत्राच्या दिवशीं प्रारंभ झाला. याच दिवशीं त्याचा राज्याभिषेक करण्याचें ठरलें होतें. राज्याभिषेकासाठीं निश्चित केलेल्या दिवशींच त्याला वनवासाला जावें लागलें. या दिवसाच्या पूर्वदिवशीं अर्थात् पुनर्वसु नक्षत्राच्या दिवशीं राजा दशरथानें बोलावलेली राजपरिषद भरली. या परिषदेंत मांडलिक राजे, सरदार, महाजन व इतर सर्व सभ्य व मान्य लोक उपस्थित होते. या दिवशीं पुढे दिल्याप्रमाणें कार्यक्रम झाला—

दोन प्रहर दिवस आल्यानंतर दशरथाची राजपरिषद भरली. रामाला राज्याभिषेक करावा कीं न करावा, या विषयाची चर्चा या परिषदेंत झाली. सर्वानुमतें रामालाच राज्याभिषेक करावा, असें ठरलें. दुसऱ्या दिवशीं पुष्य नक्षत्र आहे व त्याच मुहूर्तावर हा राज्याभिषेकसमारंभ करावा, असें सर्वानुमतानें ठरलें. या परिषदेंत श्रीराम उपस्थित होता. ( या परिषदेचें काम दुपारीं सुमारें ३ वाजतां संपलें ).

राजपरिषद संपतांच श्रीराम आपल्या निवासस्थानाला गेला. तो तेथें पोंचत आहे, इतक्यांत दशरथाकडून त्यास पुनः बोलावणें आलें. रथांत बसून राम राजवाड्यांत गेला. राजा दशरथ त्यास प्रेमानें भेटला व त्यानें रामास थोडासा राजनीतीचा उपदेश करून सांगितलें की,'भरत येण्यापूर्वी तुझा राज्याभिषेकसमारंभ करून घेण्याचें मी ठरवलें आहे.' इतकें सांगून रामास जाण्यास आज्ञा दिली. राम आपल्या मंदिरांत पोंचला. ( सुमारें ४॥ वाजण्याचा समय )

वसिष्ठ ऋषि रामाच्या महालांत येऊन त्यास उपवास वगैरे करण्याचा विधि समजाऊन देतात व परत राजवाड्यांत जाऊन राजास सांगतात कीं, सर्व ठरल्याप्रमाणें केलें आहे. ( सुमारें ५॥ वाजण्याचा समय )

दशरथ राजा कैकेयीच्या महालांत रामराज्याभिषेकाचा वृत्तांत सांगण्यासाठीं जातो. तेथें कैकेयी रुसून बसलेली असते. तिची समजूत घालण्याचा यत्न राजानें

केला; पण शेवटीं सर्व यत्न अयशस्वी ठरले व कैकेयीचा हट्ट पुरवून रामास वनवासाला पाठवणें भाग पडलें. ( या वाटाघाटींत सर्व रात्र गेली व दुसरा दिवस उजाडला. )

वसिष्ठांच्या सांगण्याप्रमाणे राम व सीता यांनी रात्रीचें उपवासव्रत यथासांग केलें. दुसऱ्या दिवशीं पहाटे स्नान, संध्या व पूजा आटोपून राज्याभिषेकासाठीं निघण्याची तयारी रामाने केली. ( सूर्योदयाचा समय )

# राज्यारोहणाचा दिवस.

कैकेयीच्या महालांतून राजाचा निरोप घेऊन रामाकडे सुमंत्र येतो व त्याबरोबरच राम कैकेयीच्या महालांत जातो. तेथे त्यास समजतें की, आपणांस १४ वर्षे वनवास पत्करणें भाग आहे. या दुःखद विचारांत राजाला रात्रभर जाग्रण झालें आहे व त्यामुळे कोणाचें स्नानही झालेलें नव्हतें. ( सुमारें ९ वाजण्याचा सकाळचा समय. )

राम राजवाड्यांतून कौसल्येच्या वाड्यांत जातो. तेथे ती पूजा--अर्चा व हवन करीत व रामाचें अभीष्टचिंतन करीत बसलेली होती. भेट होतांच रामाने वनवासाची तयारी करण्याची वेळ आल्याचें सांगितलें, तेव्हा कौसल्या मूर्च्छित झाली. पुढे लक्ष्मण, कौसल्या व राम यांचीं पुष्कळ बोलणीं झालीं व कौसल्येने रामाचें स्वस्त्ययन केलें व वनांत जाण्यास अनुमति दिली. रामाने येथेच भोजन केलें. ( सुमारें दुपारचा ११ वाजण्याचा समय. )

तेथून राम आपल्या मंदिरांत जातो. सीतेला वनवासासाठी जाण्याचें वृत्त सांगतो. ती बरोबर येण्याचा हट्ट धरते व शेवटीं राम, सीता व लक्ष्मण या तिघांनी वनवासांत जावयाचें ठरतें. ( सुमारें १२ वाजण्याचा दुपारचा वेळ. )

राम आपली सर्व संपत्ति ब्राह्मणांस वाटतो. सुयज्ञ आदि ब्राह्मण माध्यान्हसंध्या करून रामाजवळ येतात व रामाने दिलेली अगणित धनसंपत्ति घेऊन जातात. ( हें सर्व दुपारीं ३ वाजेपर्यंत संपतें. )

राम, सीता, व लक्ष्मण दशरथाची आज्ञा घेण्यासाठी कैकेयीच्या महालांत

येतात. वसिष्ठ, सुमंत्र, सिद्धार्थ वगैरेंचीं कैकेयीच्या निषेधपर भाषणें होतात; पण कैकेयीवर त्यांचा कांहीं परिणाम होत नाहीं व शेवटीं राम, लक्ष्मण व सीता रथांत बसून वनांत जातात. ( सुमारें ५ वाजण्याचा संध्याकाळचा समय. )

या दिवशीं राजवाड्यांत कोणी जेवल्याचें दिसत नाहीं. दशरथानें व कैकेयीनें तर स्नानहीं केलें नव्हतें.

# वनवासाचा प्रारंभ.

## पहिला दिवस.

### ( संध्याकाळ व रात्र )

राम, लक्ष्मण व सीता हीं तिघे रथांत बसून वनवासाला निघालीं. **तमसा** नदीवर पोंचतांच ( **इयमद्य निशा पूर्वा** । ४६-२ ) रात्र पडली. म्हणून त्यांनी तेथेच तमसा-तीरावर मुक्काम केला. नुसतें पाणीच पिऊन पर्णशय्येवर सीता व राम निजले. ( ४६ । १०-१५ ) लक्ष्मण व सुमंत्र यांनी ती वनवासाची पहिली रात्र जागून काढली.

**( पहाट झाली )** मोठ्या पहाटेस उठून, बरोबर आलेल्या प्रजाजनांस चुकविण्यासाठी, प्रथम रथ उलटा उत्तरेकडे अयोध्येकडे तोंड करून चालवला व मग पुनः वळवून ते वनाच्या मार्गास लागले. ( ४६ । ३०-३१ )

## दुसरा दिवस.

मोठ्या पहाटेस उठून इतर लोक उठण्यापूर्वीच ते पुष्कळ अंतरावर पोंचले. इकडे बरोबर आलेले लोक उठून पाहतात तों राम नाहीं. तेव्हां दुःखानें ते परत फिरतात. पुढे रामानें स्नानसंध्या करून कोसल देश सोडला व पुढे बराच प्रवास केला. ( ४९ । २-८ ) **वेदश्रुति, गोमती, स्यंदिका** या नद्या उतरून रथ **गंगानदी**च्या तीरावर पोंचला. ( ५० । १२ ) येथे गुहाची भेट झाली. **दुसरी रात्र** गंगातीरावर काढली. राम या रात्रींहि नुसतें पाणीच प्याला. राम व सीता पर्णशय्येवर निजतात. गुह, लक्ष्मण व इतर लोक जागत राहतात.

## तिसरा दिवस.

तिसऱ्या दिवशीं सूर्योदयीं स्नानसंध्या करून नौकेंत बसून गंगापार केली. रथासह सुमंत्राला परत अयोध्येंत जावयास रामाने आज्ञा दिली; पण सुमंत्र राम चित्रकूटास पोचल्याचें कळेपर्यंत येथेच थांबला होता. गंगापार केल्यानंतर ( ५२।१-१७; ७३-७६ ) लक्ष्मण, सीता व राम हीं तिघें पायीं चालूं लागलीं. वत्सदेशाला हीं सर्व पोचलीं. ( ५२ । १०१ ) येथून पुढे अरण्य लागलें. निर्जन-वनांत या तिघांची हीच **पहिली रात्र** होय. ( ५३ । २-३ )

## चवथा दिवस.

सूर्य उगवतांच स्नानसंध्या करून हे तिघे पुढे निघाले. प्रयागला भरद्वाजांचा आश्रम दिसला. तेथे मुक्काम केला. भरद्वाजांनी आदरातिथ्य केलें व आपल्याच आश्रमांत १४ वर्षे रहा, असें आग्रहानें म्हटलें; पण अयोध्या जवळ असल्याने येथे प्रजाजन येतील, म्हणून येथे राहणें योग्य नव्हे, असें रामाने सांगितलें, तेव्हा 'येथून १० कोसांवर चित्रकूट पर्वत आहे. तेथे पुष्कळ तपस्वी राहतात. तेथे जाऊन रहा,' असें भरद्वाजांनी सांगितले ( ५४।२२-२५ )

ही रात्र भरद्वाजाश्रमांतच घालविली.

## पांचवा दिवस.

भरद्वाज ऋषि रामाला बरेच दूरपर्यंत पोचवावयास गेले व पुढचा मार्ग दाखवून परत आश्रमांत आले. कालिंदी म्हणजे यमुना नदीवर राम, लक्ष्मण व सीता पोचल्यानंतर त्यांनी लाकडांचा ताफा केला व त्यावर बसून ते परतीरावर पोचले व तेथून पुढे एकदोन मुक्कामांनी चित्रकूटावर जाऊन पोचले.

पहिले दोन दिवस राम, लक्ष्मण रथांतून गेले असून, पुढचे ३।४ दिवस पायीं गेले आहेत. रामायणाचे १० कोस चालावयास सीतेला तीन दिवस लागले असावे. भरद्वाजांच्या आश्रमापासून चित्रकूट सीतेच्या चालीने तीनचार दिवसांच्या रस्त्यावर असावा. अयोध्येपासून चित्रकूट सुमारें १०० मैल असेल, असें वाटतें.

# कांही स्थलांचे निर्देश.

**तमसा** नदी— अयोध्येच्या दक्षिणेस सरयू व गोमतीच्या मध्ये वाहणारी नदी.

**वेदश्रुती, वेदश्रुती** नदी— तमसा नदी, हिला सध्या तानसा असें म्हणतात.

**गोमती** नदी— गोमती नदी, या नदीवरच सध्या लखनौ शहर वसलें आहे.

**स्यंदिका** नदी— सध्या सई असें हिला नांव आहे. गोमती व गंगा नद्यांच्य मध्यभागीं कोसल देशाच्या दक्षिण-सीमेवर ही नदी आहे.

**चित्रकूट**पर्वत- चित्रकूट स्टेशनजवळच हा पर्वत आहे. सध्या या पर्वताला कामतानाथ-गिरि असें नांव आहे.

**केकय**देश— झेलम व चिनाब या दोन नद्यांच्या मधला प्रदेश.

**कोसल**देश— सध्या याला औध (किंवा अवध) प्रांत म्हणतात.

**दक्षिणकोसल**— गोंडवन जिल्हा.

**प्रयाग**— गंगायमुना-संगमावरचें क्षेत्र. भरद्वाजाश्रम.

**वत्स**देश— प्रयागच्या पश्चिमेचा प्रांत.

यांचें वर्णन या भागांत आलेलें आहे.

वनवास किंवा निर्जन वनांतील वास्तव्य, याचा अर्थ जेथे कोणीहि माणूस रहात नाही, असा प्रदेश असा समजण्याचें कारण नाही. या अरण्यांत ठिक-ठिकाणीं ऋषींचे आश्रम होते; तेथे अध्ययन करणारे ऋषिकुमार व अध्यापन करणारे तत्त्वज्ञानी ऋषि यांचें वास्तव्य होतें. चित्रकूटापर्यंत असे अनेक आश्रम होते. गाईंचीं खिल्लारें येथे होतीं. गोमती नदीच्या दुतर्फा तर फारच गाई होत्या. ऋषींच्या आश्रमामध्ये दूधदुभतें व खाण्याचे पदार्थ भरपूर असत. चित्रकूट-पर्वतावर तर ऋषींचे अनेक आश्रम होते. हा पर्वत तपस्वी लोकांनी गजबज-लेलाच होता. या दृष्टीने चित्रकूटाचें वर्णन काळजीपूर्वक पाहण्यासारखें आहे. पहा—

**महर्षिसेवितः पुण्यः पर्वतः शुभदर्शनः ॥ २८ ॥**
**ऋषयस्तत्र बहवो विहृत्य शरदां शतम् ।**
**तपसा दिवमारूढाः कपालशिरसा सह ॥ ३१ ॥**

फलमूलफलोपेतं चित्रकूटं व्रजेति ह ॥ ३८ ॥
पुण्यश्च रमणीयश्च बहुमूलफलायुतः ॥ ४० ॥
सरित्प्रस्रवणप्रस्थान् दरीकन्दरनिर्झरान् ।
चरतः सीतया सार्धं नन्दिष्यति मनस्तव ॥ ४२ ॥
( अयोध्या. ५४ )

भरद्वाज ऋषि म्हणतात— ' हे रामा ! चित्रकूटावर पुष्कळ ऋषि, मुनि व तापसी तप करीत आहेत. त्या पर्वतावर फळें व मुळें विपुल आहेत. जलप्रवाह रमणीय आहेत. सर्वत्र पुण्य व रमणीय वायुमंडल आहे. सीतेसह तूं तेथे हिंडूं लागलास, म्हणजे तुझें मन तेथे रमून जाईल. '

यावरून चित्रकूट पर्वतावर राहणें हें रमणीयतेच्या दृष्टीनेहि चित्ताकर्षक आहे. ऋषींचा सहवास असल्याने मन उच्च विचारांनी भरून जाणें शक्य आहे. दुसरी कोणतीहि चिंता नाही. भरपूर फळें व मुळें असल्यामुळे व विपुल शाकभाज्या निर्माण होत असल्याने हवें तितकें शुद्ध सात्त्विक अन्न मिळण्याची सोय आहे. उन्हाळ्यांत उन्हाचा ताप नाही. शीत कालांत बेताची थंडी, हवा निरोगी, अशी सर्व प्रकारें येथे सोय आहे.

जसे नागरिक ऐषआराम येथे नाहीत, तसेंच राज्यांतील ईर्ष्याद्वेषही नाहीत. कैकेयीचे कठोर बोल ऐकावयास नकोत व अजीर्ण होईपर्यंत मिष्टान्नेंही मिळावयाचीं नाहींत. शरीरपोषणाचें बेताची पुष्टि करणारें अन्न हवें तितकें मिळतें. शुद्ध विचार सतत चालावे, अशी सोय येथे आहे.

चित्रकूटावरील वनवास हा शरीर, मन व बुद्धि यांचें सात्त्विक पोषण करणारा होता, असें समजण्यास हरकत नाही. हा राजकुमाराला फार त्रासाचा वाटला, तरी मनुष्याच्या गरजा भागवण्याच्या दृष्टीने पाहिलें असतां नराचा नारायण होण्यास सहाय्यक होणारा होता, असें म्हणावयास कांहीं प्रत्यवाय न.

पुढच्या कष्टतर वनवासाचा विचार योग्य प्रसंगीं पुढे येईलच.

या अयोध्याकांडांतील कांहीं विचारांचा परामर्श उत्तरभागांतील स लोचनेंत वाचकांनी पहावा.

